# प्रस्तावना

आठ–नऊ वर्षांपूर्वीची गोष्ट. श्री. सुभाषचंद्र अक्कोळे यांनी 'जसोधररास' या ग्रंथाचे संपादन केले होते. तो प्रसिद्ध करताना मी त्या ग्रंथाला प्रस्तावना लिहावी अशी त्यांनी मला विनंती केली. त्यावेळी मी ती आनंदाने स्वीकारली आणि जसोधररासाचा अभ्यास करून एक विस्तृत प्रस्तावना लिहिली. प्राचीन मराठी काव्याच्या क्षेत्रात काम करणाऱ्या तरुणांना प्रोत्साहन मिळावे हा तर माझा हेतू होताच पण याशिवाय जैन साहित्याच्या संशोधनात, संपादनात व प्रकाशनात रुची असणाऱ्या श्री. अक्कोळे यांच्या प्रयत्नाचे स्वागत करून त्यांना मार्गदर्शन करावे हाही माझा हेतू होता. तो बऱ्याच अंशी साध्य झालेला आहे असे म्हणावयास हरकत नाही. गेल्या नऊ वर्षांत श्री. अक्कोळे यांनी आपले संशोधनकार्य सुरू ठेवले. पंडित मेघराज विरचित 'जसोधररास' या काव्यानंतर त्यांनी पंडित सुरिजनविरचित 'परमहंसकथा' आणि ब्रह्मदासविरचित 'श्रेणिकचरित्र' ह्या काव्यांचे सुंदर संपादन केले. त्यांनी अनेक संग्रहालयांना भेटी देऊन तेथील हस्तलिखिते तपासली. त्यातील माहिती गोळा केली आणि मराठीतील जैन साहित्यावर एक प्रबंध लिहिला. त्याच्या गुणवत्तेनुसार पुणे विद्यापीठाने त्यांना पीएच्. डी. ही पदवी अर्पण केली. प्रा. अक्कोळे हे डॉ. अक्कोळे झाले हे त्यांच्या या क्षेत्रातील प्रगतीचे प्रगट चिन्ह होय. त्यांचा तो प्रबंध आज पुस्तकरूपाने प्रसिद्ध होत आहे. ह्या ग्रंथालाही मी प्रस्तावना लिहावी अशी इच्छा डॉ. अक्कोळे यांनी व्यक्त केली आणि ती मी तितक्याच आनंदाने स्वीकारली. याचे कारण त्यांनी केलेल्या प्रयत्नांचे कौतुक करावे आणि त्यांच्याकडून यापुढे याहीपेक्षा अधिक भरीव कार्य व्हावे अशी माझी इच्छा आहे, हे होय. त्यादृष्टीने या ग्रंथाच्या प्रस्तावनेदाखल हे चार शब्द लिहीत आहे.

एका दृष्टीने पाहिले तर श्री. अक्कोळे यांच्या या ग्रंथाला आता प्रस्तावनेची गरज आहे असे नाही. कारण आपल्या संशोधन, संपादन व लेखन कार्यांने ते मराठी वाचकांना चांगले परिचित झालेले आहेत. शिवाय त्यांच्या या प्रबंधाच्या गुणवत्तेवर पुणे विद्यापीठाने त्यांना पीएच्. डी. ही पदवी देऊन त्यांच्या कार्यावर विद्वन्मान्यतेचा शिक्कामोर्तब केला. त्यामुळेही ते मराठीच्या अभ्यासकांना विशेष परिचित झालेले आहेत. तरीही या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याची त्यांची विनंती मी मान्य

केली याचे कारण वर दिलेल्या स्पष्टीकरणावरून वाचकांच्या लक्षात येईल अशी अपेक्षा करतो.

प्रस्तुत ग्रंथात डॉ. अक्कोळे यांनी 'प्राचीन मराठी जैन साहित्याचा इतिहास' मराठी वाचकांसमोर सादर केला आहे. या प्राचीन मराठीची व्याप्ती मराठीच्या प्रारंभकाळापासून तो इ. स. १८५० पर्यंत त्यांनी गृहीत धरलेली आहे. सामान्यतः प्राचीन मराठीची कालमर्यादा इ. स. १८१८ पर्यंत मानण्यात येते. कारण इ. स. १८१८ मध्ये इंग्रजांचे राज्य महाराष्ट्रात स्थापन झाल्यानंतर मराठी जीवनाला एक नवीन वळण लागले. आधुनिक शिक्षणाचा ओनामा होऊन मायेच्या क्षेत्रात इंग्रजी आणि तिच्यातील साहित्याचा प्रवेश होऊ लागला. धर्म, समाजकारण, राजकारण, इतिहास इत्यादी शाखांना विचाराची आणि विकासाची नवीन दिशा मिळाली. साहित्य सम्राट् नरसिंह चिंतामण केळकर यांनी म्हटल्याप्रमाणे मराठी जनतेला आणि अर्थात वाङ्मयसेवकांना नवी दृष्टी प्राप्त होऊन त्यातून नवीन सृष्टी निर्माण होऊ लागली. वाङ्मयक्षेत्रात १८१८ पूर्वीच्या दृष्टीहून या दृष्टीचे स्वरूप अनेक बाबतीत अगदी वेगळे आहे आणि म्हणूनच आधुनिक वाङ्मयाचा प्रारंभकाळ स्थूलमानाने १८१८ पासून समजण्यात येतो. असे असूनही ही कालमर्यादा डॉ. अक्कोळे यांनी १८५० पर्यंत लांबविली. याचे कारण त्यांच्या दृष्टीने या काळापर्यंत जुन्याच वळणाचे जैन साहित्य निर्माण होत होते. हे खरे असले तरी १८१८ ते १८५० या कालावधीत जैन ग्रंथकारांनी नवीन दृष्टिकोनातून काही लिहिले नसेलच असे संभवत नाही. आधुनिक मराठी वाङ्मयाचा परिपोष करणाऱ्या काही साहित्यिकात असे जैन साहित्यिक कोणकोण आहेत याचा शोध घेतला पाहिजे. तसे पाहिले तर जैनेतर मराठी वाङ्मयात देखील १८५० नंतर काय पण त्यानंतरही जुन्या वळणाची रचना दीर्घकाळपर्यंत होत राहिली आणि अजूनही होत आहे. उदाहरण म्हणून देवनाथ, दयाळनाथ, माहूरचे विष्णुकवी, संतकवी दासगणू इत्यादींकडे अंगुलीनिर्देश करता येईल. पण म्हणून प्राचीन मराठीची कालमर्यादा येथवर लांबविणे खरोखर योग्य होईल काय याचा विचार झाला पाहिजे. इ. स. १८१८ पासून महाराष्ट्रात कालचक्राच्या गतीमुळे एक नवीन युग निर्माण झाले असूनही त्यापासून जैन समाज अलिप्त राहिला असे फार तर म्हणता येईल. त्यावरून त्यांची जीवनदृष्टी व्यक्त होईल, पण केवळ या दृष्टीमुळे प्राचीन वाङ्मयाची कालमर्यादा वाढविणे इष्ट होणार नाही असे मला वाटते.

किंबहुना या निमित्ताने एक विचार माझ्या मनात येतो तो असा की मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे केवळ प्राचीन व अर्वाचीन असे दोनच कालखंड न पाडता, प्राचीन, मध्ययुगीन आणि अर्वाचीन असे तीन कालखंड पाडण्याची आवश्यकता आहे. मराठी साहित्याच्या प्रारंभापासून तो शिवकालापर्यंत प्राचीन काल, शिवाजी महाराजांच्या अंतापासून तो पेशवाईच्या अखेरपर्यंतचा दुसरा

म्हणजे मध्ययुगीन काल आणि इंग्रजी राज्याच्या आरंभापासून तो त्याच्या अंतापर्यंतचा तिसरा म्हणजे आधुनिक काल असे तीन कालखंड मानणे अधिक इष्ट होईल. देशकालपरिस्थितीप्रमाणे वाङ्मयात देखील परिवर्तन होत असते. वाङ्मय हे सामान्यतः त्या त्या कालाचे प्रातिनिधिक असते त्यात आपल्या काळातील समाजाच्या जीवनाचे प्रतिबिंब पडलेले असते ही गोष्ट खरी असली तर अशा रीतीने या कालखंडाची पुन्हा विभागणी करणे आवश्यक आहे.

तथापि डॉ. अक्कोळे यांनी ही कालमर्यादा १८५० पर्यंत गृहीत धरून आपल्या या ग्रंथात जैन साहित्याची तोंडओळख करून दिलेली आहे ही वस्तुस्थिती आहे. त्यात त्यांनी केवळ या काळातील लेखक व त्यांचे साहित्य यांचीच ओळख करून दिली आहे असे नाही तर या साहित्यातून प्रगट झालेले जैन तत्त्वज्ञान, त्यांचा आचारधर्म, त्यात आलेली ऐतिहासिक व भौगोलिक माहिती यांचाही परिचय करून दिलेला आहे आणि शेवटी या जैन साहित्याचे वाङ्मयीन दृष्टीने परिशीलन करून त्याचे मूल्यमापन केले आहे. यावरून दिसून येईल की ह्या ग्रंथाचे स्वरूप केवळ ' जैन साहित्याच्या इतिहासा 'पुरतेच मर्यादित नसून त्याहून थोडे निराळे आहे. तथापि जैन साहित्याचा कालानुक्रमे दिलेला इतिहास हा या ग्रंथाचा मूळ गाभा होय ही गोष्ट विसरता कामा नये. या साहित्यात प्रतिबिंबित झालेले जैन धर्माचे तत्त्वज्ञान, त्यातील आचारविचार एका दृष्टीने आवश्यक मानले तरी त्यातील ऐतिहासिक आणि भौगोलिक माहिती स्वतंत्ररीतीने देणे कितपत आवश्यक होते ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे. यापेक्षा त्यांनी जैन ग्रंथांतून दिसून येणाऱ्या मराठी भाषेचे स्वरूप, तिची वैशिष्ट्ये इत्यादी गोष्टींचा अधिक सूक्ष्म दृष्टीने सविस्तर विचार केला असता तर तो अधिक उपयुक्त झाला असता. मराठी भाषेच्या स्वरूपासंबंधी यात मुळीच विचार झालेला नाही असे मात्र नाही. तो आहे पण फार त्रोटक आहे. ऐतिहासिक व भौगोलिक माहितीऐवजी हा भाग थोड्या विस्ताराने लिहिला गेला असता तर सर्व मराठी भाषिकांना आणि विशेषतः जैन साहित्याच्या अभ्यासकांना तो विशेष उपयोगी ठरला असता असे वाटते.

असे असले तरी हा ग्रंथ उपयुक्त झाला असून त्यामुळे मराठीच्या वाङ्मयेतिहास ग्रंथांत महत्त्वाची आणि मोलाची भर पडलेली आहे यात शंका नाही. मी यापूर्वी अनेकदा म्हटल्याप्रमाणे मराठीतील जैन साहित्य हे आतापर्यंत मराठी साहित्यातील एक उपेक्षित दालन राहिलेले आहे. या ग्रंथाच्या प्रकाशनाने ही उपेक्षा दूर होण्यास चांगली मदत होईल. हे दालन आतापर्यंत उपेक्षित होते याचे कारण मराठी साहित्याकडे पाहण्याची आमची दृष्टी हे होय आणि म्हणूनच की काय अन्यधर्मियांनी निर्माण केलेल्या मराठी साहित्याला आम्ही आमच्या साहित्य ग्रंथांत मोकळ्या मनाने स्थान देत नाही. एरवी आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या जैन वाङ्मयाच्या अनेक प्राचीन ग्रंथांची उपेक्षा होण्यास काही कारण नव्हते.

वर्धा येथून जैन काव्याचे अनेक प्राचीन ग्रंथ फार वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेले आहेत. गुणकीर्ति या कवीचे ' पद्मपुराण ' इ. स. १९०२ मध्ये मुंबई येथे कर्नाटक प्रेसमध्ये पाच भागात छापून प्रसिद्ध झालेले आहे. या ग्रंथाच्या १५००० ओव्या आहेत. पण ' महाराष्ट्र सारस्वता'त त्याचा उल्लेख आढळत नाही. हा ग्रंथ वर्धा येथून प्रसिद्ध झालेला होता. तेथूनच जनार्दन कवीचे ' श्रेणिकचरित्र ' इ.स. १९०४ मध्ये प्रसिद्ध झालेले आहे. त्याचाही नामनिर्देश महाराष्ट्र सारस्वतात नाही. महीचंद्राचे 'आदिनाथ पुराण'देखील नंतर वर्धा येथून प्रसिद्ध झालेले होते. याचाही नामनिर्देश ' महाराष्ट्र सारस्वता' त आढळत नाही. हे ग्रंथ प्रसिद्ध झालेले असूनही त्यांना महाराष्ट्र सारस्वतात स्थान न देण्याचे कारण केवळ माहितीचा अभाव हे असेल की सारस्वतकारांचा विशिष्ट दृष्टिकोन असेल हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कोणावर दोषारोप न करता आमच्या साहित्याच्या इतिहासातील ही उणीव नमूद करणे भाग आहे. डॉ. अक्कोळे यांच्या या ग्रंथाने ती विशेषेकरून मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांसमोर अप्रत्यक्षपणे प्रगट झाली आहे. तथापी डॉ. विद्याधर जोहरापूरकर, डॉ. अक्कोळे, डॉ. आवळीकर इत्यादि संशोधकांच्या प्रयत्नामुळे ही उणीव आता भरून येऊ लागली आहे. 'महाराष्ट्र सारस्वताचे पुरवणीकार डॉ. तुळपुळे यांनी आपल्या पुरवणीत वरील संशोधकांच्या संशोधनाच्या साह्याने अनेक जैन कवींच्या काव्यांचा आढावा घेतला आहे हे याचे प्रत्यक्ष गमक होय.

या बाबतीत एक गोष्ट माझ्या मनाला नेहमी खटकते तिचा निर्देश या ठिकाणी करणे अप्रस्तुत होणार नाही. प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास कै. भावे यांनी प्रथम विस्तृतपणे लिहिला. त्यांच्या मृत्यूनंतर झालेल्या संशोधनाचा आधार घेऊन डॉ. तुळपुळे यांनी आपली पुरवणी त्याला जोडली. या एका ग्रंथाशिवाय प्राचीन वाङ्मयाचा संपूर्ण इतिहास अद्यापतरी कोणी लिहिलेला नाही. दुसरा महत्त्वाचा प्रयत्न कै. ल. रा. पांगारकर यांचा होय. मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे तीन खंड प्रसिद्ध करून रामदासअखेरपर्यंत त्यांनी मजल गाठली आहे. त्यांच्यासारख्या प्राचीन मराठी साहित्यात मुरलेल्या रसिक विद्वानांकडून या इतिहासाचे संपूर्ण लेखन होऊ शकले नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय. अलीकडे डॉ. भ. ना. देशपांडे यांनी अशाच प्रकारे प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्याला प्रारंभ करून त्याचा पूर्वार्ध नुकताच दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलेला आहे.' भावे, तुळपुळे आणि पांगारकर या तिघांनी आपले इतिहास लिहिताना मुसलमान कवींनी लिहिलेले ग्रंथ, ख्रिस्ती कवींनी लिहिलेले ग्रंथ, महानुभावांचे साहित्य असे निरनिराळे भेद कल्पून काही प्रकरणे किंवा परिच्छेद लिहिलेले आहे. ही पद्धती कितपत योग्य आहे याचा विचार झाला पाहिजे. महाराष्ट्रातील जनसमाजाची भाषा मराठी, तिच्यातून निर्माण झालेले वाङ्मय ते सर्व ' मराठी वाङ्मय. ' मग ते कोणत्याही पंथियांनी किंवा धर्मानुयायांनी लिहिलेले असो, हा विचार आमच्या मनात का येत नाही ? ' मराठी असे आमुची मायबोली जरी

भिन्नधर्मानुयायी असू । सहिष्णुत्व अंगी पुरे बाणलेले हिच्या एक ताटात आम्ही असू.' ह्या केवळ शब्दातून व्यक्त झालेल्या आमच्या भावनांचे प्रतिबिंब मराठी साहित्याच्या इतिहासात आम्हाला का आढळून येऊ नये ? मराठी साहित्याचा इतिहास लिहिताना सर्व लेखक हे मराठी लेखक आहेत, महाराष्ट्र सारस्वताचे उपासक आहेत, ही दृष्टी समोर ठेऊन त्या त्या कालखंडातील साहित्याचा विचार आम्ही का करू नये ? हिंदू लेखकांचे साहित्य, मुसलमान लेखकांचे साहित्य, जैन मराठी लेखकांचे साहित्य असे भेद करून लिहिण्याची खरोखरच काही आवश्यकता आहे काय ? मराठी भाषिक जनतेच्या एकात्मतेच्या दृष्टीने अशी विभागणी करणे महाराष्ट्राच्या, नव्हे राष्ट्राच्या हिताच्या दृष्टीने योग्य होईल काय, याचा आमच्या वाङ्मयेतिहासकारांनी, विशेषतः प्राचीन वाङ्मयाच्या इतिहासलेखकांनी नीट विचार केला पाहिजे. आधुनिक मराठी वाङ्मयाचे विवेचन करताना बहुधा असे झालेले आढळते. हीच गोष्ट प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासात का आढळू नये ? मला वाटते की यापुढील वाङ्मयेतिहासाच्या लेखकांनी या गोष्टींचा विचार करून आपला दृष्टिकोन व धोरण काळजीपूर्वक आखले पाहिजे. एखाद्या विशिष्ट पंथातील लेखकांनी लिहिलेल्या वाङ्मयाचा स्वतंत्र रीतीने आढावा घेणे ही गोष्ट अर्थात वेगळी, परंतु संपूर्ण प्राचीन मराठी साहित्याचा आढावा घेताना किंवा विवेचन करताना काही कालखंड निश्चित करून इतिहासलेखन करणे मराठी भाषेच्या हिताच्या दृष्टीने अधिक उपयुक्त होईल. धर्म, पंथ किंवा समाज यांनी लिहिलेल्या साहित्याचे स्वतंत्र गट करपून संपूर्ण साहित्याचा इतिहास लिहिणे हे निश्चितच आम्हाला घातक ठरणारे आहे.

प्रस्तुत ग्रंथात डॉ. भक्कोळे यांनी लहानमोठ्या ५४ ग्रंथाकारांची आणि त्यांच्या ग्रंथांची माहिती करून दिलेली आहे. आरत्या, पदे, अभंग, फाग, कायको अशासारख्या तुटक रचना सोडल्या तरी २५–३० जैन कवींची आणि त्यांच्या रचनांची माहिती उपलब्ध झाल्यामुळे मराठी साहित्याचे आतापर्यंत अज्ञात असलेले एक फार मोठे दालन खुले झालेले आहे ही मराठी भाषिकांच्या दृष्टीने अभिमानाची गोष्ट होय. यातील काही थोडे ग्रंथ आतापर्यंत छापून प्रसिद्ध झालेले असले तरी अनेक अप्रसिद्ध ग्रंथ लवकर प्रसिद्ध होऊन अभ्यासकांच्या हातात पडायला पाहिजेत. हे कार्य अलीकडे स्वतः डॉ. भक्कोळे, डॉ. विद्याधर जोहरापूरकर आदि व्यक्तींनी गेल्या १०–१५ वर्षांत सुरू केले आहे. त्यात प्रा. जोहरापूरकर यांचा वाटा फार मोठा आहे. डॉ. भक्कोळे यांनी प्रसिद्ध केलेल्या 'जसोधररास' या ग्रंथातच प्रा. जोहरापूरकर यांनी संपादन केलेले नागो:आयाचे 'जसोधर महाराय चरित्र' अंतर्भूत झालेले आहे. याशिवाय जिनसागर यांची 'समग्र कविता', गुणकीर्ति-विरचित 'धर्मामृत', 'पद्मावतीस्तक्र कथासार', 'तिलकमंजरी कथासार' इत्यादी ग्रंथ चांगल्यारीतीने संपादून त्यांनी प्रकाशात आणले आहेत. खुद्द डॉ. भक्कोळे यांनी पंडित

मेघराजविरचित ' जसोधररास ' या काव्याव्यतिरिक्त पंडित सुरिजित-विरचित ' परमहंस कथा ', आणि ब्रह्मगुणदासविरचित ' श्रेणिकचरित्र ' इत्यादी ग्रंथ प्रसिद्ध करून प्रकाशात आणले आहेत, याचा निर्देश मी प्रारंभीच केलेला आहे. याशिवाय सोलापूर येथील जीवराज जैन ग्रंथमालेतून आणखीही काही ग्रंथ प्रसिद्ध झालेले आहेत. जैन ग्रंथांच्या संपादनाचे आणि प्रसिद्धीचे केवढेतरी मोठे कार्य अजून राहिलेले आहे. ते जसजसे प्रगत होईल तसतसे मराठी साहित्याचे भांडार अधिकाधिक समृद्ध होत राहील.

डॉ. अक्कोळे यांनी ज्या ग्रंथकारांची आणि त्यांच्या ग्रंथांची माहिती दिलेली आहे तेवढेच जैन मराठी वाङ्मय आतापर्यंत लिहिले गेलेले आहे असे मात्र म्हणता येणार नाही. उपलब्ध वाङ्मयाशिवाय अजूनही अनुपलब्ध वाङ्मय बरेच असण्याचा संभव आहे. ' १५ व्या शतकापर्यंत जैन ग्रंथकाराचे मराठीकडे खास लक्ष गेलेले दिसत नाही. कारण आज तरी त्यापूर्वीचे मराठी जैन ग्रंथ उपलब्ध झाले नाहीत. तोपर्यंत जैन साहित्यिकांनी मराठी लिहिलेच नाही असे म्हणता येणार नाही. ' असे डॉ. अक्कोळे यांनी स्वतःच म्हटलेले आहे ते अगदी बरोबर आहे. केवळ १५ व्या शतकापूर्वीच नव्हे तर त्यानंतरही लिहिले गेलेले अनेक ग्रंथ अजून अनुपलब्ध असण्याचा संभव आहे. अधिक संशोधन केल्यानंतर अजून बरेच वाङ्मय उपलब्ध होऊ शकेल असे डॉ. अक्कोळे यांच्या या ग्रंथावरून अनुमान करण्याला हरकत नाही. या बाबतीत अधिकसंशोधन करण्याची आवश्यकता पटून नवीन संशोधकांना त्यापासून प्रेरणा मिळेल अशी मला मोठी आशा वाटते. माझ्या काही जैन विद्यार्थी मित्रांशी विचारविनिमय करताना, मराठीत जैन साहित्य फारसे लिहिले गेलेले नाही, असे मला ते आरंभी म्हणाले होते. पण या बाबतीत काळजीपूर्वक संशोधनाची आवश्यकता व महत्त्व त्यांना पटविल्यानंतर आज असे आढळून आले की, काही नाही तरी २५–३० जैन ग्रंथकार आतापर्यंत होऊन गेलेले आहेत. त्यांच्या ग्रंथांची संख्याही बरीच मोठी आहे. आतापर्यंतच्या संशोधनाचे हे फळ मनात अधिक आशा निर्माण करते. डॉ. अक्कोळे यांचा हा ग्रंथ पाहिल्यानंतर माझ्याप्रमाणेच कुणाचेही मत होईल. डॉ. अक्कोळे यांच्या ग्रंथापासून स्फूर्ती व प्रेरणा घेऊन तरुण संशोधकांनी जैन मंदिरातील हस्तलिखिते अधिक काळजीपूर्वक तपासून पाहिली तर अजूनही अनवधानाने लपून राहिलेली अनेक रत्ने त्यांच्या हाती पडतील अशी आशा वाटते. ही प्रेरणा डॉ. अक्कोळे यांच्या या ग्रंथापासून त्यांना मिळाली तर त्यांच्या परिश्रमांचे सार्थक झाले असे म्हणता येईल.

डॉ. अक्कोळे यांनी या ग्रंथात ज्याचा परिचय करून दिलेला आहे त्यांची ग्रंथरचना पाहिली म्हणजे प्राचीन मराठी साहित्याच्या स्वरूपावर बराच प्रकाश पडतो आणि त्यामुळे अनेक लक्षणीय बाबींकडे मन वेधते. त्यातील पहिली गोष्ट अशी. बरेचसे जैन मराठी वाङ्मय हे विदर्भात व मराठवाड्यात लिहिले गेले आहे.

जैन वाङ्मयाच्या दृष्टीने विदर्भभूमी ही त्याची यथार्थाने सारस्वतभूमी ठरते. त्यानंतर हे लोण मराठवाड्यात पोचले. तेथीच मठाधिपतींनी विपुल ग्रंथरचना केली आहे. आणि त्यानंतर सोलापूर-कोल्हापूर बाजूला थोडीफार ग्रंथरचना होऊ शकली. एरवी महाराष्ट्र म्हणून प्रसिद्ध असलेल्या प्रदेशात जैन मराठी ग्रंथरचना होऊ नये याचे आश्चर्य वाटते. जैनांची काही तीर्थक्षेत्रे जशी विदर्भात, मराठवाड्यात आणि दक्षिण महाराष्ट्रात आहेत तशीच ती महाराष्ट्राच्या उर्वरित भागांतही आहेत. १० व्या शतकात नाशिक जिल्ह्यातील मालेगाव तालुक्यातील वडनेर आणि चंदनपुरी या ठिकाणी द्राविड संघाची मोठी पीठे होती हे अलीकडे वजीरखेड येथे सापडलेल्या ताम्रपटांवरून दिसून आले आहे. सध्या नासिक जिल्ह्यात जैनांची काही लेणीही आहेत. त्यावरून ह्या विभागात जैन भट्टारकांची फार पूर्वीपासून वस्ती होती असे दिसून येते. त्यावरून या विभागात काही जैन साहित्याची निर्मिती झाली असणे संभवनीय वाटते. तथापि आजतरी जैनवाङ्मयाच्या निर्मितीच्या भूमी प्रामुख्याने विदर्भ व मराठवाडा हाच होत असे स्पष्टपणे दिसून येते.

दुसरी गोष्ट अशी की, आतापर्यंत उपलब्ध झालेले जैन मराठी वाङ्मय हे आधारित वाङ्मय आहे, त्यात स्वतंत्र रचना आढळत नाही असे डॉ. अक्कोळे यांनी म्हटले असले तरी ते थोडे सावधतेने आणि विचारपूर्वकच स्वीकारले पाहिजे. आधारित रचना ही स्वतंत्र असू शकणार नाही असे नाही. रामायण, महाभारत इत्यादी संस्कृत ग्रंथांवर आधारलेली कितीतरी स्वतंत्र रचना अन्य मराठी कवींनी केलेल्या आढळते ना ? आधारित आणि भाषांतरित यात फरक आहे. आधारित असले तरी जैनांच्या काही मराठी रचनांचे स्वतंत्र स्वरूप दिसून येते. काही ग्रंथांना जैन संस्कृत ग्रंथांचा आधार आहे, पण असे ग्रंथ फार थोडे आहेत. काहींना गुजराती ग्रंथांचा आधार आढळतो, तर काहींना कानडी ग्रंथांचा आधार आढळतो. याला कारणेही तशीच आहेत. जैन भट्टारकांची पीठे पूर्वी गुजराथेत होती. तेथूनच काही भट्टारक महाराष्ट्रात आले. त्यामुळे गुजराथेतील जैन भट्टारकांनी निर्माण केलेल्या ग्रंथांच्या आधारे मराठीत रचना होणे स्वाभाविक ठरते. त्याप्रमाणे जैन धर्माची अनेक पीठे महाराष्ट्राला लागून असलेल्या कन्नड प्रांतात होती. तेथून काही जण महाराष्ट्रात आल्यावर त्यांनी कानडी जैन ग्रंथांच्या आधारे मराठीत रचना करणे हेही स्वाभाविक ठरते. त्यापूर्वी मराठी वाङ्मयात गुजराती आणि कानडी ग्रंथांच्या आधारे लिहिलेल्या ग्रंथांचा फारसा आढळ होत नसला. जैन मराठी साहित्याच्या उपलब्धीमुळे हे दोन नवीन प्रवाह आता आढळून आले आहेत. महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीचा विचार करण्याच्या दृष्टीने ह्या दोन्ही गोष्टी फार महत्त्वाच्या आहेत. गुजराथेत जन्मलेल्या हरिपाळ देवाने महाराष्ट्रात येऊन श्री चक्रधररूपाने महानुभाव संप्रदायाची स्थापना केली हा गुजरात आणि महाराष्ट्र यांचा सांस्कृतिक संबंध जसा महत्त्वाचा आहे, तसाच

गुजरातमधून येऊन महाराष्ट्रात स्थायिक झालेल्या जैन ग्रंथकारांनी गुजराती ग्रंथांच्या आधारे केलेली ग्रंथरचना हाही सांस्कृतिक संबंध महत्त्वाचा आहे. प्राचीन मराठी जैन साहित्याला प्रारंभ तर गुजरातकर्नाटक कवींनीच केला असे डॉ. अकोळे सांगतात ते या दृष्टीने विशेष लक्षात घेण्यासारखे आहे. हीच गोष्ट कन्नड आणि महाराष्ट्र यांच्या सांस्कृतिक संबंधासंबंधी खरी आहे.

गुजराती ग्रंथांच्या आधारे मराठीत लिहिलेल्या अनेक जैन ग्रंथांचा उल्लेख डॉ. अकोळे यांच्या या पुस्तकात आढळतो. पंत सावाजीची 'सुगंधदशमी-व्रतकथा,' विशाल कीर्तीची 'धर्मपरीक्षा,' महीचंद्राचे 'आदिनाथ पुराण,' महाकीर्तींची 'शीलपताका,' जिनसागराचे 'जीवंधर पुराण,' अनंतकीर्तींची 'दशलाक्षणिक व्रत कथा,' गंगादास याचे 'पार्श्वनाथ भवांतर,' आनंद सागराचा शिष्य पुण्यसागर याने गुणकीर्ति आणि ब्रह्मचिंतामणी यांच्यानंतर पूर्ण केलेले 'पद्मपुराण,' महीचंद्र शिष्य देवेन्द्रकीर्ति यांनी लिहिलेले 'कालिका पुराण,' इत्यादी ग्रंथ गुजराती ग्रंथांच्या आधारे मराठीत लिहिले गेले आहेत. गुजराती भाषेलाच या कवींनी रासभाषा असे नाव दिलेले आहे. 'खंडित ग्रंथ रामायण रासभाषा होती म्हणून । महाराष्ट्र ओवी केली अज्ञानपण । पुण्यसारे पै ॥' असे पुण्यसागराने म्हटले आहे, तर 'विशाळ कीर्तिचा कृपेन । देवेन्द्रकीर्ति रास पाहोन । हे मऱ्हाष्ट केले पुराण । श्रवण देश भाषा पै ॥' असे देवेन्द्रकीर्तीने म्हटले आहे. कानडी ग्रंथांच्या आधारे मराठीत आलेले अनेक जैन ग्रंथ आहेत. उदा. अर्जुनसुत सोयरा यांनी लिहिलेली 'कर्माष्टमी कथा' (ऐसि कथा अपूर्व कानडे भाषी । होती सुंदर करनाटक देशी तै म्या सायासि मऱ्हाट्र भाषी । लघुबुधि केली असे पै ॥). जिनसेनाने लिहिलेले 'पुण्यास्त्रव पुराण' (पाहून कर्नाटक भाषा ग्रंथ केले म-हाष्ट ओवीयुक्त); गिरीसुत यांचे 'पांडव पुराण' (पांडव पुराण ग्रंथ सुंदर करनाटक भाषा हरिवंश आधार त्यातील निवडून सारासार प्रथम अध्याय कथिले) इत्यादी ग्रंथ हे कानडी ग्रंथांच्या आधारे मराठीत लिहिले गेले आहेत. सांस्कृतिक देवाणघेवाणीच्या दृष्टीने जसा या आधारित मराठी ग्रंथांचा विचार करता येईल तसाच भाषिक आणि वाङ्मयीन आदानप्रदानाच्या दृष्टीने विचार करण्यासाठी देखील मराठीला त्यांचा चांगला उपयोग होऊन शकेल.

गुजराती आणि कानडी ग्रंथांच्या आधारे जसे काही जैन साहित्य लिहिले गेले आहे तसेच खास जैन प्राकृताच्या आधारेही काही मराठी साहित्य लिहिले गेले आहे ही गोष्ट विशेष महत्त्वाची होय. मराठी भाषेच्या निर्मितीचा इतिहास पाहिला तर मराठी ही तिच्या पूर्वीच असलेल्या महाराष्ट्र अपभ्रंशापासून निर्माण झालेली आहे असे आपण मानतो. महाराष्ट्र प्राकृताच्या अपभ्रंशालाच स्थूलमानाने आज अपभ्रंशभाषा आणि अपभ्रंश साहित्य म्हणून संबोधण्यात येते. अपभ्रंश भाषा आणि मराठी भाषा, त्याचप्रमाणे अपभ्रंश साहित्य व मराठी साहित्य यांचा

डॉ. तगारे यांनी सूचित केलेला संबंध अधिक विस्ताराने तपासून पाहण्यासाठी खास अपभ्रंश ग्रंथांच्या आधारे मराठीत निर्माण झालेले जैन साहित्य विशेष उपयोगी पडेल आणि म्हणूनच ते महत्त्वाचे होय असे मी म्हटले आहे.

गुजराती आणि कानडी या भाषांतील ग्रंथांच्या आधारे काही मराठी जैन कवींनी आपल्या आपल्या रचना केल्या असल्यामुळे मराठी साहित्याला बरेच फायदे झालेले आहेत. त्यातील एक फायदा असा कीं, या दोन्ही भाषांतील शब्दसंपत्ती थोडीफार प्रमाणात मराठीत आलेली आहे. मराठीत आलेल्या कानडी शब्दांचा यापूर्वी अनेकांनी आपापल्या परीने अभ्यास केलेला आहे. त्याला जैनांनी कानडीच्या आधारे लिहिलेल्या मराठी ग्रंथांचा अधिक चांगला उपयोग होईल. गुजराती भाषेतून मराठीत आलेल्या शब्दसंपत्तीच्या अभ्यासालाही गुजराती अथवा रासभाषेच्या आधाराने लिहिलेल्या जैन मराठीच्या ग्रंथाचा चांगला उपयोग होऊ शकेल. अभ्यासाचे म्हणून हे दोन स्वतंत्र विषय संशोधकांनी हाती घेण्याची आवश्यकता आहे. दुसरा फायदा असा की, या दोन्ही भाषातील काही विशेष रचना-प्रकाराची लेणी मराठी साहित्यसुंदरीच्या अंगावर चढविली गेली आहेत. 'रास' हे गुजराती भाषेचे नाव असले तरी तिकडे प्रसिद्ध असलेला तो एक विशिष्ट वाङ्मय प्रकार होय. 'कथा देखिली रास भाषा । ओवी मन्हाष्ट देसा । देवेन्द्रकीर्तिचा उपदेश । झाला मज ॥ ब्रह्मजिनदास कविश्वर भला । तयानी धर्मपरिक्षा रास केला । तो म्या सुदृष्टि पाहिला । मग कथा केलि ॥'' (पान ६२) यातील रास भाषा आणि रास काव्यप्रकार याच्या भिन्न निर्देशावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. यावरून जैन कवींनी मराठीत काही रास रचना केलेली आढळते. 'फाग' हाही असाच एक गुजराती वाङ्मयप्रकार दिसतो. असे काही फाग या जैन मराठी कवींनी लिहिलेले या ग्रंथात आढळतात. उदा : गुणकीर्तीने लिहिलेला 'रामचंद्र फाग', कामराजाने लिहिलेला 'चैतन्य फाग' इत्यादी. 'हे गुजराती वाङ्मय-प्रकार गुणकीर्तीने मराठीत रूढ करण्याचा प्रयत्न केला' असे डॉ. भवाळे सांगतात. 'वसंतोत्सवात गायली जाणारी जी समूह गीते असतात त्यांना फाग म्हणतात.' त्यांची व्युत्पत्ती 'फग्गु' या प्राकृत शब्दापासून त्यांनी सांगितलेली आहे. हा 'फग्गु' शब्दही संस्कृत 'फल्गु' शब्दापासून आलेला दिसतो. मराठीतील विराण्याप्रमाणेच हिंदीत 'बारहमासी' हा एक विरहगीताचा प्रकार आहे (पान २४४). मराठीतील भारुडाप्रमाणेच 'बेको' हाही वाङ्मय-प्रकार जैन कवींनी मराठीत आणला आहे. (पान २४९) 'विनती', 'बखुती' हे वाङ्मयप्रकार तर या जैन कवींनी मराठीत नवीनच आणलेले आहेत. गुजराती व हिंदीच्या संपर्काचा हा मराठीला झालेला फार मोठा फायदा होय. याशिवाय आणखी काही वाङ्मयप्रकार गुजरातीतून मराठीत आलेले आहेत. पण त्यांचे नामकरण लक्षात घेता त्यांना स्वतंत्र व विशिष्ट वाङ्मय-प्रकार म्हणून संबोधता येईल किंवा नाही याची मला शंका वाटते. या

वाङ्मय-प्रकाराप्रमाणेच दूहा, रासभाषा, चौपाई भासा, वस्तु असे काही नवीन छंदही या जैन कवींनी मराठीला प्राप्त करून दिले आहेत. संस्कृतातील चंपुकाव्याप्रमाणेच काही चंपुकाव्ये जैन कवींनी लिहिलेली आढळतात. या सर्वांचा सूक्ष्म अभ्यास झाला पाहिजे.

मराठी जैन कवींनी लिहिलेल्या साहित्याचे डॉ. अक्कोळे यांनी वाङ्मयीन परिशीलन आणि मूल्यमापन करणारी दोन स्वतंत्र प्रकरणे या ग्रंथात लिहिलेली आहेत. ती मराठी प्राचीन वाङ्मयाच्या अभ्यासकाना उपयुक्त होतील. जैन साहित्याचे वाङ्मयीन परिशीलन करताना जैन साहित्यिकांचा मराठी भाषेसंबंधीचा दृष्टिकोन डॉ. अक्कोळे यानी स्पष्ट केलेला आढळतो, त्यावरून या जैन कवींनी मराठी भाषेचा स्वीकार केला तो भाषाभिमानाने नव्हे, किंवा मराठी भाषेच्या अभिवृद्धीच्या हेतूनेही नव्हे, तर धर्मप्रसाराच्या दृष्टीने मराठी प्रदेशात मराठीचा उपयोग करण्याची त्याना आवश्यकता वाटत होती म्हणून. ही गोष्ट त्यांच्या लोकाभिमुखतेच्या आणि धर्माभिमानाच्या दृष्टीने लक्षात घेण्यासारखी आहे. तथापि या जैन मराठी कवींनी मराठीची तरफदारी केली आहे असे मात्र नाही. जनार्दन कवींनीसुद्धा संस्कृतचा अभिमान बाळगणाऱ्या पंडिताना इतर प्राकृत भाषांप्रमाणे मराठीतूनही स्तुतिस्तोत्र गायनाचे महत्त्व ऐकविले आहे. (पान २२१) त्यावरून एकनाथ, मोरोपंतादिकानी काढलेल्या अशाच आशयाच्या उद्गाराची कोणालाही आठवण होईल. असे असले तरी मराठीचा अभिमान मराठी जैन साहित्यिकाच्या ठिकाणी नव्हताच असे मात्र म्हणता यावयाचे नाही. जनार्दन कवींचेच काही उद्गार या बाबतीत अभ्यासकांना विचार करायला लावतील.

मराठी जनतेला मराठी जैन साहित्याच्या द्वारा जैन धर्म, त्याचे तत्त्वज्ञान त्याचे आचार विचार इत्यादिकाची ओळख होणे हीही गोष्ट फार महत्त्वाची होय. इतर समाजांप्रमाणेच मराठी जैन समाजही महाराष्ट्राचा एक अविभाज्य समाज आहे. पण त्याच्याविषयीची पुरेशी माहिती इतरांना असतेच असे म्हणता येत नाही. महाराष्ट्रातील बहुजन समाज हा हिंदु धर्मानुयायी असल्यामुळे आपल्या धर्माच्या कथापुराणादिकांची त्याना माहिती असणे हे स्वाभाविक आहे. त्यांनी लिहिलेले ग्रंथ सामान्येकरून सर्वांच्या वाचनात येत असतात. पण त्याचवेळी जैन समाजातील तत्त्वज्ञान, आचारविचार, धर्मकथा इत्यादिकाची जाणीवपूर्वक माहिती कितीजणाना असते ? वाल्मिकीने लिहिलेल्या रामकथेहून जैनांची रामकथा बऱ्याच बाबतीत वेगळी आहे याची किती विद्वानाना माहिती असते ? जैन जनता रामाला 'पद्म' म्हणून संबोधते हे तर सुशिक्षितानाही ठाऊक नाही. रामायण कथेप्रमाणे जैनानी लिहिलेल्या पांडव कथेतील आणि श्रीकृष्ण कथेतील अनेक ठिकाणी असलेले वेगळेपण याचीही जाणीव सामान्यानाच काय पण सुशिक्षित विद्वानानाही नसते. याचे मुख्य कारण जैनांचे मराठी वाङ्मय अद्याप विपुल प्रमाणात उपलब्ध नाही हे असावे. जे वाङ्मय

प्रसिद्ध झालेले आहे त्याच्या वाचनाकडे आणि अभ्यासाकडे जैनेतर मराठी समाज फारसे लक्ष देत नाही ही दुःखाची गोष्ट आहे. परस्परांच्या साहित्याच्याद्वारा त्यांचा धर्म, तत्त्वज्ञान आणि पुराणकथा यांची माहिती करून न घेताच आम्ही व्यवहारात एकमेकांना दूषणे देत असतो. महानुभावासंबंधी असेच झाले नाही काय? पण त्यांच्या साहित्याच्या प्रकाशनाने आणि अभ्यासाने त्याच्याविषयी असलेले खरेखोटे गैरसमज जसे हळूहळू नाहीसे होत आहेत त्याचप्रमाणे जैन आणि अन्य समाजांच्या संबंधीचे अपसमज नाहीसे होणे राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीने जरूरीचे आहे. यासाठी त्यांचे साहित्य प्रकाशित होऊन ते सर्वांना उपलब्ध होणे जसे आवश्यक आहे तसेच त्या साहित्याचा सर्वांकडून अभ्यास झाला पाहिजे हीही गोष्ट महत्त्वाची आहे. याद्दष्टीने डॉ. अक्कोळे यांचा हा ग्रंथ मराठी वाचकांना आणि अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त ठरेल. अन्य पंथियांच्या तत्वज्ञानाशी आणि आचारविचारांशी त्यांनी ठिकठिकाणी तुलनात्मक विवेचन केलेले आहे, त्याचा विस्तृत ऊहापोह या प्रस्तावनेत करता येणे अशक्य आहे. तथापी अभ्यासकांना ते निश्चित मार्गदर्शक होऊ शकेल. उदा. डॉ. अक्कोळे यांनी अनेक ठिकाणी महानुभावासंबंधी काही निर्देश केलेले आहेत. ' महानुभाव पंथांच्या आचारधर्मावर आणि तत्त्वज्ञानावर वेद–अमान्यतेवर जैन धर्माचा परिणाम झाला आहे ' ( पान १२ ) चक्रधरोक्त अहिंसेचा आचार पदोपदी जैन आचाराची व विचारांची आठवण करून देतो ' ( पान १३ ), ' महानुभावाप्रमाणे जैन धर्मियांनी स्वतःवर प्रादेशिक बंधन लादून घेतले नव्हते. ' ( पान २२ ) हे त्यांचे अभिप्राय महानुभावांना मान्य होण्यासारखे नाहीत. असे असले तरी महानुभाव संप्रदाय आणि जैन संप्रदाय यांच्या तत्वज्ञानाचे आणि आचारधर्मांचे तुलनात्मक निरीक्षण व परीक्षण करण्यास ते अभिप्राय मार्गदर्शक होतील. या दृष्टीनेच जैन तत्त्वज्ञान आणि आचारविचार यावरील डॉ. अक्कोळे यांनी लिहिलेली दोन्ही प्रकरणे अभ्यासकांना उपयुक्त वाटतील.

एकंदरीत डॉ. अक्कोळे यांनी फार परिश्रम करून हा ग्रंथ लिहिलेला आहे. त्याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करतो. मराठी साहित्याचे अभ्यासकही त्यांना याबद्दल निश्चित धन्यवाद देतील. मराठी जैन साहित्याच्या संशोधनाचे आपले परिश्रम ते यापुढेही असेच चालू ठेवतील तर आरंभी निर्देश केल्याप्रमाणे अजून अनुपलब्ध असलेले अनेक नवीन मराठी जैन ग्रंथ उपलब्ध होऊ शकतील. या बाबतीत आणखी एक विचार मनात येतो तो असा जैन धर्मातील श्वेतांबर अथवा स्थानकवासी पंथातील एकही ग्रंथकार मराठीत आढळत नाही. असे डॉ. अक्कोळे लिहितात ( पान ११३ ). पण या पंथातील लोकांनी मराठीत मुळीच ग्रंथरचना केली नसेल असे म्हणवत नाही. डॉ. अक्कोळे स्वतः दिगंबरपंथी असल्यामुळे कदाचित श्वेतांबर व स्थानकवासी यांच्या मंदिरातील हस्तलिखितांपर्यंत ते पोचू शकले नसतील. तेथे प्रवेश मिळवून त्यांची हस्तलिखिते तपासल्यानंतर थोडीफार सामुग्री अवश्य हाती पडेल असा विश्वास

वाटतो. दुसराही एक विचार आहे. गुजरातीप्रमाणेच कानडी ग्रंथांच्या आधारे जैन मराठी कवींनी काही रचना केलेली आहे हे खरे. तथापि दक्षिण महाराष्ट्रात विशेष मराठी रचना झाल्याचे त्यांना आढळत नाही. संशोधकांनी धुंडाळण्यासारखे हेही एक क्षेत्र होऊ शकेल. कोल्हापूरकडील मराठी-कानडीचे मिश्रण लक्षात घेता काही मराठी जैन कवींनी आपली मराठी रचना कानडी लिपीतून लिहून ठेवली असणे शक्य आहे. तिचाही प्रयत्नपूर्वक शोध घेतला गेला पाहिजे. डॉ. अक्कोळे आणि त्यांच्या मार्गदर्शनाखाली काम करीत असलेले तरुण संशोधक या कार्याकडे वळतील तर या ग्रंथाच्या लेखनाचे आणि प्रकाशनाचे सार्थक होईल.

नागपूर
१७-८-६८

वि. भि. कोलते

# निवेदन

प्राचीन मराठीतील वाङ्मयाच्या बहुतेक सर्व शाखा धर्मवृक्षावरच वृद्धिंगत झाल्या आहेत. महानुभाव, नाथ, भागवत, दत्त व रामदासी या सांप्रदायिकांनी धर्माच्या आधारे का होईना मराठी भाषेची फार मोठी सेवा केली आणि त्या भाषेचा विकास घडविला.

उपर्युक्त संप्रदायातील बहुतेक ग्रंथांचे संशोधन, संपादन होऊन ते ग्रंथ विद्वानांच्या समोर आले आणि त्यांचे योग्य ते परिशीलनही होऊ शकले. जैनधर्मीय लेखकांनी आणि कवींनी मराठी भाषेत जे ग्रंथसाहित्य निर्माण केले त्याचे संशोधन आणि परिशीलन विशेष प्रमाणात न झाल्यामुळे, मराठी वाङ्मयातील हे एक दालन काहीसे अप्रकाशित व अपरिचित राहिले आहे. प्रथमपासूनच माझ्या मनात या दालनाविषयी एक प्रकारची आपुलकी आणि कुतूहल असल्यामुळे मी या विषयाकडे माझे मन वळविले. माझे मार्गदर्शक डॉ. शं. गो. तुळपुळे, मराठी विभागप्रमुख पुणे विद्यापीठ -- यांनी योग्य ती दिशा व मार्ग दाखविल्यामुळेच हा अभ्यास या स्वरूपात मला शक्य झाला. त्यांचा मी फार आभारी आहे. इ. स. १९६४ च्या मे मध्ये प्रस्तुत प्रबंध पुणे विद्यापीठाने पीएच्. डी. पदवीसाठी मान्य केला.

प्राचीन मराठीतील जैन साहित्याचा सर्वांगीण परिचय घडविण्याचा माझा हा प्रयत्न काहीसा प्राथमिक स्वरूपाचा असला तरी तो नवीन, प्रामाणिक आणि भरीव पायावर उभा आहे याविषयी मी निःशंक आहे. ज्यांच्या प्रकाशित व संपादित ग्रंथांचा मी उपयोग केला आहे, त्यांचा उल्लेख त्या त्या स्थळी मी केला आहेच. विशेषतः ज्यांनी आपल्या भांडारातील हस्तलिखिते मला दिली, त्यांचे मला विशेष आभार मानले पाहिजेत. त्यांच्या मदतीशिवाय मला हा अभ्यास करणे अशक्यच होते. ' अभ्यासाची साधने ' या परिशिष्टात मी त्यांचा ऋणनिर्देश केला आहेच. परीक्षेसाठी विद्यापीठाकडे पाठविलेल्या प्रबंधात आणि प्रस्तुत मुद्रित प्रतीत एकच महत्त्वाचा फरक आहे तो म्हणजे ' अभ्यासाची साधने ' हा भाग पूर्वीप्रमाणे पहिल्या प्रकरणात न ठेवता तो येथे परिशिष्टरूपाने शेवटी जोडला आहे व पहिल्या प्रकरणास ' पार्श्वभूमी ' चे स्वरूप दिले आहे. हा प्रबंध लिहिल्यानंतर जवळ जवळ चार वर्षांनी प्रकाशित होत आहे. या अवधीत या क्षेत्रात काही थोडे नवे संशोधन झाले आहे आणि पुढेही होण्याची शक्यता आहेच. त्याचे स्वागत पुढे मी केव्हाही करीनच.

प्रबंध-लेखनाला आरंभ झाल्यापासून तो आज प्रकाशित होईपर्यंत अनेक गुणीजनांचे व मित्रांचे साहाय्य मला मिळाले आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे, डॉ.

ए. एन्. उपाध्ये, प्रा. गं. बा. सरदार, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. वि. पा. जोहरापुरकर, ब्र. माणिकचंद चवरे, प्राचार्य भू. आ. चौगुले, प्राचार्य भ. आ. पाटील, पं. जिनदास फडकुले यांचा निर्देश न केला तर कर्तव्यच्युती होईल. 'सन्मति' मासिकाचे प्रधान संपादक आणि बाहुबली विद्यापीठाचे संचालक गुरुवर्य माणिकचंद भीसीकर यांची सत्प्रवृत्त प्रेरणाच या कामी यशदायी झाली आहे. त्यांचा मी कृतज्ञ आहे.

मुद्रिते तपासणे आणि सूची तयार करणे या कार्यात माझे मित्र प्रा. दयाराम पाटील व प्रा. विनायक कासार यांची मला विशेष मदत झाली. इतर व्यावहारिक बाबतीत प्रा. ज. खु. गांधी आणि प्रा. भीमराव कुलकर्णी यांनी मोलाची मदत केली. त्यांचा मी आभारी आहे.

ग्रंथाच्या प्रकाशनाची जबाबदारी हल्लीच्या प्रतिकूल काळात 'सुविचार प्रकाशन मंडळा' चे चालक श्री. राजेंद्र बनहट्टी यांनी घेतली आणि ती अत्यंत यशस्वी रीतीने पार पाडली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. आनंद मुद्रणालयाचे श्री. य. गो. जोशी यांनी मुद्रणाचे कार्य चोखपणे बजावले याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

माननीय डॉ. वि. भि. कोलते, कुलगुरु, नागपूर विद्यापीठ, यांनी अतिशय आपुलकीने अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे.

पुणे विद्यापीठाने प्रबंध प्रकाशित करण्याची परवानगी दिलीच पण त्यासाठी लागणारे आर्थिक साहाय्यही अनुदान म्हणून दिले याबद्दल मी पुणे विद्यापीठाचा ऋणी आहे.

बारामती महाविद्यालय,
बारामती, ५ सप्टेंबर, १९६८

सुभाषचंद्र अक्कोळे

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | ८ | विपाकसु | विपाकसूत्र |
| ३ | १० | दर्शप्रकीर्णक | दशप्रकीर्णक |
| ६ | २० | इत्यादोचे | इत्यादींचे |
| ६ | २३ | लिहीली | लिहिली |
| ८ | २५ | ११ व्या शतकात | १२ व्या शतकात |
| | | शके १२१० | शके १११० |
| १६ | ९ | अजलपूर | अलजपूर |
| १६ | शेवटची ओळ | म. सं. पृ. | म. सं. पृ. |
| १७ | २१ | गुणकीर्तीची | गुणदासाची |
| २० | २२ | राविपेण | रविपेण |
| २७ | शेवटून २ री ओळ | विदज्जन | विद्वज्जन |
| ३८ | १३ | वईडर | व ईडर |
| ३८ | शेवटून २ री ओळ | तत्तु | तत्तु |
| ६३ | १५ | घ्याल्यात | ध्याल्यात |
| ७५ | ३१ | आगंदसागर | आनंदसागर |
| ९३ | २४ | रूपासनेवा | रूपासा नेवा |
| १०९ | २३ | श्रीपुर नग्र | श्रीपुर नग्र |
| ११८ | १ | प्रास्तविक | प्रास्ताविक |
| १२३ | शेवटची ओळ | studies n | studies in |
| १३७ | १६ | उमास्वातिरक्त | उमास्वातिकृत |
| १२८ | ९ | ६. सप्ततत्त्वे | सप्त तत्त्वे |
| १४८ | २ | रयणसागरात | रयणसारात |
| १५५ | २२ | १४. नैमित्तिक व्रते | नैमित्तिक व्रते |
| १६० | २५ | पंचविध आधार | पंचविध आचार |
| १३७ | २२ | पविठस्स | पविट्ठस्स |
| १३७ | शेवटची ओळ | रत्नकरण्ड श्रावकाचा | रत्नकरण्ड श्रावकाचार |
| १४८ | शेवटची ओळ | मणवकण | मणवयण |
| २०९ | १४ | संकष्टी चतुर्दशी | संकष्टी चतुर्थी |
| २१४ | २२ | प्रचीन | प्राचीन |
| २३३ | ६ | आचारि | अचारि |
| २३५ | ३ | त्रेसष्ट शठाका | त्रेसष्ट शलाका |
| २७८ | ७ | लोकमाया | लोकभाषा |

## अनुक्रमाणिका

* * *

# प्रकरण १ ले

# पार्श्वभूमी

## भारतीय साहित्यात जैन साहित्याचे स्थान

भारतातील अतिप्रसिद्ध आणि प्राचीन धर्मांपैकी जैन धर्म हा एक आहे. एकेकाळी हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत या धर्माने वैभवाचे दिवस पाहिले होते. भारताच्या सर्व भागात जैनधर्मीयांची मंदिर, मूर्ती, शिलालेख आदि प्राचीन इतिहासाची साधने विखुरलेली आहेत आणि अर्वाचीन व प्राचीन अशा सर्व भारतीय भाषांत जैनांचे साहित्य उपलब्ध आहे. या धर्माने दार्शनिक क्षेत्रात अहिंसा आणि स्याद्वाद यांची मौलिक देणगी दिली आहे. वाङ्मयनिर्मितीची प्रदीर्घ परंपरा कायम ठेवून भारतीय भाषांचा लक्षणीय विकास घडविला आहे. धर्मप्रसारासाठी ग्रंथनिर्मिती ही त्या धर्मातील साधू समाजाची फार मोठी समाजसेवा होती. गृहस्थांच्या आणि साधूंच्या दैनंदिन जीवनात जैनधर्माने धर्मग्रंथांच्या – पठनास – स्वाध्यायास आवश्यक क्रियेचे स्थान दिल्याने ग्रंथनिर्मिती आणि त्याचा प्रसार होणे स्वाभाविकच होते. वर्षाऋतू वर्ज्य करून हे साधुपुरुष इतर सर्व ऋतूत देशभर पायी विहार करीत. ते लोकजीवनाचे जवळून निरीक्षण करीत असत. ' बृहत्कल्प–भाष्य ' या ग्रंथातील ' जनपदपरीक्षा ' प्रकरणातील पुढील उतारा त्या साधूंच्या साहित्यिक जीवनाचे चित्र दाखविण्यास पुष्कळच उपयोगी आहे. " जैन भिक्षूंना आत्मशुद्धीसाठी व दुसऱ्यांना धर्मात स्थिर करण्यासाठी जनपदात विहार केले पाहिजे. जनपद–विहार करणाऱ्या साधूंनी मगध, माळवा, महाराष्ट्र, लाट, कर्नाटक द्राविड, गौड, विदर्भ आदि देशातील लोकभाषांत कुशल असायला पाहिजे. तरच ते भिन्न भिन्न लोकांना उपदेश देऊ शकतील. " याप्रमाणे लोकहितार्थ आणि आत्मकल्याणार्थ भारंड पक्ष्याप्रमाणे हिंडणाऱ्या जैन मुनींनी विविध प्रकारच्या लोकोपकारी साहित्याची निर्मिती केली. हे जैन साहित्य प्राचीन भारतीय साहित्यात वेगळ्या वैशिष्ट्यांनी उठून दिसते. म्हणूनच वैदिक साहित्य आणि श्रमण साहित्य असे दोन मुख्य भेद भारतीय साहित्यात मानावे लागले आहेत. श्रमण साहित्यात जैन साहित्याचे स्थान प्रमुख आहे. संशोधकांचे असे स्पष्ट म्हणणे आहे की आर्य लोक भारतात येण्यापूर्वी भारतात अध्यात्मविद्येत

पुढारलेली व सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत प्रगत अशी 'मागधी' संस्कृती भारताच्या पूर्वभागात गंगा व यमुना यांच्या किनाऱ्यावर शतकानुशतके रुजलेली होती. त्यांच्या साहित्याला श्रमण साहित्य म्हणण्याची वहिवाट आहे. त्यांत जैन व बौद्ध हेच मुख्य होत. विंटरनित्स त्यांचा उल्लेख 'Ascetic' म्हणून करतात, व याकोबी त्यांना 'Popular Religion' म्हणतात. पुनर्जन्मसिद्धान्त, कर्मवाद आणि सृष्टिकर्त्या परमेश्वराला अमान्यता यामुळे श्रमणसाहित्याची परंपरा निश्चितपणे वेगळी मानावी लागते. लोकाभिमुखता हे या साहित्याचे सर्वात महनीय वैशिष्ट्य आहे. जैनांनी आपले प्रारंभीचे वाङ्मय लोकभाषेत निर्माण केले. अर्धमागधी, शौरसेनी, महाराष्ट्री, अपभ्रंश, हिंदी, गुजराती इत्यादी उत्तर भारतीय भाषा आणि तामीळ, कन्नड आदी द्राविड भाषा यांचा साहित्यनिर्मितीसाठी काळाच्या व लोकांच्या गरजेनुसार जैन ग्रंथकारांनी स्वीकार केल्यामुळे सामान्य जनतेपासून हे साहित्य कधीच अंतरले नाही. भारतीय जीवनधारेत अहिंसेला जे अनन्यसाधारण महत्त्व प्राप्त झाले त्याचे श्रेयही जैनधर्माने साहित्याच्या द्वारा प्रसृत केलेल्या प्रचंड वैचारिक आंदोलनाला देणे काही अंशी तरी भाग आहे.

एवढेच नव्हे तर भारतीय संतसाहित्यात भक्तीच्या जोडीला अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह या पंच महाव्रतांचाच प्रभाव अधिक पडलेला दिसून येतो. वेद, यज्ञ आणि संस्कृत यांनी निर्माण केलेल्या परंपरेपेक्षा ही परंपरा निश्चितपणे वेगळी वाटते. म्हणूनच भारतीय साहित्यात जैन साहित्याला मानाचे व गौरवाचे स्थान लाभले आहे. फक्त धर्मशास्त्रातच नव्हे तर तर्क, व्याकरण, दर्शन, न्याय, काव्य, महाकाव्य, स्तोत्र, नाटक, वैद्यक आदि विविध वाङ्मयशाखांतसुद्धा जैन साहित्य समृद्ध आहे.

## जैन साहित्याचा उद्गम आणि विकास

आज जे जैन साहित्य उपलब्ध आहे ते सर्व भगवान महावीरांच्या उपदेश-परंपरेशी संबद्ध आहे. त्यांचा उपदेश त्याच्यानंतर बारा 'अंग' व चौदा 'पूर्व' यांच्या रूपाने विभागला गेला. या अंग आणि पूर्व ज्ञानांत जे पारंगत होते त्यांना 'श्रुत–केवली' म्हणत असत. भ. महावीरांच्या पूर्वीपासून जैन साहित्य निर्माण होत होते व त्यालाच "पूर्व" अशी संज्ञा आहे असे एक मत अलीकडे मांडले[१] गेले आहे. द्वादशांग आगमातील बारावे अंग 'दृष्टिवाद' होते. या दृष्टिवादाच्या अंतर्गत चौदा पूर्वांचा उल्लेख केला जातो. त्यात महावीरांच्या पूर्वीच्या अनेक विचारधारणा, मतमतांतरे आणि ज्ञानविज्ञान यांचे संकलन शिष्य गौतम यांनी केले आहे. या चौदा पूर्वांची नावे पुढीलप्रमाणे आहेत.

---

१. भारतीय संस्कृतीमें जैनधर्मका योगदान,–डॉ. हिरालाल जैन. पृष्ठ. ५१.

उत्पाद, अग्रायणीय, वीर्यानुवाद, अस्तिनास्तिप्रवाद, ज्ञानप्रवाद, सत्यप्रवाद, आत्मप्रवाद, कर्मप्रवाद, प्रत्याख्यान, विद्यानुवाद, कल्याणवाद, प्राणावाय, क्रियाविशाल, लोकबिंदुसार या चौदा पूर्वांमध्ये केवळ धार्मिक, दार्शनिक आणि नैतिक विचारांचेच संकलन केले गेले नव्हते तर त्यात नाना कला, ज्योतिष, आयुर्वेद मंत्र तंत्र इत्यादिकाचाही समावेश केला गेला होता. परंतु दुर्दैवाने आज ते साहित्य पूर्णपणे सुरक्षित राहू शकले नाही.

आचारांग, सूत्रकृतांग, स्थानांग, समवायांग, भगवतीव्याख्याप्रज्ञप्ति, ज्ञातृधर्मकथा, उपासकाध्ययन, अंतकृद्दशा, अनुत्तरोपातिकदशा, प्रश्नव्याकरण, विपाकसूत्र आणि दृष्टिवाद अशी बारा अंगे प्राचीन जैन साहित्याची आहेत. याशिवाय बारा उपांगे, चार मूलसूत्र, दशप्रकीर्णक, दोन चूलिकासूत्र, हे सर्व प्राचीन साहित्य मानले जाते. याशिवाय षट्खंडागम आणि तिलोयपण्णत्ती हे ग्रंथ प्राचीन आगमाचेच अंश मानले जातात. भ. महावीरांचा मूळ उपदेश अर्धमागधी भाषेत झाला. पण त्या काळी तो ग्रंथ–निबद्ध झाला नव्हता. आज जे अंग ग्रंथ प्राचीन म्हणून ओळखले जातात त्यांचे एकत्रीकरण इ. स. ४५४ मध्ये श्री देवर्धिगणी क्षमाश्रमण यांनी करविले आहे. जरी या ग्रंथांची भाषा अर्धमागधी होती तरी तोपर्यंत महावीरांचे निर्वाण होऊन जवळ जवळ ९८० वर्षे लोटली होती त्यामुळे कंठस्थ राहूनही या सूत्रांची भाषा मूळची, अगदी ज्या त्या स्वरूपात होती. असे म्हणता येत नाही. आज त्या अर्धमागधीचे तिच्या जवळच असलेल्या मागधीपेक्षा दूरवर्ती महाराष्ट्र प्रदेशातील भाषेशी अधिक साम्य दिसून येते. जॅकोबीने तर या भाषेला 'प्राचीन महाराष्ट्री' असे म्हटले असून तिलाच डॉ. पिशेल 'जैन महाराष्ट्री' असे नाव देतात. या सर्व गोष्टींचा एकत्रित विचार करून पंडित हरगोविंददास यांनी खालीलप्रमाणे निष्कर्ष काढला आहे "हम देखते हैं कि अर्धमागधीके लक्षणोंके साथ मागधी, शौरसेनी और आधुनिक पूर्वीय हिंदीका कोई विशेष संबंध नही है। परंतु 'महाराष्ट्री प्राकृत' और आधुनिक मराठी भाषा के साथ उसका सादृश्य अधिक है। इसका कारण क्या? चंद्रगुप्तके राज्यत्वकालमे (इ. पू. ३१०) बारह वर्षोंके अकालके समय जैन मुनिसंघ पाटलीपुत्रमे दक्षिणकी ओर गया था। उस समय वहांके प्राकृतके प्रभावसे अंग ग्रंथोंकी भाषाका कुछ कुछ परिवर्तन हुआ था। यही महाराष्ट्री प्राकृतका आर्य प्राकृतके साथ सादृश्यका कारण हो सकता है।"[२] याप्रमाणे मूळ अर्धमागधी भाषेविषयी विद्वानांची मते पाहिली तर मराठी भाषेच्या प्राचीन इतिहासात जैन धर्मांच्या मूळ ग्रंथाचे स्थान फार महत्त्वाचे मानले पाहिजे असे वाटते. 'महाराष्ट्री प्राकृत' ही महाराष्ट्राची प्राचीन भाषा. तिचा परिणाम जैनांच्या अंग ग्रंथांवर झाला, म्हणून अंग ग्रंथातील भाषेस 'जैन महाराष्ट्री' म्हणण्याचा प्रघात पडला. जैन साहित्याच्या ग्रंथा-

---

२. पाइअसद्दमहण्णव–प्रस्तावना, पृ. २७.

वतरणकालीच अशा रीतीने महाराष्ट्राने मापेच्या योगाने या दोहोंना प्रभाव पाडलेला आहे.

## जैन साहित्याचा उत्तरकालीन इतिहास

जैनांचे प्राचीन साहित्य जरी अर्धमागधीप्राकृतात असले तरी नंतर नंतर संस्कृत, अपभ्रंश आणि वेगवेगळ्या प्रदेशातील देशी भाषांचा उपयोग केला गेला. विशेषतः सूत्रांसाठी आणि व्याकरण, न्याय, तर्क, साहित्यशास्त्र, स्तोत्र, यासाठी संस्कृताचा उपयोग करण्यात आला. पण त्याचबरोबर शौरसेनी प्राकृतात व अपभ्रंशात फार मोठ्या प्रमाणात ग्रंथरचना झाली. इ. स. च्या प्रथम शतकात कुंदकुंद झाले. त्यांनी समयसार, प्रवचनसार, पंचास्तिकाय आणि अष्टपाहुड असे महान् ग्रंथ प्राकृत भाषेत लिहिले. कुंदकुंदाचे शिष्य उमास्वामी यांनी सर्वात प्रथम संपूर्ण जैन तत्त्वज्ञान आणि आचारधर्म संस्कृतमध्ये सूत्ररूपाने निबद्ध केले. त्यालाच तत्त्वार्थसूत्र असे नाव आहे. हा ग्रंथ इतर अनेक ग्रंथकारांना प्रेरक ठरला आहे. अनेकांनी त्यावर नंतरच्या काळात भाष्ये आणि महाभाष्ये लिहिली. हा ग्रंथ दिगंबर व श्वेतांबर अशा दोन्ही जैन पंथांना सारख्याच श्रेष्ठ व पूज्य वाटतो. सिद्धसेन गणी, अभयदेवसूरी, मलधारी हेमचंद्र यानी लिहिलेले भाष्यग्रंथ फारच अपूर्व आहेत. दर्शन आणि न्यायशास्त्रात स्वामी समंतभद्र, अकलंक विद्यानंदी, माणिक्यनंदी, प्रभाचंद्र, सिद्धसेन दिवाकर हे ग्रंथकार अद्वितीय आहेत. पुराणसाहित्यात विमलसूरींचे ' पउमचरिय ' पुन्नाटसंघीय जिनसेनांचे ' हरिवंशपुराण ' हे ग्रंथ महत्त्वाचे आहेत. ' पउम चरिय ' मध्ये रामकथा आहे तर हरिवंशात कृष्णकथा आहे. जिनसेनकृत ' महापुराण ' आणि हेमचंद्रकृत ' त्रिषष्टी-शलाका-पुरुष-चरित् ' हे दोन्ही ग्रंथ उल्लेखनीय आहेत. पुराण पुरुषांची पुण्यचरित्रे यात वर्णिली आहेत.

जटासिंहनंदीचे वरांगचरित्र हे एक पौराणिक काव्य आहे. काव्यसाहित्यात वीरनंदीचे चंद्रप्रभचरित्र, हरिभद्राचे धर्मशर्माभ्युदय, धनंजयाचे द्विसंधान आणि वाग्भटाचे नेमिनिर्वाण ही उच्चकोटीची महाकाव्ये आहेत. कथासाहित्यात हरिषेण कथाकोष ( इ. स. ९३२ ) उद्योतन सूरींची कुवलयमाला, हरिभद्राची समराइच्चकहा या ग्रंथांनी भारतीय कथाकोषात मोलाची भर घातली आहे. आराधना-कथाकोष, पुण्यास्रव-कथाकोष हेही दोन ग्रंथ या विभागात श्रेष्ठ दर्जाचे आहेत. चंपूकाव्यात सोमदेवकृत यशस्तिलकचंपू, हरिश्चंद्रकृत जीवंधरचंपू, अर्हद्दासकृत पुरुदेवचंपू हे उत्कृष्ट आहेत. संस्कृत गद्यात वादीभसिंहाचे गद्यचिंतामणि उल्लेखनीय आहे. नाटकात हस्तिमल्लांचे विक्रांतकौरव, मैथिलीकल्याण, अंजनापवनंजय आणि रामचंद्रसूरींची नलविलास, सत्यहरिश्चंद्र, राघवाभ्युदय, निर्भयभीमव्यायोग ही नाटके दर्जेदार आहेत.

याशिवाय स्तोत्र, व्याकरण, अलंकार, ज्योतिष, राजनीति इत्यादी विविध दालनेही समृद्ध आहेत. याप्रमाणे संस्कृत आणि प्राकृत साहित्याचे हे केवळ विहंगमावलोकन आहे.

## देशी भाषांतील जैन साहित्य

दक्षिणेकडील तामिळ भाषेचा अपवाद सोडल्यास दहाव्या शतकापासून भारतीय देशी भाषात साहित्यनिर्मितीस आरंभ झाला आहे असे दिसून येते. तामिळ भाषा ही त्यामानाने बरीच प्राचीन आहे. जैन ग्रंथकारांनी देशी अथवा लोकभाषांचा पुरस्कार ग्रंथलेखनासाठी नेहमीच केलेला दिसून येईल.

### तामिळ :–

तामिळ भाषेच्या पाच महाकाव्यांपैकी चिंतामणि, सिलप्पडिकारम् आणि वलैतापति या तीनही महाकाव्यांचे कर्ते जैन होते. सिलप्पडिकारम् हा अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथ साहित्यिक रीतीबाबत प्रमाणभूत मानला जातो. तसेच तामिळीतील पाच लघुकाव्यांपैकी यशोधरकाव्य, चूडामणि, उदयन्कथै, नागकुमारकाव्य व नीलकेशी या पाचही काव्यांचे निर्माते जैन आहेत. ' नन्नोलं ' हे तामिळ भाषेचे व्याकरण फारच प्रचलित आहे. इ. स. सहाव्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंतच्या : काळात जैन ग्रंथकारांनी तामिळ वाङ्मयात मोलाची भर घातली. विशेषतः दहाव्या शतकातील तिरुतक–देवर यांच्या ' जीवक चिन्तामणी 'चे स्थान तामिळ साहित्यात सर्वश्रेष्ठ समजले जाते.

### कन्नड :–

तामिळप्रमाणेच प्राचीन कन्नड वाङ्मयाच्याही समृद्धीत जैन ग्रंथकारांनी मोलाची भर घातली आहे. कर्नाटकात जैनांना राजाश्रयही चांगला लाभला. चामुंडरायासारखे श्रेष्ठ सेनापती आणि राष्ट्रकूटांपैकी अमोघवर्षासारख्या नृपतींनी कन्नड जैन साहित्यात आपला वाटा उचलला, कन्नड साहित्य उन्नत, प्रौढ, परिपूर्ण करण्याचे श्रेय जैन कवींना आहे. ' कर्नाटक कवि चरिता ' चे लेखक आर्. नरसिंहाचार्यांनी म्हटले आहे की " कन्नड भाषेचे मूळ कवि जैन होते. आजपर्यंत उपलब्ध असलेल्या सर्व प्राचीन व उत्तम कृती जैन कवींच्याच होत्या. विशेषतः प्राचीन जैन कवींमुळेच कन्नड भाषेला सौंदर्य व कांती आली आहे. पंप; रन्न व पोन्न यांना तर कवींमधील रत्नच मानणे योग्य होईल. इतर कवींनी १४ व्या शतकाच्या अंतापर्यंत सर्वश्रेष्ठ चंपूकाव्यांची रचना केली. कन्नड भाषेस सहाय्यक असे छंद, अलंकार, व्याकरण, कोश इत्यादी ग्रंथ अधिक प्रमाणांत जैनांनीच लिहिलेले आहेत. "

### गुजराती व राजस्थानी :–

दक्षिण भारतीय प्रमुख अशा दोन भाषांतील साहित्याच्या इतिहासात जैन साहित्याचे प्रमुख पाहिल्यानंतर उत्तर भारतातील देशी भाषांच्या उदयकाली जैन

ग्रंथकारांनी केलेली सारस्वताची सेवा पाहणे इष्ट होईल. गुजराती आणि राजस्थानी यांचे स्वरूप काही शतकापूर्वी एकच होते असे म्हटले³ जाते. या दोन्ही भाषांचे प्राचीन स्वरूप सर्वसाधारणपणे सारखे आहे. त्यांच्या आरंभकाळी कित्येक जैन कवींनी त्या दोन्हींचा उल्लेख 'राज भाषा' म्हणून केलेला आहे म्हणूनच ब्रह्मजिनदासासारख्यांचे ग्रंथ आजतरी पूर्णपणे गुजरातीत अथवा राजस्थानीत आहेत असे म्हणता येत नाही. तत्पूर्वीच्या अपभ्रंशाचा तो परिणाम आहे. जैन साहित्यिकांनी गुर्जरभाषेची केलेली सेवा 'जैन गुर्जर कविओ'⁴ चे दोन भाग प्रसिद्ध झाल्यामुळे आता सर्वमान्य झाली आहे. गुजरात व राजस्थानात जैनांना लोकाश्रय व राजाश्रय दोन्हींचा लाभ बराच काळ मिळाला. इ. स. ९५० ते १२५० पर्यंतच्या काळात गुजरातमध्ये चालुक्यवंशीय राजांकडून आणि जैन साधूंकडून साहित्यसेवेला फार मोठे प्रोत्साहन मिळाले. सिद्धराज, कुमारपाळ या राजांना व हेमचंद्राचार्यांच्या साहित्यसेवेचा प्रभाव अपभ्रंशाचा लोप होऊन गुजरातीचा जन्म झाल्यावरहि टिकून राहिला असल्यास नवल नाही. 'गुर्जर रासावली'तील⁵ रचना पाहिल्यास बहुतेक सर्व रचना जैन कवींच्याच दिसून येतील. वज्रसेनकृत भरतेश्वर बाहुबलीरास, पाल्हणकविकृत, नेमिराजुल–बारहमासा विनयचंद्रकृत नेमिनाथ–चतुष्पदिका या साहित्यकृती साहित्यगुण संपन्न आहेत.

## हिंदी :–

गुजरातीप्रमाणेच हिंदीच्याही प्रारंभकाली तत्पूर्वीच्या अपभ्रंश वाङ्मयातील प्रवृत्ती टिकून राहिल्यामुळे जैनांचा प्रभाव दिसून येतो. हिंदीच्या संधिकालसाहित्यात जैन साहित्याला स्वतंत्र स्थान आहे. 'पउम चरिउ' कार स्वयंभूला अपभ्रंशापेक्षा हिंदीकडे ओढण्याची प्रवृत्ति दिसून येते. मेरुतुंग, जोइन्दु, रामसिंह इत्यादींचे काव्य संधिकालीन आहे. १६ व्या शतकापासून हिंदी गद्य ग्रंथ जैन साहित्यात बरेच निर्माण झाले. तत्त्वार्थसूत्र, गोम्मटसार आदि बहुतेक सैद्धान्तिक ग्रंथांची हिंदी गद्य टीका लिहीली गेली. गद्य साहित्यात पं. टोडरमलजींचे मोक्षमार्ग–प्रकाशकचे स्थान अद्वितीय आहे. पद्यात पं. दौलतरामजींच्या 'छहढाला' या ग्रंथास तेच स्थान मिळाले आहे. पं. सदासुख, बुधजन, द्यानतराय, जयचंद इत्यादी अनेक विद्वानांनी हिंदीसाहित्यात मोलाची भर टाकली आहे. कविवर्य बनारसीदासांचे अर्धकथानक हे आत्मचरित्रपर काव्य ही हिंदीतील अपूर्व कलाकृती मानली जाते. त्यांचे 'नाटक

---

३. भाषा आणि संस्कृति – नारायण गोविंद कालेलकर, पृष्ठ ६५.

४. जैन गुर्जर कविओ – एम्. डी. देसाई.

५. गुर्जर रासावली – ओरिएंटल इन्स्टिट्यूट, बडोदा.

समयसार ' सुद्धा तेवढेच प्रसिद्ध आहे. हिंदी जैन साहित्याचा संक्षिप्त इतिहास[६] लिहिला गेला आहे.

## महाराष्ट्रीय अपभ्रंश आणि मराठी

हिंदी, गुजराती, बंगाली मराठी आदि विद्यमान देशभाषा या त्या त्या प्रदेशातील अपभ्रंश भाषातून विकसित झाल्या हा सिद्धान्त आज सर्वमान्य झाल्यासारखा दिसतो. मराठी ही मुख्यतः ' महाराष्ट्री अपभ्रंश ' भाषेतून जन्माला आली हेही आज मान्य झाले आहे. पण ही प्रक्रिया कशी घडली हे थोडे सूक्ष्म दृष्टीने पाहिले तर असे दिसून येते की हिंदीत आणि गुजरातीत ज्याप्रमाणे तत्पूर्वीच्या अपभ्रंशातील धार्मिक आणि भावनिक प्रवृत्तीच पुढे आलेल्या दिसतात त्याप्रमाणे मराठीच्या बाबतीत दिसून येत नाहीत. प्राचीन मराठीत महाराष्ट्री अपभ्रंशाच्या सर्व प्रवृत्ती आढळून येत नाहित. येथे प्रवाह बराच बदलला आहे. भाषेचे स्वरूप आणि त्यातील वैचारिक, भावनिक आशय या दोन्ही बाबतीत हे विधान खरे आहे असे मला वाटते. मराठी ही महाराष्ट्री अपभ्रंशाची अगदी सरळ पुढची अवस्था नाही. येथे ' संस्कृत ' च्या पुनरुज्जीवनाचा प्रभाव दिसतो असे संशोधकांना दिसून आले आहे. " Marathi can be rightly described as a reoriented form of its immediate predecessor, Viz, Apbhramsa, with a number of borrowed Sanskritisms which made it real living language " असे डॉ. शं. गो. तुळपुळे ' यांनी An old marathi Reader ' मध्ये स्पष्टपणे म्हटले आहे आणि याचा संबंध त्यानी वैचारिक दृष्टीने वैदिक संस्कृतीच्या शंकराचार्यांनी केलेल्या पुनरुज्जीवनाकडे लावला आहे. म्हणूनच अपभ्रंशातून जन्म घेतलेल्या मराठीचा चेहरा मोहरा बराच बदलला आहे. मराठीला मातृस्थानी असलेल्या महाराष्ट्री अपभ्रंशाची आणि मराठीची व्याकरणविषयक मीमांसा करण्याची येथे फारशी जरुरी नाही. प्रस्तुत प्रबंधाच्या दृष्टीने दुसरा मुद्दा महत्त्वाचा वाटतो तो हा की, महाराष्ट्री अपभ्रंश वाङ्मयातील प्रवृत्तींचा प्रभाव आशयाच्या बाबतीत प्राचीन मराठीत दिसून येतो किंवा नाही याचे समर्पक आणि अचूक उत्तर शोधण्यासाठी आपणास महाराष्ट्री अपभ्रंश साहित्याचा थोडक्यात विचार करावा लागेल.

महाराष्ट्री प्राकृत नतर महाराष्ट्री अपभ्रंशाचा काळ येतो. " जैन सूरींनी वाङ्मयाच्या असा कोणताही प्रकार अपभ्रंश भाषेत गुंफण्याचा टेवला नाही.[७] " असे संशोधक मान्य करतात. या वाङ्मयाचा व्याप मोठा होता. विविधताही त्यात भरपूर

---

६. हिंदी जैन साहित्यका इतिहास–पं. कामताप्रसाद जैन, भारतीय ज्ञानपीठ, काशी.

७. मराठीभाषा उद्गम व विकास.–कृ. पा. कुलकर्णी पृ. १२३

होती. विशेषतः 'अभिमान-मेरु' कवि पुष्पदंत तर या भाषेतील सर्वांत श्रेष्ठ कविरत्न होय. पुष्पदंत हा राष्ट्रकूटकालीन कवि होता. त्या राज्यात जैन धर्मीयांना चांगला आश्रय होता. डॉ. तगारे पुष्पदंताच्या भाषेला 'राष्ट्रकूटकालीन मराठी' मानतात. पुष्पदंताची मातृभाषा मराठी असावी. त्याचे मूळचे नाव केशव असून 'ज्योतिष रत्नमाला'-कार श्रीपति हा पुष्पदंताचा पुतण्या होता असे मानले जाते. 'ज्योतिषरत्नमाला' मराठीतील आद्यग्रंथ म्हणून प्रसिद्ध आहे. पुष्पदंताचा काळ १० वे शतक आहे. महापुराण, णायकुमारचरिउ, जसहरचरिउ असे त्याचे तीन ग्रंथ म्हणजे अपभ्रंशातील रत्नत्रयीच होय. कनकामराचे (इ. स. १०६५) 'करकंड-चरित', धनपालाचे भविसयत्तकहा, जोइन्दुदेवाचे 'परमात्मप्रकाश' व 'योगसार', रामसिंहकृत 'पाहुडदोहा' हे ग्रंथ अतिशय रसाळ आहेत. या अपभ्रंश भाषेत जरी बौद्ध व नाथ सांप्रदायिकांनी कांही ग्रंथ लिहिले असले तरी जैन ग्रंथकाराचा वाटा सर्वांत अधिक आहे. पण त्याचा हा उत्साह मराठीच्या प्रारंभकाळी दिसून येत नाही. म्हणूनच मराठी साहित्याचा विचार करताना प्रारंभी तरी मुकुंदराज, ज्ञानेश्वर हीच नावं येतात. हिंदी किंवा गुजरातीच्या बाबतीत असे झाले नाही. म्हणूनच असे म्हणावेसे वाटते की महाराष्ट्री अपभ्रंशातून मराठीचा जन्म होत असता भाषिक बाबतीत संस्कृतचे व धार्मिक बाबतीत वैदिकाचे पुनरुज्जीवन झाले व साहित्याचीही गती बदलली. यादवांच्या राजवटीत या संक्रमणास विशेष प्रोत्साहन मिळाले.

## मराठी जैन साहित्य

महाराष्ट्री अपभ्रंश ज्याकाळी ग्रांथिक स्वरूपात वैभवात होती त्याच काळी मराठी ही बोलभाषा म्हणून व्यवहारात चालू असली पाहिजे. इ. स. च्या पांचव्या शतकापासून दहाव्या शतकापर्यंत अपभ्रंशाचा काळ मानला जातो. दहाव्या शतकात कवी पुष्पदंत झाला. म्हणजेच त्या काळी ती भाषा वैभवाच्या शिखरावर होती. अर्थातच दहाव्या शतकात एकाएकी अपभ्रंशाचा काळ सरला असे म्हणता येणार नाही. या नंतरही इ. स. च्या १४ व्या शतकापर्यंत महाराष्ट्री अपभ्रंशातून ग्रंथरचना होतच राहिली. आणि इकडे ११ व्या शतकात (शके १२१०) 'विवेकसिंधु' सारखे प्रौढ ग्रंथ मराठीत निर्माण होऊ लागले. जैन ग्रंथकारांनी मात्र आपली अपभ्रंशाची परंपरा तशीच पुढे चालू ठेवली. इ. स. च्या १५ व्या शतकापर्यंत या ग्रंथकारांचे मराठीकडे खास लक्ष गेलेले दिसत नाही. कारण आज तरी त्या पूर्वीचे मराठी जैन ग्रंथ उपलब्ध झाले नाहीत तोपर्यंत जैन साहित्यिकांनी मराठीत लिहिलेच नाही असे म्हणता येणार नाही. फार तर ग्रंथ आज उपलब्ध नाही असे म्हणता येईल. तरी परंतु मराठीत इ. स. च्या चौदाव्या शतकापर्यंत जैन

---

८. जैन साहित्य और इतिहास – नाथूराम प्रेमी पृ. २३०

ग्रंथांची विशेष निर्मिती झाली नसली पाहिजे असे मला वाटते. त्याची कारणमीमांसा पुढीलप्रमाणे करता येईल.

१) वऱ्हाड व मराठवाडा या विभागात इ. स. च्या १४ व्या शतकानंतरच्या मराठी बोलणाऱ्या जैन समाजात विशेष हालचाली दिसू लागतात. मध्ययुगीन काळात भट्टारकांच्या धर्मपीठांशी जैनांच्या सांस्कृतिक चळवळी निगडित झाल्या होत्या. महाराष्ट्रात राष्ट्रकूटांचा पराभव होऊन मान्यखेट (मलखेड) बळी पडल्यानंतर जैनांना राजाश्रय राहिला नाही, म्हणूनच महाकवी पुष्पदंतालाही असे म्हणावेसे[१] वाटले, " जे मान्यखेट नगर दीन व अनाथांचे धन होते, लोकांनी भरलेले आणि उद्यानांनी सुशोभित होते, जे इंद्रपुरीलाही वैभवात मागे टाकीत होते, ते आता ' धारानाथा 'च्या कोपाला बळी पडले. हे विदग्धप्रियनगर दग्ध झाले. तेव्हा हे पुष्पदंता, तू आता कोठे निवास करशील ? " कर्नाटकात आणि गुजरात राजस्थानात परिस्थिती वेगळी होती. तिकडे राजाश्रय आणि लोकाश्रय यामुळे नतरच्या काळातही जैन समाजाची भरभराट झाली. इ. स. चौदाव्या शतकात वऱ्हाडात कारंजा हे जैनांचे सांस्कृतिक केंद्र बनले. तेथे भट्टारकांची--मठाधीशांची गादी स्थापन झाली. तेथून विदर्भ व मराठवाडा विभागात जैन समाजास नवीन चैतन्य प्राप्त झाले.

२) दक्षिणेत कोल्हापूर, नादणी रायबाग या भागात जैन समाज बहुसंख्य होता आणि त्याला राजाश्रयही होता. पण तो विभाग त्या काळी जैनांच्या दृष्टीने विचार करता कर्नाटकात मोडत होता असे दिसते. त्यामुळे त्या काळच्या तिकडच्या विद्वानांनी कन्नड भाषेत ग्रंथरचना केली असावी.

३) राजस्थानी, गुजराती, मिश्रमराठी अशी ग्रंथरचना या काळात होई आणि महाराष्ट्रीय जैन समाजाची धार्मिक गरज भागविली जाई. पण जेव्हा मराठी प्रदेशात भट्टारकांची पीठे झाली आणि त्या भूप्रदेशातील जनतेशी जैन धर्मगुरू व पंडित यांचा संबंध येऊ लागला तेव्हा मराठी ग्रंथ तयार केल्याशिवाय उपाय राहिला नाही म्हणून जैन साहित्यिक मराठीत ग्रंथरचना करू लागले. गुजरातेतील ईडर पीठाकडून वऱ्हाडातील कारंजा पीठास ग्रंथरचनेची प्रेरणा मिळाली. कारंजाकडून लातूरला हे लोण आले. इ. स.च्या १८ व्या शतकानंतर जेव्हा कारंजा व कोल्हापूर येथील भट्टारकांचा विशेष संबंध येऊ लागला तेव्हा १८ व्या शतकाच्या अगदी उत्तरार्धात कोल्हापूर पीठाला मराठी ग्रंथनिर्मितीची प्रेरणा मिळाली.

४) काही कवी मराठी मातृभाषा असूनही अपभ्रंश किंवा तत्सदृश अशी रचना करीत असावेत. अशी भाषा गुजराती, हिंदी, मराठी या तीनही भाषा बोलणाऱ्यांना जवळची वाटे. अशा स्वरूपाचे एक हस्तलिखित मला अंजनगाव

१. पुष्पदंतकृत महापुराण, संधि ५०.

मुर्शी येथे मिळाले. १० ' रामायणी कथा ' असे या ग्रंथाचे नाव असून ते पाच अध्यायांचे एक सुंदर काव्य आहे. शके १४४६ मध्ये शांतकीर्ति नांवाच्या मुनीने लिहिले आहे. त्याची रचना अमरावती येथे झाली. त्या ग्रंथातील भाषेचा नमुना पुढील दोन दोहांवरून दिसून येण्यासारखा आहे,

" मेघडंबर छत्र तागिति । कनकदंड चमर दालिनि ।
असें चरण्यो ऐरावति । तेहिवरि आरूढ सीतावती ।
तवं जनक बोले भूपति । सुनत सुमट तुम्ही एकिचिती ।
वज्र धनुक चढावेहि जरि । ते सीना परणो सुंदरी ।

अशा प्रकारची काव्ये निर्माण होत राहिल्यामुळे साथ मराठी भाषेकडे जैन साहित्यिकाचे लक्ष इ. स. चौदाव्या शतकापर्यंत फारसे गेले नसावे. प्रत्यक्षात मराठीत लिहिलेले जैन ग्रंथ इ. स. च्या पंधराव्या शतकापासून उपलब्ध होत असले तरी मराठीच्या प्रारंभकाळापासून तो पंधराव्या शतकापर्यंत जैनांनी शिलालेख किंवा अन्यत्र मराठीचा उपयोग केलेला आहे. किंबहुना मराठीचे प्राचीन अस्तित्व शोधणाऱ्या संशोधकांना जैन-साधनाचाच जास्त उपयोग झालेला दिसून येतो. संशोधकानी ती स्थळे शोधून काढली आहेत. त्याचे संकलन येथे केले आहे.

इ. स. ७७८–कुवलयमाला–( उद्योतन सूरीकृत. ) या ग्रंथात ' इय अट्ठारस देसी ' म्हणून ज्या अठरा देश-भाषांचा उल्लेख केला आहे त्यात मराठीचाही उल्लेख आहे. ती गाथा अशी आहे—

*दढमडह सामलंगे सहिरे अहिमाण कलहसीलेय । दिण्णले गहिल्ले उल्लविरे तत्य मरहट्ठे ॥*

इ. स. ९३२

सुप्रसिद्ध कन्नड कवि पंप याच्या ' विक्रमार्जुनविजय ' काव्यात द्रोणाचार्यांच्या तोंडी " अरे होय जाबाप्पा " असे उद्गार घातले आहेत.

इ. स. ११२८

कवि यशश्चंद्र यांच्या ' राजिमतीप्रबोध ' काव्यात एका महाराष्ट्रीयाने राजीमतीच्या सौंदर्याचे वर्णन मराठीत केल्याचे दाखविले आहे. ते असे—

---

१०. शके चौदासे सेतालिस कहि । तारण संवत्सर वर्षे सहि । आश्विन कृष्ण पक्ष शोभंति । शनिवार सप्तमी वर्तंती । भट्टारक श्री त्रिभुवन कीर्ति । तस्य शिष्य मुनि शांतकीर्ति विचरच्यते । रामायणी कथा पंचमोध्यायः समाप्तः ( हस्तलिखिताचा अंत्यभाग )

" देव चतुरांगुळाची जीहा मि काइ सांगवी ।
गोमटी मुह फाफट निलाट चापट्ट—" इत्यादी

याप्रमाणे जैन कवींनी मराठीचा उपयोग करून तिच्या अस्तित्वाचा पुरावा इ. स. च्या ८ व्या शतकापासून दिला आहे व मधून मधून तिचा उपयोगही केला आहे. चौदाव्या शतकात नयचंद्राने आपल्या हिंदी रंभामंजरीत आणि इ. १२१० मध्ये कन्नड कवि रत्न याने अनंतनाथ पुराणात मुद्दाम मराठी पंक्तींचा उपयोग केला आहे.

## महाराष्ट्र आणि जैन संस्कृती

मराठीतील जैन साहित्याच्या इतिहासाकडे वळण्यापूर्वी महाराष्ट्र आणि जैनसंस्कृती यांचा थोडक्यात परिचय करून घेणे आवश्यक आहे. महाराष्ट्रात आज जैन समाज तुरळक दिसतो. मंदिरादि शिल्पातही बौद्ध धर्मीयांशी तुलना करता महाराष्ट्रात जैन धर्मीयांचे प्राचीन अवशेष कमीच आहेत. असे जरी असले तरी महाराष्ट्र संस्कृतीवर जैन धर्माचा बराच परिणाम झाला आहे यात शंका वाटत नाही. व्यवहारभाष्य, बृहत्कल्पभाष्य, निशीथभाष्य वगैरे प्राचीन जैन साहित्यात दक्षिणापथ महाराष्ट्र, मरहट्ट, कोंकण यांची वर्णने आढळतात. " मरहट्ट देश अशोकाच्या काळी अनार्य होता तो अशोकाच्या नातवाने, संप्रतीने जैनधर्माच्या प्रसारासाठी सुगम व सुखावह केला. मरहट्ट लोक फार वाचाळ, न्हावी आणि कलाल यांना इतर ठिकाणाप्रमाणे या भागात तिरस्काराने वागविले जात नाही. कलालाच्या दुकानात दारू शिल्लक आहे की नाही हे दाखविणारे निशाण असे. लोकांना पालक—भाजी व केळ्याचे काप आवडत. ' अण्णा ' ही आदरार्थी संबोधण्याची संज्ञा असे. दक्षिणापथात मातुलकन्या परिणयाची चाल असे. " महाराष्ट्राविषयी इत्यादी माहिती अत्यंत प्राचीन समजल्या जाणाऱ्या ग्रंथात[११] आढळते. महाराष्ट्राशी जैनधर्मीयांचा संबंध नक्की कोणत्या काळी आला हे समजणे कठिण आहे. पण इ. स. पूर्व ४ थ्या शतकात महाराष्ट्रात जैनधर्मीयांचे आगमन फार मोठ्या प्रमाणात झाले असे सामान्यपणे मान्य केले जाते. त्यावेळी श्रुतकेवली भद्रबाहु आपल्या हजारो शिष्य-मुनींसहित दक्षिणेत आले आणि विहार करीत त्यांनी शेवटी कर्नाटकात निवासस्थान वसविले. यात भद्रबाहूने मौर्य-सम्राट चंद्रगुप्ताला प्रभावित केले होते असे म्हटले[१२] जाते. महाराष्ट्राच्या इतिहासातील उत्तर काळात राष्ट्रकूट घराण्यातील राजांनी जैन पंडितांना आश्रय दिला होता. जिनसेन हे राजा अमोघवर्षाचे गुरु होते. शके १०६३ च्या अंजनेरी ( नासिक ) येथील

११. महाराष्ट्र जीवन — परंपरा प्रगती आणि समस्या. गं. बा. सरदार पृ. ५४

१२. भारतीय संस्कृतिमें जैन धर्मका योगदान —डॉ. हिरालाल जैन पृ. ३५

संस्कृत शिलालेखात यादव राजा सेउणचंद्र यांनी तेथील दोन दुकाने चंद्रप्रभ जिन-मंदिराच्या खर्चासाठी दान दिल्याचा उल्लेख[13] आहे. यादवराजा रामचंद्राची आई म्हणजेच कन्हरदेवाची राणी हिच्या आज्ञेवरून सर्वाधिकारी मायदेव याने जिनमंदिर बांधविले असाही उल्लेख[14] येतो. महाराष्ट्रावर जैन संस्कृतीचा परिणाम हा अभ्यासाचा स्वतंत्र असा विषय होईल. परंतु त्यातील काही ठळक मुद्दे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

( १ ) महाराष्ट्रातील ग्रामधर्मांचा विचार करताना गावाबाहेरील देवस्थानांतर्गत देवता व तत्संबंधक गान्हाणे पाहिले म्हणजे ग्रामधर्मांतही जैनांना स्थान प्राप्त झाल्याचे दिसून येईल. " जैन ब्राह्मण " " जैन महालक्ष्मी " यांचा स्वीकार[15] तेथे केला गेला आहे.

( २ ) मराठी लोकगीतातही जैन धर्मीय पौराणिक कथांना स्थान मिळाल्याचे डॉ. नांदापूरकर[16] यांनी दाखविले आहे.

" पहिली माझी वई । अरिहंत देवाजीचा ।
नेमीचं राज्य । राजामती बाईला ॥
" पहिली माझी वई । वाल्याच्या चौफेरी ।
उभे हाती गिरनारी । नेमीनाथ महाराजाला
" पहिली माझी वई । नेमीनाथाला गाईली ।
राजामती बाई ऐसे वनात राहिली ॥

स्त्रियांच्या लोकगीतात स्थान मिळविण्यासाठी कोणत्याहि संस्कृतीची पाळेमुळे फार खोल रुजावी लागतात.

( ३ ) महाराष्ट्रात एकेकाळी नाथ पंथाचा प्रभाव प्राबल्याने होता असे दिसून येते. नाथ गुरुंच्या यादीत आदिनाथ, पारसनाथ इ. जैन परंपरेतील नावे आढळतात. मलधारण वगैरेसारखे काही जैनधर्मीय आचार बऱ्याच नाथ योग्यांच्या आचरणात दिसून येतात.[17]

( ४ ) महानुभाव पंथाच्या आचार धर्मावर आणि तत्त्वज्ञानातील वेद-अमान्यतेवर जैन धर्माचा परिणाम झाला आहे. महानुभाव आणि माध्व सांप्रदायिक

१३. जैन शिलालेख संग्रह, भा. ३. शिलालेख न. ३१७.
१४. Jainism in South India and some Jain Epigraphs, page 390.
१५. प्राचीन महाराष्ट्र भा. २. –श्री. व्यं. केतकर. पृ. २५४, २५५.
१६. पहिली ओवी.–डॉ. नांदापूरकर, प्रतिष्ठान मासिक, अंक १.
१७. मऱ्हाठी संस्कृति. –शं. बा. जोशी पृ. १६२

या दोघांचाही उल्लेख या बाबतीत तरी एकत्रित केला जातो. काहींनी तर माध्वमताला 'प्रच्छन्न जैन' म्हटले [१८]आहे. श्री चक्रधरांना नग्नदेव जिनवीर, गोमटदेव वगैरे पर्याय नावे होती, असे त्यांच्या चरित्रकारानी लिहिले आहे. 'गोमट' हे नाव श्रवणबेळगोळच्या बाहुबलीच्या मूर्तीला आहे हे प्रसिद्ध आहे. महानुभाव पंथातील चक्रधरोक्त अहिंसेचा आचार पदोपदी जैन आचारांची व विचारांची आठवण करून देतो. महानुभाव पंथीयात विंचू साप अशा प्राण्यांनाही मारण्यास मनाई होती. पवन पावनातही हिंसा नसो असे म्हटले [१९]आहे.

(५) 'ॐ नमः सिद्धम्' हा जैनांचा मंत्र महाराष्ट्रीयांच्या विद्याभ्यासाच्या प्रारंभी येऊन बसला आहे. कांही हिंदु देवळात जैन गुरुवांची प्रथा आहे. तर काही जैन देवळात हिंदु गुरवांची वहिवाट [२०]आहे.

आजचा महाराष्ट्रातील मूळ जैन समाज हा प्रामुख्याने दिगंबर पंथीयच आहे. तो पुढील जाती उपजातींचा बनला आहे. १) सेतवाळ, २) पंचम, ३) चतुर्थ, ४) कासार, ५) बोगार, ६) धाकड, ७) गुजर-हुंबड, ८) मारवाडी खंडेलवाल, पल्लीवाल, आगरवाल. ९) बघेरवाल, १०) कांबोज. ११) नेमा (नेवे). काही प्रमुख शहरात व्यापाराच्या निमित्ताने श्वेतांबर जैन पंथीयही स्थायिक झाले आहेत. वर उल्लेखिलेल्या जातींपैकी सेतवाळ हे सर्व महाराष्ट्रभर आहेत. चतुर्थ-पंचम हे मुख्यतः दक्षिण महाराष्ट्रात आहेत. चतुर्थ समाज प्रामुख्याने शेतीचा व्यवसाय करतो. बाकीचा समाज हा व्यापारी असून तो सोयीप्रमाणे स्थायिक झाला आहे. बघेरवाल हे विदर्भात व मराठवाड्याच्या उत्तर भागात आहेत. गुजर व मारवाडी जैन समाज सोडल्यास इतर बहुतेक सर्वजण महाराष्ट्रीय संस्कृतीचेच दिसतात सण, उत्सव, पोषाख, संस्कार, रूढी यात विशेष फरक राहिलेला नाही. सेतवाळ व बघेरवाल हे मराठी भाषाच बोलतात. इतर लोकही घरगुती व्यवहार सोडल्यास मराठीच बोलतात. वऱ्हाड, मराठवाडा आणि दक्षिण महाराष्ट्र येथील खेडोपाडी वसलेल्या जैन समाज हा इतर हिंदु समाजाप्रमाणेच मराठीचा वारसदार आहे. मराठी भाषा घडविण्यात व जडविण्यात याही समाजाचा वाटा आहे.

## मराठी साहित्यातील एक दालन

मराठीतील जैन साहित्याचे संशोधन आजवर फारसे झाले नाही. ज्यांनी ज्यांनी संशोधन करून या दालनावर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला आहे त्यांच्या

---

१८. महाराष्ट्र संस्कृति -पां. वा. जोशी पृ. १६९.
१९. महाराष्ट्र संस्कृति. ,, पृ. १६९.
२०. सन्मति, नोव्हेंबर १९५२. -वि. म. कर्वे यांचा लेख.

संशोधनाचा येथे निर्देशपूर्वक स्वीकार करून पुढे जाण्याचा प्रयत्न केला आहे. पुढील सर्व प्रकरणांसाठी ज्या साहित्याचा मी उपयोग केला आहे त्या प्रकाशित व अप्रकाशित साहित्याच्या संदर्भ स्थळांचे संकलन मी परिशिष्टात केले आहे. आणि त्याला 'अभ्यासाची साधने' असे नाव दिले आहे. जिज्ञासूंना संदर्भ स्थळासाठी त्याचा उपयोग होईल. महाराष्ट्र सारस्वतात जैन साहित्याचेही एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. पुढील संशोधनातून ते दिसून येईलच.



# प्रकरण २ रे

# प्राचीन मराठी जैन साहित्याचा कालानुक्रमे इतिहास

## या इतिहासाच्या पूर्व व उत्तर मर्यादा

पहिल्या प्रकरणात इ. सनाच्या १४ व्या शतकानंतर जैन ग्रंथकार हे मराठीत ग्रंथरचना करू लागले असे आपण पाहिले आहे. चालू प्रकरणात प्राचीन मराठीतील जैन साहित्याचा कालानुक्रमे इतिहास पाहावयाचा आहे. आज उपलब्ध इतिहासात गुणदास हा पहिला मराठी जैन ग्रंथकार दिसतो, त्याचा काल इ. सन १४५० च्या सुमारास येतो. म्हणजे मराठी जैन साहित्याच्या इतिहासाचा आरंभ आज तरी पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात होतो असे मानावे लागते. प्राचीन मराठीची उत्तर मर्यादा ही मराठी वाङ्मयाच्या इतिहास-लेखकाच्या मते एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत पोहोचते. अर्वाचीन मराठीचा आरंभ महाराष्ट्रात इंग्रजी राज्याच्या आगमनाबरोबर झाला. इ. स. १८१८ मध्ये पेशवाईची इतिश्री झाली. आणि इंग्रजी राज्यास महाराष्ट्रात आरंभ झाला. राज्ये तावडतोब नष्ट अथवा जमीनदोस्त होऊ शकतात. पण साहित्याचे तसे होत नाही. त्याची परंपरा एकाएकी तुटत नाही. प्राचीन मराठी जैन साहित्याच्या इतिहासात उत्तरकालाची मर्यादा ठरविताना इ. स. १८१८ लाच थांबणे अशक्य होते. इ. स. १८५० पर्यंत ती परंपरा तशीच चालू राहिली आहे. म्हणून इतिहासाच्या या प्रकरणात इ. स. १८५० पर्यंतच्या जैन मराठी साहित्याचा समावेश करण्याचे मी ठरविले आहे. म्हणजे इ. स. १४५० ते इ. स. १८५० पर्यंतच्या जवळ जवळ चारशे वर्षांतील जैन ग्रंथकार व त्यांनी निर्माण केलेले सर्व लहानमोठे ग्रंथ अथवा बारीकसारीक उपलब्ध रचना यांचा समावेश या इतिहासात होणार आहे.

## इ. स. चे १५ वे शतक

ब्रह्मगुणदास—कालदृष्ट्या विचार करता गुणदास हा पहिला मराठी (सन १४५०) जैन ग्रंथकार ठरतो. ब्रह्मगुणदास म्हणूनच हा कवी प्रसिद्ध आहे. 'ब्रह्म' ही ब्रह्मचारी या अर्थी लावलेली उपाधी आहे. ब्रह्मगुणदासाच्या नावावर 'श्रेणिकचरित्र'

संशोधनाचा येथे निर्देशपूर्वक स्वीकार करुन पुढे जाण्याचा प्रयत्न केला आहे. पुढील सर्व प्रकरणांसाठी ज्या साहित्याचा मी उपयोग केला आहे त्या प्रकाशित व अप्रकाशित साहित्याच्या संदर्भ स्थळांचे संकलन मी परिशिष्टात केले आहे. आणि त्याला ' अभ्यासाची साधने ' असे नाव दिले आहे. जिज्ञासूंना संदर्भ स्थळासाठी त्याचा उपयोग होईल. महाराष्ट्र सारस्वतात जैन साहित्याचेही एक वैशिष्टयपूर्ण स्थान आहे. पुढील संशोधनातून ते दिसून येईलच.

● ● ●

## प्रकरण २ रे

# प्राचीन मराठी जैन साहित्याचा कालानुक्रमे इतिहास

### या इतिहासाच्या पूर्व व उत्तर मर्यादा

पहिल्या प्रकरणात इ. सनाच्या १४ व्या शतकानंतर जैन ग्रंथकार हे मराठीत ग्रंथरचना करु लागले असे आपण पाहिले आहे. चालू प्रकरणात प्राचीन मराठीतील जैन साहित्याचा कालानुक्रमे इतिहास पाहावयाचा आहे. आज उपलब्ध इतिहासात गुणदास हा पहिला मराठी जैन ग्रंथकार दिसतो, त्याचा काल इ. सन १४५० च्या सुमारास येतो. म्हणजे मराठी जैन साहित्याच्या इतिहासाचा आरंभ आज तरी पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात होतो असे मानावे लागते. प्राचीन मराठीची उत्तर मर्यादा ही मराठी वाङ्मयाच्या इतिहास-लेखकांच्या मते एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत पोहोचते. अर्वाचीन मराठीचा आरंभ महाराष्ट्रात इंग्रजी राज्याच्या आगमनाबरोबर झाला. इ. स. १८१८ मध्ये पेशवाईची इतिश्री झाली. आणि इंग्रजी राज्यास महाराष्ट्रात आरंभ झाला. राज्ये तावडतोब नष्ट अथवा जमीनदोस्त होऊ शकतात. पण साहित्याचे तसे होत नाही. त्याची परंपरा एकाएकी तुटत नाही. प्राचीन मराठी जैन साहित्याच्या इतिहासात उत्तरकालाची मर्यादा ठरविताना इ. स. १८१८ लाच थांबणे अशक्य होते. इ. स. १८५० पर्यंत ती परंपरा तशीच चालू राहिली आहे. म्हणून इतिहासाच्या या प्रकरणात इ. स. १८५० पर्यंतच्या जैन मराठी साहित्याचा समावेश करण्याचे मी ठरविले आहे. म्हणजे इ. स. १४५० ते इ. स. १८५० पर्यंतच्या जवळ जवळ चारशे वर्षांतील जैन ग्रंथकार व त्यांनी निर्माण केलेले सर्व लहानमोठे ग्रंथ अथवा बारीकसारीक उपलब्ध रचना याचा समावेश या इतिहासात होणार आहे.

### इ. स. चे १५ वे शतक

ब्रह्मगुणदास—कालदृष्ट्या विचार करता गुणदास हा पहिला मराठी (इ. स. १४५०) जैन ग्रंथकार ठरतो. ब्रह्मगुणदास म्हणूनच हा कवी प्रसिद्ध आहे. 'ब्रह्म' ही ब्रह्मचारी या अर्थी लावलेली उपाधी आहे. ब्रह्मगुणदासाच्या नावावर 'श्रेणिकचरित्र'

या मोठ्या काव्याशिवाय 'क्षमागीत', 'विंचूगीत', 'गान्हाणें' व 'रामचंद्र-हळदुली' अशा किरकोळ रचनाही मिळतात. प्रथमतः त्याच्या ग्रंथांची माहिती पाहून नंतर त्याच्या काल-गुरु इत्यादींसंबंधी विचार करणे योग्य होईल.

श्रेणिकचरित्र–श्रेणिक हा म. महावीरकालीन मगधदेशाचा सम्राट होता. म. महावीराच्या चरित्राशी त्याचा संबंध वराच येतो. त्याचे हे मराठी काव्यमय चरित्र गुणदासाने सहज परंतु ललितरम्य अशा शैलीत लिहिले आहे. या ग्रंथाचे अधिकार ४ असून ओवीसंख्या ३,००० आहे. ग्रंथाच्या शेवटी ब्रह्मजिनदास या आपल्या गुरूचा कर्त्याने उल्लेख केला आहे आणि हा ओवीबद्ध ग्रंथ त्याच्या चरणी समर्पण केल्याचे सांगितले आहे.[1] श्रेणिकाचा पिता उपश्रेणिक याच्या व भद्रपूरच्या सोमराजाच्या संघर्षापासूनच या काव्याचा प्रारंभ होतो. सावत्र मातेमुळे वडिलांनी राज्य देण्याचे टाळले आणि बालपणीच श्रेणिकावर संकटपरंपरा कोसळली, त्यानंतर त्याचा नंदेशी विवाह, राज्यप्राप्ति, बौद्धधर्माचा स्वीकार असा कथाभाग येतो. चेटक राजाची जैन राजकन्या चेलना हिच्याशी त्याचा विवाह होतो आणि बौद्धधर्म की जैनधर्म असा संघर्ष त्याच्या जीवनात निर्माण होतो. पण शेवटी त्याला जैन धर्माचा स्वीकार करावा लागतो. श्रेणिकाचा अंत मात्र मोठ्या दुःखद परिस्थितीत होतो. अनेक कथा व उपकथा यांनी सजलेले हे चरित्र जसे मनोरंजक आहे तसे बोधप्रदही आहे.

हे काव्य ब्रह्मगुणदासाने स्वतःचा गुरु ब्रह्मजिनदासाच्या 'श्रेणिकरास' या गुजराथी ग्रंथाच्या आधारे लिहिले असावे. ब्रह्मजिनदासाने श्रेणिकरास हा ग्रंथ सन १४६४ च्या दरम्यान लिहिला असे समजण्यास हरकत नाही. कारण त्याचा काळ सन १४५९ – १४६४ च्या सुमारास निश्चित समजला जातो.[2] काव्यकथेचा आधार जरी ब्रह्मजिनदासाच्या ग्रंथाचा घेतला असला तरी गुणदासाची ही रचना अस्सल मराठी वाटते. तत्कालीन मराठीतील कित्येक शब्द वाक्प्रचार या ग्रंथात सहजपणे उपयोगात आणले आहेत.

### क्षमागीत

क्षमेचे महत्त्व वर्णन करणारे ६ कडव्याचे एक गीत आहे. क्रोधामुळे

---

१. शिष्य सकलकीर्ति देवाचा । तो जिणदासु गुरू आमचा ॥
प्रसादु लाधला त्याचा । गुणदासें देखा ॥ ४·६९५
त्या जिनब्रह्माचरणी । गुणब्रह्म नमन करोनि ।
ओवीबंधु ग्रंथ करूनि । वेगरा ठेला ॥ ४·६९६
—श्रे. च. गुणदास

२. म. सा; पृ. १५३.

द्वीपायनमुनी व तुकारी यांचा घात झाला. क्रोध न करता माणसाने क्षमाभाव धारण करावा अशी विनवणी करून शेवटी कवी म्हणतो.

" इया गीतालागीं चित्त द्यावें दूजे । आता अबोलणें न राहिजे ।
ब्रह्मगुणदास ह्मणे साहाजे । आतां प्रेमरसें मनभीजे यो ॥ ६ ॥

कोणत्या प्रसंगातून या गीताची निर्मिती झाली आहे हे समजणे आज अशक्य असले तरी प्रत्यक्ष जीवनातून अनुभवलेल्या प्रसंगातून असले काव्य जन्माला यावे हे सहज आहे.

## विंचूगीत —

या गीतात ५ कडवी आहेत. व्यवहारात विंचू चावला असता फेरमुणीने विंचवाचे विष उतरवतात. परंतु अध्यात्मात विषयरूपी विंचू अहंकारांच्या नागीने दंश करतात. अशा वेळी वैराग्यरूपी फेरमुणीचा उपयोग करावा आणि जिननामाचा मंत्र म्हणावा असे या गीतात सांगितले आहे. गीताचा शेवटचा भाग असा आहे—

" जिनवर नाम मंत्रे । विघन विंचु उतेरे ।
जिनब्रह्म परसादे । गुणब्रह्म विष हरे ॥ ५ ॥ "

येथेहि आपला गुरु ब्रह्मजिनदास असल्याचे त्याने सांगितले आहे.

## गान्हाणे —

६ कडव्यांचे हे एक गीत आहे. देवाकडे गुणदासाने गान्हाणे नेले आहे. मन दुःख देत आहे. इंद्रिये विटंबना करीत आहेत. काम-क्रोध-मद हे तर दुःखकंद आहेत. अशावेळी माझे सुखदुःख मी तुझ्याजवळ सांगू नये तर कोणाला सांगू ? हे गान्हाणे वाचीत असता आपण नामदेवाचा एखादा अभंग तर वाचीत नाही ना अशी शंका यावी इतकी आत्मीयता या गीतात गुणकीर्तींची दिसून येते.

" ब्रह्म गुणदासु ऐसें भणे । देवा दीधलें गान्हाणें ।
संसार तारने । गा देई माते ॥ ६ ॥ "

अशी देवापाशी शेवटी संसार तारण्याची भिक्षा तो मागतो.

## रामचंद्र हळदुली[३] :—

लग्नातील ' धवल ' गीताप्रमाणे गाण्याची ही रचना आहे. एकंदर ३० ओव्या यात आहेत. रामचद्रास व सीतेस लग्नाप्रसंगी हळद लावून सुवासिनी गात आहेत अशी या गीताची पार्श्वभूमी आहे.

३. एकनाथकृत दोन हळदुल्या मराठीत प्रसिद्ध आहेत. एकनाथाची गाथा पृ. ६९१ व ७६९

" कैसि दिसे बालि कनकाचि पुतलि ।
हलदुलि करकमलि लावुनिया ॥ २३ ॥
हलदुलि लावल्या सुरनर पाहावया ।
येतिल गावया रामगीत ॥ २४ ॥ "

अशा पद्धतीची ही रचना आहे. महदंबेच्या धवळ्यांशी या गीताची तुलना होऊ शकेल असे वाटते.

" गुणब्रह्म कविता म्हनतुसे अनंता ।
पाविजे सिद्धपदा सुखरासी " ॥ २५ ॥

असे शेवटी तो म्हणतो.

## ब्रह्मगुणदास – व्यक्ति – गुरु व काल :—

ब्रह्मगुणदासाने 'गुणब्रह्म' म्हणून स्वतःचा कित्येकदा उल्लेख केल्याचे त्याच्या गीतावरून दिसते. तो ब्रह्मचारी होता आणि ईडरच्या भट्टारकांच्या शिष्य-परंपरेत तो वावरत होता. ब्रह्म जिनदासाचे गुरु भुवनकीर्ति हे ईडर (गुजराथ) येथे भट्टारक होते.[४]

आपल्या गुरूचा त्याने श्रेणिकचरित्रात आणि अन्यत्रही आदराने उल्लेख केला आहे. ब्रह्मजिनदासाचे तीन शिष्य उल्लेखिले गेले आहेत. मल्लिदास, गुणदास व नेमिदास.[५] पैकी पहिल्या दोघांचा उल्लेख रामायणरासात व हरिवंशरासात जिनदासाने केला आहे. या दोन्ही ग्रंथांची रचना अनुक्रमे संवत १५०८ व १५२० मध्ये (सन १४५१ व १४६३ मध्ये) झाली. दोन्हींतहि गुणदासाचा उल्लेख आहे.[६] म्हणजे सन १४५१ पासूनच गुणदासाचे उल्लेख मिळतात असे म्हणावे लागेल. या ग्रंथकाराची इतर कोणतीच माहिती उपलब्ध नाही.

## ● गुणकीर्ती :—

(सन १४५० – १४७०) गुणदासाच्या समकालीन असे हे एक श्रेष्ठ आचार्य होऊन गेले. धर्मामृत, पद्मपुराण, रुक्मिणीहरण, रामसंदेशराग, नेमिनाथ अथवा नेमिनाथ विवाह, नेमिनाथ पाळणा, नेमिनाथ–जिन–दीक्षा, धनागीत आणि

---

४. म. ग्रं. पृ. १५८.
५. ब्रह्म जिनदास सिरमौर । नेमिदास मतिसार ।
पढे पढावे दिगंबरी । परमहंस सुखकार ॥ ८ ॥
—परमहंस. अनेकान्त वर्ष ११ किरण १.
६. म. ग्रं. पृ. १५३.

रत्नकरण्डश्रावकाचारावरील मराठी टीका (?) असे विविध ग्रंथ त्याच्या नावावर मोडतात.

## धर्मामृत —

गुणकीर्तीच्या उपलब्ध ग्रंथात सर्वात महत्त्वाचा हा ग्रंथ आहे. ग्रंथ तत्कालीन गद्य-भाषेत असून विषयाच्या दृष्टीनेही मोलाचा व व्यापक आहे. जैन धर्माप्रमाणे आदर्श गृहस्थाचे आचरण कसे असावे व त्याने कोणकोणत्या गोष्टींचा त्याग करावा हेच प्रामुख्याने या ग्रंथात सांगितले आहे. त्याशिवाय लोकरचना, युगपरिवर्तन; ध्यानस्वरूप हेंहि महत्त्वाचे विषय या ग्रंथात आले आहेत. जैनधर्मांचा आचार व तत्त्वज्ञान समजावून घेण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ श्रेष्ठ प्रतीचा आहे.

या ग्रंथाचे नाव 'धर्मामृत' इतकेच नसून 'धर्मामृत तत्त्वसार' असे असावे असे वाटते कारण केळवद प्रतींत या ग्रंथास "धर्मामृत-तत्त्वसार[७]" असे म्हटले आहे. ही केळवद प्रत शके १५७१ ची (सन १६४९) आहे. या ग्रंथाची सर्वात जुनी हस्तलिखित प्रत हीच होय. ग्रंथाच्या शेवटी "अइसे कविश्वरू गुणकीर्ती म्हणतु असे ॥" असा उल्लेख येतो. गुणकीर्तीने 'कवीश्वर' म्हणवून घेणे ही गोष्ट त्याच्या योग्यतेच्या दृष्टीने सूचक आहे. या ग्रंथात गुणकीर्तीची बहुश्रुतता, जैन-धर्मावरील निष्ठा आणि दयाधर्माविषयी खास जिव्हाळा हे गुण दिसून येतात. ग्रंथ समाप्तीच्यावेळी तो श्रोत्यांना अंतःकरणपूर्वक सांगतो आहे की "जाणतेनि नेणतेनि धर्माचा संग्रहो करावा । धर्माचा विषं आलसु न करावा ।" या ग्रन्थाचे ऐतिहासिक मूल्यमापन करताना "धर्मामृताचा मुख्य उद्देश लोकाना धर्ममार्गाचा उपदेश करून अधर्ममार्गापासून परावृत्त करणे हा आहे. त्या दृष्टीने अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह व्रताचे, तसेच क्षमामार्दवादि दहा धर्मांचे जे विवरण यात दिले आहे ते कोणत्याही धर्मशील गृहस्थाला उपयुक्त असेच आहे.[८]" असे या ग्रंथाच्या संपादकांनी म्हटले आहे ते यथार्थ आहे. जैनधर्मविषयक पधराव्या शतकातील एक श्रेष्ठ गद्य-ग्रंथ म्हणून या ग्रंथाचे स्थान मराठी साहित्यात कायमचे राहील असा हा मौलिक ग्रंथ आहे. ज्या काळात तो निर्माण झाला त्या काळाच्या मागणीप्रमाणे त्यात धर्माचे विवेचन केले आहे इतकेच. धर्मविषयक विचार बाजूस ठेवूनही भाषा, सांस्कृतिक इतिहास या दृष्टीने ह्या ग्रंथाची मौलिकता विद्वानांना मान्य होण्यासारखी आहे.

## पद्मपुराण —

पद्मपुराण हा गुणकीर्तिकृत दुसरा महान काव्यग्रंथ होय. हा ग्रंथ त्यांच्याच हातून पूर्ण होऊ शकला नाही हे महाराष्ट्र सारस्वताचे दुर्दैव म्हटले पाहिजे. सन

---

७. धर्मामृत —- प्रस्तावना पृ. ७.
८. धर्मामृत -- प्रस्तावना पृष्ठ २८.

१९०२ मध्ये जयचंद्र श्रावणे, वर्धा यांनी मुंबई येथे कर्नाटक प्रेसमध्ये पाच भागांत हा ग्रंथ छापून प्रसिद्ध केला होता. सध्या या ग्रंथाची हस्तलिखित प्रत प्रयत्न करूनही उपलब्ध होऊ शकली नाही. मूळ ग्रंथाचे शास्त्रशुद्ध संपादन होणे अत्यंत आवश्यक आहे. आज हा मुद्रितस्वरूपातलाच ग्रंथ प्रमाण मानून चालणे भाग आहे. ग्रंथ प्रसिद्ध करताना प्रस्तावनेत प्रकाशकाने पुढील खुलासा केला आहे : “ या पुराणाच्या तीन प्रती मिळून जो लेख योग्य वाटला तो ठेवला आहे. व ज्या ठिकाणी असंबद्ध दिसले त्या ठिकाणी आम्ही नवीन ओव्या रचून हा ग्रंथ प्रसिद्धीस आणला आहे. ” म्हणूनच हा ग्रंथ मुळाबरहुकूम नाही, असे म्हणावे लागते. पण हस्तलिखित प्रती मिळून तुलनात्मक पाठभेद तयार करून या ग्रंथाचे संपादन होत नाही तोपर्यंत आहे तोच ग्रंथ आपणास उपयोगात आणावा लागतो.

ग्रंथ एकंदर ४३ अध्यायांचा आहे. त्यातील ओवीसंख्या १५,००० आहे. अठ्ठावीस अध्याय गुणकीर्तिकृत आहेत. त्यानंतरचे ३५ पर्यंतचे सात अध्याय हे ब्रह्मचिंतामणि नावाच्या कवीने पूर्ण केले आहेत. आणि ३६ ते ४३ हे आठ अध्याय ब्रह्मपुण्यसागर या कवीने पूर्ण केले आहेत. अशा रीतीने हा ग्रंथ अखेर तिघांच्या हातून पूर्ण होऊ शकला आहे. ग्रंथाचा विस्तार पाहता, तो बराच मोठा आहे. अठ्ठावीस अध्यायापर्यंतच्या प्रत्येक अध्यायाच्या शेवटी “ इति श्री पद्मपुराणे रामचरित्रे भट्टारक भुवनकीर्ति देवानां तत्पट्टे आचार्य गुणकीर्ति विरचिते ” चा उल्लेख येतो. २९ व्या अध्यायात ब्रह्मचिंतामणीचे नाव येते. ग्रंथ खंडित होता तो मी पूर्ण करीत आहे असे तो म्हणतो.

जैन पुराणात रामचंद्रास ‘ पद्म ’ म्हटले असून, रामचरित्रास ‘ पद्मपुराण ’ अथवा ‘ पद्मचरित ’ म्हणतात. वैदिकांचे रामायण हे जैनांना मान्य नाही.[९] विमलसूरि ‘ पउमचरिउ ’ हा वि. स. १६० मधील प्राकृत काव्यग्रंथ व रविषेणकृत वि. सं. ७३३ मधील पद्मचरित हा हे संस्कृत काव्यग्रंथ हे जैन रामायणाची परंपरा[१०] सांगणारे ग्रंथ आहेत. गुणभद्राच्या उत्तरपुराणातही ६८ व्या पर्वात जैन परंपरेनील रामकथा आली आहे. राम हा सुद्धा जैनधर्माप्रमाणे पूज्य पुरुष असून त्रेसष्ट शलाकापुरुषांत तो ‘ बलिभद्र ’ म्हणून ओळखला जातो. पंधराव्या शतकात ब्रह्मजिनदासाने ‘ रामायणरास ’ ही गुजराती रचना केली आहे.[११]

८. धर्मामृत प्रस्तावना, पृ. ३८.

९. आभीयमासुरक्खं भारह रामायणादि उवएसा ।
तुच्छा असाहणीया सुय अण्णाणंति तं बेंति ॥ ३०४ ॥
—गोम्मटसार—जीवकांड.

१०. जैन साहित्य और इतिहास, नाथूराम प्रेमी, पृ. ८७.

११. म. सं. पृ. १३९.

## पद्मपुराणांतील अनुप्रेक्षा --

गुणकीर्तींच्या नावावर हा लहानसा ग्रंथ उपलब्ध आहे. त्याच्या स्वतंत्र अशा बऱ्याच हस्तलिखित-प्रती पाहण्यास मिळतात. त्यांचे संपादनही झाले आहे. ( अभ्यासाची साधने ३ पाहा. ) या ग्रंथाची ओवीसंख्या ३४५ आहे. पण हा ग्रंथ ज्याअर्थी 'पद्मपुराणातील अनुप्रेक्षा' म्हणून ओळखला जातो त्याअर्थी स्वतंत्रपणे तो रचला गेला नव्हता हे निश्चित. पण 'अनुप्रेक्षा' हा विषय फार लोकप्रिय असल्याने तेवढ्याच भागाच्या वेगळ्या हस्तलिखित प्रती बनविण्यात आल्या असल्या पाहिजेत. शके १५१४ ची ( सन १५९२ ) हस्तलिखित प्रत पाहण्यास मिळते. त्यावरून फार लवकर या ग्रंथाची वेगळी हस्तलिखित प्रत बनविली गेली असावी. ही घटना या ग्रंथाची लोकप्रियताच सिद्ध करते. मुद्रित पद्मपुराणात या अनुप्रेक्षा कोठेच दिसत नाहीत. कदाचित् संपादकांनी वगळल्याही असतील. पण मूळ ग्रंथात त्या असल्या पाहिजेत.

अनुप्रेक्षा म्हणजे वारंवार चिंतन करणे. त्या चिंतनात आत्मा हा जड पदार्थापासून वेगळा आहे या जाणीवेला फार महत्त्व आहे. अनुप्रेक्षा बारा आहेत. वैराग्य होण्यासाठी या चिंतनाचा उपयोग साधकाला होतो. वि. स. १ ल्या शतकातील कुंदकुंदाचार्यांचा 'बारस अणुवेक्खा' हा ग्रंथ या विषयावरचा सर्वात प्रथम ग्रंथ[१२] आहे. पद्मपुराणातील अनुप्रेक्षात वैराग्यभावना विशेष दिसून येते. संसाराचे अस्थिर स्वरूप मोठ्या काव्यमय रीतीने या ग्रंथात मांडले आहे. भ. ऋषभदेवाना वैराग्य व्हावे म्हणून देवानी एक युक्ती केली. नीलांजना नावाची अप्सरा नृत्य करता करताच मरण पावली आणि नकळत दुसरी अप्सरा तेथे नाचताना दिसू लागली. परंतु ऋषभदेवाच्या मनावर त्या घटनेमुळे संसाराच्या चंचलतेसंबंधी खोलवर परिणाम झाला आणि ते बारा अनुप्रेक्षांचे चिंतन करू लागले. अशी पार्श्वभूमी घेऊन पद्मपुराणातील या अनुप्रेक्षा गुणकीर्तीने लिहिल्या आहेत. या अनुप्रेक्षा म्हणजे मराठी वाङ्मयातील उत्कृष्ट वैराग्यधन आहेत. अनित्यानुप्रेक्षा, अशरण-अनुप्रेक्षा, एकत्वानुप्रेक्षा, अन्यत्वानुप्रेक्षा, अशुच्यानुप्रेक्षा, आस्रवानुप्रेक्षा, संवरानुप्रेक्षा, निर्जरानुप्रेक्षा, लोकानुप्रेक्षा, बोधिदुर्लभानुप्रेक्षा, धर्मानुप्रेक्षा अशा एकेका अनुप्रेक्षेवर बारा प्रकारे गुणकीर्तीने वैराग्यभावना आळविली आहे. रचना फारच रसाळ आहे. भाषा अगदी साधी पण मधुर आहे.

## रुक्मिणीहरण --

६४ कडव्याची ही गुजराथी गौळणी भाषाच्या थाटाची एक सुंदर रचना आहे. प्रत्येक कडव्यानंतर ८ चरणाचा एक 'चढावा' या काव्यात आहे. रुक्मिणीविवाह,

---

१२. पुरातन जैन वाक्य सूची, प्रस्तावना, पृ. १२.

तिचे व सत्यभामेचे भांडण, रुक्मिणीचा कुमार प्रद्युम्न याने सत्यभामेच्या बाजूचा केलेला पराभव इत्यादि कथाभाग या काव्यात आला आहे. काव्य गेय स्वरूपाचे आहे.

काव्याचे प्रथम कडवे असे आहे......

" ब्रह्मतनयासुंदरी । अज्ञान ते हरी । प्रकाशिली गणधरी । ते माय माझी ॥ ते कविजना नवनिधि । आनि देइल वाचा सिद्धि । केवल ज्ञानरिधि । ते भगताकाजि ॥ ते माझी अंबिका । मि पुत्र तिये निका । गुणकीर्ति वो एका । इयापरी शारदा । विनवावी विबुधा ॥ मग कविता-बांध गे शुभ जडो ॥ १ ॥ "

पहिल्याच कडव्यात गुणकीर्तीने आपल्या नावाचा उल्लेख या काव्यात केला आहे. या काव्याच्या शेवटच्या कडव्यात गुणकीर्तीने स्वतःचा 'मुनी' म्हणून उल्लेख केला आहे. आणि 'जैसवाल' कुलात आपला जन्म झाल्याचे सांगितले आहे. " जैसवाला कुलमति । मुनि उपनले गुणकीर्ति । केली हे विनति बोधि माये ॥ ६४ ॥ " या काव्यावर गुजराथी काव्याची छाया पडली आहे असे वाटते. काव्यगुणाच्या अपेक्षेने ही रचना श्रेष्ठ दर्जाची आहे. ज्याअर्थी शके १५७७ (सन १६५५) च्या हस्तलिखितात ही रचना पाहावयास मिळते त्याअर्थी त्याच्या जुनेपणाविषयीही शंका राहात नाही. पण हस्तलिखितांत १२ ते ३१ कडव्यांचा भागच गहाळ झाल्यामुळे या काव्याचा आस्वाद पूर्णपणे घेणे अशक्य झाले आहे. उत्कृष्ट धर्मचर्चेप्रमाणेच काव्यकौशल्यही गुणकीर्तीला साधत असे याचा हे काव्य म्हणजे उत्कृष्ट पुरावा आहे.

**रामचंद्रफाग –**

गुणकीर्ति हा कवी गुजराथी वाङ्मयाचा चांगला अभ्यासक असल्याने काही गुजराथी वाङ्मयप्रकार त्याने मराठीतही रूढ करण्याचा प्रयत्न केला आहे. 'रामचंद्रफाग' ही एक छोटीशी काव्यकृती अशाच त्याच्या प्रयत्नातून निर्माण झाली आहे. म्हणूनच भाषाही किंचित मिश्रस्वरूपाची वाटते. या काव्यात ३१ कडवी आहेत. वसंतोत्सवात गाइली जाणारी जी समूहगीते असतात त्याना 'फाग'[१३] म्हणतात. अत्यंत आनंदी असे वातावरण या गीतात रंगविलेले असते. फाग शब्दच 'फग्गु' पासून बनला आहे आणि फग्गु म्हणजे 'मधूत्सव' असे देशीनाम मालाकारही[१४] सांगतात. रामचंद्रफागमधील वसंतवर्णन फार सुंदर आहे. या गाण्यात गुजरी, तेलंगणी, कानडी या सर्वच स्त्रियांनी भाग घेतला आहे. त्यांत हस्तिणी आहेत, चित्तिणी आहेत, पद्मिणी आहेत आणि शंखिणीहि आहेत.

---

१३. गुर्जर रासावली : Introduction, Page 12.

१४. फग्गु मदूत्सवे, दे. ना. ६.८२.

काव्याचा प्रारंभाचा व शेवटचा भाग पाहिल्यास या काव्याची कल्पना येण्यासारखी आहे.

प्रारंभ— "रामचंद्र मन गावतां । पाप करम दुरि जाए ।
रामनाम कैसे रमणिक । जैसे परम निधान रे ।।
सूर्यवंशकुलतिलकु । त्रिभुवनको सोमान रे ।। १ ।।"

अंत्यभाग—"नानाविधि क्रीडा करी । रामचंद्र गुणवंत रे ।
गुणकीरती मुनिवर भणे । एवो जिणवर पाटपूज्या रे ।। ३२ ।।"

अशा या काव्यात गुजराथी भाषेचे प्रमाण किती व मराठी भाषेचे प्रमाण किती हे ओळखणेही कठीण होते इतकी ही भाषा मिश्र झाली आहे.

## नेमिनाथ पाळणा :—

नेमिनाथ हे बावीसावे तीर्थंकर होत. त्यांच्या जन्मोत्सवाचे वर्णन या गीतांत गुणकीर्तीने केले आहे. यात १९ कडवी आहेत. यादवकुळातील समुद्रविजय राजाच्या शिवादेवी राणीच्या उदरी नेमिनाथांचा जन्म झाला. स्वर्गातील देवदेवींनी पृथ्वीवर येऊन या उत्सवात भाग घेतला अशी या गीताची कल्पना आहे. काव्यगुणांनी संपन्न असे हे गीत 'पाळणा' या वाङ्मयप्रकाराच्या इतिहासावरही प्रकाश टाकील असे वाटते.

"तया नमन माझे प्रभू इंद्रनिला । सजल जल्द घनु मेघु सावला ।
वागेश्वरी देइ कवितकला । पाळणा गावया नेमिचि लिला ।।
जो जो ।। २ ।।"

अशा मधुर भाषाशैलीत हा पाळणा गाइला गेला असून त्यातही कवित्वकला प्रकट करण्याची इच्छा स्वतः कवीनेच व्यक्त केली आहे. शेवटी कवी म्हणतो "आइके तया मनि मनोरथ पुरे । गाता नवनिधि मंदिर भरे । सुरनर सुधन्य नरनारि गावे । गुणकीर्ती म्हणे मंगलिक व्हावे ।। १९ ।।"

## नेमिनाथ विवाह:—

गुणकीर्तीने नेमिनाथाच्या जीवनावर लिहिलेले ४४ कडव्याचे हे दुसरे लहानसे काव्यप्रकरण आहे. नेमिनाथांनी विवाह केलाच नाही. राजीमतीशी त्यांचा विवाह ठरला. पण आपल्या लग्नात आलेल्या वऱ्हाडासाठी हजारो मूक पशु कापले जाऊन भोजनसमारंभ होणार हे त्यांना समजताच ते लग्नमंडपातून बाहेर पडले आणि गिरनारकडे तपश्चर्येसाठी निघून गेले. राजीमतीला हे वृत्त कळताच ती फार व्याकुळ झाली. तीही त्यांच्या मागोमाग गेली. नेमिनाथांनी तिलाही संसाराचे क्षणभंगुरत्व पटवून दिले. अशा प्रसंगावर हे काव्य आधारले आहे.

## नेमिनाथ जिनदीक्षा–

नेमिनाथांनी राजीमतीचा त्याग करून दिगंबर दीक्षा गिरनार पर्वतावर धारण केली; याच प्रसंगावर हे दुसरे एक ४५ कडव्यांचे काव्य आहे. दीक्षा घेतल्यानंतर नेमिनाथांनी केलेल्या तपश्चर्येचे आणि ध्यानाचेही वर्णन या काव्यात केले आहे. शेवटी कवी म्हणतो —

" मग तो नेमी नेमीस्वरु मुक्त्यस्थानीं गे । निर्वाण पद पावला गे ।
गुणकीरतीचा स्वामी कर जोडोनी वीनविला गे ॥ तो देउ सुगती नामी ॥४५॥"

यावरून नेमिनाथ पाळणा, नेमिनाथ विवाह व नेमिनाथ जिनदीक्षा ही तीनही प्रकरणे गुणकीर्तीने एकच 'चरित्र' लिहिण्याच्या प्रेरणेतून निर्माण केली आहेत असे निश्चित दिसते. बार्शीमच्या हस्तलिखितात 'नेमिनाथ जिनदीक्षा' प्रकरणाच्या शेवटी " गौल्णी मास समाप्त " असे म्हटले आहे. गौल्णी मास हा एक गुजराती काव्याचा प्रकार असावा. त्याच प्रकारात हे काव्य त्याने रचले आहे. इतके निश्चित की मराठी काव्यात अशा गेयगीताचा प्रकार नवीनच आहे. गुजरातीचा संस्कार झालेली मधुर मराठी भाषा गुणकीर्तीने या तीनही गीतांत वापरली आहे.

## धंदागीत–

६ कडव्याचे हे एक वैराग्यपर गीत गुणकीर्तीने लिहिले आहे. अरत्राचा धंदा सोडून परत्राचा धंदा करावा असे तो येथे म्हणतो.

" धंदा कीजे परत्राचा । जिणे टाके पेनु पारु ।
गुणकीर्ति मुनिवरु म्हणे । वो तुम्ही तरा संसारु ।
सुखाचे सोइरे अवघी वो जन्हा पुरवी आस । एह वचन साच संसारधंदा ॥ ५ ॥ "

असे कवी परोपरीने सांगत आहे.

## रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका–

या ग्रंथाचा खरा कर्ता कोण आहे हे समजत नाही. कदाचित् याची दुसरी एखादी प्रत उपलब्ध झाली तर ते कळण्याची शक्यता आहे.

ग्रंथास आरंभ पुढीलप्रमाणे आहे––

" ॐ नमः सिद्धेभ्यः ॥ श्री गुरुभ्य नमः ॥ श्री सरस्वति देविभ्यो नमः । अथ श्री समंतभद्रस्वमि विरचिताया ॥ श्री रत्नकरण्ड ग्रंथ श्रावकाचार व्याख्या मान्हाष्ट्र भाषा ॥ श्रावक रत्नत्रयात् व्याख्यान क्यते ।

तद्यथा श्री वर्धमान स्वमियासि गौतम गुरुसि नमस्कार करुनि ॥ स्वरितरूपे सगुण संम्यक्दर्शन संम्यक्ज्ञान ॥ संम्यक् चारित्र । रत्नत्रयो म्हणिजे । संम्यक्दर्शन

सांवेन । परमेश्वरु श्री अरिहंतु आराधिजे । जिननाम अभ्यासु किजें । जिनमुनि परमगामि यति मुनिश्वर त्याचि सेवा किजे । तो अरिहंतु कैसा । ”

प्रतीच्या अंत्यभागी काहीही उल्लेख नाही. ग्रंथकाराचे कोठेही नाव नाही.

समंतभद्रविरचित ‘ रत्नकरण्डक ’ या संस्कृत ग्रंथावर ही मराठी टीका आहे. संस्कृतात मूळ ग्रंथावर टीका लिहिण्याची पद्धति असताना अगदी त्याच पद्धतीने मराठीत टीका लिहिण्यात ग्रंथकर्त्याने फार मोठी कुशलता दाखविली आहे. भाषा गद्य असून गुणकीर्तीच्या धर्मामृतासारखीच आहे. कोठेही पाल्हाळ नाही. मूळ मुद्यालाच स्पर्श करणारी ही श्रावकाचार टीका म्हणजे प्राचीन जैन मराठीचे एक वैशिष्ट्य आहे.

## या ग्रंथाचा कर्ता कोण असावा ? —

अर्थात याचे निश्चित उत्तर देणे हे अशक्य आहे. कारण त्याला नक्की आधार कशाचाच नाही. पण शैली व भाषाप्रयोग पाहता हा ग्रंथ ज्यांनी ‘ धर्मामृत तत्वसार ’ लिहिला त्याचाच असावा असे वाटते. कदाचित् प्रथम या रत्नकरण्डकाची टीका लिहून नंतर सर्वसामान्य धर्मांचे विवेचन करणारा स्वतंत्र ग्रंथ लिहावा म्हणून नंतर धर्मामृताची रचना केली असेल. अर्थातच या बाबतीत अधिक तपशिलात जाता येणे शक्य नाही. पण इतकी गोष्ट खरी की या ग्रंथाने त्या वेळच्या मराठी भाषेचे सामर्थ्य प्रकट झाले आहे. टीका ही मराठीतही कशी उत्तम होऊ शकते याचे हे आदर्श उदाहरण आहे.

## गुणकीर्ती : व्यक्ती – काल – गुरु –

गुणकीर्ती हे मूलतः कोणत्या प्रदेशातील होते हे समजणे कठीण आहे. पण मराठी, गुजराती व मिश्र अशा विविध रचना त्यांच्या आढळतात. भट्टारक व मुनी या दोन्ही विशेषणाचा त्यांच्या नावामागे उपयोग केलेला आढळतो. ते ‘जैसवाल’ या कुलात उत्पन्न झाले होते हे निश्चित होय धर्मामृताच्या शेवटी ‘ कविस्वरु ’ असे त्यांनी स्वतःस म्हटले आहे. धर्मामृताच्या व बारा भावनाच्या बहुतेक लिपिकारानी त्यांचा उल्लेख ‘ आचार्य ’ गुणकीर्ती म्हणून केला आहे. ते स्वतः मूलसंघांतील बलात्कारगणापैकी असून ईडर शाखेतील भुवनकीर्ती यांचे शिष्य होते. कवी व धर्माचार्य या दोन्ही दृष्टींनी गुणकीर्तीची योग्यता मोठी आहे. धर्मामृत ग्रंथ त्यांचे सखोल धर्मज्ञान दाखवितो तर पद्मपुराण आणि इतर गीते त्यांची काव्यशक्ती व्यक्त करितात. नेमिनाथाच्या जीवनाविषयी कवीचा विशेष जिव्हाळा दिसतो. नामदेवाच्या नंतर आणि एकनाथाच्या अगोदर मराठी साहित्यात जी पोकळी निर्माण झाली होती असे दिसते ती गुणकीर्तीने भरून काढून मराठी सारस्वतात स्वतःचे स्थान अढळ केले असे म्हणणे भाग आहे.

काल :—गुणकीर्तींचे गुरु भुवनकीर्ती होते. भुवनकीर्ती हे सन १४५० च्या सुमारास झाले. भुवनकीर्ती यांचे शिष्य ब्रह्म जिनदास यांनी सन १४५१ मध्ये रामायणरास लिहिले आहे. गुणकीर्तींने मराठीत पद्मपुराणाची रचना ब्रह्म जिनदासाच्या उपदेशाने केली आहे. कदाचित् ब्रह्मजिनदासाच्या रामायणरासाच्या आधारेच त्यांनी ही मराठी रचना केली असावी. पण गुणकीर्तींने आपल्या दोन्ही मोठ्या ग्रंथांची रचना सन १४७० नंतर केली असावी असे डॉ. जोहरापूरकर म्हणतात.[१५] ते बरोबरही वाटते. द्वादशानुप्रेक्षांची सर्वांत जुनी प्रत सन १५९२ ची उपलब्ध आहे. म्हणजे गुणकीर्तींचा काळ इ. स. च्या पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात येईल हे निश्चित होय. याची चर्चा धर्मामृताच्या संपादकांनी पूर्णपणे केली असल्याने येथे त्याचा मी विस्तार करीत नाही.

## ब्रह्मगुणदास व आचार्य गुणकीर्ती एक होत —

संशोधकांच्या समोर जाता जाता एक मुद्दा ठेवावा असे वाटते. श्रेणिकचरित्रकर्ते गुणदास आणि धर्मामृत व पद्मपुराण लिहिणारे आचार्य गुणकीर्ती या दोन व्यक्ती नसून ती एकच असावी असे मला वाटते. ब्रह्मचारी अवस्थेत जो ब्रह्म-'गुणदास' होता तोच पुढे मुनी झाल्यानंतर 'गुणकीर्ती' आचार्य झाला असे म्हणता येईल. दोन्ही नावांचा ईडरच्या बलात्कारगण भट्टारक पीठाशीच संबंध येतो. गुणदासाचे गुरू ब्रह्मजिनदास हेच गुणकीर्तींच्या पद्मपुराणाच्या पुष्पिकावाक्यांत उल्लेखिले जातात. शिवाय दोघांचाही काळ एकच आहे. म्हणूनच ती एकच व्यक्ति असावी असे वाटते. ब्रह्मचारी अवस्थेतील नाव मुनि होताना बदलण्याचा प्रघातही जैनधर्मात आहे. गुणदास — गुणकीर्ती असा हा थोडा बदल झाला आहे. मुनि अवस्थेत ब्रह्मजिनदासाचा उल्लेख गुरु म्हणून करणे पदाच्या दृष्टीने अशक्य होते म्हणून गुणकीर्तींने गुरु म्हणून भुवनकीर्तींचा उल्लेख केला आहे.

## • जिनदास—

निर्विवादपणे ज्याची गणना इ. स. च्या पंधराव्या शतकात करता येईल असा हा ग्रंथकार देवगिरि येथे होऊन गेला आहे कवित्व आणि विद्वत्ता या दोन्ही दृष्टींनी हा ग्रंथकार श्रेष्ठ दर्जाचा आहे. त्याची एकच महान् कृती उपलब्ध आहे आणि तीही त्याच्याच हातून पूर्ण झाली नाही. हरिवंशपुराणासारखी महाकाव्याची देणगी जिनदासाने मराठी भाषेस दिली आहे.

## हरिवंशपुराण—

हरिवंशात श्रीकृष्ण व प्रभू नेमिनाथ यांचे चरित्र मुख्यत्वाने येते. तदनुषंगाने बलराम, कौरव, पांडव यांचीही कथा या पुराणात येते.

१५. धर्मामृत प्रस्तावना, पृ. ४.

संस्कृत-प्राकृतात बरेचसे ग्रंथ या विषयावर आहेत. मराठीत जिनदास व पुण्यसागर यांनी पूर्ण केलेली ही रचना आहे. ग्रंथाच्या एकंदर ६७ अध्यायांपैकी ५५ अध्याय जिनदासाने लिहिले आहेत. पुढील भाग पुण्यसागराने पूर्ण केला आहे. या ग्रंथाच्या हस्तलिखित प्रती पुष्कळ ठिकाणी आढळतात. ओवीसंख्या जवळ जवळ ११ हजार आहे.

## जिनदास–व्यक्ती–गुरु व काल––

जिनदास हा देवगिरी येथील उज्जंतकीर्ती आचार्यांचा शिष्य होता. उज्जंतकीर्ती हे देवगिरी येथील भट्टारक होते. उज्जंतकीर्ती यांचे गुरु गुजरातमधील ईडर पीठावरचे भुवनकीर्ती होते. भुवनकीर्ती यांचे उल्लेख संवत १५०८ पासून १५२७ पर्यंतच्या दरम्यान पाहण्यास मिळतात.[१६] त्याने उज्जंतकीर्तीसाठी देवगिरीस स्वतंत्र पीठ स्थापून दिले. ते याच काळात असणार. जिनदास हा उज्जंतकीर्तीचा शिष्य होता. त्यांनी त्याला काव्य, व्याकरण, धर्मशास्त्र शिकवून तयार केले. वरील संदर्भात जिनदासाचा काळ हा संवत १५५० ( सन १४९३ ) च्या सुमारास धरण्यास हरकत नाही. सनाच्या १५ व्या शतकाचा अगदी उत्तरार्ध हा त्याचा काळ ठरतो. देवगिरी हे त्यापूर्वीच जैनधर्मीयांचे एक आश्रयस्थान बनले होते. अल्लाउद्दीन सुल्तानाच्या वेळीच देवगिरीस जैन भट्टारकाचा सन्मान झाला होता. विद्यानंदीना " अल्लावधि-सुल्तान–मान्य " असे बिरुद पट्टावलीत[१७] लावलेले आढळते. देवगिरी येथे वाद होऊन परमतीयांचा पराभव त्या भट्टारकांनी केल्याचाही दाखला मिळतो. पुढे उज्जंत-कीर्ती यांना तेथे स्वतंत्र पट्ट स्थापून देऊन भुवनकीर्ती यानी त्या दृष्टीने आणखी एक पाऊल पुढे टाकले आहे.

जिनदासाने हरिवंशाच्या प्रारंभीच प्राचीन आचार्यांची खूप मोठी यादी देऊन पुढे आपला व आपल्या गुरूचा परिचय करून दिला आहे.

" इत्यादि पुर्वाच्यार्यांउपरी । जाले **पद्म** आच्यारी ।
श्री **सकलकीर्ति** वसुंधराचार्य । जाले तत्पटे ॥ १.५६

---

१६. भ. सं. पृ. १५८.

१७. गुर्वावलीत कारंजा पट्टावलीतील प्रथम भट्टारक अमरकीर्ती यांच्यानंतर विद्यानंदींच्या वेळी–अल्लाउद्दिन याने त्यांचा सत्कार केल्याचा उल्लेख येतो.

"स्वभूजो–पराक्रमोपार्जित–जयरमाविराजमान चारुदोर्दंड–मंडित प्रशस्त समस्त वैरीभूपाल–मानमर्दन प्रचंडाटोप तुर्क राजाधिराज अल्लावधि सुल्तान–मान्य श्री मदभिनव विद्यानंदी स्वामीनां तत्पट्टोदय **देवगिरिपरमत** विद्व्जन तिमिर निर्नाश दिनकर समानानां ॥ ––" मोठी गुर्वावली, कारंजा.

श्री सकलकीर्तिपासुनी । आच्यार्य भुवनकीर्ति महामुनि ।
येते उज्वंतकीर्ति पट स्थापुनी । केला आच्यार्य ॥ १.५७
या पूर्वाच्यार्यांनिं स्मरण केलें । तेणें मज कवित वरदान जालें ।
कथा सनुळ सांगुं आदरिलें । पुराण हरिवंश ॥ १.५८ ॥
श्री माहास्थानकें देवगिरी । जीनदासु नाम ते जन्मला नगरीं ।
तेथें आसे उज्वंतकीर्ति आच्यारी । तेणें पंडितु केल्यारे ॥ १.५९ ॥
तेणें पदछंद महाकाव्य । शब्दसुत्र दावोनी स्वमेव ।
तर्कवृत्तिव्यापवरागविक्र ? । केलें आक्षरज्ञान ॥ १.६० ॥
प्रत्यक्ष वरदान मूर्ति सरस्वति । जियेतें ब्रह्मादिक वंदिती ।
ते जिनदास प्रकट कविनिति । नामयासी ॥ १.६१ ॥"—( हरिवंशपुराण ).

या परिचयावरून जिनदासाचे जन्मस्थान देवगिरी होते आणि तेथेच त्याचा विद्याभ्यास उज्वंतकीर्तीने करून घेतला व त्याला पंडित बनविले हे स्पष्ट आहे. जिनदास हा मोठा व्युत्पन्न कवी असून हरिवंशासारखा महान् ग्रंथ त्याने मराठीत आणला हे त्याच्या पांडित्याला व काव्यशक्तीला शोभणारेच झाले. त्यासाठी संस्कृत किंवा गुजराती कोणत्या हरिवंशाचा आधार घेतला आहे हे त्याने सांगितले नाही. पण संवत १५२० ला ब्रह्मजिनदासाने गुजरातीत ' हरिवंशरास ' पूर्ण केला. त्याचीही मदत त्याला झाली असणे शक्य आहे. मराठी भाषेवर मात्र जिनदासाने ही ग्रंथरचना करून उपकार केले आहेत यात शंका वाटत नाही.

## हरिवंश पुराणाची जैन परंपरा—

पुन्नाट संघातील जिनसेनांनी शके ७०५ मध्ये हरिवंशपुराणाची संस्कृतमध्ये रचना केली. तत्पूर्वी प्राकृतात विमलसूरींने हरिवंशाची रचना केली होती असा उल्लेख मिळतो. पण ग्रंथ अनुपलब्ध आहे असे संशोधक म्हणतात.[१८] श्रीकृष्ण व जरासंध हीच यातील महत्त्वाची व्यक्तिचित्रे होत. जैन परंपरेप्रमाणे जरासंध हा प्रतिनारायण व श्रीकृष्ण हे नारायण. दोघांचेही स्थान त्रेसष्टशलाकापुरुषात मान्य आहे. भ. नेमिनाथ हे श्रीकृष्णाचे चुलतबंधु म्हणून त्यांचेही चरित्र या पुराणात येते. उपर्युक्त जिनसेना-शिवाय संवत ९५५ मध्ये गुणभद्रानी ( उत्तरपुराणात ), व ब्रह्मजिनदासाने संवत १५२० मध्ये हीच कथा वर्णिली आहे.[१९] परंपरेने हीच कथा मराठी हरिवंशातही आली आहे.

## १५ व्या शतकाचा समारोप—

या शतकातील ग्रंथकारांपैकी गुणकीर्ती व गुणदास हे ब्रह्मजिनदासाच्या शिष्यवर्गात मोडतात. जिनदास हा 'उज्वंतकीर्तिशिष्य' आहे. मात्र या ना त्या नात्याने

१८. जैन साहित्य और इतिहास, पृ. ११४. —नाथूराम प्रेमी.

या सर्वांचा संबंध गुजरातमधील ईडर भट्टारक पीठाशी पोचतो हे विशेष आहे. मराठीत ग्रंथरचना करण्याची प्रेरणा ही गुजराती कवींमुळे झाली आहे. ब्रह्मजिनदासाने गुजरातीत पन्नास तरी ग्रंथ लिहिले असतील. देशी भाषेत ग्रंथनिर्मितीची प्रेरणा ही जुनीच असली तरी मराठीत मात्र जैनधर्मासंबंधाने विचार करता प्रत्यक्षात पंधराव्या शतकात झाली. या काळापर्यंत विदर्भातील कारंजा शहराला जैनांच्या दृष्टीने फारसे महत्त्व नसले पाहिजे. म्हणूनच प्राचीन मराठी जैन साहित्याला प्रारंभ गुजरातकडील कवींनी केला. या काळातील ग्रंथरचना ही बहुतेक गुजरातीच्या आश्रयाने झाली आहे. त्यात ब्रह्मजिनदास हाच प्रमुख आधार आहे. पुराण, चरित्र, तत्त्वज्ञान व आचारधर्म या सर्वांवरच मारदस्त अशी रचना या काळात झाल्यामुळे पुढील सर्व काळाशी तुलना करता हा काळ पराश्रित असूनही वैभवाचा वाटू लागतो. देवगिरीच्या बाजूला जिनदासापूर्वी मराठी जैन कवी झाले असण्याची शक्यता आहे. पण आज तरी ते अज्ञात आहेत. जिनदास मात्र खास मराठवाड्यात देवगिरीत जन्मलेला, महाराष्ट्रीय जीवनात मुरलेला कवी आहे. नामदेवानंतर एकनाथापर्यंत मराठी साहित्यात एकप्रकारची पोकळी निर्माण झालेली दिसते. ती भागवतधर्माच्या अपेक्षेने खरी असली तरी जैन साहित्याच्या अपेक्षेने हाच काळ विशेष भरभराटीचा वाटतो.

## इ. सनाचे १६ वे शतक

इ. स. च्या पंधराव्या शतकात निर्माण झालेली मराठी जैन साहित्याची परंपरा इ. स. च्या सोळाव्या शतकातील प्रारंभी तरी जोमात होती. या साहित्याची वाढ उत्तरोत्तर अधिकच होत गेली. पंडित मेघराज, कामराज, पंडित सूरिजन, नागो आया आणि गुणनंदी असे मान्यवर ग्रंथकार या शतकात होऊन गेले.

### • पंडित मेघराज —

मेघा उर्फ मेघराज या नावाचा हा कवी सोळाव्या शतकाच्या प्रारंभकालीच झाला. त्याच्या ( १ ) जसोधररास, ( २ ) पार्श्वनाथभवांतर, ( ३ ) कृष्णगीत, ( ४ ) रामायणी कथा, ( ५ ) गुजरी मऱ्हाटी गीत व ( ६ ) गोमटस्वामीगीत अशा लहान-मोठ्या रचना उपलब्ध आहेत. त्यापैकी जसोधररास ( चरित्र ) सोडल्यास इतरांचा समावेश किरकोळ ग्रंथरचना या सदरात करावा लागेल.

#### जसोधररास ( चरित्र )—

यशोधराचे चरित्र वर्णन करणारा ५ अधिकारांचा व ११६४ ओव्यांचा हा

---

१९. जिनरत्नकोश, Page 490.

ग्रंथ आहे. ग्रंथकर्त्याने ग्रंथाच्या अंतिम ओवींत आपला उल्लेख केला आहे. त्याच तो स्वतःच्या गुरुचा उल्लेखही करतो.

" जो ब्रह्मचारि शांतिदासु । तेणें मज साह्यासु ।
केला कथेचा प्रकाशु । मेघा म्हणे ॥ ११६४ ॥ "

ग्रंथाच्या प्रारंभीसुद्धा एकोणिसाव्या ओवीत " शांत ब्रह्म "चा उल्लेख येतो. या ब्रह्म शांतिदासाने त्याला क्षमा करून धर्म समजावून दिला व त्याच्यावर प्रसाद केला असे मेघा सांगतो. पंडित मेघाच्या सर्व उपलब्ध साहित्यात ' जसोधररास ' ही रचना श्रेष्ठ दर्जाची असून भाषा-अभ्यासाच्या दृष्टीने मौलिक आहे. जैन तत्त्वज्ञान व आचारधर्म यांचेही वर्णन या ग्रंथात आले आहे. अहिंसा व ब्रह्मचर्य या मतांचे महत्त्व या यशोधर-चंद्रमती कथानकात वर्णिले आहे. कात्यायनी देवीला बलिदान अर्पण करण्याच्या परंपरागत रूढीवर अंधविश्वास असलेल्या आईच्या आग्रहाला बळी पडून यशोधर राजाही बलिदान करतो व या दुष्कृत्याचे फल त्याला पुढच्या सात जन्मांपर्यंत भोगावे लागते हे या कथेचे मुख्य सूत्र आहे. हा ग्रंथ व्यवस्थित-पणे संपादून त्याला विस्तृत प्रस्तावना जोडून प्रकाशित केला गेला असल्याने येथे पुनरुक्ती करीत नाही.

## पार्श्वनाथ भवांतर—

२३ वे तीर्थंकर भ. पार्श्वनाथ यांच्या भवांतराचे वर्णन करणारे ४७ कड-व्यांचे एक गीत आहे.

प्रारंभ — सीरिं श्री सिक्षा सोहे बिंदु चंद्रा उंकारु ।
समयाचा धुरु तो मी नमिन उंकारु ।
निजज्ञानि त्रेविश वां तीर्थंकरु ।
अवारि सोहे ए कलिकालि अघरु ॥ १ ॥

अखेर — अंतरिक्ष शीरपूरिं परमेश्वरु ।
वांछितदायक पास जिनेश्वरु ।
ब्रह्म शांतिदास प्रसादें भवावली कहणी ।
मेघा करितो वंदना दोन्हि कर जोडोणी ॥ ४७ ॥

मेघाने आरंभी व अंती शिरपूर येथील अंतरिक्ष पार्श्वनाथाच्या ' अधर मूर्ती 'चा उल्लेख येथे केला आहे. ती मूर्ती पाहूनच कदाचित त्याने ही रचना केली असावी. पार्श्वनाथांना त्यांची माता वामादेवी विवाह करण्याचा आग्रह करते त्या वेळी सांसारिक भोगोपभोगांचे निरुपयोगित्व पटविण्यासाठी त्यांनी स्वतःचे मागील भव सांगितले तेच ' पार्श्वनाथ भवांतर ' होय.

कृष्णगीत –

श्रीकृष्णाच्या राण्या रुक्मिणी, सत्यभामा व जांबुवंती यांनी श्रीकृष्णाशी केलेला हा गीतरूप संवाद आहे. श्रीहरि सेजेवर पहुडले आहेत. अंतौरी सेवा करीत आहेत. कोणी पाय चुरीत आहेत. तर कोणी विजणवारा घालीत आहे. कोणी विडा करून देत आहे. त्यावेळी श्रीकृष्णाने प्रत्येकीस म्हटले––

" बोलु गमे न गमे । बोलिजे पारब्रह्म ।
रसरंग प्रीतिप्रेमें । काइ कथनें साचा " ॥ ७ ॥

त्यानंतर प्रत्येकीने उखाणा सांगितला. अर्थातच ते सर्व आध्यात्मिक गूढ अर्थाने भरलेले आहेत.

गीताला––" गोपी सांगताती मातु । परियसे गोपिनाथु ।
सुजाण जाणती अरथु । समरथा बोले ॥ " याप्रमाणे ध्रुपद आहे.

१७+१६+४३=७६ याप्रमाणे ७६ कडव्याची ही तीन गीते आहेत. स्त्रियांचे आपल्या पतीशी संवाद करताना दिसून येणारे चतुराई, कोमलपणा, हळुवारपणा हे गुण भाषेत फारच उत्कृष्ट रीतीनें व्यक्त झाले आहेत.

गीताचा आरंभ– श्री नमिन स्वामिनी सरस्वती । करिन श्री गुरु भगती ।
घावी अविचल मती । गीतकृष्णु गावया ॥ १ ॥

अखेर–– ऐसा येरामागे येरि । बोल बोललीया नारि ।
मानवलें जी मुरारी । भलें भले जी झणितलें ॥ ४२ ॥
तेथे आणंदु पै जाला । प्रिति प्रेमु वाढिनला ।
मेघा मंगलु बोलिला । सांतिब्रह्मप्रसादें ॥ ४३ ॥

प्रतीत " इति काहानि गीत समाप्तं " ॥ म्हटले आहे. पण प्रत्यक्ष गीतात " गीतकृष्णु गावया " म्हटल्याने याला कृष्णगीत हेच नाव योग्य आहे असे वाटते.

रामायणी कथा––

वरील गीताच्याच धर्तीवर ही रचना आहे. परंतु त्यातील पहिल्या व दुसऱ्या गीताचा काही भाग आढळत नाही. दशरथाने राम, लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांना कथा सांगण्यास सांगितले. त्यावर प्रत्येकाने एकेक गूढ कथा सांगितली. ही अशी संवादात्मक कविता आहे.

कथेचा अंत्यभाग––

" सोमार्पिते काहाणी कथा । च्यारी पुत्रासी बोलीता ।
मन माने दशरथा । अरथा जाणती ज्ञानी ॥
एक वर्षाचें वर्तन । अरथुसाहित सगिन ।
आइकता नीवे चीत । धन जीवित त्या क(वि)चे ॥ १५ ॥

थलि जिहां जिहां हुवा सिद्धजल थल आकाशग्रह गहीजे।
ते हुं वंदु तिनकाल मेघराज कहे भाव धरीए।

याप्रमाणे छोट्या मोठ्या मराठी–गुजराती अशा मिळून पंडित मेघाच्या आठ कृती पाहण्यास मिळतात.

## पंडित मेघराज ( मेघा ) : व्यक्ती–गुरु व काळ—

मेघा किंवा मेघराज ही दोन्ही नावे एकाच व्यक्तीची आहेत. जसोधररास-मध्ये, पार्श्वनाथ भवांतरात, कृष्णगीतात, रामायणीकथेत, गुजरी – मन्हाटी गीतांत ' मेघा ' असा स्वतःचा उल्लेख या कवीने केला आहे. पण शान्तिनाथचरित्र ( गुजराती ) व तीर्थवंदना ( गुजराती ) या दोन ग्रंथांत मात्र तो मेघराज व मेघो अशा दोन्ही नावांचा उल्लेख करतो.

तो ब्रह्मशांतिदासाचा शिष्य होता. शांतिदास हे स्वतः गुजराती असून त्यांनी अनेक मराठी ग्रंथकार निर्माण केले. ब्रह्मशांतिदासाने बृहत्–शांतिनाथ पूजा रचिली आहे. ब्रह्मजिनदासाच्या प्रेरणेने त्यांनी ती पूजा रचल्याचे त्याने सांगितले आहे. ब्रह्मजिनदासाचा काळ हा संवत १५०८ ते संवत १५२० च्या दरम्यान आहे.[४] ( सन १४५१–१४६३ ). ब्रह्मजिनदास–ब्रह्मशांतिदास–पंडित मेघराज अशी ही परंपरा होते. म्हणूनच पंडित मेघराजाचा काळ सोळाव्या शतकाच्या अगदी प्रारंभी मानावा लागतो.

मेघराज हा गुजराती व मराठी दोन्ही भाषात ग्रंथ निर्माण करणारा कवी होता. दोन्ही भाषांवर त्याचे प्रभुत्व होते. तीर्थयात्रादि करून तो बहुश्रुत पंडित झाला होता, असा निष्कर्ष एकंदरीत त्याच्या ग्रंथावरून निघतो. पं. मेघराजाचे गुजराती भाषेवरही प्रभुत्व आहे. गुजराती व महाराष्ट्री दोन्ही समाजाशी त्याचा कसा निकट संबंध होता हे गुजरी-मन्हाटी गीतामध्ये चांगले पाहण्यास मिळते. पार्श्वनाथभवांतरा-मधील श्रीपुरपार्श्वनाथाचा उल्लेख व गोमटगीतामधील ' चामुंड ' राजाचा उल्लेख यावरून मेघाने या दोन्ही क्षेत्राची प्रत्यक्ष वंदना केली असेल असे वाटते. हरिवंश व पद्मपुराण यांचाही त्याचा अभ्यास चांगला दिसतो.

## पंडित मेघाविषयी भिन्न मत

डॉ. वि. भि. कोल्ते, नागपूर यांनी ' जसोधरचरित्रा 'च्या प्रस्तावनेत खालीलप्रमाणे मत मांडले आहे :

( १ ) " मेघा व मेघराज एकच होत असे मानणे सयुक्तिक होईलसे वाटत नाही. " ( पान १९ )

---

४. भ. सं. पृ. १५२.

(२) "मेवा हा मूलतः गुजराती होता या श्री. अवकोळे यांच्या अनुमानाचा पुन्हा विचार होणे आवश्यक आहे." (पान २१)

वरील दोन्ही मुद्द्यांचा पुनः विचार करूनही त्यांत फरक पडेल असे दिसत नाही.

शांतिनाथचरित्र गुजरातीत आहे. त्यातही 'मेघो' व 'मेघराज' या दोन्ही नावांचा उल्लेख स्वतः ग्रंथकर्ता करीत आहे. गुरु म्हणून "ब्रह्मशांतिदास" यांचाच उल्लेख येतो.

यशोधरचरित्रातही 'मेघा 'चा व गुरु शांतिदासाचा उल्लेख येतो.

ही गोष्ट खरी आहे की मेघाने कोणत्याही मराठी रचनेत आपले नाव 'मेघराज' असे दिले नाही. 'मेघा' असाच तो उल्लेख करतो. मेघा व मेघराज दोन व्यक्ती भिन्न असायलाही हरकत नाही. पण शांतिनाथचरित्राच्या प्रशस्तीचे काय करावयाचे ? 'ब्रह्मशांतिदास' हेही दोन मानावयाचे की काय ? गुजरी-मऱ्हाटी गीतातील गुजराती भाषा ही मराठी मेघाची मानावयाची नाही व त्यातील 'ब्रह्मशांती 'चा उल्लेख हा यशोधरचरित्रकाराच्या गुरूचा नव्हे असे विपरीत मत मानणे आपणास भाग पडेल.

मेघराज हा मूलतः गुजराती असावा; नंतर मराठीकडे त्याने आपले लक्ष वळविले असावे. याला कारण त्याचा गुरु ब्रह्मचारी शांतिदास हा गुजराती होता. त्याची 'ज्योतीभाव'[5] व 'बृहत्‌शांतिनाथपूजा'[6] उपलब्ध आहेत. शांतिदासाचा गुरु प्रसिद्ध गुजराती कवी ब्रह्मजिनदास होता. शांतिदासाच्याहि दोन्ही रचना गुजरातीत आहेत. मेघराजाच्या भाषेवर गुजरातीचा प्रभाव मराठीतही पडला आहे. वरील संदर्भात

"नेनु मी मऱ्हाटे बोलणें । नेनु वोवीचे बंधने ।
अक्षर होय अदिक उणें । तें नैनवे मज ॥" (ज. रा. ११६०)

या मेघाच्या ओवीचा अर्थ केवळ 'विनयोक्ति' प्रकट होणे असा नाही. त्यासाठी खास 'मऱ्हाटे बोलणे 'चा उल्लेख करावयाची जरूरी नव्हती.

सारांश—मेघराज व मेघा एकच कवी आहे. त्याचा गुरु ब्रह्मशांतिदास होता. मेघराज हा मूळचा मराठी भाषिक नव्हे. पण वऱ्हाडात जैन धर्मियांत तो वावरला. त्याची मराठी भाषा संपन्न आहे. तो एक व्युत्पन्न पंडित होता.

**कामराज —**

ब्रह्मशांतिदासाचा मेघराजाप्रमाणेच कामराज हाही शिष्य होता. तोही मूळ

---

५. वाशिम, हस्तलिखित क्रमांक १.
६. सन्मति, मे, १९५७.

ज्ञाने वीज्ञाने थरु युक्ति । आखर बीवरणीं युरती ( ? ) ।
ऐसीं असतां वीनपती । तहीं वाछ्तीना महिमा ॥ १६ ॥
मेघा म्हणे अनुचित । ते अवघे माझे मीत ।
तयापासा अपकर्षीत । माझे मुख होईल ॥ १९ ॥
दसरथु राव मानवला । तेथं । आनंदु पै जाला ।
मेघा माल्हणु बोलिला । सांत ब्रह्म परसादे ॥ २० ॥
इति रामायणी काहाणी च्यारि संपुर्ण समाप्ता ॥ "

याप्रमाणे चार गीतांचे हे काव्य आहे.

## गुजरी मन्हारी गीत—

गीताची भाषा नावाप्रमाणेच मिश्र आहे. गुजराती आणि महाराष्ट्री अशा दोन स्त्रिया गिरनारला नेमिपूजा करण्यास चालल्या आहेत, रस्ता एकपावली. आधी कोण जाणार हा वाद सुरू झाला. दोघींनी एकमेकींची निंदा केली. मांडल्या करी विनंती करतो की मिळून भक्ती करा. पोषाख, खाणेपिणे, रीतिरिवाज वगैरे बाबतीत दोन्ही समाज त्याही वेळी एकमेकावर कशी टीका करीत असत याचे फार सुंदर चित्र या गीतात उमटले आहे. गीत लहान म्हणजे प्रत्येकी चार ओळींच्या १३ कडव्यांचे आहे.

गुजरी म्हणते— " बालु ताहारू बोलणू तुं बोले । कवकसी ।
कासटवाली पेहेरे दीसे नाचन जैसी । "

मन्हाटी म्हणते—" हाणे मन्हाटी गुजरी तुं राहो मेलिसी ।
निघदे रंगीले दात तुं काहिं विडा न घेसि ॥ ३ ॥ "

अशा हा संवाद रंगला आहे.

अखेरचा भाग— " मानभाव मीलीने बहु चढतां वारि ।
ऐकल्या मिलिने तेन्ही चढो गिरिनारी ।
पुजा दान करुन पुन्य जोडावे भारी ।
मेघयाचा स्वामि नेमि बालब्रह्मचारि ॥ १३ ॥ "

## गोमटस्वामी गीत—

३ कडव्यांचे 'सकल्याभरण' रागातील हे पद आहे. कदाचित् बेळगोळ येथील गोमटेश्वराची यात्रा केल्यानंतर या पदाची रचना झाली असावी.

" हारे बापा गोमटा नाव साजे तुज ।
प्रगटोनि बेल्गुलि पंचमकाळीं ।
चामुंडराजा तारीला ।
जिनभक्त मेघा हाणे । सफल तयाचे जिने ।
चरनि रहिवासु केला ॥ ३ ॥ "

**शांतिनाथ चरित्र—**[1]

हा ग्रंथ गुजरातीमध्ये आहे. 'जैन गुर्जर कविओंचे' संपादक श्री. देसाई हे या ग्रंथाचा काल संवत १६१७ पूर्वी मानतात. या शांतिनाथ चरित्राचा कर्ता, 'मेघराज-मेघमंडल' असे दिले आहे. ग्रंथाची पुष्पिका[2] पाहिल्यास असे दिसते की ब्रह्म-शांतिदासाचा मेघमंडल हा शिष्य होता. संवत १६१७ हा प्रतिलेखनाचा काल आहे.

ग्रंथाच्या प्रारंभीच कवीने "सांतब्रह्म"च्या पायास वंदन केले आहे. प्रशस्तीत[3] स्वतःस मेघो व मेघराज असे म्हटले आहे. त्यावरून ब्रह्मशांतिदासशिष्य पंडित मेघा म्हणजेच मेघराज होय. त्यानेच गुजरातीत शांतिनाथ-चरित्र लिहिले आहे यात संशय वाटत नाही.

**तीर्थवंदना—**

हीही पंडित मेघाची गुजराती रचना आहे. तीत २२ पद्ये आहेत. निर्वाण-कांडाच्या आधारे पूर्वीच्या व अलिकडील तीर्थक्षेत्रांचे वंदन केले आहे. पण काळाचा उल्लेख इतर कृतीप्रमाणे यातही केला नाही.

श्रीपुर पारिश्वनाथ गोमिंदस्वामी वेलगुलेअे ।
तेरपुरे वर्धमान पोयनापुरे वंदु बाहुबलिये ॥ १९ ॥
समुद्रमाहे आदिनाथ संखजिनेंद्र लक्ष्मीस्वरेअे ।
ते हुं वंदु भावसहित शांतिकुंथु हथनापुरेअे ॥ २० ॥
तिलकपुरे चंद्रनाथ नागद्रा श्री पासजिनअे ।
वडमोइ कोटमा पास जिराउल जिन वांदमुअे ॥ २१ ॥

---

१. जैन गुर्जर कविओं, भा. ३, खंड १, पान ६९०.

२. "इति श्री सांतिनाथचरित्रे ब्र. श्री शान्तिदासदेश-कवि-बुध मेघमंडल विरचिते कथासमुद्र ग्रंथे परिपूर्णा संवत १६१७ वर्षे माघ सुदि ३ शनौ लिखितं"—सन्मति, डिसेंबर १९५८

३. सरसति स्वामिणी वीनवुं दीगंबर गुरुराय ।
परमगुरु वलि समरसुं सांतब्रह्म तण पाय ॥
क्षायक समकित पामीया । टल्यो कुमिथ्यात्वप्रकास ।
करजोडी मेघो कहे । ते मझ यो साहास ॥
भक्तिभाव छे माहारो । कर्मक्षयने काज ।
चरित्र श्री सांति जिनतणो कीधो कहे मेघराज ॥
—जैन गुर्जर कवियो, सदर.

मराठी भाषिक कवी नव्हे. पण विदर्भात मराठी बोलणाऱ्या जैन समाजांत जैन धर्म समजावून सांगण्याच्या प्रेरणेने ईडरच्या गुजराती परंपरेतील ज्या कवींनी ग्रंथरचना केली आहे त्यांतच कामराजाचे स्थान आहे. त्याने ' सुदर्शन चरित्र ' हे चरित्रात्मक आख्यान–काव्य लिहिले असून 'चेतनफाग ' या नावाची त्याची एक लहान रचनाही उपलब्ध आहे.

## सुदर्शनचरित्र —

सुदर्शन श्रेष्ठींचे चरित्र जैन वाङ्मयात बरेच लोकप्रिय आहे. वेगवेगळ्या अनेक ग्रंथकारांनी संस्कृतात व अपभ्रंशांत मिळून हे चरित्र लिहिले आहे. यावरून या कथेची लोकप्रियता दिसून येते. ब्रह्मनेमिदत्त, सकलकीर्ती, विद्यानंद ( देवेंद्रकीर्ति-शिष्य ), विश्वभूषण, माणिक्यसूरी, देवेंद्रसूरी या कवींनी हे चरित्र लिहिले[७] आहे. अंतकृद्दशांगांत महावीर तीर्थंकरांच्या तीर्थात चार प्रकारचे घोर उपसर्ग सहन करून अतिशयपूर्वक निर्वाण प्राप्ती करून घेणाऱ्यांच्या यादीत सुदर्शनाचेही नाव येते. ( धवला, १, १, २. )

णमोकार मंत्राचे माहात्म्य दाखविणारी—सुभग गवळ्याची कथा ही सुदर्शनाच्या पूर्वभवाची कथा म्हणून सांगितली जाते. (गोपः सुदर्शनीभूय सुभगाव्हः शिवं गतः ॥ ८, ७७, सागारधर्मामृत ).

प्रस्तुत कामराजकृत सुदर्शनचरित्रात सुदर्शनश्रेष्ठींने शेवटपर्यंत ब्रह्मचर्यव्रत कसे अचल रीतीने आचरिले हे दाखविले आहे. मुनि अवस्थेत त्याच्यावर झालेल्या घोर उपसर्गांचेही वर्णन आले आहे. सुदर्शन हा कामदेव होता. त्याच्यावर अनेक स्त्रिया मोहित झाल्या. परंतु त्याने आपले शीलव्रत अखेरपर्यंत दृढ ठेवले, अशी ही कथा आहे. कामराजकृत सुदर्शनचरित्र[८] १४ अधिकारांचे असून त्याची ओवीसंख्या ९८७ आहे. सुदर्शनाच्या चरित्राबरोबरच जैन आचारधर्म व तत्वज्ञान यांचे सुसंगत व सुंदर वर्णन प्रस्तुत ग्रंथात कामराजाने केले आहे. मेघराजाचे यशोधरराय आणि कामराजाचे सुदर्शनचरित्र यांची लेखनशैली व कथा कथन करण्याची पद्धती ही एकच आहे.

---

७. जिनरत्नकोश, पृ. ४४४

८. हा ग्रंथ श्री. चवडे व श्री. आवळे यांनी मुद्रित केलेला आढळतो. मुद्रित करताना मूळ ग्रंथाचा जवळ जवळ नाश दोघांनीही केला आहे. चौदाऐवजी पंधरा अधिकारांचे फक्त ५ अधिकार त्यांनी बनविले आहेत. ९८७ ओव्यांची काटछाट करून आवळे यांनी ५३२ ओव्या बनविल्या तर चवडे यांनी ५४० ओव्या तयार केल्या. म्हणून मुद्रित प्रतींचा संदर्भ देणे टाळला आहे. चवडे यांनी तर ' कामराज ' याचे कामकाज करून दोघांचा उल्लेख गाळला आहे. कदाचित सुदान केले की काय न कळे !

" आरे जो जिनदास ब्रह्मचारु । त्याने केला ग्रंथाचा विस्तारु ।
तोची मज अवधारु । त्या नमन माझे ॥ ८ ॥ "

याप्रमाणें ब्रह्मजिनदासाच्या सुदर्शनरास या ग्रंथांच्या आश्रयाने ही मराठी रचना कामराजाने केली आहे असे तो स्वतःच म्हणतो. ब्रह्मजिनदासाने 'सुदर्शनरास' लिहिले आहे. कामराज स्वतः गुजराती होता. म्हणूनच स्वतःच्या मराठीबद्दल तो पुढीलप्रमाणें ग्रंथांत खुलासा करतो.

" नय जी नमन करीता । नय जी मन्हाष्ट बोलता ।
नय ओवी बांधता ।............॥ ११ ॥

चैतन्यफाग —

ही एक लहानशी १४ कडव्यांची रचना आहे. त्यात आत्मतत्त्वाचे काव्यमय वर्णन केले आहे. शरीर पिंजरा व आत्मा पक्षी अशा रूपकात हे काव्य आहे. 'राघो' असे आत्म्यास संबोधिले आहे. शेवटच्या कडव्यांत कामराजाने स्वतःचा उल्लेख केला आहे. तो म्हणतो,—

" आतमा चैतन्य राघो गायला परी । अनंतगुणे राघो तुझी कुसरी ।
कामराज म्हणे राघो नं सूत्रधारी। जानता नैनता राघो कविलासपुरि ॥१४॥"
वरील दोन रचनांशिवाय कामराजाचे अन्य काही उपलब्ध नाही.

कामराज : व्यक्ती-गुरु व काल —

पंडित मेघराज यांच्याप्रमाणे कामराज हाही ब्रह्मशांतिदासाचा शिष्य होता व मूलतः गुजराती होता. याचाही काळ सोळाव्या शतकाचा प्रारंभ हाच ठरतो. त्याने सुदर्शन चरित्राची रचना ब्रह्मजिनदासाच्या सुदर्शनरासच्या आधारे केली आहे यात शंका नाही. तो मराठी ही माझी मूळची भाषा नव्हे असे मेघराजा-प्रमाणेच सांगतो. ब्रह्मशांतिदासाच्या तिन्ही शिष्यात भाषेचे फार मोठे साम्य आहे. त्याच्या सुदर्शनचरित्रात खालील ओव्यावरून त्याची माहिती मिळते, ती अशी आहे.

" अरे जो जिनदासु ब्रह्मचारू । तेणे केला ग्रंथाचा विस्तारु ।
तोचि मज अवधारु । त्या नमन माझे ॥ १.८
जो का ब्रह्मशांतिदासु । तो करी जैनधर्मीचा प्रकासु ।
तेणे दिधला सायासु । त्या नमन माझे ॥ १.९
जो का ब्रह्मचारी जाना । तो जैन धर्मांच्या जाणे खूणा ।
पारु नाहीं त्याचिया गुणा । त्या नमन माझे ॥ १.१०
नय जी नमन करितां । नय जी मन्हाष्ट बोलता ।
नय जी ओवी बांधता । बुधी निगु ॥ १.११ "

ग्रंथाच्या अंत्यभागीसुद्धा कामराजानें " नय मन्हाटी बोल्ता । क्षमा करावी सुधीवंता " म्हणून क्षमा मागितली आहे. मूळ भाषा मराठी नसताना या कवींनी चांगल्या दर्जाच्या काव्यांची निर्मिती केली आहे हे विशेष होय. सुदर्शनचरित्रात

" आपमति नाही सांगितली । पूर्वे शास्त्रे कथा चालोन आली ।
ते म्या मन्हाटी भाषा केली । देशभाषालागुणी ॥ १.१७ ॥ "

याप्रमाणे प्रारंभीच " पूर्व ऋण " मान्य करून तो पुढे जातो. त्याच ग्रंथात

" दिगंबर धर्मि सुमति । जैन चरित्रें शुधवृत्ती ।
मूळसंघे पाविजे कीर्ति । चहूंदिशीं ॥ १५.५२ ॥ "

याप्रमाणें मूलसंघाचा व दिगंबर आम्नायाचा तो अभिमानाने उल्लेख करतो. जवळजवळ प्रत्येक अध्यायाच्या अंती " कामराजु ह्मणे " असा स्वतःचा उल्लेख तो करतो.

एवंदरीत कामराजाची गुरुपरंपरा ब्रह्मजिनदास–ब्रह्मशांतिदास हीच होती, ईडर पीठाची होती यात शंका राहात नाही. गुजराती मूळ भाषा असूनही उत्तम मराठी काव्य लिहिणाऱ्या तत्कालीन विद्वानांपैकीच तो एक होता असे दिसते.

## ● पंडित सूरिजन ––

ईडर ( गुजरात ) येथील भट्टारकांची परंपरा गुरुस्थानी मानूनही मराठीत ग्रंथरचना करणारी बरीच विद्वान् मंडळी पधराव्या शतकाच्या उत्तरार्धात पुढे आली. पंडित सूरिजन, पंडित मेघराज व कामराज हे तिघेजण समकालीन आहेत. पंडित सूरिजन यांचा 'परमहंसकथा' हा एकच ग्रंथ उपलब्ध आहे.

### परमहंसकथा —

ही रचना लहान असली तरी ती आपल्या वैशिष्ट्याने फारच उल्लेखनीय झाली आहे. हे एक चंपूकाव्य आहे. गद्य–पद्यमिश्र अशी ही रचना आहे. ' अथ वचन चाली ' म्हणून गद्य भागाला आरंभ होतो तर ' अथ वोवीया ' म्हणून पद्याचा प्रारंभ होतो. एकूण एक हजार ओवीप्रमाण अशी ही वैशिष्ट्यपूर्ण कृती आहे. गद्यालाही ' वचन चाली ' म्हटल्याने तो मागही एका विशिष्ट चालीवर म्हणण्याची किंवा शास्त्र प्रवचनाचे वेळी मोठ्याने वाचण्याची रीत पूर्वी असली पाहिजे. वचनगद्याचा उत्तरकालीन प्रकार मोडल्यास महानुभाव ग्रंथवर्गात गद्यही याच प्रकारचे समजावे लागेल. धर्मामृतही याच गद्यात आहे. या गद्याला चूर्णिका[1] असे

---

१. अकठोराक्षरं स्वल्पसमासं चूर्णकं विदुः । तत्तु वैदर्भरीतिस्थं गद्यं हृद्यतरं भवेत् ॥– छंदोरचना–पटवर्धन पृ. ३२

म्हटल्यास या वचन चालीचा उलगडा होतो. मराठीत निरंजन माधवाने आपल्या सुभद्राचंपूत अशा मिश्र रचनेचा उपयोग केला आहे.

या काव्याची दुसरी विशेषता ही की, ही एक रूपककथा आहे. हे आध्यात्मिक रूपक असले तरी त्या वेळच्या राजकीय संग्रामाचे प्रतिबिंब त्यात उत्तम रीतीने पडले आहे. 'कायानगरी', 'परमहंसराजा' 'चेतना राणी', 'मायाउक्त' 'मनपुत्र' अशा काही उदाहरणांवरून काव्याचे स्वरूप सहज कळून येईल. मोहासी संग्राम करून शेवटी विवेकाने परमहंसास बंधमुक्त केले व त्याला चेतनेची प्राप्ती करविली असा हा कथाभाग आहे.

भाषेचे स्वरूप, तत्कालीन धर्मपंथ व राजकारण यांच्या दृष्टीने हा ग्रंथ अभ्यसनीय आहे. गुजरातीत[१०] ब्रह्मजिनदासकृत 'परमहंसरास' आहे. त्याच आधाराने पं. सूरिजनाने ही मराठी रचना केली असावी. ही मूळ कथा श्वेतांबरपंथीय असावी. जयशेखरसूरिकृत 'परमहंस प्रबंध'[११] हा मूळ असावा. त्यावर अनेक रचना आढळतात.

**पं. सूरिजन : काल व गुरु—**

पं. सूरिजन याची परमहंसकथेशिवाय दुसरी कोणतीही रचना उपलब्ध नाही. या ग्रंथातही स्वतःसंबंधी त्यांनी फारसे काही लिहिले नाही.

ग्रंथाची शेवटची ओवी अशी आहे,

"अइसें बोलिला ब्रह्मचारी जिनदासु । मग मनीं धरुनि संतोसु ।
मग कथिला परमहंसु । पंडित सुरीजनें ॥"

ब्रह्मजिनदासाच्या ग्रंथाच्या आधारे पं. सूरिजनाने ही कथा रचिली हाच याचा अर्थ आहे...ब्रह्मजिनदास हा प. सूरिजनाचा गुरुही आहे.

ग्रंथाच्या प्रारंभी सर्वात अगोदर देवस्तुती करून तो गुरुपरंपरा देतो. त्यात ब्रह्मजिनदासास त्याने आद्यस्थान दिले आहे. व त्यांना 'प्रेमगुरु'[१२] म्हटले आहे. नंतर सकलकीर्ती, भुवनकीर्ती, ज्ञानकीर्ती, ज्ञानभूषण अशी तो मालिका देतो आणि शेवटी,

"ब्रह्मचारी शांतिदासु । तो करि जैन धर्माचा प्रकासु ।
त्यन्दे दिधला सायासु । त्या नमन माझे ॥ २.७ ॥"

याप्रमाणे तो ब्रह्मचारी शांतिदासास नमन करतो. [ब्रह्मशांतिदास हा ब्रह्मजिन-दासाचा शिष्य होता. पं. सूरिजन हा ब्रह्मशांतिदासाचा शिष्य आहे. सकलकीर्ती ते ज्ञानभूषण ही परंपरा ईडरच्या भट्टारक पीठाची आहे. ज्ञानभूषणाचे [उल्लेख संवत

---

१०. कारंजा, बलात्कारगण ग्रंथभांडार हस्तलिखित न. ४६८
११. अनेकांत, वर्ष ११ किरण ९
१२. परमहंसकथा १.४

१५३४ ते १५६० च्या सुमारास येतात. ज्ञानभूषण हे पीठावर असताना पं. सुरिजन यांनी या ग्रंथाची रचना केली असावी. एकंदरीत पं. सुरिजनांचा काळ हा सोळाव्या शतकाच्या अगदी प्रथमार्धात येईल.

● **नागोआया ( सन १५४० )—**

यांची फक्त एकच काव्यकृती उपलब्ध आहे. ती म्हणजे 'यशोधरचरित्र' होय.

**यशोधरचरित्र—**

वैराट देशातील कोटनगर येथे माणिकसेन गुरूच्या कृपेने हा ग्रंथ लिहिल्याचे कवीने प्रशस्तीत म्हटले आहे. हे कोटनगर म्हणजे आजचे अकोला जिल्ह्यातील 'आकोट' हे तालुक्याचे गांव असावे. या ग्रंथाचे संपादक डॉ. वि. पा. जोहरापुरकर यांनी १६ व्या शतकाचा उत्तरार्ध हा या ग्रंथाचा काळ ठरविला आहे. कारंजा पीठावरील सेनगणापैकी माणिक्सेन हे इ. सनाच्या १५४० च्या सुमारास झाले. तेच त्यांचे गुरु होते.

यशोधरचरित्र हा ग्रंथ फक्त २९२ ओव्यांचा आहे. अधिकारसंख्या ५ आहे. हा ग्रंथ वादिराजसूरींच्या संस्कृत 'यशोधरचरितम्'च्या आधारे लिहिला गेला आहे. हे साधार सिद्ध[१३] करण्यात आले आहे.

ग्रंथाचा विषय यशोधर–चंद्रमती कथानक आहे. मराठीत या कथेवर मेघराज, नागोआया, व गुणनंदी यांनी काव्ये लिहिली आहेत. हा ग्रंथ थोडक्यात पण रसाळ आहे. भाषा वऱ्हाडी असून तत्कालीन वऱ्हाडी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीने ग्रंथ महत्त्वाचा आहे. ओव्या चार चरणी आहेत पण मध्येच काही ओव्या तीन चरणी आहेत. त्यांना 'गायत्री' छंदातील ओव्या असे म्हणतात. भाषा, छंद, व विषय या दृष्टीने हा लहानसा ग्रंथही महत्त्वाचा मानावा लागतो. ग्रंथ व ग्रंथकार यांच्या परिचयाच्या दृष्टीने खालील काही ओव्या महत्त्वाच्या आहेत.

> वैराट देसामध्यें कोटनगर । तेथ आदिनाथ असे जगप्रसिद्ध ।
> सिद्ध तीर्थंकर जाणा ॥ २८६ ॥
> सरस्वती मातेच्या प्रसादें । माणिक्सेन गुरूच्या आल्हादें ।
> नागो आया म्हणे आनंद ॥ २८७ ॥

● **गुणनंदी ( सन १५८१ ):—**

सोळाव्या शतकाच्या उत्तरार्धात हा एक प्रतिभाशाली कवी होऊन गेला.

१३. ज. रा. प्रस्तावना, पृ. ३२.

याचा एकच ग्रंथ आज तरी उपलब्ध आहे. पण त्या एकावरूनही गुणनंदीची योग्यता कवी म्हणून फार मोठी आहे हे पटल्याशिवाय राहत नाही.

## जशोधरपुराण[१४] —

यशोधर चरित्रावरील मराठीतील ही तिसरी रचना होय. या तिन्ही रचनांचे तुलनात्मक विवेचन आम्ही 'जसोधररासच्या प्रस्तावनेत'[१५] केले आहेच. यशोधरचरित्रावरील मराठी साहित्यात ही सर्वांत श्रेष्ठ दर्जाची कलाकृती आहे. या ग्रंथात ८ संधि (अध्याय) असून ओवीसंख्या १३१६ आहे. 'मोरंबपूर' येथील माळातीर्थ चैत्यालयात ही यशोधररायाची कथा संपूर्ण केली असे स्वतः कवीनेच सांगितले आहे. मूलसंघ बलात्कार गणातील धर्मभूषण हे गुणनंदीचे गुरु होते. गुरु धर्मभूषण हे कारंजा पीठावरील भट्टारक होते. कारंजा पीठावर दोन धर्मभूषण झाले. संवत १६३८ मध्ये एक व दुसरे संवत १७०७ ते ३२ मध्ये. पण यापैकी नक्की कोणते धर्मभूषण गुणनंदीचे गुरू होते हे कळण्यास स्पष्ट साधन नाही. कदाचित् मोरंबपूर येथील माळातीर्थ चैत्यालयाचा इतिहास मिळाल्यास यावर प्रकाश पडेल.

गुणनंदीने आचार्य सकलकीर्ती यांच्या संस्कृत यशोधर चरित्राच्या आधारे ही मराठी रचना केली आहे. पण आपण सरस संगीत रचना करीत आहोत याची तो स्वतः खात्री देतो. गुणनंदीसंबंधी जशोधरपुराणात ज्या ओव्यांत वरील माहिती मिळते त्या अशा आहेत :

"मग धर्मभूषण सद्गुरु । तेणें गुणनंदि धरिला करि ।
तेहि मज तारिलें भवसागरि । धर्म उपदेशोनि ॥ १.१२ ॥
ह्मणे आरे गुणनंदा धर्मपुत्रा । तूं जशोधर चरित्र चालवि पवित्रा ।
तें जैन आगमाचें सूत्र ॥ पाहोनिया ॥ १.१३ ॥

---

१४. या ग्रंथाची हस्तलिखित प्रत प्रयत्न करूनही मिळाली नाही. मात्र "जशोधरपुराण" या नावाने पुराणाकार स्वरूपात कुरुंदवाड येथून तो प्रसिद्ध झाला होता. छापील पुराणाची पाने ९४ आहेत. "हा ग्रंथ रा. रा. बाळाप्पा धस्याप्पा आलासे, राहणार कुरुंदवाड यांनी श्रावकाचे उपयोगाकरिता कुरुंदवाड येथें आपल्या "जैनभूषण" छापखान्यात छापून प्रसिद्ध केला." असे प्रकाशकांनी प्रारंभी म्हटले आहे. शके १६९५ च्या हस्तलिखितावरून हा ग्रंथ छापला आहे असे ग्रंथाची पुष्पिका पाहिल्यास दिसून येते.

१५. ज. रा. प्रस्तावना, पान ३०.

१६. म. सं. प ७७.

जे संस्कृत बोलिले सकळकीर्ति ॥ ते म्या वाचिलें करुनि प्रीति ।
त्यापासोन उपजलि मति । श्रीगुरुप्रसादें ॥ १.१५ ॥
ह्मणे तुह्मी जरि करुनि द्यावें प्राकृत । तरि लोक सांडिति मिथ्यात्व ।
आणि पुण्य लागेल बहुत । ऐकोनि स्वामीया ॥ ८.१९७ ॥
हे रचिलें मोरंबपुर स्थानी । माळातीर्थ चैतात्यभुवनीं ।
श्री मूळसंघ बलात्कारगनी । धर्मभूषण श्री गुरु ॥ ८.२०० ॥
त्याचा गुणनंदी गुणसागर । जिनदेव गुरु भक्ति निर्भर ।
या जशोधर रायाची कथा सुंदर । संपूर्ण केलि ॥ ८.२०१ ॥ ''

**सोळाव्या शतकाचा समारोप :—**

सोळाव्या शतकात प्रारंभीचे पं. मेघराज, कामराज, पंडित सूरिजन हे श्रेष्ठ दर्जाचे ग्रंथकार झाले. ग्रंथरचनाही नवीन झाली. पण ते तिघेही मूळ गुजराती होते. नागोआया व गुणनदी गुणसागर हे दोन कवी मात्र विदर्भातले होते. नागोआया वैराट देशाचा उल्लेख करतो. गुणनंदीने मोरंबपुरचा उल्लेख केला आहे. पण हे मोरंबपूर निश्चित कोठे आहे हे समजले नाही. पण ज्या अर्थी दोघांचीही गुरुपरंपरा कारंजा येथील भट्टारक पीठाची आहे त्याअर्थी ते त्या भागातील असावेत. पंधराव्या शतकातील गुणकीर्ती आदि ग्रंथकारांना ब्रह्मजिनदासाच्या गुजराथी ग्रंथांची प्रेरणा होती. पण नागोआया किंवा गुणनदी या दोघांचाही साहित्यप्रेरणा ही संस्कृतमधून झालेली दिसते. वादिराज आणि सकलकीर्ती या दोघांच्याही काव्यावरून त्यांनी मराठी काव्ये निर्माण केली.

सोळाव्या शतकाच्या आरंभी कारंजाला जैन मठपरंपरेतील – सेनगण व बलात्कारगण या दोन्ही शाखांची भट्टारक पीठे स्थापन झाली. कारंजाला जैन धर्माच्या केंद्राचे स्वरूप विदर्भापुरते तरी प्राप्त झाले. भट्टारकाच्या पीठात शिष्य असत. संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश या भाषांचे अध्ययन आणि अध्यापन तेथे चालत असे. त्यातूनच गुणनंदीसारखे मराठी कवी निर्माण झाले.

भागवत संप्रदायातील श्रेष्ठ कवी एकनाथ सोळाव्या शतकात पैठणच्या परिसरात भागवतधर्माची ध्वजा मिरवीत होते. एकंदरीत १६ वे शतक हे जैन व भागवत याच्या धर्मप्रसारात उपयुक्त ठरले असे म्हणावे लागेल. जैन ग्रंथकार जरी प्रारंभी कमी दिसत असले तरी पुढे पुढे ही परंपरा वृद्धिंगत होत गेली आणि विदर्भ व मराठवाडा यात पुढील काळात अनेक नामांकित ग्रंथकार निर्माण झाले.

## इ. सनाचे १७ वे शतक

**भट्टारक पीठांचा वैभवकाल —**

इ. सनाच्या सोळाव्या शतकात विदर्भातील कारंजा येथे भट्टारकपीठाचे

प्राबल्य धार्मिक दृष्ट्या वाढले. पीठावर असलेले भट्टारक हे धर्मगुरु म्हणून त्यांची सत्ता विशेषतः धार्मिक बाबतीत व कधी कधी सामाजिक बाबतीतही चालत असे. लातूर येथे इ. सन १६५१ च्या सुमारास कारंजा येथील बलात्कारगण पीठाची एक शाखा स्थापन झाली. विदर्भ व मराठवाडा विभागातील मध्ययुगीन भट्टारक पीठांचा हा वैभवकाल होता. पूजा, प्रतिष्ठा, मूर्तिस्थापना इत्यादी प्रसंगांत धार्मिक बाबतीत विशेष प्रभावना होई. त्यामुळेच धार्मिक साहित्याची मागणीही अधिक वाढली. पण या साहित्यात व्रते, व्रतकथा, पूजा, आरती याचे स्तोम फार होते. वीरदास, दामा-पंडित व महीचंद्र हे तीन कवी अपवाद सोडल्यास बाकीच्या ग्रंथकारांनी उपर्युक्त साहित्याचीच अधिक निर्मिती केली आहे.

● अभयकीर्ती ( इ. सन १६१६ )—

या शतकात हा कवी कालदृष्ट्या प्रथम आहे. याने अनंतव्रतकथा लिहिली.

**अनंतव्रतकथा :—**

अनंत चतुर्दशीच्या दिवशी अनंतव्रत करण्याचा प्रघात हिंदूंप्रमाणेच जैनांतही आहे. त्या व्रताचा विधी व त्याची कथा या ग्रंथात अभयकीर्तीने सांगितली आहे. ग्रंथात तीन अध्याय असून ओवीसंख्या २५५ आहे. या विषयावरील हे पहिलेच मराठी जैन काव्य असावे. या ग्रंथाची रचना शके १५३८ (सन १६१६) मध्ये केली असे कवीनेच सांगितले आहे. कवीच्या गुरुचे नाव अजितकीर्ती असल्याचा उल्लेख त्याने केला आहे. तो म्हणतो—

" मग माझा जन्मु सफल जाले । अजितकीर्ति भेटले ।
भवसागरी तारिले ॥ २४२ ॥
संवत्सरु पंधरासे अडतिसु । ग्रंथ केला श्रावणमास ।
ग्रंथु केला सोत्तर जाला सस । दिन शुक्रवार ॥ २५२ ॥
दीवसि चादने तिथ पंचमिचि । कथा संपली अनंताची ।
भावना पुरली भक्ताची । म्हणे अभयकीर्ति ॥ २५३ ॥

राजा विजयसेन महावीराच्या समवशरणात आला असता, त्याच्या पूर्वभवाविषयी श्रेणिकाने महावीरास प्रश्न विचारला व त्याचे उत्तर म्हणून त्याने ही कथा सांगितली अशी या कथेची भूमिका आहे. विजयसेन राजा पूर्वीच्या भवात 'सोम' ब्राह्मण होता. त्याने अनंतव्रत पाळले व ,त्यामुळे त्याचे दारिद्र्य गेले व पुढील जन्मी त्यास वैभवाची प्राप्ती झाली अशी ही कथा आहे.

जैनाप्रमाणेच वैदिक संप्रदायांतही अनंतचतुर्दशी व्रत पाळतात. त्यांच्या मते अनंत हे नागांचा राजा शेष याचे नाव आहे. त्याचीच पूजा या व्रतात केली जाते.

या व्रताच्या पालनाने कौंडिण्य नावाचा ब्राह्मण व त्याची पत्नी सुशीला यांना कसे सुख प्राप्त झाले त्याची कथाही वैदिक संप्रदायात प्रचलित[1] आहे.

## अभयकीर्तिंचे गुरु व त्यांचा काल :–

अभयकीर्तिंचे गुरु अजितकीर्ति होते याचा उल्लेख प्रारंभी आलाच आहे.

" श्रीमूलसंघ बलात्कार गन । श्री सरस्वती गच्छ प्रविन ।
श्री अभयकीर्ती मति अजान । कथा केली अनंतार्ची ॥ २५० ॥ "

याप्रमाणे स्वतःची परंपरा मूलसंघातील बलात्कार गणाची तो सांगतो. या गणांत अजितकीर्ती ( त्यांचे गुरु ) शके १५३८ च्या सुमारास झाले असावेत. पण हे अजितकीर्ती लातूर शाखेतील भट्टारक परंपरेत उल्लेखिलेल्या अजितकीर्तींपैकी[2] नक्की कोणते हे मात्र स्पष्ट होऊ शकत नाही.

## • वीरदास ( पासकीर्ती ) ( इ. स. १६२७ ) :—

सतराव्या शतकातील जैन कवीत वीरदास याचे अनन्यसाधारण महत्त्व आहे. प्रारंभी कवी म्हणून त्यांनी नावलौकिक मिळविला आणि नंतर औरंगाबाद येथील बलात्कारगण भट्टारक पीठावरील आचार्य म्हणून त्यांना धार्मिक दृष्टीनेही मोठे पद प्राप्त झाले. सुदर्शनचरित्र हा त्यांचा सर्वांत मोठा काव्यग्रंथ असून बहुतरी, नवकार-मंत्रभक्ती, नेमिनाथवन्हाड अशा काही लहान रचनाही त्यांनी केल्या आहेत.

## सुदर्शनचरित्र :—

कामराजाच्या सुदर्शनचरित्रासंबंधी लिहिताना त्या चरित्राच्या लोकप्रियतेसंबंधी ऊहापोह केला आहे. त्याच सुदर्शन श्रेष्ठीचे हे मराठीतील दुसरे मोठे चरित्र आहे. कामराजाने जे चरित्र १५ अधिकारात लिहिले आहे तेच चरित्र वीरदासाने २५ अध्यायांत लिहिले आहे. वीरदासाने या ग्रंथाची रचना ब्रह्मजिनदासाच्या ' सुदर्शन-रास ' ग्रंथाच्या आधारे केली असल्याचे त्याने स्वतःच पुढीलप्रमाणे सांगितले आहे—

" ब्रह्मजिनदासें केला निस्तार । तो मज जाहला आधार ।
देसभासा केला प्रकार । मुलाधारप्रमाणें ॥३.३ ॥ "

अर्थातच कामराजाप्रमाणे वीरदास हा फक्त गुजराती रास ग्रंथावर अवलंबून राहिला नाही. त्याने संस्कृतमधील सुदर्शनचरित्रांचाही आधार घेतला आहे.

---

१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, अ. १५९.
२. सन्मति, मे, १९५८ ( अनतव्रतकथा, प्रा. जोहरापूरकर ).

" हें संस्कृताचि महाराष्ट्रवाणी । बहु न कलेचि पै विरनीं ।
परी बोलिलों आधार पाहुनि । सज्जन जनीं विश्वासु ॥ २५.३७ ॥ "

असे त्याने म्हटले आहे.

कामराज व वीरदास या दोघांच्याही सुदर्शनचरित्राचे नीट निरीक्षण केल्यास या दोन्ही ग्रंथात विलक्षण साम्य दिसून आल्याशिवाय राहात नाही. दोन्ही ग्रंथ पाहिले तर कामराजाचा ग्रंथ जवळ जवळ समोर ठेवूनच वीरदासाने आपला ग्रंथ तयार केला आहे असे वाटू लागते. जे संस्कृत श्लोक कामराजाने उद्धृत केले आहेत तेच वीरदासानेही उद्धृत केले आहेत. वीरदासाने प्रत्येक अध्यायाचे नामाभिधान केले आहे. प्रत्येक अध्यायाच्या शेवटी त्या नावाचा व स्वतःच्या गुरूचा व स्वतःच्या नावाचा तो उल्लेख करतो.

उदा. इति श्री प्रतिबोधकथासार । धर्मचंद्रगुरु गंभिर ।
वंदावया विरसागर । प्रितितत्पर प्रसंगि ॥ अध्याय २४

प्रत्येक अध्यायाच्या प्रारंभी एकेक तीर्थंकरास नमन केले आहे. ग्रंथाची एकंदर ओवीसंख्या १६५० आहे. सुदर्शन कामदेवाचीच हीही कथा आहे. पण हा केवळ कथाग्रंथ राहिला नाही. मराठी भाषेत श्रावकांना स्वाध्यायासाठी सर्वांगपरिपूर्ण ग्रंथ तयार करावा या भावनेने श्रावकाचारात मोडणाऱ्या सर्व विषयांचे सांगोपांग वर्णन यात केले आहे. सुदर्शनाने अनेक स्त्रियांचा उपसर्ग सहन करून अखेरपर्यंत ब्रह्मचर्य दृढ ठेविले हा कथेचा मुख्य गाभा आहे. आख्यान-काव्य म्हणूनच नव्हे तर जैन धर्माच्या पारंपरिक व तत्कालीन आचारधर्माच्या अभ्यासाच्या दृष्टीने हा ग्रंथ मराठीत तरी अत्यंत महत्त्वाचा मानावा लागेल. धर्मकथा या नावाने तो ग्रंथाचा उल्लेख करतो. ( २५.३५ )

ग्रंथाच्या शेवटी व्यवस्थितपणे प्रशस्ति देऊन ग्रंथकर्त्याने स्वतःची माहिती व ग्रंथलेखनाचा काल दिलेला आहे.

श्री मूलसंघ बालात्कर गण । सरस्वति गच्छ प्रमान ।
विख्यात वंशकुल मंडन । वृषभ चिन्ह गोत्रासी ॥ २५.५३ ॥
लोहितवाल प्रथम ज्ञाति । तद्वंसि जया जन्मस्थिति ।
धर्मचंद्र गुरु दिक्षापति । नामस्थिति विरदास ॥
पुढती दीक्षा महाव्रत । गुरुधर्मचंद्र समर्थ ।
मस्तकि ठेउनि स्वहस्त । पासकीर्ति नामना ॥ ५५ ॥
सके ग्रंथासे येकुनवत्तास । प्रभव सवत्सर नामवंश ।
फाल्गुन वद्य दशमी दिवस । गुरुवासर तद्दिने ॥ ५६ ॥
श्रवण नक्षत्र ते प्रमान । सिद्धयोग तो शुद्धज्ञान ।
म्द्रासतमो नामकर्नें । ग्रंथ बानावा समाप्त ॥ ५७ ॥

यावरून वीरदासासंबंधी काही माहिती मिळू शकते. या ग्रंथावरून संस्कृताच्या तोडीची रचना मराठीतही जैन कवी करू लागले होते याची खात्री पटते.

**बहुतरी —**

७२ ओव्यांची ही छोटीशी रचना आहे.

" नमिला म्या गुरु । सत्यधर्मचंद्रु ।
त्रीसुद्धी हा वरु । मज त्याचा ॥ ४० ॥
येने पंथे पासकीर्ति म्हणे जना ।
सिद्धं सोहं गुना । सुभ्रष्ट भावे ॥ ४५ ॥ "

विषय अभंगाप्रमाणे अलग अलग आहेत. याची हस्तलिखित प्रत नागपुरात सेनगण-मंदिरात आहे. धर्मविषयक स्फुट विचारांचा संग्रह अकारादि क्रमाने यात केला आहे.

**नवकारमंत्र–प्रकृती —**

२२ ओव्यांची ही रचना आहे. णमोकार मंत्राचे माहात्म्य यात वर्णिले आहे.

" हे उंकार प्रकृति । म्हणे पासकीर्ति ।
पुढील पद्धति । सांगू आता ॥ २२ ॥ " असा शेवट आहे.

**नेमिनाथ वऱ्हाड :—**

४० कडव्यांचे हे गीत आहे. नेमिनाथांच्या विवाहाची तयारी व त्यांनी विवाहाचा केलेला त्याग याचे वर्णन या गीतात केले आहे. गीताचे शेवटचे कडवे पुढीलप्रमाणे आहे.

" वीरदास म्हने चरणसेवा । प्रसन्न नेमिजिनु ।
जय जय करीत असें सुरवर । पुष्पवरिखावो करिती ॥ ४० ॥ "

**वीरदास व्यक्ती व काल —**

वीरदास हा मराठीतील एक चांगला व्युत्पन्न कवी होता. तो केवळ कवी नव्हता तर स्वत: दीक्षित होऊन त्याने धर्मप्रसार केला आहे. सुदर्शन चरित्रावरून त्याचा धर्माभ्यास सहज व्यक्त होतो. त्रिलोकसार, पद्मपुराण यांचाही त्याचा अभ्यास चांगला होता. ( सु. च. वी. ८. ७७. ७८ ). सुदर्शनचरित्रावरून त्याच्या पूर्वस्थितीची बरीच माहिती मिळते. हा ग्रंथ त्याने महाव्रते घेण्यापूर्वीच लिहिला असावा. कारण प्रत्येक अध्यायात ' वीरदास ' हेच नाव ठेविले आहे. प्रशस्तीत मात्र पासकीर्ति हे नाव नंतर ठेवल्याचे सांगितले आहे. कदाचित् प्रशस्तीचा हा भाग नंतरही लिहिला असेल. तो जैन धर्मातील शेतवाळ ज्ञातीतील होता. गुरूचे नाव धर्मचंद्र होते.

हे धर्मचंद्र कारंजा बलात्कार पीठावर संवत १६८४ ते १७०४ च्या दरम्यान[3] झाले. त्यांनी जयपूर, श्रवणबेळगोळ इ. यात्रा करून अनेक मूर्ती प्रतिष्ठित केल्या होत्या. जरी वीरदासाने धर्मचंद्राचाच उल्लेख केला असला तरी धर्मचंद्राचे गुरु कुमुदचंद्र यांच्याजवळ त्याचा काही काल गेला होता. 'पंचस्तवनाचूरि' ग्रंथाच्या शेवटी "भ. श्री कुमुदचन्द्रैः ब्रह्मश्रीवीरदासाय दत्तमिदं पुस्तकं" असा [4]उल्लेख मिळतो. याच ब्रह्मवीरदासाने गुणकीर्तीकृत 'बारा अनुप्रेक्षा' ग्रंथाची एक प्रती बनविली आहे. ग्रंथाच्या शेवटी ब्रह्मवीरदास म्हणतो—

"मानाख्ये नगरे रम्ये । चंद्रप्रभ चैत्यालये ।
ब्रह्मश्री वीरदासेन । अनुप्रेक्षा लिखितं मया ॥" – (हिंगोली प्रत).

यावरून मान नगरातील चंद्रप्रभ जिनालयात ब्रह्मवीरदासाने अनुप्रेक्षेची प्रतिलिपि केली होती असे दिसते. एवढी गोष्ट निश्चित की पहिल्यापासूनच वाचण्याची, लिहिण्याची त्याला आवड असली पाहिजे.

धर्मचंद्राने त्याला मुनिदीक्षा देऊन त्याचे नाव पासकीर्ती असे ठेविले. तेव्हापासून त्यांचा उल्लेख आचार्य पासकीर्ती असा होऊ लागला. संवत १६८६[5] मध्ये त्याने रामटेक येथे कलिकुंड यंत्राची प्रतिष्ठापना केली आहे. शके १५६९[6] मध्ये त्यांनी बाळापुरला एक मूर्ती स्थापन केली आहे.

यावरून धर्मोपदेशक एक आचार्य म्हणूनही पासकीर्तींची प्रतिष्ठा मोठी असावी. बाळापूरच्या मूर्तिलेखात तर त्यांना 'धर्माचार्य' असे म्हटले आहे.

कवी, आचार्य या दोन पदांव्यतिरिक्त पासकीर्ती हे भट्टारक म्हणूनही उत्तरायुष्यात प्रख्यात झाले आहेत. औरंगाबाद येथे धर्मचंद्राच्या वेळी कारंजा येथील बलात्कार पीठातर्फे भट्टारक पीठ स्थापण्यात आले आणि तेथे पासकीर्ती यांची पहिला भट्टारक म्हणून धर्मचंद्राने नेमणूक केली. या भट्टारक पीठाचा उल्लेख आजवर भट्टारकांचा इतिहास लिहिताना केला गेला नाही. दयाभूषणकृत सम्यक्त्वकौमुदीच्या प्रकटीकरणानंतर पासकीर्ती व औरंगाबाद पीठ यांचा संबंध प्रकाशात आला आहे.

● दामा पंडित — (सन १६९३ च्या अगोदर, सन १६५० नंतर).

यांच्या नावावर 'जंबूस्वामीचरित्र' आणि 'दानशीलतपभावना' असे दोन ग्रंथ आढळतात.

---

३. भ. सं. पृ. ७७.
४. भ. सं. पृ. ५२.
५. भ. सं. पृ. ५३.
६. भ. सं. पृ. ५३.

**जंबूस्वामीचरित्र [७] :—**

जैनांचे चोविसावे तीर्थंकर भगवान महावीर यांच्यानंतर जी आचार्यपरंपरा निर्माण झाली त्यातील जंबूस्वामी हे तिसरे आचार्य इ. स. पूर्व ५ व्या शतकात झाले. त्याचे चरित्र मराठीत दामा पंडिताने लिहिले आहे. या ग्रंथात सोळा अधिकार असून, ओवीसंख्या १९१५ आहे. ग्रंथाच्या पहिल्या चार अधिकारांत जंबूस्वामीच्या पूर्वजन्मीचे वर्णन केले असून, नंतर मुख्य कथेला प्रारंभ केला आहे. सुधर्माचार्यांचा उपदेश ऐकून जंबूस्वामींना तरुण वयातच वैराग्य उत्पन्न झाले. त्यांनी मुनिदीक्षा घेण्याचा निश्चय केला. त्यांच्या रूपवान व गुणवान अशा आठ राण्या होत्या. त्यांनी युक्तिवाद करून जंबूस्वामींना संसाराचे महत्त्व पटविण्याचा प्रयत्न केला, पण जंबूस्वामींनी त्यांना तितक्याच मार्मिक रीतीने निरुत्तर केले. नंतर त्याच वेळी घरात आलेल्या एका चोरालाही संसाराच्या असारनिःसारतेसंबंधी जंबूस्वामींनी वाद घातला आणि त्यालाही संसाराचे असारत्व पटवून दिले. शेवटी जंबूस्वामी मुनिदीक्षा ग्रहण करतात असा हा कथाभाग आहे. लहान लहान परंतु मार्मिक कथांनी या ग्रंथाचा बराचसा भाग व्यापला आहे. एका [८]संस्कृत ग्रंथाच्या आधारे सदर कथा मराठीत आणल्याचे दामाने सांगितले आहे. प्रत्येक अधिकाराच्या शेवटी दामाने आपल्या नावाचा उल्लेख केला आहे दयासागराचाही [९]त्याने शेवटी उल्लेख केला आहे.

**जंबूस्वामी चरित्र** — ( रत्नसाकृत शिंदुर हस्तलिखित क्रमांक १ प्रमाणे ).

हेही जंबूस्वामीचेच चरित्र असून त्यात रत्नसाने फार मोठा फेरफार करून त्याचा दुसराच एक ग्रंथ बनविला आहे. शके १६१५ मध्ये रत्नसाने ही जंबूस्वामी चरित्राची सुधारून वाढविलेली आवृत्ती तयार केली. रत्नसाच्याच हातची प्रत आज उपलब्ध आहे. यांत २४ अधिकार असून ओवीसंख्या २६२१ इतकी आहे. गुजराथी रासभाषेतील छंदाचा उपयोग केल्यामुळे निराळ्याच पद्धतीची मराठी काही ठिकाणी दिसून येते. याही आवृत्तीत कथा तीच आहे पण विस्तार वाढला आहे. तेराव्या अधिकारापर्यंत " दामा पंडित नमन करी " असा शेवटी उल्लेख येतो. पण नंतर मात्र पूर्वीच्या ग्रंथात थोड्या अधिक ओव्या मिळवून सांगितल्याचे दृष्टोत्पत्तीस येऊ लागते. तसा उल्लेखही रत्नसाने केला आहे. अधिकार २२ व २३ नंतर तर स्पष्टपणे " साह रत्नेन वर्णितं " असे त्यांनी लिहिले आहे. प्रशस्तीत मात्र

---

७. प्रतिष्ठान, मे १९६०

८. ग्रंथ प्रथम संस्कृत होता । मऱ्हाटी केली समर्था ।
शोधुनि पाहिजे श्रोता । माझिये कवने ॥ १९१२ ॥

९. आता कर जोडुनि विनंती । दयासागर महामती ।
दामा पंडित अल्पमति । ग्रंथस्थिति रचन ॥ १९१५ ॥

" दयाभूषण पंडितपणा । तइं केली कथेची रचना । ते पुरि केली रत्न सुजाणा सुगुने करूनि देखा ॥ २४.१७६ ॥ "

रत्नसाने मूळ ग्रंथात सर्वच ठिकाणी बदल घडविला आहे. भाषा मात्र रत्नसाची चांगली आहे. प्रशस्तीवरून असे दिसते की दयाभूषण याने पंडितपणात हा ग्रंथ रचला होता. परंतु तो अपूर्ण राहिला होता म्हणून ' रत्न ' याने तो पुरा केला. म्हणून अशी शंका येते की दामा पंडित पुढे ' दयाभूषण ' झाला की काय ?

## दानशीलतपभावना :—

हा लहानसा ४६८ ओव्यांचा व ४ अधिकारांचा ग्रंथ आहे. दान, शील, तप व भावना यांनी म. महावीरांच्या समवसरणांत जाऊन आपणात कोण मोठा याबद्दल वाद घातला असून शेवटी भावशुद्धीचा मोठेपणा व्यक्त केला आहे. चौघांचा हा संवाद आहे.

नागपूर हस्त. क्र. ३ वरून असे दिसते की या ग्रंथाच्या २८५ ओव्याच दामा पंडिताने रचिल्या असाव्यात. पुढील भाग मानकीर्ती याने पूर्ण केला. मानकीर्तीचे गुरु धर्मभूषण होते. त्यांचाही उल्लेख मानकीर्तीने ओवी ४०३ मध्ये केला आहे.

## दामा पंडित व्यक्ती – काल :—

नागपूर हस्तलिखित क्र. ३ मध्ये प्रारंभीच चारित्रपूजेनंतर ' अमरसागरे— दामाजी पंडित पठनार्थ ' असे लिहिले आहे. आणि याच अमरसागराने दामाजीच्या जंबूस्वामी चरित्राची प्रत ' सिउर ' येथे बनविली आहे. ( पहा – नागपूर ह. क्र. ३. अभ्यासावी साधने ). म्हणजे त्याच्या हयातीतच कदाचित् अमरसागराने जंबूस्वामी चरित्राची प्रत बनविली असावी. कारण अमरसागर हा त्याचा समकालीन आहे. परंतु प्रतीत अमरसागराने कालाचा उल्लेख केला नाही. शके १६१५ मध्ये रत्नसाने जंबूस्वामी चरित्राची नवीन आवृत्ती बनविली हे वर पाहिले आहे. दानशील तपभावनेचीही प्रत त्यांच्याच हातची शके १६१५ ची आहे. ( जितुर ह. क्र. १ पाहा. ) म्हणजे शके १६१५ नंतर दामापंडिताचा काळ असून शकणार नाही. ज्या मानकीर्तीने दानशीलतपभावना पूर्ण केली त्याचे गुरू 'धर्मभूषण याचे उल्लेख कारंजा भट्टारक पीठ – बलात्कारगणात शके १५७२ ते १५९७ पर्यंत पाहावयास' मिळतात. साधारणपणे शके १५७२ ते शके १६१५ च्या दरम्यान दामा पंडित झाला असावा.

---

१०. म. सं. पृ. ७३.

## ● भानकीर्ती – ( भानुकीर्ती )

हे औरंगाबाद पीठावरील दुसरे भट्टारक होते. कारंजा पीठावरील धर्मचंद्र भट्टारकांनी सुदर्शनचरित्रकर्ते वीरदास यांना दीक्षा देऊन पासकीर्ती बनविले व त्यांची स्थापना औरंगाबादला केली. पासकीर्तीनंतर धर्मभूषण यांनी तेथे भानकीर्ती यांना बसविले असा इतिहास[११] मिळतो. धर्मभूषणावरूनच यांचा काळ ठरविणे आवश्यक ठरते. ज्या धर्मभूषणांचा भानकीर्ती हे गुरु म्हणून उल्लेख करतात ते धर्मभूषण[१२] कारंजा पट्टावर सन १६५०–१६७५ मध्ये होऊन गेले. यावरून भानकीर्तीचाही काळ सन १६७६ पूर्वीचा किंवा समकालीन ठरतो. भानकीर्ती यांनी दामा पंडिताच्या काही अपूर्ण रचना पूर्ण केल्याचा उल्लेख मिळतो. 'दानशीलतपभावना' या दामाच्या ग्रंथात शेवटी भानकीर्तींनी तसा स्वतः उल्लेख[१३] केला आहे व स्वतःचे गुरु धर्मभूषण असल्याचे सांगितले आहे.

भानकीर्तींच्या स्वतःच्या अशा रचना कमीच. काही किरकोळ पदे वगैरे मात्र त्यांची दिसतात. अमरसागर नावाच्या दामाजी पंडिताच्या शिष्याने बनविलेल्या एका हस्तलिखित प्रतीत पुढील रचना भानकीर्तींच्या नावावर आहेत. ( अभ्यासाची साधने पहा. )

१ ) **तनना तनना आनंद माझे मना** –– हे एक पाच कडव्यांचे पद आहे. आरंभ––

तनना तनना आनंद माझे मना ॥
सगुन निर्गुना आनंदलोचेना । उपदेस मनीजना ॥ तनना ॥

अंत्यभाग–**भानकीर्तीस** ज्ञान । गुरु प्रकाश पुना । **धर्मभूषण** चरणीं लीना ॥ ५ ॥

२ ) **जये जया पारीस्वनाथा । तुझीया चरनी माझा माथा**–
हे पद ४ कडव्यांचे आहे.

आरंभ––जये जया पारीस्वनाथा । तुझीया चरनी माझा माथा ।
**धर्मभुखेन गुरु** समरथा । विनवी **भानकीर्ति** यो गीता ॥ १ ॥
अंत्यभाग – योगादि योजीता फीटे बंद सायो जीता । निवारी कर्मवेथा ।
गुरुज्ञानी सायजीता । **भानकीर्ति** योगीता ॥ २ ॥

३ ) **म्हणे भानकीर्ति लाधोंनी लाहे**
हे १४ कडव्यांचे पद्य आहे. त्यात वैराग्यभावनाच जास्तीत जास्त आहे.

---

११. भविष्यदत्तबंधुदत्तपुराण, अध्याय १०, ओव्या ९७–९८.
१२. प्रतिष्ठान, मे १९६०, दामाजी व साबाजी हा लेख पाहा.
१३. दानशील तपभावना रास, हिंगोली प्रत, ओव्या ४०४ व ४१४.

आरंभ--जयाची गुरु गमी सोहे। तोचि प्रेम भावें पाहें ॥
नमनीं प्रकास राहे। म्हणे मानकीर्ति लाधोनी लाहे ॥ १ ॥
चीतिं चैतन्य राहे। गुरुमूर्ति ज्ञानाची सोहे।
पंच समेती प्रेम सोहे। म्हने मानकीर्ति लाधोनी लाहे ॥ २ ॥

अंत्यभाग – धर्ममुसेन श्रीगुरु। वंदिला जैसा नवकारु।
तेने उतरे पैल पारू। म्हने मानकीर्ति लाधोनी लाहे ॥ १४ ॥

**४) मानकीर्ति मुनि। पूजीती भव्यप्रानी –**

हे ७ कडव्यांचे गीत आहे. विषय वैराग्यपरच आहे.

आरंभ--मानकीर्ति मुनि। पूजिती भव्यप्रानी।
आनंत नाम नीजमनीं। म्हणे मानकीर्ति मुनि पूजिती भव्यप्रानी ॥ १ ॥

अंत्यभाग – सतनाव साचार। तेने उतरे पैलपार।
सत गुरु सेवा केल्या होये ज्ञानधार। मानकीर्ति मुनि पूजीती भव्यप्रानी ॥ ७ ॥

अर्थात् वरील रचना किरकोळ व स्फुट स्वरूपाच्या आहेत. मानकीर्ती यांनी ग्रंथरचना स्वतंत्र अशी केलेली पाहण्यात आली नाही. पण इतके खरे की, त्यांना मराठी साहित्यासंबंधी विशेष प्रेम वाटत असले पाहिजे. दामा पंडिताच्या अपूर्ण कृतीला पूर्णत्व त्याच वृत्तीतून त्यांनी आणले आहे.

● **दयासागर :--**

सम्यक्त्वकौमुदी, भविष्यदत्तबंधुदत्तपुराण व धर्मामृतपुराण असे तीन ग्रंथ दयासागराच्या नावावर आढळतात.

**सम्यक्त्वकौमुदी :--**

हिंगोलीच्या ह. प्रतीत या ग्रंथाचे अकरा अधिकार आहेत. ओवीसंख्या २३८० इतकी भरते. जैन तत्त्वावर दृढ असा विश्वास असणे म्हणजे सम्यक्त्व होय. असा विश्वास दृढ होण्यासाठी या ग्रंथात कथा सागण्यात आल्या आहेत. कथा काहीशा अद्‌भुत आहेत. एकदा रात्री राजाच्या राणीसह नगरातील सर्व स्त्रिया वनविहारासाठी गेल्या. राजाचे मन राणीच्या विरहाने संतप्त झाले. त्याचे मन शांत करण्यासाठी प्रधानाने राजाला काही कथा सांगितल्या. त्या कथेतील यमदंड कोतवालाच्या कथेत पुन: काही कथा उद्‌भवल्या. वृषभदास शेटजीच्या आठ बायकांनी सांगितलेल्या आठ कथा व वृषभदासानी स्वत:च्या बायकांना सांगितलेली कथा यांनी हा ग्रंथ सजला आहे. अनेक लोककथा, चातुर्यकथा, उपदेशकथा यात एकत्रित करण्यात आल्या आहेत. या ग्रंथाची प्रशस्ती पुढीलप्रमाणे आहे :

"कुमुदचंद्र पट्टे धर्मचंद्र महागुणी । शास्त्रार्थी करुनी धर्मवखाणी ।
त्याने पट देउनी स्थापिला पाशकीर्ति मुनि । नगर अवरंगाबादी ॥ ११.१६६॥
त्याचे पट्टि धर्मभूशेण थापिले माणकीर्ति । माणकीर्ति पट्टे बैसविलं दयाभूषणमूर्ति
ज्याची कवितकळा करुन अथाप कीर्ति । या मंडळीं पै ॥ ११.१६७ ॥
कथा केली कहेळि मंगरस[१४] नगरी । ते नगर आहे करनाटकामीतरी ।
कथा होती संस्कृत करुण कवित मारी । ते म्या मऱ्हाट्ट केली ॥ ११.१६९ ॥
हे कथा केली ब्रह्मपर्णी दयासागरीं । मग नांव ठेविल दयाभूषण सुररीं ।
हे कथा आइकावी वाचावी ल्याहावी मनोहरी । सुखुप्रकारीं शरीरीं पै
॥ ११.१७२ ॥"

## भविष्यदत्त बंधुदत्त पुराण :—

हा दयासागराचा दुसरा ग्रंथ. पण या ग्रंथांत दयासागराचे नंतरचे नाव 'दयाभूषण' याचाच उल्लेख केला आहे. ग्रंथाचे अधिकार दहा आहेत. ओवी-संख्या १३८९ आहे. रत्नद्वीपाला जाऊन रत्नाचा व्यापार करावा म्हणून भविष्यदत्त बंधुदत्त जातात. मध्यंतरी बंधुदत्ताच्या मनांत स्वार्थाचा संचार होतो आणि तो भविष्यदत्ताचे धन घेऊन पळून जातो. भविष्यदत्तावर त्याच्याकडून अशीच अनेक संकटे येतात. पण भविष्यदत्त जैनधर्माप्रमाणे चालणारा असल्याने शेवटी त्याचे कल्याणच होते अशी ही कथा आहे. कथेत वैश्यवर्गाचे कुळाचार बरेच आले आहेत. देवादिकांचा संबंध नसलेली एक सामाजिक कथा असे याचे स्वरूप आहे. श्रुतपंचमी-व्रतकथा याच पुराणात येते. हे पुराण "रासभाषेतील ग्रंथाच्या आधारे केल्याचे कवीने सांगितले आहे.

कवी दयाभूषण याने बहुतेक अधिकाराच्या शेवटी आपला गुरु मानकीर्ती यांचा उल्लेख केला आहे. कवीच्या चरित्राच्या अपेक्षेने पुढील ओवी अत्यंत महत्त्वाची आहे :

"इक्ष्वाकुवंसे वैश्यकुळभूषण । नदि गोत्र सोहेरवाल जाति प्रविण ।
मग दयाभूषण कर जोडून । कथा मांडिली ॥ ५.१५६ ।"

कवी हा इक्ष्वाकुवंशातील, वैश्यकुलोत्पन्न, नंदिगोत्रस्थ सोहेरवाल (सैतवाळ ?) ज्ञातीतील होता असे यावरून स्पष्ट आहे.

---

१४. कल्हल्ली मंगरस याने संस्कृतमध्ये सम्यक्त्वकौमुदी लिहिली आहे
– जिनरत्नकोश, पृ. ४२४

१५. भविष्यदत्तबंधुदत्तपुराण, १०. ९५.

## धर्मामृतपुराण :—

दयासागराचा हा तिसरा ग्रंथ असून बहुधा हा ग्रंथ सर्वांत आधी रचला असावा. यातही दयासागराने आपले गुरू मानकीर्ती यांचा उल्लेख केला आहे. जिनदास नारायण चवडे यांनी हा ग्रंथ प्रसिद्ध केला होता. (वीरसंवत २४३४). प्रस्तावनेत त्यांनी म्हटले आहे : "हा ग्रंथ छापण्याकरिता म्हणून दोन प्रती मिळविल्या. त्या दोन्ही प्रती दोन प्रकारच्या आढळल्या. मात्र भावार्थ दोहोंचाही एकच दिसला. त्यावरून त्यांत योग्य जी प्रत वाटली त्यावरून व त्यास दुसरी साह्यभूत ठेवून त्याचे अनुरोधाने माझे अल्पमतीस जे कमीजास्त आढळले ते काही अंशी माझे मते ओव्या दुरुस्त करून छापला आहे." परंतु या मुद्रित ग्रंथाशिवाय आज आपणास दुसरा ग्रंथ उपलब्ध नाही. प्रयत्न करूनही याची हस्तलिखित प्रत मिळू शकली नाही. या ग्रंथाचे अध्याय १० आहेत. संस्कृत[१६] ग्रंथावरून मराठीत हा ग्रंथ आणल्याचे कवीने सांगितले आहे. सम्यक्त्वाच्या निःशंकितादि आठ अंगांत प्रसिद्ध असलेल्या अंजनचोर, अनंतमती, उद्दायन राजा, रेवती राणी, जिनेंद्रभक्त श्रेष्ठी, वारिषेण, नीलीकुमारी, जयकुमार यांच्या कथा अत्यंत रोचक पद्धतीने या ग्रंथात वर्णिल्या आहेत. कथा ग्रंथात या ग्रंथाचे स्थान भाषा व वर्णनशैलीच्या दृष्टीने बरेच श्रेष्ठ समजावे लागेल. कवीने शेवटी आपला व गुरूचा उल्लेख केला आहे.[१७]

## दामा पंडित, ब्रह्मदयासागर व दयाभूषण यासंबंधी काही निष्कर्ष.

आतापर्यंत दाम पंडित, ब्रह्मदयासागर व दयाभूषण यांच्या ग्रंथासंबंधी व त्या व्यक्तींसंबंधी जे विवेचन केले आहे त्यावरून जे निष्कर्ष निघतात ते येथे एकत्रितपणे देत आहे.

१) दामापंडिताच्या जंबूस्वामीचरित्राच्या नागपूर प्रतीत दयासागराचा उल्लेख येतो. दयासागराना ज्या अर्थी दामा पंडित 'महामती' म्हणून उल्लेखितो त्या अर्थी ते त्याचे गुरू असावेत असे वाटते.

२) दामापंडिताचा दानशीलतपभावना हा ग्रंथ अपूर्ण होता तो मानकीर्ती (भानुकीर्ती) याने पूर्ण केला. मानकीर्तीचे गुरु कारंजापीठावरील धर्मभूषण होते.

३) दामापंडिताच्या जंबूस्वामीचरित्राच्या रत्नाकृत प्रतीत दयाभूषण याने

---

१६. मूळ ग्रंथ संस्कृत होता। त्याचा करोनिया उलथा।
असे सज्जन समर्थ श्रोता। ग्रंथ शोधोनि पाहावा ॥१०'५८—धर्मामृतपुराण.

१७. भानूकीर्ति भट्टारक महान। त्याचा शिष्य दयासागर जाण।
त्याने महाराष्ट्र केली अजान। धर्मामृत कथा ही ॥ १०'६२
—धर्मामृतपुराण.

पंडितावस्थेत त्या ग्रंथाची रचना केली असे म्हटले[१८] आहे. म्हणून दामा पंडित व दयाभूषण एक असावेत असाही एक तर्क वाहतो.

४ ) दयासागराने सम्यक्त्वकौमुदीत व भविष्यदत्तबंधुदत्तपुराणात दयासागराचेच नाव नंतर दयाभूषण असे ठेवण्यात आले असे स्पष्टपणे म्हटले[१९] आहे.

५ ) दयासागराचे गुरु मानकीर्ती–मानुकीर्ती होते हे त्याच्या धर्मामृतपुराणावरून दिसून येते.

६ ) दामापंडित व दयाभूषण हे एकच आणि दयासागर व दयाभूषण हे एकच म्हणजे दामापंडित, दयासागर व दयाभूषण ही तीनही नावे एकाच व्यक्तीची असावीत असे वाटू लागते. पण या निष्कर्षात एक मोठी अडचण उभी राहते ती ही की, दामाने दयासागराला जंबूस्वामीचरित्राच्या नागपूर प्रतीत वेगळा मानले आहे. म्हणजे दामा व दयासागर एक होऊ शकत नाहीत. पण दयासागर व दयाभूषण ही मात्र एकच व्यक्ती असावी.

## ● चिमना ( पंडित ) ( सन १६५१ नंतर ) —

सतराव्या शतकात झालेल्या या पंडिताच्या बऱ्याचशा रचना किरकोळ असल्या तरी त्यांची संख्या बरीच मोठी आहे. एकनाथाच्या पैठणलाच त्याचे वास्तव्य असल्यामुळे एकनाथांनी मराठीत भर टाकलेल्या बहुविध गीत प्रकारांचा परिचय त्याला झालेला होता. त्याचा परिणाम त्याच्या साहित्यावर झाल्याशिवाय राहू शकला नाही. लहानमोठ्या स्वरूपाच्या पुढील रचना आज चिमना पंडिताच्या नावावर उपलब्ध आहेत.

अनंतव्रतकथा, तीर्थवंदना, त्रिकाळ तीर्थंकरपूजा, गोमटस्वामी स्तोत्र, नेमीश्वर पाळणा, मातेची सोळा स्वप्ने, गुरुगीत, भूपाळी, नेमिनाथभवांतरपद, फुगडी, हंसा, गिंगा, लाखोटा, चेंडुफळी, ठिपरी २, बालक छाटीपद, आदिनाथ आरती, चंद्रनाथ आरती, चिंतामणि पार्श्वनाथ आरती याप्रमाणे जवळ जवळ वीस रचना उपलब्ध होऊ शकल्या. अद्यापि अनुपलब्ध काही असू शकतील. काही हिंदी भाषेतील पदे त्याच्या नावावर आढळतात. उपर्युक्त रचनांपैकी अनंतव्रतकथा व तीर्थवंदना ह्याच काय त्या मोठ्या आहेत. बाकी लहान आहेत.

---

१८. दयाभूषण पंडितपणा । दई केली कथेची रचना ।
ते पुरी केली रत्न भुजाणा । सुगुणेकरूनि देखा ॥ २४·१७६

—जंबूस्वामीचरित्र.

१९. हे कथा केली ब्रह्मचर्णी दयासागरीं ।
मग नाव ठेविले दयाभूषण मुनीरें ॥ ८.१७२.—सम्यक्त्वकौमुदी.

**अनंतव्रतकथा :—**

अभयकीर्तिकृत अनंतव्रतकथेची माहिती देताना या व्रतासंबंधी माहिती दिलीच आहे. त्याच व्रताच्या कथेवर आधारित अशी ही मराठीतील दुसरी रचना आहे. ८ चरणांचे एक कडवे तयार करून ५८ कडव्यांत ही कथा लिहिण्यात आली आहे. प्रस्तुत कथेत शेवटी प्रतिष्ठान नगरीचा व आपल्या गुरुंचा चिमना पंडिताने उल्लेख केला आहे. मराठी भाषेबद्दलचा त्याचा खास अभिमानही या रचनेत दिसून येतो.

या कथेचा आरंभीचा भाग व शेवटचा भाग नमुन्यासाठी देत आहे.

प्रारंभ—प्रणाम करुं परमेश्वरा । मुगतिवरा तीर्थंकरा श्री अनंता ।
हृदयकमलि भाव धरुनि । अनंत करूनि । स्मरें सरस्वति माता ।
गणधर चौदासे बावन । त्यासि सरन । नमियलें साधुसंता ।
कथा सांगेन अति गोमटी । भाषा मराठी । तुम्ही परिसावी आतां ॥ १ ॥

अंत्यभाग—श्री मूलसंघ सरस्वती । गच्छधिपति । बाळात्कार विज्ञानी ।
अजितकीर्ति भट्टारक । यतिनायक । मन भेटले प्रमानि ।
प्रतिष्ठान महानगरीं । जिनमंदिरीं । चंद्रप्रभ सुमस्थानीं ।
कथा करि चिमना पंडित । भावसहित । महाष्ट्र नागर वानि ॥ ५८ ॥

प्रतिष्ठान नगरात चंद्रप्रभ जिनमंदिरात महाराष्ट्र नागर – वाणीत ही अनंतव्रतकथा भावभक्तिपूर्वक रचिली आहे. त्याचे गुरु मूलसंघ – सरस्वतीगच्छापैकी बलात्कार गणातील श्री अजितकीर्ति भट्टारक होते. इतक्या गोष्टी या अंत्यभागातून स्पष्ट होतात.

**तीर्थवंदना :—**

प्रभातकाली अथवा पूजेनंतर जैन सिद्धक्षेत्रे, अतिशयक्षेत्रे यांना वंदना करावयाची असते. संस्कृतात ‘ तीर्थभक्ति ’ दशभक्तींत प्राचीन काळापासून आहे. चिमना पंडिताने मराठींत तीर्थवंदना तयार करून स्वकालीन कित्येक महत्त्वाच्या तीर्थस्थानांचाही तीत समावेश केला आहे. ३६ श्लोकवजा कडवी या रचनेत आहेत. चिमना पंडिताने शेवटी आपला उल्लेख केला आहे. तो असा आहे. “ जिन चैत्या चैत्यालि आहे त्रिलोकी । सिद्धान्तागम भेद जाने विवेकी ।....सुरगुरु शिनले गीर्वान वाचा । म्हणे चिमना दास जिनेश्वराचा ॥ ३६ ॥ ”

**त्रिकाळ तीर्थंकर पूजा :—**

वर्तमानकाळातील २४, भूतकाळातील २४ व भविष्यकाळातील २४ असे ७२ तीर्थंकर होतात. ते त्रिकाळ तीर्थंकर होत. त्यांची एक पूजा चिमना पंडिताने रचली आहे. अर्घ्यप्रदानाच्या श्लोकात चिमनाने स्वतःचा उल्लेख केला आहे.

“ अष्टद्रव्य प्रकारीं । अर्घ्य अर्धू बहुतारीं । चिमना म्हणे मज उद्धारीं ।
जिनदेव ।...तीन चोविसी निर्धार पूजा करूं ॥ अर्घ्यं ॥ ”

**गोमटस्वामी स्तोत्र** :– गोमटेश्वरासंबंधी ६ ओव्यांचे हे स्तोत्र आहे.

" जलगंध करि अक्षत पुष्प आहे ।
चरू दीपधूप फल आर्घ पाहे ।
जा (?) तोरणे मंगलाचि शोभा ।
चिमना पूजे गोमट स्वामी उभा ॥ ६ ॥ "

असा त्याचा शेवट आहे.

**नेमीश्वर पाळणा** :–१८ गीतांचा हा पाळणा आहे.

प्रारंभ—परथम द्वारका नगरी । समुदर-विजयोपरी नेमीस्वर स्वामी अवतरले । सीवा देवी उदरे । जो जो जो रे बीहलाला । नेमिनाथु घ्याला । नीदरा लागु न दा धानाची । सवरूप लागे डोला । जो जो जो रे ॥ १ ॥

शेवट—ऐसा नेमिजिन पाल्खु । गार्ता तीन्हु लोकु ।
तयापरी होति मंगालिकु । म्हणे चीमना पंडीतु ॥ १८ ॥

**मातेची सोळा स्वप्ने** :–तीर्थंकराच्या मातेला तीर्थंकर गर्भात येताच १६ स्वप्ने पडतात. ती फार शुभ असतात. त्यांचे वर्णन या गीतात केले आहे. ६ कडव्यांचे हे गीत आहे.

" ऐसि हे सोळा स्वपन स्थिति गहन । आगमवाणी परमपदसाधन ।
राजिप्रति रायं केलं निरोपन । चिमना म्हनत आनंदले मन ॥ ६ ॥ "

याप्रमाणे गीताचा शेवट आहे.

**गुरुगीत** :–कारंजा येथील बलात्कारगण भट्टारक पीठावरील धर्मभूषण व धर्मचंद्र यांची ही स्तुती आहे.

" पंचेंद्रि मद मर्दुनी । स्वधर्म-शुक्लध्यानीं ।
तो म्या देखिला नयनीं । चिमना कर जोडुनि ॥ "

असे चिमना गुरूस म्हणतो.

**भूपाळी** :–७ ओव्यांची ही भूपाळी आहे. जिनेंद्रनाम महिमा त्यात गाइला

**फुगडी** :–यात ३ कडवी आहेत. तिसरे कडवे असे आहे :

" आगम वचन फुगडी घालिता वो फुगे । क्रोधमान माया लोभ सांडुनि
देइ मागे । साराशार निवाड करि अनुभव वेगे । चिमना म्हणे
परमात्म स्मरुनि तुं जागे ।। फुगडी फुगे । घाली बाई तुगे ।। ३ ।। "

**झंपा** :–यात ५ कडवी आहेत. याचा अखेरचा भाग—

" संशार सार्थक हेचि । करा दयादान । चिमना म्हणे मज यक आगम प्रमान ।।
झेपा घाली झेपा ।। ५ ।। "—असा आहे.

**पिंगा** :–यात ४ कडवी आहेत.पिंगा खेळावरचे हे आध्यात्मिक रूपक आहे. शेवटचे कडवे असे आहे :

" रत्नत्रय गुणाचा । हा पिंगा मुक्ति साचा । आगम सिद्धांताचा ।
चिमना म्हणे अनुभव त्याचा ।। ४ ।। "

**लयलाखोटा** :–यात ५ कडवी आहेत :

" श्री गुरुकृपा होईल । तरिच कळो येइल । निवांत होउन राहिल ।
चिमना म्हणे हे जाइल । लय लावि लाखोटा । अरे मना मोकाटा ।
न धरी भाव धाकुटा । साधन साधि मुमटा ।। ५ ।। "

**चेंडुफळी** :–ज्ञानाचा चेंडू व शुभ आचाराची फळी यांचा हा खेळ आहे :

" ऐसि हे अनुपम्य चेंडुफळी । खेळता मागेपुढे सांभाळी ।
जेणे पावीजे मुक्तिसुख नव्हाळी । चिमना म्हणे ।। ११ ।। "

**टिपरी** :–दोन टिपरी गीते आहेत. पहिले गीत ४ कडव्यांचे आहे.

" जो खेल खेलले जिनवर गणधर । जाले मुगति निवासि रे ।
चिमना म्हणे बा तोचि खेल खेले । जाणे येणे नाही जन्मासि रे ।।४।। "

दुसरे टिपरी गीत ६ कडव्याचे आहे.

" ऐसि हे कडविकडी । अनुभवी जाणे गोडी ।
चिमना म्हणे मज बुधि थोडी । सिद्धस्वरूप परवडी ।। ६ ।। "

**बालकछाटी पद** :–– या पदात ११ कडवी आहेत. मुलाच्या जन्मप्रसंगी त्याच्या रक्षणासाठी हे गीत गावयाचे आहे.

" ऐसं हे मुकृतफल । गोत्र उधरी सकल ।
चिमना म्हणे पूर्वार्चित । पुत्र पाविजे निर्मल ।। ११ ।। "

**आदिनाथ आरती** :–– ६ कडव्यांची ही आरती आहे – शेवटी उल्लेख पुढीलप्रमाणे आहे :

" उजळुनि ज्ञानदीपक । चिन्मयरूप । अनुभवी निजस्वरूप । भावभगति शुभ
मंगल आरती । चिमना म्हणे मुगति पद पावती ।। ६ ।। "

**चंद्रनाथ आरती** :––कारंजा येथील मूळ नायकाची ही आरती आहे. ५ कडवी असून आरतीचा अंत्यभाग पुढीलप्रमाणे आहे :

" कारंजा महानगरि मूळ नायक । चंद्रनाथ स्वामी सौख्यदायक । करी नित्य पूजा महा अभिषेक । चिमना म्हणे धन्य वंदी त्रिदोक ॥ ५ ॥ "

**चिंतामणि पार्श्वनाथ आरती** :— कचनेरच्या चिंतामणि पार्श्वनाथांची ही आरती ५ कडव्यांची आहे. आरतीत कार्तिक शुद्ध पौर्णिमेला तेथे महाभिषेक होऊन यात्रा भरत असल्याचा उल्लेख आहे. शेवटचे कडवे असे आहे

" निजरूप तुझे देखोनि नयनीं ।
निवालं मन माझे स्वामी पाहुनि ।
निजपदीं राखे देइ मुगति रमणी ।
नित्य आरती चिमना करि कर जोडुनि ॥ ५ ॥ "

चिमना पंडिताच्या प्रत्येक रचनेचा काही भाग येथे मुद्दाम दिला आहे. कारण त्याची कोणतीच रचना अद्यापि पूर्ण प्रकाशित झालेली नाही. प्रत्येक रचनेत तो आपला उल्लेख करीत असल्याने त्याची रचना ओळखण्यास त्रास पडत नाही.

## चिमनापंडित — व्यक्ती, गुरु, स्थल व काल

चिमना पंडिताच्या एकंदर साहित्याचा विचार करता तो त्या काळचा एक समाजप्रिय साहित्यिक असावा असे दिसते. तो जाई त्या ठिकाणी एखादे पद, आरती अथवा स्तुती अशी काही रचना करून सामुदायिक उत्सवात भाग घेत असावा. चिंतामणी पार्श्वनाथ आरतीत कचनेर क्षेत्राचा व तेथील कार्तिक पौर्णिमेच्या उत्सवाचा, तीर्थवंदनेत चाउंडरायाने मूर्ती घडविल्याचा व पोदनपुरच्या मूळमूर्तीचा, चंद्रनाथ आरतीत कारंजा महानगरांतील मूलनायक चंद्रनाथ स्वामीचा, मुनिसुव्रत विनतींतील ( हिंदी रचना ) पैठणच्या माळावीर्थाच्या निर्मितीचा इतिहास, तीर्थवंदनेतील श्रीपूर पार्श्वनाथाच्या प्रतिमेचा इतिहास इत्यादि गोष्टी पाहता, तत्कालीन समाजात वावरलेला, अनेक ठिकाणी यात्रा करून आलेला व अत्यंत बहुश्रुत असा एक पंडित आपल्या नजरेसमोर येतो. त्याच्या पदांची रचना आणि गेयता पाहून तो एक संगीतप्रिय व तज्ञ कवी होता, हेही लक्षात येते. झंपा, पुगडी, टिपरी, काळाछाटी, चेंडुफळी, लास्रोटा इत्यादी गीतांवरून त्याचे लोक—विज्ञान सहज दिसते.

चिमना पंडित पैठणचा होता. हे अनेक पुराव्यावरून सिद्ध होते. त्यानेही तसा उल्लेख केला आहे. हिंगोली येथील न. ६४५ च्या पोथीत अभंग देताना खालील महत्त्वाचा उल्लेख मिळाला. ( पान १५० ) " चिमना पंडित वस्ती ग्रामे पैठनात गंगातीर यानिल उनावळीचे अभंग आहेत २६४. " असे म्हणून पुढे " ते पूर्णता करण " असे म्हटले आहे. याचा अर्थ इतकाच असावा की चिमनापंडिताचे २६४ अपूर्ण अभंग पूर्ण करण्यात आले. या पोथीतील अभंग कवींद्र सेवकाचे आहेत. कदाचित् त्यानेच चिमनापंडिताचे अभंग पूर्ण केले असतील. हे पोथीलेखन शके १७३१ चे आहे. पण ते २६४ अभंग मात्र उपलब्ध झाले नाहीत

मुनिसुव्रत-विनतीत पैठणच्या माळातीर्थाचा इतिहास त्याने खालीलप्रमाणे दिला आहे. चांगदत्त साहूच्या स्वप्नात रावणकालीन (खरदूषण) प्रतिमा आली. त्याने माळा चढविली. म्हणून माळातीर्थ पृथ्वीवर विख्यात झाले.

तीर्थवंदनेत– " प्रतिष्ठान ग्राम महातिर्थ त्यासि
बारा दारवंटे गंगातट ज्यासि ।
मुनिसुव्रत स्वामी निवास जेथ ।
आदिश्वर चंद्रप्रभ वंदि तेथ ॥ ३० ॥

याप्रमाणे पैठणचे वर्णन त्याने केले आहे.

अनंतव्रतकथेच्या प्रशस्तीतही त्याने काही गोष्टींचा सविस्तर उल्लेख केला आहे तो असा—

" श्रीमूलसंघ सरस्वति । गच्छाधिपति ! बलात्कार विख्यानी ।
अजितकीर्ति भट्टारक । यतिनायक । मज भेटले प्रमानि ।
प्रतिष्ठान महानगरी । जिनमंदिरी । चंद्रप्रभ सुमस्थानी ।
कथा करी चिमना पंडित । भावसहित । मराष्ट्र नागरवानि ॥ ५८ ॥ "

यावरून पैठणला त्याने या कथेची रचना केली हे स्पष्ट आहे. वरील एकंदर अंतर्बाह्य पुराव्याचा विचार करता चिमनापंडित हा पैठणनिवासी [२०] होता यात शंका राहात नाही.

गुरु म्हणून अजितकीर्तीचा उल्लेख त्याने केलेला वर पाहिलेच आहे.'गुरुगीत' यांत – धर्मचंद्र यांच्या स्वर्गवासानंतर धर्मभूषण पटावर बसल्याचे तो सांगतो. इतकेच नव्हे तर धर्मभूषण भट्टारकांना प्रत्यक्ष पाहिल्याचे वर्णितो.

" धर्मभूषणमुनि । पुजिति भव्य प्रानि । महाज्ञाता तत्त्वज्ञानी ।
तपतेजे दीनमनि । तो म्यां देखीला नयनीं ॥ "

धर्मभूषण हे अजितकीर्तीचे गुरु होते. म्हणजे चिमना पंडिताचा काळ हा या दोन्ही भट्टारकांच्या वेळचा आहे. मुनिसुव्रत विनतीत गुरूचा उल्लेख तो अनंतव्रत-कथेतल्याप्रमाणेच करतो.

" श्रीमूलसंघे जान । महियल भान । बलात्कारगण राजतोए ।
सरसति गछेवर । अजितकीरति गुरु । प्रणामि चिमना । विनती करए ॥ "

भट्टारक या नात्याने अजितकीर्ती हेच त्याचे गुरु होते. पण धर्मभूषणाची कारकीर्दही त्याने प्रत्यक्ष पाहिली आहे. अजितकीर्ती यांच्या वेळेपासूनच लातूर येथील भट्टारकांची परंपरा चालू होते. शके १५७३ मध्ये अजितकीर्तीच्या उपदेशाने बाळापुरला

---

२०. कारंजा येथील स्थानिक अनुश्रुतीवरून असे समजते की, चिमना पंडिताने कारंजा येथील चंद्रप्रभ तीर्थंकराची मूर्ती गुरूजवळ मागवून घेऊन पैठणला आणली.

एक मूर्ती स्थापिल्याचा उल्लेख मिळतो. तोच काळ चिमनापंडिताचा घरण्यास हरकत नाही. एकनाथाच्या वेगवेगळ्या गीतांचा अभ्यास पैठणला चिमनापंडिताने केलेला होता हे त्याच्या रचनेकडे पाहिल्यास सहज व्यक्त होते.

● ब्रह्मपुण्यसागर ( सन १६५८ नंतर ):—

प्राचीन मराठी जैन वाङ्मयात पुण्यसागर नावाच्या दोन व्यक्ती झाल्या आहेत. त्यांतील ही पहिली होय. याच्या दोन ग्रंथांपैकी पहिला 'हरिवंश पुराण' हा जिनदासाने अपूर्ण ठेवलेला ग्रंथ त्याने पूर्ण केला तो आणि दुसरी रचना 'रविवारकथा' ही होय.

हरिवंशपुराण :—

१५ व्या शतकाच्या उत्तरार्धात झालेल्या देवगिरीच्या जिनदासाने हा ग्रंथ रचण्यास हाती घेतला होता. पण तो त्याच्या हातून पूर्ण होऊ शकला नाही. या ग्रंथाचे एकंदर अध्याय ६७ आहेत. पैकी ५५ अध्याय जिनदासाच्या हातचे असून ५६ पासून पुढचे ब्रह्मपुण्यसागराच्या हातचे आहेत. ५६ व्या अध्यायाच्या प्रारंभीची ओवीच अशी आहे.

" हा प्रद्युम्नप्रसंग जाला । खंड ग्रंथ परिपूर्ण केला ।
कवि ब्रह्म पुण्यार्थी मला । कथीतसे पै ॥ १ ॥ "

ब्रह्मजिनदासाच्या हरिवंश रासच्या आधारे त्याने हा ग्रंथ पूर्ण केला आहे.

" कथा पूर्वार्ध होती संपूर्ण । खंड होता उत्तरपुराण ।
ते कथीलें रास पाहून । श्री गुरुबुधीं ॥ ६५ वा अध्याय. "

रविवार कथा [२१] :—

रविवार कथेवरील मराठीतील ही पहिली रचना होय. 'आदित्यवारकथा' असेही या कथेचे नाव आहे. आषाढ महिन्यातील शुक्ल पक्षाचा शेवटचा रविवार धरून पुढे नऊ रविवार या व्रतात ९ वर्षे करायचे असे हे व्रत आहे. या व्रताचा विधी यात सांगितला आहे. ३३२ ओव्यांची ही कथा आहे. याच पुण्यसागराने १८० श्लोकांची दुसरी एक लहान रविवारकथा लिहिली आहे की काय समजत नाही. या व्रताचे फळ म्हणून कवीने खालील वर्णन केले आहे :

" हे कथा वर्तती रवीव्रताची । मन वचन काया हो साची ।
भंडार भरती का सुकृताची । कथा श्रवण केल्या ॥ ३२१ ॥

२१. जा. फे. मार्च १९५६ च्या म. सा. पत्रिकेतील लेखात १८० श्लोकांची संख्या प्रा. जोहरापुरकरांनी दिली आहे. ती चुकीची असावी अथवा ती कथाच वेगळी असावी.

कथा पुण्य बहु काहो पावन । परम रविव्रत सुनिधान ।
संसारी तारावया तारु जाण । भवसागरि रे ॥ ३२२ ॥ "

ब्रह्मपुण्यसागर–गुरु आणि काल :—

पुण्यसागर हा लातूर येथील भट्टारक पीठाच्या शिष्यवर्गापैकी आहे. त्याने हरिवंशपुराणाच्या अंती खालीलप्रमाणे गुरुपरंपरा दिली आहे :

" नंदि संघ संघामध्ये सिरोमनीं । कुंदकुंदाचार्य जाला मुनी ।
तयाचा आन्वय गुरुज्ञानी । जाले बहुत ॥ ६७.५५ ॥

गुरु आन्वयें जाले भट्टारक । मुनि देवेंद्रकीर्ति मुरेख ।
त्याचे पटि जाले भट्टारक । कुमुदचंद्र ॥५६॥ "

धर्मचंद्र – धर्मभूषण अशी परंपरा देऊन तो पुढे म्हणतो :

" गुरु जाले धर्मभूषण । तयाचे आन्वय विचक्षण ।
भट्टारक विशालकीर्ति जान । गुरु आमचे ॥ ५८

तयाचे पटि ज्ञानज्योति । भट्टारक श्री अजितकीर्ति ।
माउली आमुची पुण्यमूर्ति । ते व्हावि आम्हा ॥ ५९

तयाचा सीस्य तो ब्रह्मचारि । पुन्यसागर कवित्व करि ।
म्हराष्ट भाषादिका उच्चारि । हरिवंसकथा ॥ ६० ॥ "

पुण्यसागराचे गुरु अजितकीर्ती होते. ते लातूर गादीवरील दुसऱ्या शाखेचे पहिले भट्टारक होते. त्यांच्या काळाचा निश्चित उल्लेख जरी मिळत नसला तरी ते शके १५७६ नंतर झाले ही गोष्ट निश्चित आहे. कारण शके १५७६ हा धर्मभूषणाचा[२२] काळ आहे. शके १६१० मध्ये केलेली पुण्यसागराच्या रविवार कथेची हस्तलिखित प्रत रत्नकाच्या हातची[२३] आहे. पुण्यसागराचा काळ हा साधारणतः शके १५८० नंतर आणि १६१० च्या पूर्वी या दरम्यानचा आहे. पुण्यसागराने रविवार-व्रत कथेतही आपल्या गुरु अजितकीर्ती याचा उल्लेख केला आहे. पुण्यसागराची गुरुवर अगदी निःसीम भक्ती होती.

" श्री मूळसंघ आमणाप्रमाण । सरस्वती गछ बलात्कार जाण ।
अजितकीर्तिनं केलं कथन । पूर्वकथापासुन ॥ ३२९ ॥

२२. भ. सं. पृ. ७३.
२३. हिंगोली ह. प्रत क्रमांक २, ( अभ्यासाची साधने १ पाहा ).

मराठी भाषा कथा हे जाणिजे । मने भावे वचने वखाणिजे ।
पुण्यसागरे केली जिनवचने । बहुसुख हीतकारी ॥ ३३० ॥ "

● विशालकीर्ती :—

विशालकीर्ती नावाचे दोन ग्रंथकार आहेत. पैकी हे अजितकीर्ती यांचे शिष्य होते. त्यांच्यासंबंधी आता विचार करावयाचा आहे. त्यांनी लिहिलेली रुक्मिणीव्रतकथा उपलब्ध झाली आहे. त्याशिवाय त्याचे अन्य कोणतेच ग्रंथ आढळले नाहीत.

. **रुक्मिणीव्रतकथा** :—नेहमीप्रमाणे श्रेणिकाने म. महावीरांस प्रश्न विचारला व त्यांनी उत्तरस्वरूपात ही कथा सांगितली असा प्रारंभ आहे. रुक्मिणीने मागील जन्मात (लक्ष्मीमती असे त्यावेळी तिचे नाव होते.) दिगंबर मुनींची निंदा केली. त्यामुळे तिला पुढे फार दुःख भोगावे लागले. पुढे तिने एक व्रत केले. त्या व्रताचा विधी पुढीलप्रमाणे दिला आहे :

" आइका याचें विधान । भाद्रपद शुक्लपक्ष जान । अष्टमि किजे उपोषण । भावसहित पै ॥ १२४ ॥ गुरुमुखें व्रत उचारिजे । अष्टविध पूजा आणिजें । हवन शांतिक कीजें । शक्तिप्रमाणें ॥ १२५ ॥ प्रहरां प्रहरां किजे पुजा । ऐसे अष्टप्रहर करावे पूजा । आही प्रभाते जालिया वोजा । मग पारणे किजें ॥ १२६ ॥ "

याप्रमाणें विधी करून शेवटी दान ८, ८ वस्तूंचे द्यावे. हे व्रत केल्यामुळे लक्ष्मीमतीचा जीव रुक्मिणी होऊन जन्मला. अशी ही कथा आहे. ओवीसंख्या १५२ आहे.

विशालकीर्ती—गुरु व काल :—

विशालकीर्तिने ग्रंथाच्या शेवटी पुढीलप्रमाणे प्रशस्ती दिली आहे :

" कुंदकुंदाचार्यान्वयुरी । अजितकीर्ति पटधारी ।
ततपटी महासुखकारी । वीसालकीर्ति ॥ १५० ॥
रुक्मिणीव्रतविधान विशालकीर्तिनें केले कथन ।
महाराष्ट्र भाखा करून । निरोपिली ॥ १५१ ॥
अथवा स्त्रीपुरुष । निश्चये व्रत करीति हरुषें ।
ते पावती मोक्षसदा । अन्यथा नाहीं ॥ १५२ ॥ "

अजितकीर्ती हे विशालकीर्तीचे गुरु होते. ते लातूर येथील भट्टारक पीठावर शके १५७३ च्या सुमारास झाले. त्यानंतर प्रस्तुत विशालकीर्ती हे भट्टारक झाले. शके १५९२ मध्ये त्याने एक नंदीश्वर मूर्ती स्थापित केल्याचा उल्लेख[२४] मिळतो.

२४. भ. सं. पृ. ७९.

त्यामुळे या विशालकीर्तींच्या कालासंबंधी फारशी चर्चा करण्याची आवश्यकता नाही.

● **पंत सावाजी** (सन १६६५)—

रुक्मिणीव्रतकथेचे कर्ते विशालकीर्ती यांचे हे शिष्य होते. यांनी सुगंधदशमी व्रतकथा लिहिली आहे.

**सुगंधदशमीव्रतकथा :–**

२६१ ओव्यांची ही कथा आहे. सुगंधदशमी व्रतावर प्राचीन मराठी जैन वाङ्मयात हा पहिला ग्रंथ आहे. ब्रह्मजिनदासाने गुजरातीत या कथेवर रास लिहिला[२५] आहे. त्यावरूनच ही मराठी रचना तयार केल्याचे कवीने प्रारंभी सांगितले आहे. श्रीमंतिनी नावाच्या राणीने दिगंबर मुनीश्वरास कटुकमिश्रित आहार देऊन पाप केले. पापामुळे श्रीमंतिनीस अपार दुःख भोगावे लागले. तिचे शरीर दुर्गंधयुक्त झाले. मरून म्हैस, डुकरी असे जन्म घेऊन ती चांडाळाच्या घरी मुलगी होऊन जन्मली. तिचे शरीर दुर्गंधयुक्तच होते. श्रुतसागर मुनींनी तिला मागील पाप सांगितले. तिने अष्टमूलगुण घेतले. शेवटी तिने सुदर्शनमुनीजवळ सुगंधदशमी व्रत घेतले. त्या व्रताचा विधी:—भाद्रपद शुद्ध दशमीस उपवास करून पूजा वगैरे करावी. शीतलनाथाची प्रतिमा पूजावी. दहा दहा वस्तू दान घ्याव्यात. दहा अष्टके द्यावी. हे व्रत तिने केले. (दहा वर्षे) तिचे शरीर सुगंधयुक्त झाले. तिने स्वर्गप्राप्ती करून घेतली.

**ग्रंथाची प्रशस्ती :–**

"सकळकीर्तींच्या प्रसादे । ब्रह्म जिनदास सांगे आनंदे ।
सुगंधदशमी रासछंदे । रचिलें असें ॥ २५७ ॥
भट्टारक श्री वीशाळकीर्ति गुरु । त्याचा मज थोर आधारु ।
तयाने ठेविला माथा करु । सावाजीचा वै ॥ २५८ ॥
पंत सावाजी ह्याने श्रोतयासी । कथा रचिली मऱ्हाष्टभासी ।
ते म्या नीरोपीली तुह्मासी । गुरुप्रसादें ॥ २५९ ॥
शके पंधरासे सत्यासि । वीश्वावुंस सष्ट रासी ।
श्रावण वद्य आष्टमीसी । दूषण ठेवींजे सर्वथा ॥ २६० ॥"

---

२५. सुगंधदशमी कथा रासभास । ब्रह्म जीनदास केला प्रकाश ।
वीबुध सावाजीन नीरोपी श्रुतयास । माथा मऱ्हाटी ॥ ६ ॥

वरील प्रशस्तीवरून खालील गोष्टी दिसून येतात :

पंत सावाजीने शके १५८७ मध्ये[२६] सुगंधदशमी ग्रंथाची रचना पूर्ण केली. विशाळकीर्ती हे सावाजींचे गुरू होते. हे विशाळकीर्ती लातूर येथील भट्टारक पीठावर होऊन गेले आहेत. त्यांनी 'रुक्मिणीव्रतकथा' लिहिल्याचें व त्यांच्याविषयी इतर माहिती मागे पाहिली आहे. विशाळकीर्ती यांचा शिष्यपरिवार मोठा असावा.

● विशालकीर्ति ( देवेंद्रकीर्तिशिष्य ) सन १६८८ च्या अगोदर —

लातूर पीठावरील अजितकीर्ती यांचे शिष्य विशालकीर्ती यांच्या अगोदर देवेंद्रकीर्ती ( कारंजा ) यांचे शिष्य कोणी विशालकीर्ती नांवाचे झाले आहेत. पण कारंजा भट्टारकांच्या पीठाची मालिका पाहता देवेंद्रकीर्तीनंतर लगेच विशालकीर्ती असे कोठेच दिसत नाही. त्यामुळे हे विशालकीर्ती कोठे भट्टारक होते किंवा नाही असा संशय येतो. त्यांनी लिहिलेले–लिहिलेले म्हणण्यापेक्षा सांगितलेले धर्मपरीक्षा हे एक महत्त्वाचे काव्य उपलब्ध झाले आहे.

**धर्मपरीक्षा** :— शके १६१० मधील याची हस्तलिखित प्रत उपलब्ध आहे. म्हणजे तत्पूर्वी या ग्रंथाची रचना होऊन बरेच दिवस लोटले असतील. मराठीत कालिकापुराणात सिद्धान्तवाणी देवेंद्रकीर्तीरचित एक धर्मपरीक्षा आहे. त्याचा विचार यथाकालक्रमे येईलच. सर्व धर्मांची परीक्षा करून शेवटी जैनधर्म श्रेष्ठ असल्याचे मनोवेग याने आपला मित्र पवनवेग याला पटवून दिले आहे. तत्कालीन लोकाचार व लोककथा याचा ग्रंथात फार उपयोग केला आहे. प्राकृत–संस्कृत-गुजराती भाषेतही याच कथेवर अनेक ग्रंथ आहेत. जिनरत्नकोशात ११ ग्रंथांचा उल्लेख केला आहे. विशालकीर्तीने अत्यंत रोचक पद्धतीने व थोडक्यात ९५८ ओव्यात – ५ अधिकारांत ही कथा वर्णिली आहे. सारांश म्हणून खालील ओवी पाहण्यासारखी आहे.

एकांत मत या बौद्धाचं । विपरित मत ब्राह्मणाचं ।
विनय मिथ्यात तापशाचं । जानिजे सुदेवा ।। ९०९ ।।
संशयमते स्वेतांबर वागिजे । अज्ञान मिथ्यात दुर्धर वागिजे ।
तया मता तुरुकाच म्हणिजे । हे पाचहि मते ।। ९१० ।।

बौद्ध, वैदिक, तापस, श्वेतांबर पंथ आणि तुरुक । ( म्लेंछ ) याचे यामध्ये या ग्रंथांत नाट्यमय पद्धतीने खंडन केले आहे, विशेषतः त्याकाळी मुसलमानांचा जो जाच होत होता त्याचे यथार्थ चित्र लेखकाने थोडक्यात उभे केले आहे.

---

२६. प्रतिष्ठान, मे १९६०, प्रा. जोहरापुरकरांचा लेख. ( पंत सावाजी ).

**विशालकीर्तीचे गुरु :—**

या ग्रंथाच्या प्रारंभी व प्रत्येक अधिकाराच्या अंतीं ज्या ओव्या[1] आहेत त्यांचा नीट विचार करणे आवश्यक आहे.

हा ग्रंथ प्रत्यक्ष विशालकीर्तीने स्वहस्ते लिहिला नाही. त्याने उपदेश केला. किंवा तोंडी काव्यही केले असेल. ज्ञानसागराने ग्रंथाची ठेवणी तयार केली. विशालकीर्तीचे गुरु देवेंद्रकीर्ती होते. त्यांना अनेकदा त्या ओव्यात सुरेंद्रकीर्ती असेही म्हटले आहे. ब्रह्मजिनदासाच्या 'धर्मपरीक्षारासा' चा अभ्यास करुन विशालकीर्तीने

~~~~~~~~

१ मग नमिला परमगुरु । ज्याचे नाम **देवेंद्रकीर्तिस्वरु** ।
त्याने मस्तकि ठेविला करु । भवसागर तरावया ॥ ३ ॥
हा ग्रंथ **रासभासा** अगाध । तयाचा **विशाळकीर्तिस** झाला बोध ।
ज्ञानदृष्टी मऱ्हाष्ट केला निःबध । लोका उपदेशाकारणें ॥३०४ ॥
विशाळकीर्ति मुखिचें कथन । **ज्ञानसागरें** घेतल लेहूण ।
आपणे कथा संपूर्ण । करूं आता ॥ ३०५ ॥
मी त्याचा असे सेवक । त्याच्या शब्दाचें मन्न कवतिक ।
हे कथा मज सागता विवेक । वाटत असे ॥ ३०६ ॥
ऐसाग्रंथ **रासभास** । तयाचा **विशाळकीर्तिस** प्रकाश ।
मऱ्हाष्ट वचने केला उपदेश । तया भव्य लोकासि ॥ ५०३ ॥
श्री देवेंद्रकीर्तिचा उपदेश । झाला **विशाळकीर्ति** जतिस ।
तयाच्या प्रसादें **ज्ञानसागरास** । विश्वास धर्माचा ॥ ५०४ ॥
**सुरेंद्रकीर्ति** गुरु । **विशाळकीर्ति** लाधला थोरु ।
ग्रंथ केलें थोडा प्रचूरु । धर्मपरिक्षाचा ॥ ६५३ ॥
मत खंडिल प्रतेक्ष वादें । गुरु सुरेंद्रकीर्तिचिया स्वादे ।
कवी बोले प्रमोदें । **विशाळकीर्ति** ॥ ७६१ ॥
कथा देखिली **रासभासा** । बोधी केली मऱ्हाष्टदेस ।
**देवेंद्रकीर्तिचा** उपदेस । झाला मज ॥ ७६२ ॥
ब्रह्म **जिनदास** कविश्वर भला । तयानें **धर्मपरिक्षा रास** केला ।
तो म्या सुदृष्टि पाहिला । मग कथा केली ॥ ९५४ ॥
**सुरेंद्रकीर्ति** गुरु दातारु । तयानें मस्तकिं ठेविला करु ।
मज दिधला विद्यामारु । कृपा करूनिया ॥ ९५६ ॥
धर्मात्साधन तत्पर शिवः सुखं पापाधकारं रवी ।
तद्धर्म कुरु सेवनं जिनमतं सागारिणा चिन्वतं ।
वायुवेगविनाशनैक चतुरं । मिथ्यांधकारं त्यज ।
सद्धर्मं जिनमार्गण भज भज । विशाळःकीर्तिवदत ॥ ९५८ ॥
~~~~~~~~

हे मराठी कथन केले आहे. देवेंद्रकीर्ती याने प्रत्यक्ष वाद करून परमतीयांस जिंकल्याचा उल्लेख ओवी ७६१ मध्ये आला आहे. हे देवेंद्रकीर्ती केव्हा झाले याचा नक्की बोध होत नाही. कारंजा पट्टावर शके १६१० पूर्वी देवेंद्रकीर्ती या नावाचे दोन भट्टारक[२७] झाले आहेत. एकाचा काळ संवत १५९९ आहे तर दुसऱ्याचा काळ संवत १६३८–१६४९ आहे. पण या दोघांच्याही नंतर लगेच विशालकीर्ती म्हणून कोणी भट्टारक झाले नाहीत. तूर्त तरी धर्मपरीक्षाकर्ते विशालकीर्ती यांचा काळ शके १५६४ पासून शके १६१० च्या दरम्यान मानणे भाग आहे. शके १६१० च्या अगोदर यांचा काळ मानण्याचे कारण त्यांच्या धर्मपरीक्षेची प्रतच शके १६१० ची उपलब्ध आहे. ( हिंगोली हस्त. क्रमांक २, अभ्यासाची साधने १ पाहा. )

● पद्मकीर्ती ( सन १६७९ ):—

यांची फक्त एक ५ कडव्यांची **पार्श्वनाथआरती** उपलब्ध आहे. तीत पार्श्वनाथांना *'चिंतामणि'* म्हटले आहे. शेवटी— *" चक्रपुर नगर महास्थानक । पारिस्वनाथ स्वामी मूलनाइक । निते पुजादान धर्म करिती श्रावक । पद्मकीर्ति आनंदला हर्षोदक ॥ "*
असे म्हटले आहे. चक्रपुरनगर म्हणजे कोणते नगर हे कळणे कठीण आहे. तेथे पार्श्वनाथ चैत्यालय असल्याचे वर्णन आहे. पद्मकीर्ती या नावाचे भट्टारक लातूर पीठावर संवत[२८] १७३६–४३ च्या दरम्यान होऊन गेले. ते लातूरच्या दुसऱ्या शाखेतील विशालकीर्तींचे शिष्य होते. या पद्मकीर्तीने शके १६०१ मध्ये आणि १६०७ मध्ये काही मूर्ती स्थापित केल्या आहेत.

● राय ( मल्लाजिपुत्र ) ( इ. स. १६८४ ):—

शके १६०६ मध्ये यांनी *'जिनवरविनती'* नावाची १६ कडव्यांची रचना केली आहे. भक्तिपूर्ण असे हे एक स्तोत्र म्हणावयास हरकत नाही. भाषा अत्यंत साधी पण हृदयंगम आहे. त्याचा प्रारंभाचा व शेवटचा भाग पुढीलप्रमाणे आहे.
प्रारंभ—चिदानंद आनंदकारी तुम्हाचा । माहाघोर संकट फेडी दुःखाचा ।
म्हणोनि तुम्हां शरण आलो मी आता । करं विनती तं प्रभु आणि दाता ॥
अंत्यभाग—ऐसा विनवि राय मल्लाजिपुत्र । परब्रह्म आम्हा सुख देई तत्र ।
म्हणे विनति जे नरनारि भावे । मनीं कल्पिता पावती ते स्वभावें ।
नृपे शालिवाहन शके सोळासे सा । विदग्धे आश्विनमासे तिथि या ।
गुरुवार हे निर्मळ्ज्ञानरूपे । रायें पूर्ण केले निःसंदेहरूपें ॥ १६ ॥

---

२७. म. सं. पृ. ७७
२८. म. सं. पृ. ८८

मल्लाजीचा पुत्र राय याने निर्मलगावात शालिवाहन शके १६०६, गुरुवारी शुक्ल-पक्षाच्या षष्ठीस ही रचना केली.

● रत्नसा ( इ. सन १६८८ ) :—

हा ग्रंथलेखक म्हणण्यापेक्षा पोथीलेखक म्हणूनच विशेष प्रसिद्ध असला पाहिजे. पोथीलिखनाचे कार्य त्याने फार सुंदररीतीने बजावले आहे. त्याच्या हातच्या दोन पोथी मला उपलब्ध झाल्या.

**जिंतुर पोथी** :– शके १६१५ मध्ये देऊळगावला लिहिली.

यात १ ) सुगंधदशमी ( पंतशामाजी ) २ ) दानशीलतपभावना ( दामा पंडित )
३ ) श्रेणिकचरित्र ( गुणकीर्ती ) ४ ) जंबूस्वामीचरित्र ( दयाभूषण )

या रचना आहेत. ( जिंतुर, हस्त. क्रमांक १ )

**हिंगोली गुलाबसावजी पोथी**:–शके १६१०मध्ये देऊळगावला लिहिली.

यात १ ) सम्यक्त्वकौमुदी (दयाभूषण) २ ) भविष्यदत्तबंधुदत्तपुराण ( दयाभूषण)
३ ) धर्मपरीक्षा ( विशालकीर्ती ) ४ ) सुदर्शनकथा ( कामराज )
५ ) रविवार कथा ( पुण्यसागर ) ६ ) पार्श्वनाथभवांतर ( मेघराज )
७ ) द्वादश अनुप्रेक्षा ( गुणकीर्ती ) ८ ) धर्मामृत फक्त ४ पाने ( गुणकीर्ती )

प्रत्येक ग्रंथाला पुष्पिका देऊन शक घातले आहेत. ( हिंगोली, हस्त. क्रमांक २ ).

जंबूस्वामी-चरित्र :—

हा दयाभूषणकृत ग्रंथ १४ व्या अध्यायापासून अपूर्ण राहिला होता, तो रत्नसाने पूर्ण केला. हा ग्रंथ २४ अधिकारांचा आहे. म्हणजे जवळ जवळ १० अधिकार रत्नसाने लिहिले आहेत. ग्रंथाच्या इतर अधिकारांतही त्याने बदल केला आहे. ( दामा पंडित पाहा. ) प्रशस्तीत तो म्हणतो—

" दयाभूषण पंडितपणा । तद्द केली कथेची रचना ।
ते पुरि केली रत्न सुजाणा । सुगुनेकरूनि देखा ॥ २४.१७६ "

तो स्वतः देऊळगावचा राहणारा होता. बघेरवाल ज्ञातीय असून साहुला गोत्रीय होता. वडिलांचे नाव अर्जुनसा होते व आईचे नाव पसाई. भावाचे नाव जयवंतसा. रत्नसा हा सेनगणापैकी होता. त्यानें गुरुपरंपरा सेनगणाची दिली आहे. त्याच्यावेळी कारंजा पीठावर सेनगणभट्टारक जिनसेन होते.

गंगादास ( इ. सन १६९० ) :–

हा मूळचा गुजराती[२९] असूनही केवळ गुरुआज्ञा म्हणून त्याने मराठीत

---

२९. मराट भाषा न बले माता । गुजर देशी वास ।
अल्पमती ग्ये केला कविजन पाहावें विस्तार ॥ रे ॥ ॥ ४५ ॥
— पार्श्वनाथभवांतर.

· **पार्श्वनाथभवांतर** ही छोटीशी रचना केली आहे. त्याची 'चक्रवर्ती–पाळणा' ही २१ कडव्यांची रचनाही उपलब्ध आहे. भाषा अर्थातच गुजराती शब्दांनी युक्त झाली आहे. गंगादास हा भट्टारक धर्मचंद्र यांचा शिष्य होता. हे धर्मचंद्र[30] संवत १७४२ ते १७४९ च्या दरम्यान कारंजा येथील बलात्कारगण पीठावर होते. गंगादासाने शके १६१२ मध्ये 'पार्श्वनाथभवांतर' तयार केले. या भवांतरात ४७ कडवी आहेत.

**पार्श्वनाथभवांतर :–**

हे *डफगाण्याच्या चालीमध्ये म्हणावयाचे कीर्तन आहे. बहुतेक हस्तलिखित* प्रतीत–" अथ श्री पार्श्वनाथ भवांतर लिख्यते। डफगानाचि चालीमधीं। असे प्रारंभी लिहिलेले आहे. गंगादास मात्र त्याला कीर्तन म्हणतो. कदाचित शके १६१२ शु ॥ १३ पौष मासांत भट्टारक धर्मचंद्राने एखादा मोठा मंगलिक महोत्सव[31] घडविला असावा. त्यावेळी गंगादासाने हे कीर्तन केले असावे. कवितेचा विषय पुढीलप्रमाणे आहे :

पार्श्वनाथ भागवंतांचा विवाह करण्याचे त्याच्या मातापित्यानी ठरविले; पण पार्श्वनाथ विवाहास तयार झाले नाहीत. आपण मागील भवात सर्व सांसारिक सुख भोगले आहे. ते नश्वर आहे हे मातेला पटविण्यासाठी पार्श्वनाथांनी आपल्या मागील नऊ भवाचे वर्णन केले आहे. अमात्य मरुभूति, वज्रघोष हत्ती, शशिप्रभ देव, राजकुमार *अग्निवेग, विद्युत्प्रभदेव, चक्रवर्ती वज्रनाभी, ग्रैवेयक इंद्र, महाराज आनंद,* आनत इंद्र असे नऊ भव आहेत. वर्णनाच्या भरात पार्श्वनाथाच्या वेळी बंदुकांचाही उल्लेख कवीने केला आहे.

**चक्रवर्तीचा पाळणा :–**२१ कडव्यांचा हा पाळणा फारच गोड आहे.

" गंगादास म्हणे पुण्येवीण । कहींच सुख जाण ।
द्दाणोनि गुरुचरण । म्या आधीं बळकट धरिला जाण ॥
जो जो जो जो रे निजबाळा । चक्रवर्ति वेल्हाळा ।
सुनंदा गातसे विनोद नानापरि छंद । जो जो जो जो रे ॥ २१ ॥ "

याप्रमाणे आदिनाथ तीर्थंकराची पट्टराणी सुनंदा ही आपल्या पहिल्या मुलाचा– चक्रवर्ती भरताचा पाळणा गात आहे अशी कल्पना केली आहे.

---

३०. म. सं. पृ. ७३.

३१. शके सोलासे वर बार । शुद्धपुष्यमास ।
मोनोद संवत्सर शुक्रवार त्रयोदश । कीर्तन पूरन झाला ।
धर्मचंद्राचे आदेस । तो गुरु माहीं जिहि भजला ।
दिधला उपदेश । तिहांचा पंडितकरा भनती गंगादास ।
मंगलिक महोच्छाकारण कीर्तनचा परकास रे ॥ ४६ ॥ –पार्श्वनाथभवांत

## महीचंद्र आणि त्याचे शिष्यमंडळ :–

साधारणपणे इ. सनाच्या १७ व्या शतकाच्या मध्यभागी कारंजा येथील भट्टारक पीठाची (बलात्कारगण) एक स्वतंत्र शाखा लातूरला निर्माण झाली. प्रारंभी कोणत्याही हेतूने या शाखेची निर्मिती झाली असली तरी पुढे पुढे जैन समाजातील सैतावळ संप्रदायाचे ते मुख्य पीठ म्हणून ओळखले जाऊ लागले. शिष्यमंडळीही बरी मिळाली. स्वतः भट्टारक आणि त्यांच्या शिष्यमंडळींनी मराठी साहित्यात बरीच भर घातली. महीचंद्रापूर्वी विशालकीर्ती, पद्मकीर्ती यांनी मराठीत साहित्यनिर्मितीस लातूरकडे प्रारंभ केला होताच. पण महीचंद्रापासून साहित्यसेवेस विशेष जोम आलेला दिसतो.

● **महीचंद्र** ( इ. सन १६९६ ) :–

लातूरच्या बलात्कारगण भट्टारक पीठावरील या आचार्यांनी मराठीत बरीच मोठी ग्रंथनिर्मिती केली आहे.

आदिनाथपुराण, सम्यक्त्वकौमुदी, नंदीश्वरकथा, गरुडपंचमीकथा, नेमिनाथकथा ( भवांतर ), शांतिनाथ स्तोत्र, नेमीश्वरगीत, महावीर पाळणा, चूडचिंतामणी आरती आणि अरिहंत आरती याप्रमाणे १० रचना महीचंद्राच्या नावावर उपलब्ध आहेत.

**आदिनाथपुराण** :– या ग्रंथाचा प्रथम परिचय[३२] विविधज्ञानविस्तारात झाला होता. तो मद्रासच्या शास्त्रीय ग्रंथालयातील हस्तलिखित प्रतीचा होता. त्यात जिनदासाचे ' आदिपुराण ' म्हटले आहे. ते चुकीचे आहे.

वर्धा येथून हा ग्रंथ प्रथम प्रसिद्धही झाला होता. या ग्रंथाचे अध्याय पंधरा आहेत. ग्रंथ मोठा असून रसाळ आहे. शके १६१८, माघ वद्य पंचमीस, रविवारी आशापुर येथील शांतिनाथ चैत्यालयात हा ग्रंथ पूर्ण झाल्याचे कवीने प्रशस्तीत[३३] सांगितले आहे. हा ग्रंथ ब्रह्मजिनदासाच्या आदिनाथ-रासाच्या[३४] आधारे लिहिला आहे. आदिनाथ–रासाची रचना ब्रह्मजिनदासाने जिनसेनांच्या आदिपुराणावरून केली होती. प्रथम तीर्थंकर ऋषभदेव – आदिनाथाचे चरित्र पूर्वभवांसह या ग्रंथात वर्णिले आहे. जैनपुराणात हे चरित्र विशेष महत्त्वाचे समजले जाते. ग्रंथाची ओवीसंख्या मुद्रित प्रतीत ३२५३ आहे.

---

३२. विविधज्ञानविस्तार, मे, १९२४,

३३. शके सोळासे अष्टादश । धाता नाम संवत्सर सुरस ।
माघ वद्य पंचमी तिथीस । रविवार तो ॥ १०.१४५.
भरत क्षेत्रामध्यें जाण । आशापूर पुण्यपावन ।
मूळनायक शांतीजीन । चैत्यालय पैं ॥ १०.१४६.

३४. रास केली ब्रह्म जिनदासें । ती पाहून महिश्चंद्र उल्हासें ।
महाराष्ट्र केले सायासें । श्री गुरुप्रसादें ॥ १०.१४२

**सम्यक्त्वकौमुदी** :–दयासागरांनी सम्यक्त्वकौमुदी मराठीत केली आहे, हे आपण पाहिले आहेच. महीचंद्रानेही एक सम्यक्त्वकौमुदी रचिली आहे. याची एक प्रत कारंजा येथे पाहण्यास मिळाली. कदाचित् त्याने याची रचना आदिपुराणाच्या नंतर केली असावी. कारण आदिपुराणात विशालकीर्तींचा गुरु म्हणून उल्लेख आहे. पण येथे विशालकीर्ती ' यांच्या पट्टी महीचंद्र ' म्हणून त्याने आपला उल्लेख केला आहे.

ग्रंथाचे एकंदर प्रसंग तेरा असून ग्रंथसंख्या – ओवीसंख्या १६८१ म्हणून प्रतिकर्त्याकडून लिहिले गेले आहे. मूळ ग्रंथ संस्कृत होता, त्याचे हे मराठी रूपांतर आहे. *ग्रंथ मूळचा कोणाचा हे मात्र सांगितले नाही. मधून मधून संस्कृत* सुभाषिते उद्धृत केली आहेत. ग्रंथाची प्रशस्ती पुढीलप्रमाणे आहे :

कुंदकुंदाचार्यावर्यः । आजितकीर्ति मुनिराय ।
तत्पटीं धर्म्म थापीली सोये । वीशालकीर्तिन ॥ १६३३ ॥
तत्पटीं महीचंद्र जान । सम्यक्त्वकोमदी माहापुरान ।
मन्हाष्ट केला आज्ञानपन । श्रोती क्षेमा किजे ॥ १६३४ ॥
पडल अक्षेर जान । श्रोति घ्यावे शोधुनि ।
महीचंद्र करितो नमन । साधु जनासि ॥ १६६५ ॥

हा ग्रंथ अप्रकाशित असून आजपर्यंत अनुपलब्ध होता. सम्यक्त्वकौमुदी हा कथासंग्रहाचा ग्रंथ आहे. धर्मावर जेणेकरून श्रद्धा बसेल अशा गोष्टी अत्यंत सोप्या रीतीने या ग्रंथात सांगितल्या आहेत.

**नंदीश्वरकथा** (अष्टान्हिक–कथा ) :–आषाढ, कार्तिक, फाल्गुन या तीन महिन्यांत अष्टमीपासून पौर्णिमेपर्यन्त आठ दिवस नंदीश्वर मुनींचा उत्सव करतात. त्याला अष्टान्हिक–पर्व म्हणतात. याच्या व्रतकथेवर ही रचना आधारली आहे. ओवीसंख्या १५० आहे. यातही गुरुपरंपरेचा उल्लेख केला आहे. हरिषेण चक्रवर्तींची कथा या व्रतात येते. " गुरुआज्ञा घेउनी सार । अष्टान्हिका व्रत सुंदर । सांगता होईन तत्पर । गुरुप्रसादें । पूर्वी होती गीर्वाण भास । ब्रह्मजिनदासें केला रास । तयाची केली मन्हाष्ट भास । महीचंद्रें पें ॥ १,६ ॥ अशी या कथेची प्रस्तावना कवीने केली आहे.

**गरुड–पंचमी–कथा** :– ९१ ओव्यांची ही लहानशी कथा आहे.

श्रावण शुद्ध पंचमीसी । उपोषण करावे दिवशी ।
आरंभ करावा न्हवनासी । चैत्यालयात ॥

तेथे पार्श्वनाथ पूजा करावी. ५ वर्षे हे व्रत करावे. हे व्रत पाळणाऱ्याची कथा देऊन त्या कथेचा विधी सांगितला आहे. गरुड राजाला एका मुनीने ही कथा सांगितली. धर्मचंद्र, अजितकीर्ती, विशालकीर्ती ही गुरुपरंपरा येथेही दिली आहे.

**नेमिनाथ भवांतर** :— ७१ कडव्यांची ही रचना काव्यदृष्ट्या चांगल्यापैकी आहे. प्रथमतः नेमिनाथाच्या बलपरीक्षेचा प्रसंग वर्णिला आहे. नंतर जलक्रीडा, जाबूवंतीशी वाद यांचे वर्णन आहे. नंतर विवाहाची तयारी व शेवटी प्राणिहिंसा होऊ नये म्हणून नेमिनाथाने विवाह न करता दीक्षा घेतली. दीक्षा घेण्यापूर्वी त्यांची माता व नेमिनाथ यांचा संवाद दाखविला आहे. त्यावेळी नेमिनाथाने भोग भोगण्यात नवीन असे काही नाही हे दाखविण्यासाठी मागील भवांचे वर्णन केले आहे. हे नऊ भव आहेत. शेवटी विशालकीर्ती गुरूचा उल्लेख असून रचनाकाल दिलेला नाही.

**शांतिनाथ स्तोत्र** :— फक्त ११ श्लोकांची ही एक उत्कट व भावपूर्ण अशी रचना आहे. भाव व भाषा यांची एकरूपता आणि कवीची प्रामाणिक भक्ती येथे पाहाण्यास मिळते. पुढील ओळीवरून स्तोत्राची कल्पना येते.

" स्वजन सोइरे पुत्र मित्र ही रामा । माय बाप बंधु नये कोण्ही कामा ।
मोहफासा मी गुंतलो धनधामा । स्मरणवीण काज गेला रीकामा ॥ ६ ॥ "

शेवटी नेहमीप्रमाणे गुरुचा उल्लेख केला आहे :

" मुरि विशालकीर्तिच्या प्रसादें । महीचंद्र स्तुति केलीसे प्रमोदे ।
शांतिनाथ स्वामी विनविला आनंदे । भवभ्रमणे चूकविले जिनेंद्रें ॥ ११ ॥ "

**नेमीश्वर गीत** :— १० कडव्याचे हे गीत आहे. राजुलमतीने नेमिनाथासाठी केलेला धावा यात आहे. ' राजुलमती धावा ' असेही या गीताचे नाव आहे.

" बीसाल कीरती । सीस महीचंदर यती ।
धाय राजुल नेमीपरती थो काय सागु सये ॥ १० ॥ "

**महावीर पाळणा** :— १६ कडव्यांचे हे स्वतंत्र गीत आहे. महावीरांच्या जन्मोत्सवाचे वर्णन यात करण्यात आले आहे. शेवटी–

" गुरु विशालकीरती । घरनीया चीती ।
पालना गात असे । महीचंद्र यती ॥ १६ ॥ " अशी ओवी आहे.

**चूडचिंतामणि आरती** :–अंबापूर येथील चूडचिंतामणीची ही आरती आहे.

" अंबापूर नगरी रहिवास तुझा । भक्त शरण येति तुझिया चरणास ।
तयाचि मनकामना पूर्वीसी आस । तरण तारण स्वामी तूं जगदीश ॥
गुरु विशाल कीर्ति ज्ञानाचि मूर्ति । महिचंद्रास स्वामी देतसे स्फूर्ति ॥ "

यातील अंबापूर कोणते समजत नाही.

**अरिहंत आरती** :— भाषा फार चागली आहे. नदीपूर ( नांदेड ) येथील मूर्तीची ही आरती असावी.

" कोटी रविकिरण तनु तुझी । कोमल कर्दळी गामा ॥
नदीपूर नगरीं विराजीत । आदिनाथ साक्षात ॥
विशालकीर्ति मुनींची । झाली कृपा स्वामीची ।
चिंता हरलीसे शिष्याची । महीचंद्र दीनाची ॥ ६ ॥ "

**महीचंद्र–व्यक्ती** :—महीचंद्र ही लातूर येथील बलात्कारगण भट्टारक पीठावरील एक विशेष महत्त्वाची व्यक्ती होऊन गेली. त्यांनी आदिपुराणात शके १६१८ चा कालनिर्देश केला आहे. महीचंद्राचे गुरु विशालकीर्ती होते. ' काली गोरी [३५] संवाद ' नांवाची एक हिंदी रचनाही महीचंद्रानी केली आहे. समाजात भट्टारकाला विशेष मान्यता होतीच. त्यात पुनः महीचंद्र हे श्रेष्ठ दर्जाचे साहित्यिक असल्याने त्यांना गुरु मानणारे बरेच साहित्यिक निर्माण झाले. महीचंद्राचे हे शिष्यमंडळ बरेच मोठे आहे. गुजराती व हिंदी भाषांचा अभ्यास या शिष्यमंडळात बराच असला पाहिजे. समाजांत अष्टके, आरत्या, व्रतकथा, स्तोत्र यांना या काळात विशेष मागणी होती. तत्त्वज्ञानाच्या खोल चिकित्सेपेक्षा कथापुराणे व आचारवर्णन यांचे सामान्य जनतेला नेहमीच आकर्षण असते. या प्रकारच्या साहित्याचा पुरवठा तत्कालीन साहित्यिकांनी विशेष केला. महाकीर्ती, ब्रह्मचिंतामणि, रामकीर्ती, म. देवेंद्रकीर्ती, इत्यादिकांनी भट्टारक महीचंद्राचा आपापल्या कृतीत गुरु म्हणून उल्लेख केला आहे.

● **महाकीर्ती ( इ. सन १६९८ )** :—

यांची शीलपताका नावाची एक सामाजिक रचना उपलब्ध आहे.

**शीलपताका** :—' शीलतरंगिनी पुराण ' या नावाने वर्षांपूर्वी प्रकाशित झाले होते. यात ओवीसंख्या ५५२ असून तीन प्रसंग आहेत. यात ब्रह्मचर्याचे महत्त्व सांगणारी सामाजिक कथा वर्णिली आहे. ब्रह्मजिनदासाने[३६] गुजरातीत प्रथम ही कथा लिहिली होती. तीच कथा महाकीर्तीने मराठीत आणली आहे. माणिकचंद व चंपावती यांची ही कथा आहे. माणिकचंद हा तारुण्यात वेश्येच्या नादी लागतो. त्याला चंपावतीने अत्यंत युक्तीने सन्मार्गावर आणले आहे. याची रचना शके १६२०, बहुधान्य संवत्सर, ज्येष्ठ शु॥ ७ ला केली आहे.

**महाकीर्ती – व्यक्ती** :—

शीलपताकेच्या प्रशस्तीत अजितकीर्ती, विशालकीर्ती, महीचंद्र अशी गुरुपरंपरा महाकीर्तीने दिली आहे.

" महीचंद्र माझी माउली । थोर कृपेची साउली ।
महाकीर्तीस टेकणी दाविली । शीलपताकेची ॥ ५५१ ॥ "

असे महाकीर्तीने महीचंद्रासंबंधी म्हटले आहे.

---

३५. म. सं. पृ. ८०

३६. शीलपताकाचें महिमान । ब्रह्मजिनदास बोले वचन ।
शीलपताकादि म्हणून । नांव याचें ठेविलें ॥३-६५॥
—शीलतरंगिनी पुराण.

'चंद्रकीर्ती' व 'अनंतकीर्ती' यांचा स्वतःचे शिष्य म्हणून महाकीर्तीने उल्लेख[३७] केला आहे.

● ब्रह्मचिंतामणि :—

गुणकीर्तिकृत पद्मपुराण हा ग्रंथ तीन ग्रंथकारांच्या हातून पूर्ण झाल्याचा उल्लेख त्या ग्रंथाच्या वर्णनात केला आहे. ब्रह्मचिंतामणि याने या ग्रंथातील २८ व्या अध्यायापासून ३५ व्या अध्यायापर्यंतचा भाग पूर्ण केला आहे. हा भाग ७ अध्यायांचा आहे.

**पद्मपुराण** :—२९ व्या अध्यायात[३८] प्रारंभी गुरुस नमस्कार करून पुढील ग्रंथ सांगण्याची प्रतिज्ञा केली आहे. त्याचे गुरु महीचंद्र होते हे त्यावरून स्पष्ट होते. ग्रंथरचनेचा काळ जरी दिला नाही तरी महीचंद्राच्याच वेळी ब्रह्मचिंतामणि झाला असला पाहिजे. या २९ व्या अध्यायापासून ३५ व्या अध्यायापर्यंतच्या भागात रामवनवासातील कुलभूषणदेशभूषणकथा, चंद्रनखाशुद्धि, जटायुकथा, रामाचे अयोध्येत आगमन इत्यादी भाग आला आहे.

● रामकीर्ती :—

यांची एक पद्मावतीची आरती उपलब्ध आहे. यांचे गुरु महीचंद्र होते इतकीच माहिती त्यावरून मिळते.

**पद्मावती आरती** :—ही १४ कडव्यांची मोठी आरती आहे. पद्मावतीची मूर्ती त्या काळी कशी पूजिली जात होती याचे समग्र वर्णन या आरतीत पाहण्यास मिळते. जैन समाजात जिनदेवाशिवाय दुसरा देव पूजिला जात नाही. पण सामाजिक रूढीतून पद्मावती पूजेला किती महत्त्व प्राप्त झाले होते हे आरतीतून व्यवस्थित पाहण्यास मिळते.

---

३७. तदान्वयी चंद्रकीर्ति । त्याचा शिष्य अनतकीर्ति ।
वरदहस्त तयाप्रति । प्रसाद असो गुरुचा ॥३·६७॥

—शीलतरंगिनी पु.

३८. महाराष्ट्र टिका रामायणीं । खंड ग्रंथ होता म्हणोनि ।
गुरुचरण स्मरोनि । आरम्भ केला ॥ २९·३ ॥
रामायण कथा अपार । जन उद्धरेला निर्धार ।
महीचंद्र ज्ञान दातार । स्वामी माझा ॥ ५ ॥
तयाचा शिष्य ब्रह्मचिंतामणि । ओवी बांधू नेणें अज्ञानी ।
ओने न्यावे साधरोनी । कृपा करावी ॥ ६ ॥

—(प. पु.)

" पार्श्वनाथाची यक्षनि । धारनेंद्र पद्मिनि ।
बैसि सोभति सिंहासनीं । मायावरनि फणि ।
जय जय पद्मिनि । भवानि चिंतामनि ।
यक्षनि । आरती करीन तुझे चरणि । पावमि निरवानि । "

असा या आरतीचा आरंभ आहे. शेवटी गुरूचे स्मरण केले आहे.

" गुरु महीचंद्र पटपति । ज्ञानाचि मूरति भावें आरति करति ।
रामकीर्ति यति ॥ १४ ॥ "

## ● पुण्यसागर ( आनंदसागरशिष्य ) :–

औरंगाबाद भट्टारक पीठावर हे पुण्यसागर झाले. हरिवंशपुराण पूर्ण करणारे पुण्यसागर आणि हे पुण्यसागर वेगळे आहेत. ते पुण्यसागर लातूर पीठावरील अजितकीर्तीचे शिष्य होते. शके १५७६ चा सुमार हा त्यांचा काळ आहे. हे पुण्यसागर औरंगाबाद पीठापैकी आहेत. यांनी गुणकीर्तिकृत पद्मपुराण ( रामायण ) पूर्ण केले आहे.

**पद्मपुराण** :–या ग्रंथाच्या ४४ अध्यायांपैकी शेवटचे ८ अध्याय पुण्य-कीर्तीने लिहिले आहेत. गुणकीर्ती, ब्रह्मचिंतामणि, पुण्यसागर अशा तिघांच्या हातून हा ग्रंथ पूर्ण झाला आहे. या ग्रंथाच्या ३६ व्या अध्यायापासून पुण्यसागराचे[३९] नाव येऊ लागते. या भागात शत्रुघ्नमथरा, सीताकलंक, लहुअंकुशजन्म, रामसीता भेट, हनुमंतदीक्षा, लक्ष्मण-मृत्यु, लहुअंकुश निर्वाण, रामनिर्वाण हे विषय आले आहेत. या भागाची रचना, अपूर्ण ग्रंथ पूर्ण करण्याची आज्ञा गुरूकडून झाली म्हणून राम[४०] ग्रंथाच्या आधारे पूर्ण केली असे पुण्यसागराने सांगितले आहे.

### पुण्यसागराचा गुरु व काल :—

पुण्यसागराने ग्रंथाच्या शेवटी आपली गुरुपरंपरा दिली आहे. त्यावरून औरंगाबाद पीठाची परंपरा अधिक स्पष्ट होते. भानुकीर्ती, दयाभूषण, विजयकीर्ती, भुवनकीर्ती,

---

३९. महाराष्ट्र ग्रंथ रामायण । खंडित होता जाण ।
गुरु आज्ञा झाली म्हणून । पूर्ण केला ॥ ३६. २५२ –प. पु.
कवी म्हणे पुण्यसागर बाण । मी तर आहे अज्ञान ।
श्रोते असती सज्ञान । त्यांनी शोधावें ॥ ३६.२५३ –प. पु.

४०. खंडीत ग्रंथ रामायन । राम भाषा होती म्हणून ।
महाराष्ट्र ओवी केली अज्ञानपण । पुण्यसारें पै ॥ ४२.१९५ ॥–र. पु.

आनंदसागर, पुण्यसागर अशी ही परंपरा दिसते.[४१] यापैकी विजयकीर्तीची परंपरा दयाभूषणकृत सम्यक्त्वकौमुदीत आली आहे. सम्यक्त्वकौमुदीची ह. प्रत शके १६१० ची असल्याचे आपण मागे पाहिलेच आहे. (अभ्यासाची साधने पाहा). भुवनकीर्तीच्या कारकीर्दीत हा ग्रंथ पुण्यसागराने पूर्ण केला आहे. म्हणजे साधारणतः शके १६५० पूर्वी व १६१० नंतर पुण्यसागराचा काळ ठरतो. रामसाच्या शके १६१५ च्या हस्तलिखित प्रतीतही भुवनकीर्तीचे नाव येत नाही. म्हणून शके १६१५ नंतर हा काळ समजावा लागेल.

### सतराव्या शतकाचा समारोप :-

सतराव्या शतकात लातूर येथील बलात्कारगण भट्टारक पीठाची परंपरा सांगणारे बरेच जैन ग्रंथकार निर्माण झाले. अभयकीर्ती, विशालकीर्ती पहिले व दुसरे, पद्मकीर्ती, महीचंद्र, महाकीर्ती इत्यादि सर्वांची परंपरा ही लातूर पीठाची आहे. याच शतकात सुदर्शनचरित्रकर्ते वीरदास हे पार्श्वकीर्ती–पासकीर्ती या नावाने औरंगाबादला नवीनच निर्माण झालेल्या भट्टारक पीठावर आचार्य झाले. ते स्वतः थोर मराठी ग्रंथकार होते. म्हणून त्यांच्यानंतर त्या पीठावर आलेल्या भानुकीर्ती, दयाभूषण यानी मराठीत विशेष प्रमाणात ग्रंथनिर्मिती केली. विशेषतः पंडितावस्थेत दामाने, ब्रह्मचारी अवस्थेत दयासागराने आणि मुनी अवस्थेत दयाभूषण याने मराठीची बहुमोल सेवा केली असे म्हणावे लागते.

वीरदासकृत सुदर्शनचरित्र, दामापंडितकृत जंबूस्वामीचरित्र व दानशीलतपभावना, दयासागरकृत धर्मामृतपुराण आणि दयाभूषणकृत सम्यक्त्वकौमुदी व भविष्यदत्तबंधुदत्तपुराण आणि महीचंद्रकृत आदिपुराण हे ग्रंथ केवळ धार्मिक दृष्ट्या मोलाचे नाहीत तर साहित्यिक दृष्टीनेही ते मोलाचे आहेत.

या शतकात व्रतकथांची व आरत्यांची संख्या वाढली त्याचे कारण भट्टारक युगाचा तो परिणाम होय. चिमनापंडिताचे संपूर्ण वाङ्मय ही त्याचीच परिणती

---

४१. श्री वृषभसेनादि जाण । पट्टावली प्रमान ।
श्री भट्टारक भानुकीर्ति जाण । शिष्य दयाभूषण पै ॥
तत्पट्टी भ. विजयकीर्ति । भवतारक ।
तत्पट्टी भट्टारक भुवनकीर्ति । पै ।
त्या स्वामीचे प्रसादे । ग्रंथ रामायण आनंदे ।
संपूर्ण केला प्रमोदे । रामचरित्र ॥
रामचरित्र महापुराण । खंडित ग्रंथ होता म्हणून ।
आनंदसागर गुरुला स्मरुन । प्रबंध केला ॥
पुण्यसागर अज्ञान वर्ती । रामचरित्र केले अल्पमती ।
महाराष्ट्र भाषा कथा युक्ति । रचिले केले पै ॥ ४४.५० ॥—प. पु.

आहे. या शतकात जैनेतर ग्रंथकारांकडे दृष्टी टाकली तर मुक्तेश्वर, रामदास, तुकाराम, वामनपंडित, रघुनाथपंडित, सामराज हे ग्रंथकार दिसतात.

### इ. सनाचे अठरावे शतक :—

सतराव्या शतकाप्रमाणेच अठराव्या शतकातही मराठी जैन वाङ्मय हे भट्टारकांच्या पीठांच्या आश्रयाने अधिकाधिक विकसित व विस्तृत होत गेले. विशेषतः या शतकात मराठवाड्यातील शिरडशहापूरच्या भागात कारंजाचे भट्टारक जाऊन राहू लागल्याने त्या विभागातही मराठी ग्रंथरचनेची प्रेरणा मिळू लागली. जैन ग्रंथकार जैनेतर संप्रदायातील मराठी ग्रंथाचे अवलोकन–अभ्यासादी करू लागले. त्यामुळे मराठीतील जैन वाङ्मयात या काळात कल्पकता थोड्या अधिक प्रमाणात दिसू लागली. देवेंद्रकीर्ती, जिनसागर व जनार्दन हे या काळातील प्रमुख जैन मराठी ग्रंथकार या शतकात झाले.

● **देवेंद्रकीर्ती ( महीचंद्रशिष्य ) :—**

भट्टारक महीचंद्र यांचा गुरु म्हणून उल्लेख करणारे देवेंद्रकीर्ती या काळात एक प्रमुख जैन ग्रंथकार समजावे लागतील. ' कालिकापुराण ' हा त्यांचा ग्रंथ अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. अनेक पौराणिक, ऐतिहासिक, सामाजिक आख्यानाचे व घटनांचे एकत्रीकरण या पुराणात करण्यात आले आहे. देवेंद्रकीर्तींचा काळ नक्की कोणता हे ठरविणे सध्या तरी पुराव्याच्या अभावी अशक्य आहे. त्याचे गुरु महीचंद्र होते व महीचंद्र हे सन १६९६ च्या सुमारास झाले हे आपण महीचंद्राचा विचार करताना पाहिले आहेच. त्यानतरचा म्हणजेच अठराव्या शतकातील प्रारंभाचा काळ या देवेंद्रकीर्तींचा असावा असे दिसते.

**कालिकापुराण** :— कालिका म्हणजेच पद्मावती. तिचे माहात्म्य या प्रचंड पुराणात सांगितले आहे. ग्रंथात एकुण ४८ अध्याय असून ओवीसंख्या जवळजवळ ७ हजारांच्या वर आहे. शिरडशहापूर येथील मल्लिनाथ जैन मंदिरात या ग्रंथाची हस्तलिखित प्रत आहे

ग्रंथकर्त्याने ग्रंथाच्या प्रशस्तीत पुढील माहिती दिली आहे—

" श्री देवेंद्रकीर्ति बलात्कारगन । श्री सरस्वती गछ प्रमान ।
देवेंद्रकीर्ति अज्ञानघण । कालिका माहात्म्य निरोपिला ॥ १६० ॥
शालीवाहन प्रथम शाहार्ण । माहापद्मपुराण वाचील पूर्व देव ।
संस्कृतवानी देव । न कळे जैनाप्रती ॥ १६२ ॥
संवत्छेर प्रथम आठावीस । मुक्रश्च श्रावणमास ।
ग्रंथ कल्पोत्तर जाला सुरेस । मास दीन सुक्रवार ॥ १६३ ॥
दीवस चांदन दीय पंचमीची । कथा संपली कालिकामाहात्म्यपुराणींची ।
भावना पुरली मनाची । म्हणे देवेंद्रकीर्ति ॥ १६४ ॥ "

यावरून कालिकापुराणाचे लेखक देवेंद्रकीर्ती हे मूलसंघांतील बलात्कार गणांतील होते एवढे सहज समजते. पण श्रावणमासातील शुद्धपक्षातील शुक्रवारी हा ग्रंथ ज्या शकात पूर्ण झाला तो शक मात्र स्पष्ट करू शकत नाही. "शालीवाहन प्रथम शाहान्नं". व "संवत्छेर प्रथम आठावीस" याचा अर्थ नीट लागू शकत नाही.

हे देवेंद्रकीर्ती 'सिद्धान्तवाणी देवेंद्रकीर्ती' म्हणून प्रसिद्ध असावेत असे कालिकापुराणात वारंवार येणाऱ्या उल्लेखावरून वाटते. या पुराणातील १ ल्या अध्यायातील ४ थ्या व ५ व्या ओवींत पुढील उल्लेख मिळतो.

"महापद्मपुराण गीर्वाणवाणी । बाळ गोपाळा न कळे म्हणौनि ।
ब्रह्मजिनदास केली ठेवणी । रासभाषे पैं ।।
विशाळकीर्तिच्या कृपेण । देवेंद्रकीर्ति रास पाहोन ।
हे मऱ्हाष्ट केलें पुराण । श्रावण देश भाषा पै ।। "

यावरून ब्रह्मजिनदासाच्या रासग्रंथाच्या आधारे हा ग्रंथ विशाळकीर्तीच्या कृपेने देवेंद्रकीर्तीने केला असे म्हणावे लागते. तिसऱ्या अध्यायाचा शेवट करताना कवी पुढील उद्गार काढतो—

"हे चरित्र पुण्य पावनीं कथा । कालिकामहात्मपुराण ।
गुरुकृपा झाली म्हणोन । ओवी केली पैं श्रोतेजनी ।।
हे कथा महापद्मपुराणीं । म्या ऐकोनी जी श्रवणी ।
परी भाषा संस्कृत वाणी । वोवी केली मऱ्हाष्ट ।
महीचंद्र सीस्ये देवेंद्रकीर्ति । म्हणे श्रोतेजन हो मी असे अज्ञान ।
तुम्ही बैसावें सावरोन । श्रोते समर्थ ।। १२५ ।। "

'महापद्मपुराण' या ग्रंथाच्या आधारे महीचद्राचे शिष्य देवेंद्रकीर्ती याने या ग्रंथाची रचना केली असे येथे कवीने सांगितले आहे. संस्कृतमध्ये पद्मपुराणाची रचना रविषेणाचार्यांनी केली आहे, पण त्यात कालिकेची कथा कोठे दिसत नाही. ग्रंथाचा मूलाधार कोणता हे समजणे सध्या तरी कठीण आहे.

**कालिका पुराणातील कथांश :**— सम्यक्त्वकौमुदी, धर्मपरीक्षा व अनंतव्रतकथा या तीन ग्रंथांतील कथा या महाकाय ग्रंथात समाविष्ट करून घेण्यात आल्या आहेत. २२ ते ३१ अध्यायांत सम्यक्त्वकौमुदी, ३२ ते ३८ अध्यायांत धर्मपरीक्षा आणि ४७ व्या अध्यायात अनंतव्रतकथा आली आहे. म्हणजे या ग्रंथातील ४८ अध्यायांपैकी १७ अध्याय केवळ ग्रंथाचा विस्तार वाढविण्यासाठी खर्ची घातले आहेत. पहिल्या आठ प्रकरणात श्रेणिकराजकथा, चतुर्थपंचमकालवर्णन, कुळकरनिर्मिति, महाबल राजाची कथा, सोमवंशाची उत्पत्ती, ९६ कुळांची निर्मिती इत्यादी गोष्टी सांगण्यात आल्या आहेत. ९ ते १३ अध्यायांत कौरवपांडवांची उत्पत्ती, परशुरामाची कथा, माहोर क्षेत्राची निर्मिती ही प्रकरणे आली आहेत. बाकीच्या

अध्यायात महकावतीचे येगार व त्यांचे लिंगायतवाणी समाजाशी आलेले वितुष्ट, तगर चेगाराची निर्मिती, दक्षिणेत मुस्लीमांनी दिलेला त्रास इत्यादि प्रकरणे आली आहेत. सलग व एकसंघ अशी कथाच या पुराणात आली नाही.

**कालिकापुराणाचे महत्त्व :–** हे पुराण मध्ययुगीन जैन समाजाच्या स्थित्यंतराचा इतिहास आहे. दक्षिणेत सोमवंशी कासार येगार या समाजाची उत्पत्ती आणि त्यांची स्थित्यंतरे, मुसलमानांच्या हल्ल्यापासून जैन व हिंदू या सर्वांनाच त्या काळी सारखा त्रास कसा भोगावा लागला यांची वर्णने या पुराणात आली आहेत. हलकासलका व्यापार करून गावोगाव भटकून पोट भरणारा वर्ग व खेडेपाडी राहून बलुत्यांची कामे करणारा लोहार, सुतार, सोनारादी समाजसेवक कारागीर–वर्ग यांची कुलदेवता कालिका आहे असे या पुराणात सांगितले आहे. ती या वर्गाचे संरक्षण सदैव करीत आली आहे. म्हणून राज्ये बदलली तरी या समाजाचे महत्त्व नष्ट होत नाही असे या ग्रंथात सांगण्यात आले आहे.

दक्षिणेत लिंगायत आणि जैन यांचेही बरेच झगडे झाले. हे दोन्ही समाज आपापसात भांडून न्याय मिळविण्यासाठी व आपापल्या धर्माचा मोठेपणा सिद्ध करून घेण्यासाठी मुसलमान सुलतानाकडे जात असत. निलगा, तगरखेड इत्यादि विजापूर भागातील खेड्यात झालेल्या अशा काही घटनांचा इतिहासही या पुराणात आला आहे. अनेक गावे व बाजारपेठा–धार्मिक अगर राजकीय उलाढालींने ओस पडत व नवी निर्माण होत यांचीही चित्रे येथे उमटली आहेत.

तत्कालीन धार्मिक, सामाजिक व राजकीय इतिहास समजून घेण्यास कालिका-पुराण हे एक महत्त्वाचे साधन आहे. मुसलमान राज्यकर्त्यांनी दक्षिणदेश जिंकला आणि इकडील धर्म बुडविला. याचा परिणाम जैन समाजावर कोणता झाला हे या पुराणात चांगलेच दिसून येते.

दक्षिणेस श्रवणबेळगोळपासून उत्तरेस कारंजापर्यंतचा मुलुख यावेळी जैन समाजाच्या दृष्टीने क्रांतिकालातून जात होता. कर्नाटक व महाराष्ट्र असे दोन्ही भूप्रदेश या क्रांतीने ढवळले गेले. कालिकापुराणाचा अभ्यास या संदर्भात अत्यंत महत्त्वाचा आहे.

**० छत्रसेन ( इ. सन १७०३ ):—**

सेनगणाच्या परंपरेत छत्रसेन हे भट्टारक होते. यांनी संवत १७५४ ( सन १६९७ ) मध्ये एक पार्श्वनाथमूर्ती स्थापिली, ते कारंजास राहिले होते व तीर्थवंदन, समवसरण षट्पदी, मेरुपूजा, पार्श्वनाथपूजा, द्रव्या, अनंतनाथ स्तोत्र व पद्मावती स्तोत्र इत्यादि लहानमोठी काव्यप्रकरणे त्यांनी रचिली होती असे उल्लेख मिळतात. पण ह्या सर्व रचना संस्कृत अगर हिंदीत आहेत. छत्रसेन हे चांगले संस्कृतज्ञ होते.

अर्जुनसुत, बिहारी, हिरा यांनी छत्रसेनाचा गुरु म्हणून आपल्या काही हिंदी कवनात उल्लेख केला आहे.[1]

त्यांची सन १७०३ मधील आदीश्वरभवांतर ही लहानशी काव्य-कृती व सरस्वती आरती आणि नंदीश्वर आरती अशा दोन आरत्या उपलब्ध आहेत.

**आदीश्वरभवांतर** :—६७ कडव्यांची ही आदिनाथ तीर्थंकरांचे पूर्वभव-वर्णन करणारी रचना आहे. महापुराणात (जिनसेन) महाबलादिकांच्या जन्मात आदिनाथ तीर्थंकरांचे पूर्वभव वर्णन करण्यात आले आहेत. त्याच्याच आधारे संक्षिप्तात हे भवांतर सांगितले आहेत.

" आदीश्वर जिनवर । तयाचे भवांतर ।
पूर्वीची उत्पत्ति वो सांगतो मी सुंदर ।
आयका चित्त देउनी । आदिहीचे भवांतर ।
उत्तम श्रोता होऊनी । गाई हंसावतार ॥ नाभिराया नंदन ॥ ३ ॥ "

या काव्याचे तिसरे कडवे वरीलप्रमाणे आहे. आदिनाथ तीर्थंकर राज्यत्याग करून ज्यावेळी दीक्षा घेण्यास निघाले त्यावेळी त्यांच्या मातेने त्यांना मायेमुळे दीक्षा घेऊं नका असे म्हटले. तिला आदिनाथानी गत दहा भवांतरात आपण कोणकोणते भोग भोगले हे सांगितले आणि भोगात आत्मकल्याण होत नाही असे तिला समजावून दिले असा हा प्रसंग आहे.

" वरणन महापुराणीं । इये नाम वर्णन ।
आटी प्रतिहार्येसी ओपती आदिजिन ।
बारइ सभा मिलाली भरतेश्वर श्रोता जान ।
वृषभसेन गणधर आदि चउरयासी गणधर ज्ञान ॥ ५९ ॥

याप्रमाणे कवीने महापुराणाचा दाखलाही दिला आहे.

काव्याच्या शेवटी मूलसंघातील सेनगण पुष्करगच्छाचा व त्यातील सोमसेन-जिनसेन व समंतभद्र या गुरुपरंपरेचा उल्लेख त्याने केला आहे. काव्याचे शेवटचे कडवे असे आहे—

" शके सोलासे पंचवीस । सुभानु नाम संवत्सर ।
कुंतल देशी तिलक कागल मोठा नगर ।
त्यामधिं अति उन्नत सांतिजिनेश्वर मंदिर ।
तिथें राहून चउमासीं वर्णन केला नागर ॥ "

कुंतल देशातील कागल नगरात शांतिनाथ जैन मंदिरात शके १६२५ मध्ये चातुर्मास केला असताना छत्रसेनाने ही काव्यकृती पूर्ण केली.

---

१. म. स. पृ. ३३.

**सरस्वतीआरती :** ही ५ कडव्यांची आरती आहे. तीर्थंकराची द्वादशांग-वाणी म्हणजेच सरस्वती. तिची आरती छत्रसेनाने केली आहे. सरस्वतीला त्याने ' हंसवाहना ' म्हटले आहे. आरतीचा शेवटचा भाग पुढीलप्रमाणे आहे :

" तत्त्वपदार्थ द्रव्य पंचास्तिकाय । परमारथ तुझ्याने पावे ।
सारदा भारती अंबे हंसवाहनी । सोलाभरण भूषित निर्मल वचनी ।
निश्चल ज्योति मुमतिमुक्तिचि सखी । छत्रसेना यावें सत्वरसें मुक्ति ॥५॥"

**नंदीश्वरआरती :** नंदीश्वर आरतीचा " जयदेव जयदेव नंदीश्वरा । भारती ओवाळीन जगदीश्वरा " इतकाच भाग प्राप्त होऊ शकला. पण त्या आरतीवर हस्तलिखितात छत्रसेनकृत नंदीश्वर आरती असे स्पष्ट म्हटले आहे.

## सटवा ( सन १७१८ ) :—

यांच्या ' शिवानेमि संवाद ' व 'कंसाचे पद' अशा दोन किरकोळ रचना प्राप्त झाल्या आहेत. सटवाचे गुरु महीभूषण होते. त्याशिवाय इतर काही माहिती मिळत नाही. ' गज छोड चले गिरिनारी ' नावाचे एक हिंदी पदही त्याचे उपलब्ध[२] आहे.

**शिवानेमि संवाद :**— २० कडव्यांचे हे मोठे गीत आहे. नेमिनाथ विवाह-मंडप सोडून दीक्षा घेण्यासाठी गिरनारला निघाले त्यावेळी त्यांची माता शिवादेवी त्यांना थांबण्याचा आग्रह करते आणि नेमिनाथ आपला त्यागाचा निर्णय तिला पुनः सांगतात असा हा जिव्हाळ्याचा संवाद आहे. समूहगीत म्हणून याचा उपयोग त्याकाळी होत असला पाहिजे. यात गुरुचा उल्लेख नाही. गीताचा शेवटचा भाग असा आहे :

" सीवा नेमी संवादवाद जाहला पूर्ण प्रबोधावो ।
द्वारावती नीज छंदछंद पावला परमानद वो ।
ऐसी हें जिनसाशन आनादीसिध वातवो ।
सटवा म्हणे मी नेणे काही शास्त्र पुराणवो ॥ २० ॥ "

**कंसाचे पद :**— ८ कडव्यांचे हे पद आहे.

कंस श्रीकृष्णास मारण्याचा प्रयत्न करतो. पण तो मरत नाही. त्यावेळी त्याच्या तोंडी हे पद आहे :

या गीताचा शेवट खालीलप्रमाणे गुरुचा उल्लेखपूर्वक केला आहे.

" महीभूषण गुरु सटवा बोले अन्यवाचा ।
कंस म्हणे आझुनी का न मरे । कृष्ण देवकीचा ॥ "

' गज छोड चले गिरनारी ' या हिंदी पदांत ५ कडवी आहेत. यांतही गुरु महीभूषणाचा उल्लेख आहे.

२. नागपूर, डॉ. जोहरापूरकर यांच्या संग्रही.

" महीभूषण गुण भवांतर नौका । सटवांको भव पार उतारो ॥ ५ ॥ "
'शिवानेमि संवादा'त काही साहित्यिक गुण दिसून येतात. बाकीच्या रचना किरकोळच आहेत.

**सटवा – गुरु व काल :–**

सटवाचे गुरु महीभूषण होते. महीभूषण हे महीचंद्राचे शिष्य व लातूर गादीवरील भट्टारक होते. या महीभूषणांनी शके १६४० वैशाख कृ. ५ ला 'पद्मावतीसहस्रनामा'ची एक प्रत कारंजाला केल्याचा उल्लेख मिळतो. त्यावरून सटवाचा काळ निश्चित होतो. शके १६४० नतर (सन १७१८) तो लगेच झाला असावा.

● **यादवसुत (सन १७१८ नंतर) :—**

यांचा एकच ग्रंथ उपलब्ध झाला आहे.

**अष्टकर्मप्रकृती :—** यात आठ कर्मांच्या भेद-प्रभेदांचे वर्णन केले आहे. ओवीशिवाय अन्यवृत्तांचा उपयोग या ग्रंथात करण्यात आला आहे. काव्यदृष्ट्या या ग्रंथाचे महत्त्व विशेष नाही. पण जैनांचा कर्मसिद्धांत हा दर्शनशास्त्रातील महत्त्वाचा विषय असल्याने तत्त्वज्ञान म्हणून व मराठीत असा हा एकच ग्रंथ असल्याने याचे महत्त्व साहजिकच विशेष वाटू लागते. २२२ श्लोकांचा हा ग्रंथ आहे. आठ अध्याय आहेत. या ग्रंथात जीवाला संसारात बद्ध करणाऱ्या ज्ञानावरणादि अष्टकर्मांचे वर्णन आले आहे.

**यादवसुत व त्याचे गुरु :—**

यादवसुताने स्वतः आंधळा असल्याचा उल्लेख[३] वारंवार केला आहे. यादवसुताने आपल्या गुरूचा उल्लेख 'गुणाब्धिकीर्ती' व 'गुरु गुणाब्धिराये' असा केला आहे. त्याच्या गुरूचे नाव त्यावरून गुणसागर असे असावे. अर्थात हे गुणसागर कोणते हा प्रश्न शिल्लक राहतो. भट्टारक धर्मचंद्र यांचे एक शिष्य गुणसागर

३. लाउनि आगमपंथा । तारी आंधा समर्था ॥ ५.४३
अंध यादव सुताला ॥ ६.३४
स्मरीता मंत्र बिजा । दावी पदमा हारा ।
जीवारि आंधाचे काजा ॥ ७.३१
जीनजी वदे निज वदनी । दिव्य भाषा ।
मथितार्थ जानोनि वदे गणधर । गीर्वाणभाषा ॥
नृपश्रमासंबोधि । प्रगट जे गती । सत्य वचेनि ।
तेचि ऐकोनि राय । गुरुकृपे वदे आंध वचेनि ॥ १०.२०
— अष्टकर्मप्रकृति.

म्हणून होऊन गेले आहेत. शके १६४० मध्ये त्यांनी केलेली एक 'भेरुकी आरती' हिंदीत उपलब्ध[४] आहे त्यांची चंद्रनाथ आरतीही उपलब्ध आहे. तेच गुणसागर जर यादवसुताचे गुरु असतील तर शके १६४० च्या दरम्यान त्यांचा काल ठरतो. यादवसुताची भाषा पंडिती थाटाची आहे. यमकाच्या श्लोकांची छाप तेथे दिसून येते. ग्रंथ कर्मविषयक क्लिष्ट असूनही प्रत्येक अध्यायाच्या शेवटी त्याचे स्वविषयक जे उद्गार[५] आहेत त्यावरून त्याची कवित्वशक्ति आणि धर्मविषयक भक्ति हे गुण प्रगट होतात

● **माणिकनंदी ( सन १७२४ ) :--**

जिनसागर व माणिकनंदी हे दोघेही एकाच गुरूचे शिष्य होते. ते समकालीन होते. माणिकनंदीच्या फक्त तीन आरत्या उपलब्ध आहेत.

१ ) अनंतनाथ आरती ५ कडवी. २ ) चंद्रनाथ आरती ५ कडवी.

३ ) समवसरण आरती ४ कडवी.

१ ) अनंतनाथ आरती :—

रस सिंधु पट चंद्र शकेसी । शीत चतुर्दसी माद्रपदमास ।
शशिप्रभु भुवनी । रतती जिनचरणी ॥ ४ ॥
पंचमकाली केवलीसम यति । गुरु देवेंद्रकीर्ति ।
लघुशिष्य श्री माणिकनंदी । मंडलाचार्यपदी ॥ ५ ॥

२ ) चंद्रनाथ आरती :—

जय जय वदनि जिनभुवनी । श्री चंद्रप्रभचरणी ।
मंगल आरती हे आनंदे । फेरति दीप उजलोनि ।
मूलनायक मूर्ति ससिपति । गुरु देवेंद्रकीर्ति ।
माणिकनंदीचे गुरु साचे । केवळ उपमास्फूर्ति ॥

---

४. नागपूर, पोथी नं. ६, पान ११८ ( सेनगणमंदिर )
सके सोलासे च्यालीसे । सुध मादवा पंचमी बसे ।
गुरु धर्मचंद्र उपदेसे । गुणसागर म्हणे उल्हासे ।
देसवराड कारंजे । मूलनायक शशिप्रभु राजे ।
धर्मचंद्र गुरु गाजे । गुणसागर स्तुति करे सहजे ॥

५. जिन जिन मनि जेपा । साधि स्वर्गासी सोपा ।
अघहर मद कोपा । टाळिजे काळ मापा ।
दृढ धरि ध्यान खोपा । तारि भवाब्धितापा ।
जननमरण खेपा चुकवी जिनभूपा ॥ २.२१ ॥

३ ) समवशरण आरती :-

आरति करु जिनवरचरणीं । मनवचकायमनी धरणी ।
परिमल कल्पतरु बसले । झंकृत भृंगमनी जाले ।
अशोक वृक्षावरि बसले । जयजिन शब्दपक्षि कुले ।
सिंहासन योगिराज । श्रीशीतलजिन महाराज ।
शतकीर्ति गुरु । चरणि माणिक रत जाले ॥ ४ ॥

**माणिकनंदी : गुरु व काल :-**

वरील तीनही आरतींत माणिकनंदीने देवेंद्रकीर्ती गुरूंचा उल्लेख केला आहे. देवेंद्रकीर्ती कारंजा पीठावर या सुमारास विराजमान होते. कारंजाच्या चंद्रप्रभ मंदिराचाही आरतीत उल्लेख आला आहे. अनंतनाथ आरतीत संस्कृतपद्धतीप्रमाणे शके १६४६ चा उल्लेख केला आहे. माणिकनंदी यांची भाषा आरतींतही काव्यमय दिसते. विशेषतः समवशरण आरतीची रचना मनोहर झाली आहे.

● जिनसागर :-( इ. सन १७२४ ते १७४४ )

अठराव्या शतकातील मराठी जैन ग्रंथकारात विपुल व विविध लेखनामुळे कवी जिनसागरांनी एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण केले आहे. त्याचे समग्र काव्य 'जिनसागर याची समग्र कविता' या नावाने विस्तृत प्रस्तावनेसह जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, तर्फे ( सं. जोहरापुरकर ) प्रसिद्ध झाले आहे. त्याच्याच आधारे पुढील विवेचन केले आहे.

**जिनसागर यांची समग्र कविता :-** जिनसागराने मराठी, हिंदी आणि संस्कृत भाषात आपले साहित्य लिहिले आहे. त्याच्या पुढील रचना मराठीत आहेत. आदित्यव्रतकथा, अनंतव्रतकथा, निर्दोषसप्तमीकथा, पुष्पांजलीकथा, कलशदशमी-कथा, सुगंधदशमी कथा, लहुअंकुश कथा, पद्मावती कथा, जिनागमकथा, कयरो, ज्येष्ठ जिनवर पूजा, भक्तामर स्तोत्र, आदिनाथ स्तोत्र, शांतिनाथ स्तोत्र, पार्श्वनाथ स्तोत्र, वीतरागस्तोत्र, पद्मावती स्तोत्र, क्षेत्रपाल स्तोत्र, शांतिनाथ आरती, महावीरआरती, सरस्वती आरती, दशलक्षणधर्म आरती, दशलक्षणधर्म आरती ( २ ), पद्मावती आरती आणि जीवंधर पुराण.

याप्रमाणे व्रतकथा, कथा, स्तोत्र, आरती आणि पुराण असे या साहित्यात पाच प्रकार आहेत. यावरुन जिनसागराच्या प्रतिभेची बहुश्रुतता लक्षात येते. जैन समाजाशी एकरूप होऊन धर्मप्रसाराची बहुविध वाङ्मयीन अंगे निवडून ती सजविली ही जिनसागराची विशेषता होय.

रचनाकालाचा विचार करता सन १७२४–शके १६४६ चैत्र कृष्ण ५ ला त्याने आदित्यव्रत कथा लिहिली. हीच त्याची पहिली साहित्यकृती असावी. जीवंधर-पुराणाची रचना सन १७४४–शके १६६६ मध्ये त्याने पूर्ण केली आहे. हीच

त्याची अखेरची काव्यकृती. याप्रमाणे वीस वर्षे जिनसागराने अव्याहत लेखन केले आहे. त्याच्या उपर्युक्त साहित्याच्या पाचही प्रकारांविषयी येथे संक्षेपात दर्शन घडवायचे आहे.

व्रतकथा :—आदित्य, अनंत, निर्दोषसप्तमी, पुष्पांजलि, कलशदशमी, सुगंधदशमी अशा सहा व्रतकथा त्याने लिहिल्या आहेत. व्रताची कथा व व्रतविधी अशा दोन्ही दृष्टिकोणातून त्याच्या कथा मराठी वाचकांच्या तरी आदरास पात्र झाल्या आहेत. फार विस्तार नाही व अतिसंकोच नाही अशी मध्यमशैली त्याची रचना आहे. आदित्य व अनंत व्रतावर इतर:कवींच्या रचना पाहावयास मिळतात. पण बाकीच्या व्रतावर मात्र फक्त जिनसागरानेच कथा लिहिल्या आहेत. निर्दोषसप्तमी कथेत जिला दुःख म्हणजे काय हे मुळी कळतच नाही अशा एका भाग्यवती स्त्रीचे वर्णन आहे. पुत्राच्या मृत्यूकरिता विलाप करीत असलेल्या एका मैत्रिणीला ती 'दुःख म्हणतात ते कसे असते' असे विचारते, त्यामुळे त्या मैत्रिणीला तिचा राग आला. तिने सर्पदंश करवून त्या भाग्यवतीला मारण्याचा प्रयत्न केला. पण पुण्यामुळे त्या सर्पाचा रत्नहार झाला अशी ही कथा आहे.

पुष्पांजलि कथेत मातेच्या मृत्यूबद्दल शोक करणाऱ्या पित्याला धर्मोपदेश करून त्याला त्यागमार्गात स्थिर ठेवणाऱ्या प्रभावती नामक कन्येची कथा आहे.

सुगंधदशमी कथेतील 'सुगंधा' ही सावत्रकन्या आहे. तिचा छळ फार होत असतो पण तिच्या भाग्योदयाने तिचा विवाह राजाशी होतो.

व्रतपालनामुळे ऐहिक उत्कर्षाची प्राप्ती झाली हाच बहुतेक सर्व व्रतकथांचा सार सांगता येईल.

कथा :— लहुअंकुशकथा, पद्मावतीकथा आणि जिनागमकथा या तीन रचनांपैकी पहिली—लहुअंकुशकथा काव्यगुणाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट आहे. ओघवती भाषा, ठसकेबाज पण प्रासादिक शब्दरचना, रोचक संवाद आणि अनुरूप वृत्तयोजना यामुळे हे काव्य आख्यानकाव्याचे एक सुंदर उदाहरण झाले आहे. जनापवादावरून रामाने सीतेचा त्याग केला या प्रसंगापासून या कथेचा आरंभ होतो. वनात ती विलाप करीत असताना पुंडरीकिणी नगरचा राजा वज्रजंघ तिचे सांत्वन करून तिला आपल्या नगरास नेतो. तेथे तिला लहु व अंकुश हे पुत्र होतात. इकडे नारद सीतात्यागाबद्दल रामाची निंदा करतो. पण राम त्याचे ऐकत नाही. नारद रामाबरोबर आणि लहु अंकुशांना युद्धाकरिता प्रेरित करतो. युद्धात पितापुत्रांची ओळख पटते. लोकांच्या समजुतीकरिता सीता अग्निदिव्य करते. योग्य काळी राज्योपभोग भोगून लहु व अंकुश मुनिदीक्षा घेतात, व निर्वाण प्राप्त करून घेतात अशी ही कथा आहे.

पद्मावतीकथेत हुंमच ( कर्नाटक ) येथील पद्मावतीच्या मूर्तीची कथा सांगितली आहे. जिनागमकथेत जैन भूगोल आणि चोवीस तीर्थंकरांची चरित्रविषयक टिपणे अत्यंत संक्षेपाने सांगितली आहेत.

**स्तोत्र व आरत्या** :— जिनसागराने एकंदर आठ स्तोत्रे लिहिली आहेत. आदिनाथ, शांतिनाथ, पार्श्वनाथ हे तीन तीर्थंकर त्याच्या स्तोत्रांचे नायक आहेत. त्याचप्रमाणे पद्मावती, क्षेत्रपाळ या शासनदेवतांची स्तुतीही त्याने केली आहे. स्वतःला हीनदीन मानून उद्धारासाठी याचना करण्याचीच भावना जिनसागराच्या स्तोत्रात प्रबल दिसते. त्याच्या आरत्याही अशाच भक्तियुक्त व नादमधुर आहेत.

**जीवंधरपुराण** :— जिनसागराची ही कालक्रमाने शेवटची रचना आहे. पण विस्ताराने हीच सर्वांत मोठी आहे. या ग्रंथाचे १० अध्याय असून ओवीसंख्या १५३० आहे. ब्रह्मजिनदासकृत 'जीवंधररास' आणि गुणभद्राचार्यकृत 'उत्तरपुराण' यांच्या आधारे जिनसागराने हे पुराण लिहिले आहे. जीवंधर हा हेमांगद प्रदेशाचा राजा, भगवान् महावीरांच्या वेळी–सनपूर्व ६ व्या शतकांत झाला, असे जैन पुराणात वर्णन आहे. जीवंधरकथेवर संस्कृतात वादीभसिंहकृत 'गद्यचिंतामणि' व 'क्षत्रचूडामणि' आणि हरिचंद्रकृत 'जीवंधरचम्पू' हे ग्रंथ लिहिण्यात आले आहेत. तामीळ भाषेतील तिरुतक्कदेवविरचित 'जीवकचिंतामणि' व गुजराती भाषेतील ब्रह्मजिनदास–विरचित 'जीवंधररास' हेही ग्रंथ जीवंधरकथेवरचेच आहेत.

जीवंधराची कथा शृंगार व वीर रसांनी ओथंबलेली आहे. जीवंधराचा पिता सत्यंधर हा हेमांगदाचा राजा असताना मंत्री काष्ठांगार याने विश्वासघाताने राज्य बळकावले व त्याचा खून केला. सत्यंधराची गर्भवती राणी युक्तीने वाचली व तिने स्मशानात जीवंधरास जन्म दिला. गंधोत्कट नावाच्या धनिकाने जीवंधरास गुप्तपणे आपल्या घरी वाढविले. जीवंधराचा पराक्रम दिवसेंदिवस वाढू लागला. अनेक सुंदर व सुविद्य कुमारिकांशी त्याचा विवाह झाला. शेवटी आईची व त्याची भेट झाली. गोविंदराजाच्या सैन्याच्या साहाय्याने जीवंधराने काष्ठांगाराचा पराभव केला. शेवटी जीवंधराने भ. महावीराच्या हस्ते दीक्षा घेतली व तो निर्वाणास गेला. अशी जीवंधराची कथा आहे.

**जिनसागराचे गुरु व काल** :—

सन १७२४ ते १७४४ च्या दरम्यान जिनसागराने आपले काव्य केल्याचे आरंभी सांगितले आहे. त्याचे गुरु देवेंद्रकीर्ती होते. सन १७०० पासून १७४४ पर्यंतचे त्यांच्या संबंधीचे उल्लेख मिळतात. देवेंद्रकीर्ती हे बहुश्रुत व व्यासंगी भट्टारक होते. कारंजा व मराठवाड्यातील शिरड ( शहापूर ) येथे देवेंद्रकीर्ती राहात असत. जिनसागराने आपल्या काही रचना कारंजाला केल्या आहेत तर काही रचना शिरडला केल्या आहेत. जिनसागराचाही प्रभाव त्याच्या भट्टारकाप्रमाणेच होता. त्यांचीही शिष्यपरंपरा होती व त्यांत विजापूरकडचे लोकही होते हे जिंतूर येथील हस्तलिखितांवरून[६] दिसून येते.

---

६. जिंतुर हस्तलिखित क्रमांक २, अभ्यासाची साधने पाहा.

## ● लक्ष्मीचंद्र ( सन १७२८ ) :—

लक्ष्मीचंद्र यांच्या ' मेघमालाव्रतकथा ' व ' जिनरात्रीव्रतकथा ' अशा दोन रचना उपलब्ध आहेत.

**मेघमालाव्रतकथा** :—ग्रंथ फक्त ६९ ओव्यांचा आहे. पण त्याची प्रशस्ती[7] मात्र मोठी वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यावरून लक्ष्मीचंद्रांच्या स्थलकालाचा बोध होतो. शिवाय सभेमध्ये अशा कथा गाण्याची चाल त्या काळी कशी प्रचलित होती हेही शेवटच्या काही ओळींवरून प्रकट होते. मान येथील चंद्रप्रभ जिनालयात शके १६५० रविवार ज्येष्ठ शु॥ प्रतिपदेच्या दिवशी लक्ष्मीचंद्राने हा ग्रंथ पूर्ण केला. कडतासा रेवडी याने ती कथा आणली – कडतासा कमलापुरे याने ती प्रकट केली आणि गोविंदा कवड्याने सभेमध्ये ती गाऊन दाखविली.

मेघमालाव्रत हे भाद्रपदाच्या पहिल्या पाच दिवसात करतात. वत्सराज नामक श्रेष्ठीला हे व्रत आचरल्याने कोणते फळ मिळाले हे कथेत दाखविले आहे. संस्कृतमध्ये श्रुतसागरकृत ' मेघमालाव्रतकथा ' उपलब्ध आहे.[8]

**जिनरात्रिव्रतकथा**।—१५८ ओव्यांची ही छोटा एक व्रतकथा आहे. या ग्रंथात मात्र कालोल्लेख न करता केवळ स्थलोल्लेख[9] केला आहे. मरीच्याच्या जीवाने सिंहभवात हे व्रत चारणमुनींकडून धारण केले आणि आचरिले. त्यामुळेच त्याला तीर्थंकरपदाचा बंध पडला व नंतर तो जीव महावीर झाला. असा या व्रताचा प्रभाव दाखविला आहे.

---

७. मान नाम नगर रम्ये । चंद्रप्रभ जिनालय ।
गुरु वंदिला महायति । कृपासागर ॥ ६६ ॥
लक्ष्मीचंद्रकृतकथा । जानिजे तुम्ही समर्था ।
मेघमाला व्रतकथा । सपूर्ण जाली ॥ ६७ ॥
सके सोलासे पन्नास । जेष्ट सुद प्रतिपदास ।
अइतवारी पूर्ण वेश । पूर्ण केली ॥ ६८ ॥
कडतासा रेवडिनें आणिली । कडतासा कमलापुरेन प्रगट केली ।
गोविंदा कवड्यानें गाइली । सभेमाजी ॥ ६९ ॥

८. म. सा. पत्रिका, जा. फे. मार्च, १९५६.

९. मानाख्ये नगरे रम्य चंद्रप्रभ जिनालय ।
जिनाल्यस्य गृहे चैव । लक्ष्मीचंद्रकृतं कथा ॥ १ ॥
द्वासप्तती सुवर्णायु । कनकाभ सिंह लांछनं ।
श्रीमान् सत करो वीर । पायाद भव्य सदा मुदा ॥ २ ॥
( जिनरात्रिव्रतकथा – शेवटी )

त्या व्रताचा विधी – माघ व॥ १४ ला उपवास, चोवीस जिनपूजा, महाभिषेक, चौदा अष्टके, रात्री जागरण, चौदा वर्षे हे व्रत करावे असे सांगितले आहे.

लक्ष्मीचंद्र – काल :–

वरील दोन्ही ग्रंथांतून लक्ष्मीचंद्र मान ( मानवत ) येथे राहात होते. तेथील चंद्रप्रभ मंदिरात राहून शके १६५० च्या सुमारास वरील रचना केल्या इतकी माहिती मिळते. संस्कृताचेही ज्ञान व वाचन त्यांचे चांगले होते असे या ग्रंथावरून दिसून येते. व्रतकथा असूनहि एखाद्या आख्यानक काव्याची रसवत्ता येथे लक्ष्मीचंद्राने आणली आहे. लक्ष्मीचंद्राने दोन्ही ग्रंथांत गुरुस नमन केले आहे पण त्यांचे नाव मात्र दिले नाही.

● अर्जुनसुतसोयरा ( सन १७४६ ) :–

अर्जुनसुतसोयरा अशा नावाने याच काळात काही रचना झाल्या आहेत. अर्जुनसुत आणि हा सोयरा यांचे कौटुंबिक संबंध काय होते हे कळण्यास मार्ग नाही. पण या व्यक्ती भिन्न होत्या इतके मात्र निश्चित वाटते.

**कर्माष्टमी कथा** :—अर्जुनसुत सोयरा याची 'कर्माष्टमी कथा' ही महत्त्वाची व्रतकथा आहे. यात ११७ ओव्या आहेत. हा अर्जुनसुतसोयरा कन्नड भाषा जाणणारा असावा. कारण ग्रंथस्तीत[१०] कन्नड भाषेतील एका सुंदर कथेवरून ही कथा मराठीत आणल्याचे कवीने सांगितले आहे. संवत १८०२ आषाढ शु॥ अष्टमीस ही रचना पूर्ण झाली.

आषाढ, कार्तिक, फाल्गुन या मासांमध्ये येणाऱ्या कोणत्याही नदीश्वर पर्वातील अष्टमीच्या दिवशी या व्रतिकांनी हे व्रत करावयाचे असते.

अर्जुनसुतसोयरा–गुरु व काल :—

अर्जुनसुतसोयरा याने आपल्या गुरुचे नाव ' समंतभद्र ' असे दिले आहे. स्वतः अर्जुनसुतसोयरा हा देउळगावचा बघेरवाल ज्ञातीतील ' चवरिया ' गोत्राचा

---

१०. ऐसि कथा अपूर्व कानडे भासी । होति सुंदर करनाटक देसि ।
ते त्या सायासि मन्हाट भासी । लघुबुधी केली असे पै ॥ ११२ ॥
दक्षण देशा माझारि । देउलगावे नगरी ।
बघेरवाल ज्ञाति बरी । गोत्र चवरिया जात ॥ ११३ ॥
अर्जुनसुतसोयरा म्हणे । मी अर्थाअर्थ काही नेणें ।
समंतभद्रस्वामीचे वचने । कथा केलि पवित्र ॥ ११४ ॥
संवत अठरासे दोन । आषाढ सुध अष्टमी जान ।
कथा केली परिपूर्ण । सारजा प्रसन्न जाली पै ॥ ११७ ॥– कर्मा. क.

होता. ' समंतभद्र ' भट्टारक सेनगणात होऊन गेले. पण संवत १८०२ शी अद्याप त्यांचा काल जोडला गेला नव्हता. या कर्माष्टमी कथेतील उल्लेखाने हा दुवा प्रथमतःच जोडला जात आहे.

अर्जुनसुतसोयराने प्रशस्तीतील चंद्रप्रभ मूर्तीचा[11] उल्लेख देऊळगावी असल्या-संबंधी केला आहे. तसाच उल्लेख " कैलासछप्पय[12] " या हिंदी रचनेतही केलेला आहे हा अर्जुनसुतसोयरा ' अर्जुनसुत ' पासून वेगळा आहे असे मानावे लागते. रविवारव्रतकथा लिहिणाऱ्या यमासाचा हा कोणी नातलग असावा.

● **तानूपंडित ( सन १७५१ नंतर ) :—**

तानू पंडिताच्या नावावर समवसरण–आरती, पार्श्वनाथ–आरती व क्षेत्रपाळ-आरती अशा तीन आरत्या उपलब्ध आहेत. समवसरण आरती ही विशेष महत्त्वाची आहे. काष्ठासंघातील भट्टारकांचा ' विख्यातकीर्ति ' म्हणून त्याने उल्लेख केला आहे. तीनही आरत्यांचा अंत्यभाग पुढीलप्रमाणे आहे :

*समवसरण आरती :—*

काष्टासंघ गुरु विख्यातकीर्ति । देश विदेशान ॥
तानु विनवी प्रभु तुजला । अविचल पद मज दे वहिला ॥ ५ ॥

*पार्श्वनाथ आरती :—*

संसारसिंधु भरियला उन्मनू । नाम तुझ ताराबया समर्थु
तानो पंडित यइल शरणांगतु । चरणि सेवा मागे अखंडितु ॥ ५ ॥

*क्षेत्रपाळ आरती :—*

" जे तुज नीत्ये ध्याती । तया वीघ्न काय करीती ।
पंडित तंनु ह्मणे । भक्ता द्यावें वरदान ॥ ७ ॥ "

तानू पंडिताने एका हिंदी[13] रचनेत कारंजाच्या भट्टारक पीठावरील शांतिसेनाचा उल्लेख केला आहे. ते शांतिसेन शके १६७३ च्या सुमारास झाले. त्याच सुमारास तानू पंडित झाला असे म्हणावे लागते.

● **यमासा–अर्जुनसुत ( इ. स. १७५१ ) :–**

यमासा अर्जुनसुत या नावाचा एक चांगल्यापैकी कवी शके १६७३ ( सन

---

११. चंद्रनाथ स्वामिचि मूर्ति । त्रीभुवनी तयाचि किर्ती ।
पुजितां होय विरति । ज्ञानाची देशा ॥ ११६ ॥–कर्माष्टमी कथा

१२. देवलगांव पवित्र निहां जिनमंदिर सोहे । चंद्रनाथनी मूर्ति देखि सुरनर मन मोहे ॥ म. सं. पृ. २१.

१३ म. सं. पृ. ३४.

१७५१ ) च्या सुमारास झाला. त्याने 'रविवारव्रतकथा' लिहिली आहे. त्याशिवाय मराठीत त्याची दुसरी कोणतीच रचना पाहावयास मिळाली नाही.

**रविवार-व्रतकथा** :— मराठीत पुण्यसागर, जिनसागर, यमासा आणि महतीसागर ( आदित्यवार कथा ) अशा चार कवींनी रविवारव्रतकथा लिहिली आहे. पण त्या सर्वांत यमासाची रचना भारदस्त असून साहित्यगुणांनी संपन्न आहे. शार्दूल-विक्रिडितादि अक्षरगणवृत्तांतून व पंडिती थाटातून लिहिलेले हे एक कलाकाव्य आहे. प्रासादिकता आणि रसवत्ता यामुळे या काव्याचा दर्जा बराच उंचावला आहे.

केवळ काव्य म्हणून ही रचना जशी श्रेष्ठ आहे तशीच सामाजिक अभ्यासाच्या दृष्टीनेही ती अभ्यसनीय आहे. या काव्याची श्लोकसंख्या ३२६ आहे. वृत्तवैचित्र्य आणि सालंकारिकता यामुळे या काव्याचा समावेश कलाकाव्यात करावा लागतो. तत्कालीन विवाहविधीचे सांगोपांग वर्णन या काव्यात पाहावयास मिळते. कवीने मंगलाष्टकेही रचिली आहेत. महाराष्ट्रातील प्रसिद्ध अशा तत्कालीन कापडबाजाराच्या पेठांचा उल्लेख कवीने या ग्रंथात केला आहे. परंपरागत रविवारकथाच येथे विस्ताराने सांगण्यात आली आहे. ( पुण्यसागर पाहा. )

काव्याचा आरंभ पुढील श्लोकाने झाला आहे —

" श्री चिंतामणिरत्नरूपप्रतिमा देवाधिनाथा नमूं ।
तो श्रीशुद्ध धरोनि भाव हृदइं दाता कवित्वा गमूं ॥
नानाशास्त्र कलाविशाल विमला स्फूर्ति कवित्वा करी ।
स्वामीनाथ सनाथ नाथ करितो दासाप्रति सादरी ॥ १ ॥ "

ग्रंथाची प्रशस्ती बरीच विस्तृत असून तीत कवीने आपल्या गुरुपरंपरेचा, गावाचा व ग्रंथ पूर्ण ज्या शकात झाला त्या शकाचा उल्लेख केला आहे. सेनगणांपैकी भट्टारक शांतिसेन हे यमासाचे गुरु होते. 'वत्सगुल्म' म्हणजे वाशीम येथे ही काव्यकृती शके १६७३ मध्ये पूर्ण झाली. सनूसा हा यमासाचा शिष्य होता. त्याला कवीने ही कथा उपदेश म्हणून सांगितली आहे. 'आदित्यअभिधान रास' असे या काव्याचे नाव आहे.[१४]

---

१४. मुंडादंडप्रचंडपंडित मुखि मार्तन्ड डोलीतसे ।
वैसोनि हृदइं ग्रहमुखि सदा स्वानंद बोलीतसे ।
येमासार्जुनदास पार्श्वनाथ प्रभुचा श्री वत्सगुरम मही ।
**ग्रंथादित्यभिधानरास** रचिली श्रोता सनु शिष्यहि ॥ ३२३ ॥
स्वानंदे मन आचरोन-रणि शकावरि डोलती ।
गेली कीर्त दिगंतरा कवि म्हणे शास्त्रीकुरे बोलती ।
पूर्वी ग्रंथपुराण संस्कृत कथा पाहोन स्वारंभिलें ।
प्राकृतार्थं काव्य छंद रचना मोभा...पावले ॥ ३२४ ॥

## यमासा आणि त्याचे गुरु :—

यमासाने वाशीम येथे रविवारव्रतकथा लिहिली. त्याच्या वडिलांचे नाव अर्जुनसा होते हे उघड आहे. हिंगोलीच्या ज्या पोथीत सदरहू रविवार व्रतकथा लिहिली आहे, त्या पोथीवर पुढील मजकूर लिहिलेला आहे.—"हे पुरान अर्जुनसुत येमासा तस्य पुत्र मानिक्सा रवने हिंगोलीकर लीखीतं।" यमासाच्या मुलाचे नाव माणिकसा होते आणि आडनाव रवने होते व तो हिंगोलीस राहात होता असे यावरून दिसून येते.

शांतिसेन हे यमासाचे गुरु होते. शांतिसेन सेनगण भट्टारक पीठावर इ. सन १७५१ ते १७५९ पर्यन्त होते. त्यानंतर त्या पीठावर सिद्धसेन भट्टारक झाले. त्यांचीही यमासाने हिंदीत एका ठिकाणी प्रशंसा केली आहे. शांतिसेन भट्टारकांनी कारंजा येथे चंद्रप्रभ व पार्श्वनाथ तीर्थंकरांच्या मूर्ति स्थापिल्याचा उल्लेख येतो.[१५]

**अर्जुनसुतकृत गुरु आरती :** अर्जुनसुत या नावावर 'गुरु-आरती' ही रचना उपलब्ध आहे. त्यांतील गुरुपरंपरा काष्ठासंघाची आहे. ती रचना पुढीलप्रमाणे आहे

"सुरेंद्रकीर्तिपट्टे लक्ष्मीसेन महाभूप।
तयाचे पट्टीं आला विजयकीर्तिस्वरूप।
पंचमहाव्रतधारी। सततत्त्वविचारी।
जिंतिले कर्म वैरी। कामक्रोध जीवारी।
चैत्र शुद्ध पाहा। झाले पूर्णमी दिने।
उपदेश थोर केला। भव्य जीवालागुन।
नामकर्म थोर आहे। काष्ठासंघ गच्छपति।
अर्जुनसुत म्हणे। जयो जयो विजयकीरती॥"

येथे शकाचा उल्लेख न करताच अर्जुनसुताने चैत्र शु॥ पौर्णिमेला विजयकीर्तींनी उपदेश केल्याचा उल्लेख केला आहे. याप्रमाणे अर्जुनसुत-यमासाची गुरुपरंपरा सेनगण व काष्ठासंघ अशी दोन्हीकडची दिसते.

---

शांतिसेनकृपेकरूनि वदनीं वाग्वादिनी हे स्वता।
येमासार्जुनसुत संगत असे सत्तमायनि हे कथा।
शिष्या हे व्रत आचरील नर जो स्त्री कर्णरंध्री सुणें।
त्यासि स्वर्ग मिळताच धन्य भूमि श्री वत्सगुल्मीं सुखें।
शके सोळसे शीयाउर्वार असे। सुदक्ष नमानयोदशी दिसे।
माणि उत्तरार्धे मीनवार हो। ग्रंथ पूर्ण हा ते दिनीं सारहो॥ ३२८॥
—रविवारव्रतकथा (यमासा).

१५. म. सं. पृ. २१ व २५.

● **रतनसा** ( इ. सन १७६९ ) :—

हाही सिद्धसेनाचा शिष्य होता. त्याने सिद्धसेनावर एक आरती रचली असून त्यात त्याचे चरित्र १० कडव्यांत सांगितले आहे.

**सिद्धसेन गुरू आरती :—**

" श्री मूळ संघाचे मंडन सकळकळा परिपूर्ण ।
पुष्कर गच्छाचे निधान गुरु गौतम जाण ॥ १ ॥
शांतिसेनजीचे कर सिरी करवीर कोल्हापुरी ।
तेथुन चालले निरधारी कार्यंरजकपुरी ॥ २ ॥
सेनगणाचे पटधारी सर्वांसी अधिकारी ।
श्री सिद्धसेन गुरु सुखकारी तत्वातत्व विचारी ॥ ४ ॥
संमत अठरासे सवीस वैशाख कृष्णपक्ष ।
द्वादशि तिथिस चरणासी रतनचा लय लक्ष ॥ १० ॥ "

संवत १८२६ मध्ये ही आरती रचली आहे. सिद्धसेन हे करवीर-कोल्हापूरहून कारंजा ( विदर्भ ) येथे भट्टारक म्हणून गेले असा इतिहास येथे सांगितला आहे.

● **दिनासा** ( इ. सन १७७० )

मराठीत दिनासाच्या दोन रचना उपलब्ध आहेत. तेरा ओव्यांची 'बारमासी' आणि ६ कडव्यांचे ' चितो रे माझ्या मना ' हे गीत अशा त्या दोन कृती आहेत.

**बारमासी :—** हिंदीत व गुजराथीत बारमासी हे एक आवडते लोकगीत समजले जाते. विरहिणींची अवस्था वर्षाच्या प्रत्येक महिन्यात कशी होत जाते याचे वर्णन अशा गीतात केलेले असते. नेमिनाथानी विवाहापूर्वीच राजीमतीचा त्याग केला. तिचे जीवनपुष्प त्यामुळे कोमेजून गेले. तिच्या विरहाच्या यातना या बारमासीत दिनासाने व्यक्त केल्या आहेत. यांत फक्त १३ च ओव्या आहेत. पण प्रत्येक ओवी भावपूर्ण आहे. प्रत्येक महिन्याचे वैशिष्ट्य भारतीय आर्य स्त्रीच्या दृष्टिकोनातून टिपले गेले आहे.

शेवटच्या ओळीत कवीने आपल्या नावाचा व जातीचा उल्लेख केला आहे. ती ओवी अशी आहे :

" द्वादशमास संपूर्ण । नेमि पावले निर्वाण ।
राजमती तपाच्या बळें । जाली देवनंदन ।
बघेरवंश दिनासा । नित्य वंदी चरण ॥ १३ ॥ "

या काव्याच्या शेवटी जितुरच्या हस्तलिखित क्रमांक ५ मध्ये " सके १६९२ मीति आश्विन सुद गुरौ " असा उल्लेख आहे. तो या कृतीचाच आहे.

**चितो रे माझ्या मना :—** हे पद वैराग्यभावनेने ओथंबलेले आहे. पदाच्या चौथ्या कडव्यात– " माता पिता हे पुत्र रानी । हे तर सुखाची खानी ।

यमदूत नेतील घेउनी । क्षण नर ( न ) ठेवी कोणी । लावीती आगिनी । " असे संसाराचे वर्णन केले आहे. कवी शेवटी म्हणतो, " दिनासा मनीं म्हणे । नीत दीन चिंतने । जिनराया याचुनी गा तारील कोण ॥ ६ ॥ "

दिनासा हा शके १६९२ च्या सुमारास झाला. तो खंडेलवाल जातीचा होता इतकीच त्याची माहिती मिळू शकते.

● राघव–( इ. स. १७७० ते १८३५ ) :–

कवी रघु किंवा राघव या नावाचा हा कवी अठराव्या शतकाच्या अगदी उत्तरार्धात झाला आहे. त्याची ग्रंथरचना काही पाहण्यात आली नाही. पण किरकोळ प्रासंगिक रचना व काही पदे मात्र दिसतात.

वर्धासेटि–महात्म्य, सिद्धसेनस्तुति आणि इतर सात वेगवेगळी पदे एवढें त्याचे साहित्य प्रसिद्ध[१६] झाले आहे.

नागपूर येथे खंडेलवाल जैन समाज बऱ्याच मोठ्या संख्येने राहू लागल्यानंतर तेथील मोसले राजघराण्याकडून त्या समाजास बरेच संरक्षण मिळाले असावे. प्रत्यक्ष नागपूरला जरी भट्टारकांचे पीठ प्रस्थापित झाले नाही तरी पूजा प्रतिष्ठा यांचे प्राबल्य तेथे वाढले याचा पुरावा म्हणजे राघवकविकृत 'वर्धासेटिमहात्म्य' होय. इ. स. १७८१ च्या सुमारास वर्धासा नावाच्या धनिकाने मंदिर बांधवून त्याची प्रतिष्ठा करविली, त्या प्रतिष्ठेच्या निमित्ताने रघू–राघव याने हा व्यक्तिमाहात्म्य दाखविणारा पोवाडा रचला असावा. हा पोवाडा चौऱ्याहित्तर अक्षरा कडव्यांचा आहे. नागपूरकर मोसले घराण्यातील बापूसाहेब, नानासाहेब आणि आबासाहेब या व्यक्तींचा उल्लेख आणि वर्धासाचे घराण्याचा इतिहास यामुळे या पोवाड्याला ऐतिहासिक साधनाचे महत्त्व आहे.[१७]

सिद्धसेनस्तुतीत राघव कवीने कारंजा नगरास मनोहर म्हटले आहे व तेथील जिनमंदिरातील त्रिकाळपूजा व विधिविधानाची महती गाइली आहे. भट्टारक सिद्धसेनांची त्याने मनोभावे स्तुती केली आहे.

" या दो वचनें जे प्रियकर ते दया कृपामूर्ति
कर जोडोनि म्हणे राघव करुणा असु द्यावी चित्तीं ॥ "

असा या स्तुतीत कवीने स्वतःचा उल्लेख[१८] केला आहे.

आदिनाथ तीर्थंकराचे गर्भकल्याणिक त्याने एका पदात वर्णिले असून त्याने त्यात स्वतःला 'रघु' म्हटले आहे. गुरु म्हणून पद्मकीर्तींचा उल्लेख केला आहे.

---

१६. सन्मति, सप्टेंबर १९६३, कवि राघव–डॉ. जोहरापुरकर.
१७. युगवाणी, ऑगस्ट १९५८, वेमवशाली नागपुरात काहीं क्षण–डॉ. जोहरापुरकर.
१८. म. सं. पृ. २५.

दुसऱ्या एका पदात—

" षड्वैरी जिंकुनि जाला कामरहित ।
भट्टारक पद्वी जाली लातुरांत ॥

या शब्दात विशालकीर्ती भट्टारकांची स्तुती केली आहे.

पंचणमोकार मंत्राचे महत्त्व सांगणारे एक पद त्याने लिहिले आहे. " न कळे पार गुण अपार ज्याचा किती वर्णु महिमा थोरी । पहा धर्मामृत मूळ ग्रंथीं हे साक्ष असे गा निर्धारी ॥ " या शब्दात कवीने या पदात गुणकीर्ती आचार्यांच्या ' धर्मामृत ' या मराठी ग्रंथाचा उल्लेख केला आहे. याच पदात महतीसागरांना ' सद्गुरु ' म्हणून तो संबोधतो.

एकंदरीत सिद्धसेन, पद्मकीर्ती, विशालकीर्ती आणि महतीसागर या चार व्यक्तींचा तो गुरु म्हणून उल्लेख करतो. त्या सर्वांचा विचार करुन डॉ. जोहरापुरकरांनी राघवाचा कालनिर्णय हा सन १७७० ते १८३५ हा ठरविला[१९] आहे.

● **अनंतकीर्ती** ( सन १७७५ ) :—

याची ' दशलाक्षणिकव्रतकथा ' उपलब्ध झाली आहे. हा लातूर येथील बलात्कारगण पीठाच्या शिष्यवर्गापैकी आहे.

**दशलाक्षणिक व्रतकथा** :—१८८ ओव्यांची ही कथा आहे. ब्रह्मजिनदासकृत दशलाक्षणिक रास गुजरातीत आहे. त्यावरुन ही कथा मराठीत आणली आहे.[२०]

या कथेत–दशलाक्षणिक व्रताचा विधी–तो पाळण्याने मिळणारे फळ आणि हे व्रत मुळात ज्यांनी केले त्याच्या कथा–सांगितल्या आहेत. उत्तमक्षमादि दशधर्माचे हे व्रत आहे. नयरपुरचा राजा प्रियंकर व राणी प्रियंकरा याना कमळसेना नावाची कन्या होती. तिने वनात मुनींस या व्रताचा विधी विचारला.

भाद्रपदमासातील शुक्लपक्षात पंचमीपासून या व्रताचा आरंभ होतो. अनंतचतुर्दशीस हे व्रत संपते.

अनंतकीर्तींनी ही कथा जैसिंगपेठ येथील आदिनाथ मंदिरात लिहिली आहे. रुपास नेवा याच्या विनतीवरुन त्याने ही कथा मराठीत लिहिली. अनंतकीर्ती यांच्या

१९. सन्मति, सप्टेंबर, १९६३, ( कवि राघव हा लेख )
२०. चारठाणा व्रतकथा हस्तलिखित क्र. १ पृ. ७१.

" दशलाक्षणीक धर्म ह तणे । कथा आती वखाणी ।
यह कथा सुन विकरी भवियण तम्हे सुजाण ।
सुललीत धर्म आचरो । त्रिभुवन तारण हार ।
श्री सकलकीर्ति पाय प्रणमेणू । ब्रह्म जिनदास भणे सार ॥ "

गुरुचे नाव चंद्रकीर्ती होते. अनंतकीर्तीने ही कथा शके १६९७ मध्ये लिहिली आहे. या सर्व गोष्टी त्याने कथेच्या प्रशस्तीत[11] व्यवस्थित सांगितल्या आहेत.

**अनंतकीर्ती – गुरु व काल :—**

शके १६९७ चा तर अनंतकीर्तीने उल्लेखच केला आहे. लातूर पीठावर चंद्रकीर्ती भट्टारक गुणकीर्तीनंतर झाले. अनंतकीर्तीने गुणकीर्तीचाही उल्लेख केला आहेच. जनार्दन यानेही श्रेणिकचरित्रात चंद्रकीर्तींचा उल्लेख केला आहे. जनार्दनाची[12] ती रचना शके १६९७ मध्ये पूर्ण झाली आहे हे विशेष होय.

● **जनार्दन – ( सन १७७५ ) :—**

प्राचीन मराठी साहित्यिकात १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात जनार्दन हा एक श्रेष्ठ दर्जाचा कविवर होऊन गेला. त्याचा एकच ग्रंथ जरी उपलब्ध होत असला तरी त्यावरूनही त्याची योग्यता सहज सिद्ध होण्यासारखी आहे.

**श्रेणिकचरित्र**[13] :—अक्षगुणदासाने १५ व्या शतकात एक श्रेणिकचरित्र लिहिले होतेच. त्याच्याच आधारे[14] हा ग्रंथ कवी जनार्दनाने काहीसा विस्ताराने लिहिला आहे.

---

२१. **ब्रह्म जिनदास** रासकथा । तयाचा पाहोनि केला उत्था ।
माया मन्हाष्ट कथा । रचिलि पै ॥ १८० ॥
**मुनि गुणकीर्ति** गुनविशाल । तपे जैसा भान केवल ।
द्वादश कला आकाशमंडल । त्रिमिर हरि ॥ १८१ ॥
तयाचा सिसे गुणनिधान । **निर्सापतिच** अभीधान ।
तयाचे ज्ञान संपूर्ण । विस्तारले ॥ १८२ ॥
**जैसिंगपेठ** विख्यते । तो आदिनाथ साक्षाते ।
ते माझे कुलदैवते । प्रसादु त्याचा ॥ १८६ ॥
**नेवा रुपासा** याचे निरोपने । आद्या मन्हाष्ट करोनि सगने ।
मग पडले कारन । तयासाटि ॥ १८७ ॥
**रसि नारायण घेउन** । शट **चेंद्र** आदि जान ।
नममास वीजदीन । वद्य पक्षे इति ॥ १८८ ॥

२२. श्रे. च. ज. अध्याय ४०.२७८.

२३. जिनदास नारायण चवडे, वर्धा योंनी शके १८२६ मध्ये प्रकाशित केले. प्रस्तावनेत त्यांनी लिहिले आहे. की, " प्रथम हे श्रेणिकपुराण दोन तीन ग्रंथ एकत्र मिळवून त्यांतील सरळ शब्दांनी म्हणजे बरोबर शब्दांचा अर्थ लागत नसे तेथे ओवी अल्पमतीने जुळविली आहे व एकदाचा ग्रंथ पूर्ण केला आहे. "

२४. गुणब्रह्माची ही वाणी । जे पूर्वी वचन वदले ॥ ५.१२ ॥ — श्रे. च. ज.

४० अध्यायांचा हा ग्रंथ म्हणजे एक पुराणकाव्यच आहे. ग्रंथाची भाषा अत्यंत प्रौढ आणि रचना श्रेष्ठ दर्जाची आहे. केवळ धार्मिक ग्रंथ नव्हे तर प्रतिमासंपन्न कवीचे हे काव्य आहे. एकनाथादि कवींच्या ग्रंथाच्या वाचनाने कवीची दृष्टी विस्तारली आहे. रुक्मिणी-स्वयंवरातल्या काही कल्पना या काव्यात स्पष्टपणे पाहण्यास मिळतात. मुळापेक्षा विस्तारही तो नवरसांच्या अभिव्यक्तीसाठी करतो. काव्याचा विषय श्रेणिक राजाचे चरित्र आहे. महावीर समकालीन हा राजा म्हणजे जैन पुराण ग्रंथातील श्रोता व समानायकत्व होय. अनेक आख्यानोपाख्यानांनी हे चरित्र भरले आहे.

**जनार्दन-व्यक्ती :**— ग्रंथाच्या प्रशस्तीत[२६] कवीने आपली व आपल्या गुरुपरंपरेची बरीचशी माहिती दिली आहे. जनार्दन याचे गुरु चंद्रकीर्ती होते. त्यांचा उल्लेख कवीने 'रोहिनीकांत प्रदि सकलकीर्ति' ( १.६ ) 'रजनीकांत षोडश कलाकीर्ति' ( १.१६१ ) 'रजनीकीर्ति' ( ४.४२ ) 'निशीकीर्ति' ( ५.१३७ ) इत्यादि नावांनी केला आहे. स्वतःला जनार्दनाने 'शांतिसुत' 'संतसुत' असे म्हटले आहे. तो शेतवाळ ज्ञातीतील होता. चंद्रकीर्ती यांचे शिष्य माणिकनंदी यांचा जनार्दन हा नातलग ( सजन ) असावा. वासिमजवळ नहसी तालुक्यात शर्कराग्राम येथे जनार्दन याने ग्रंथ पूर्ण केला. स्वतःला तो श्रावक म्हणवितो. ( २२.२७१ )

त्याच्या काळी कदाचित् संस्कृत मराठी वाद पुनः उद्‌भवला होता की काय असे वाटते. मराठीची तरफदारी त्याने केलेली पाहण्यासारखी आहे. ( २४.२०० )

**जनार्दनाचे गुरु-काल :—**

जनार्दनाने १६९७ शकेमध्ये श्रेणिकचरित्र लिहिले. त्यावेळी लातूर पीठावर भट्टारक चंद्रकीर्ती होते. चंद्रकीर्तीनंतर माणिकनंदी भट्टारक झाले असे म्हणण्यास श्रेणिकचरित्रात आधार मिळतो. पण दशलाक्षणिक व्रतकथेवरुन चंद्रकीर्तीनंतर अनंत-

---

२५. येथे कासिया विस्तार । ऐसें न वदावे जे श्रोते चतुर ।
नवरस कथेचा प्रकार । याच चरित्रीं आणिला ॥ ३९.१४५ ॥ — श्रे. च. ज.

२६. त्याचा शिष्य क्षमाशील । जो चंद्रकीर्ति विशाळ ।
त्याचे मम माथा करकमळ । गुरु दयाळ तो माझा ॥
त्याचे अंशीं महारत्न । माणिकनंदी निर्ग्रंथ पूर्ण ।
त्याचा सजन जनार्दन । श्रावक जैन गृहाश्रमी ॥
भरत क्षेत्रामाझारी । बोलती गिरि वासीम नगरी ।
त्याचे तळी नहसी शहरी । तत्र थोर जाण पां ॥
त्याचेहि तळी शर्कराग्राम । तो मज दीनाचा विश्राम ।
अति धार्मिक जनोत्तम । नृप परमभक्त राज ॥ — श्रे. च. ज.
४०. २७०–२७१.

कीर्ती भट्टारक झाले असावेत. कारण शके १७०२ मध्ये अनंतकीर्ती भट्टारकांचा उल्लेख[२७] मिळतो. अनंतकीर्तीने आपल्या ग्रंथात माणिकनंदीचा उल्लेख केला नाही. म्हणून माणिकनंदी हे भट्टारक नसून एक निर्ग्रंथ गुरु पण चंद्रकीर्ती यांचे शिष्य असावेत. काही संशोधक[२८] माणिकनंदीस भट्टारक मानतात.

● भीमचंद्र ( ई. सन १७८१ ) :—

हा लातूरचे अनंतकीर्ती यांचा शिष्य होता. पण त्यानंतर तो कारंजा भट्टारकांच्या शिष्यवर्गात सामील झाला असावा. त्याची फक्त एक आरती उपलब्ध आहे. पण ती भट्टारकांच्या पीठाच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे.

गुरूंची आरती :—

आनंदे उतारिन आरती । श्रीगुरुचे चरणी ।
संसयनासन वुद्धि प्रकासी पट मारग ध्यानी ।।
डीळी तक्त मळियाद्रि सींव्हासन परंग होंवुचे सोहे ।
श्री पद्मावती माय विराजीत देखत मन मोहे ।। ३ ।।
देशे वराड नगर कारंजी चंद्रप्रभू स्थानी ।
सरस्वती गछे वलात्कार गणे मूळसंघ जाणे ।। ४ ।।
धर्मचंद्रगुरु धैर्यधुरंधर । त्याचे पटस्थानी । देविंद्रकीर्ति ।
महामुनि विराजे पंचेतत्वज्ञानी ।। आनदे ।। ५ ।।
सारासार वीचारन स्वामी पाहत सुखकंदा । कर जोडुनी हे
विनती करितो पंडित भीमचद ।। आनदे ।। ६ ।।

अशी ही आरती परंपरेच्या इतिहासात महत्त्वाची आहे.

भीमचंद्र–गुरु व काल :—

आरतीत धर्मचंद्र व त्याचे शिष्य देवेंद्रकीर्ती या कारंजा बलात्कारगणपीठावरील भट्टारकांचा उल्लेख आहे. संवत १८४० ते १८५० मध्ये देवेंद्रकीर्ती यांचे उल्लेख[२९] मिळतात. त्याच्याशी भीमचंद्राची ही आरती सुसंगत आहे. भीमचंद्राचा यापूर्वीचा उल्लेख संवत १८३७ चा आहे. त्यात अनंतकीर्तिस्वामींसाठी रुक्मिणीव्रतकथेची प्रत बनविल्याचा उल्लेख केला आहे. तो वसमत गावी पूर्वी राहात असावा. दिल्ली हे भट्टारकांचे मुख्य पीठ होते. मलखेड हेही महत्त्वाचे गुरुपीठ होते. होंवुसच्या पद्मावतीचा यावेळी वऱ्हाड भागात खूप प्रचार झाला होता असे दिसते.

२७. हिंगोली ह. प्र. क्र. ७ पाहा. ( अभ्यासाची साधने )
२८. म. सं. पृ. ८८.
२९. म. सं. पृ. ७८

**अठराव्या शतकाचा समारोप —**

या शतकात कालिकापुराणकार देवेंद्रकीर्ती, जीवंधरपुराणादी अनेक ग्रंथांचे कर्ते जिनसागर आणि श्रेणिकचरित्रकार जनार्दन हे फार महत्वाचे जैन कवी होऊन गेले. कालिकापुराणाचे महत्त्व सामाजिक इतिहासाच्या दृष्टीने फार मोठे आहे. जीवंधरचरित्र मराठीत एकच आहे आणि ते याच शतकात जिनसागराने तयार केले.

कारंजा, शिरडशहापूर, वासीम, कागल ( कोल्हापूर ) इत्यादि भागात मराठी जैन साहित्य या शतकात निर्माण झाले. जिनसागर, यमाबा अर्जुनसुत आणि जनार्दन यांची काव्ये काव्यदृष्टीने श्रेष्ठ प्रतीची आहेत.

यादवसुताने ' अष्टकर्मप्रकृति ' सारखा कर्मसिद्धांतावरील ग्रंथ याच काळात मराठीत निर्माण केला.

पंधराव्या शतकातील गुणकीर्तीने रचलेले 'पद्मपुराण' शेवटी अठराव्या शतकात औरंगाबाद भट्टारक पीठाच्या शिष्यपरंपरेतील पुण्यसागराने पूर्ण केले.

जैनेतर मराठी सारस्वताच्या इतिहासाकडे पाहिले तर या काळात श्रीधर, कृष्णदयार्णव, अमृतराय, भक्तलीलामृतकार महीपती, आणि मोरोपंत हे श्रेष्ठ साहित्यिक दिसून येतात.

## इ. स. १९ वे शतक ( पूर्वार्ध )

१९ व्या शतकाच्या पहिल्या पंचवीस वर्षात बरेच श्रेष्ठ दर्जाचे जैन कवी महाराष्ट्रात निर्माण झाले. १८ व्या शतकात विदर्भातील कारंजाचा कोल्हापूरशी जो संबंध आला त्या संबंधामुळे कोल्हापूरच्याही भट्टारकाचे विशेषतः जिनसेन मठाचे लक्ष मराठी साहित्य निर्माण करण्याकडे लागले.

१८ व्या शतकातील शेवटच्या भागात जन्मलेले कविवर संत महतीसागर यांच्या साहित्याने मराठी जैन वाङ्मयात 'तुकारामकाला'चा अवतार झाला. त्यांच्या अभंगांनी स्वतःचे असे वैशिष्ट्य निर्माण केले.

जरी प्राचीन मराठीची मर्यादा सन १८१८ पर्यंतच मानली जात असली तरी येथे मी ती १८५० पर्यंत वाढविली आहे. कारण त्याच जुन्या परंपरेतील काही ग्रंथकार तोपर्यंत निर्माण झाले.

१९ व्या शतकात साहित्यनिर्मिती, समाजातील स्थान व कालानुक्रम यांचा विचार करता महतीसागर हेच प्रथम येतात.

● **महतीसागर** ( जन्म इ. सन १७७२ ) —

कारंजा येथील भट्टारक पीठातून निघालेल्या शिष्यवर्गात महतीसागर हा शेवटचा श्रेष्ठ कवी होय. महतीसागर ही व्यक्ती फार लोकप्रिय होती. गुजराती जैन समाज महाराष्ट्रात वसाहत करून राहिल्यापासून त्याचा इकडच्या भट्टारक पीठाशी

अर्थात स्नेहाचा व भक्तीचा संबंध निर्माण झाला नव्हता. उत्तर सातारा, नगर सोलापूर, उस्मानाबाद या भागात हा समाज प्रामुख्याने वसाहत करून राहू लागला. कारंजा किंवा लातूर येथील भट्टारक पीठांचा व या समाजाचा संबंध महतीसागराच्या अगोदर आलेला दिसत नाही. हा संबंध महतीसागराने घडवून आणला. आपल्या सरळ स्वभावाने, कडक तपश्चर्येने आणि सुगम काव्यसंभाराने त्याने वऱ्हाडापासून सोलापूरपर्यंत आपला शिष्यवर्ग तयार केला व समाजावर छाप बसविली.

ब्रह्म महतीसागर या नावाने ते प्रसिद्ध आहेत. त्यांचा जन्म वऱ्हाडात अंजनेर[1] (शिंदुरजन) गावी सेतवाळ जैन ज्ञातीत शके १६९४ च्या सुमारास झाला. त्यांचा विद्याभ्यास कारंजा येथे भट्टारक देवेंद्रकीर्ती यांच्या सान्निध्यात झाला. मागधी, संस्कृत, हिंदी व मराठी ह्या भाषा त्यांना चांगल्या अवगत होत्या. शके १७३२ पर्यंत महतीसागर वऱ्हाडातच राहिले. नंतर ते दक्षिणेत आले. फलटण, दहिगांव, नातेपुते, मेढ्द या गावी त्यांनी धर्मोपदेश केला. शके १७५४ मध्ये कार्तिक व॥ २ ला दहिगाव येथे त्यांचे देहावसान झाले.

महतीसागरांच्या देहावसानानतर समाजात कोणती अवस्था निर्माण झाली याचे अगदी उत्तम वर्णन शंभर वर्षांपूर्वीच्या शिरडशहापूरहून दक्षिणीसमाजप्रमुखास पाठविलेल्या एका पत्रात शिरडशहापूरच्या पंचमहाजनांनी केले आहे. शके १७८२ मध्ये हे पत्र लिहिले आहे. भाषा हिंदीमिश्र गुजराती आहे. त्यातील पुढील वाक्यावरून महतीसागरांचे सामाजिक महत्त्व ध्यानात येते.

"हमारे वाहांसे तुम्हारे देसमे श्री श्री श्री महतीसागर स्वामीजी दधिपुर (दहिगांव) आयेके निर्वाण भयाजी ते दिनसे हम निराश्रित जिनधर्म प्रकाशविना हम लोक असमर्थ भयाजी। आपकी अनेक भवकी कमाई माटे श्री गुरु महतीसागर स्वामीके वरदायीक होजी।"

## महतीसागरांचे गुरु –

देवेंद्रकीर्ती हे कारंजा पीठावरील भट्टारक, महतीसागरांचे गुरु होते. ते पीठावर संवत १८४० ते १८५० पर्यंत होते.[2] संवत १८५० मध्ये शिरडशहापूर येथे त्यांचे समाधिमरण झाले. त्यांना दंडी देवेंद्रकीर्ती म्हणत. त्यांच्या चरित्रासंबंधी एक लावणी[3] महतीसागराने लिहिली आहे. ते मूळचे गौल्य देशातील होते. अधर पारख्री

---

१. महतीकाव्यकुंज या पुस्तकाच्या प्रस्तावनेच्या आधारे ही चरित्राची माहिती दिली आहे.

२. भ. सं. पृ. ७८.

३. महतीकाव्य कुंज, पृ. ९२.

चालवून त्यांनी आश्चर्य दाखविले होते अशी एक दंतकथा[४] असावी.

**महतीसागरांचे वाङ्मय :–** महतीसागरांचे बरेचसे वाङ्मय प्रसिद्ध झाले आहे. परंतु हस्तलिखिते मिळवून अजून त्या वाङ्मयाचे संशोधनपूर्ण संपादन झाले नाही. पण आज त्यांच्या उपलब्ध साहित्याचा येथे विचार करावयाचा आहे.

**महतीकाव्यकुंज**[५] :– अभंग, पदे, आरत्या, अष्टक व व्रतकथा इत्यादि महतीसागराच्या बहुतेक रचनांचे हे संकलन आहे. महतीसागरांच्या काव्यांचे प्रकाशन सन १९०३ पासून सुरू झाले. सन १९०३ साली वर्धा येथे जिनदास नारायण चवडे यांनी महतीसागरांच्या ६२ अभंग, ३४ तीर्थंकरपदे व उपदेशपदे २२ आणि २ आरत्या यांचे संकलन प्रसिद्ध केले. १९२६ साली त्याची दुसरी आवृत्ती काढली. १९२२ साली सखाराम नेमचंद दोशी यांनी ' श्री महतीसागराचे अभंग व श्री कवींद्रसेवकांचे अभंग ' या नावाने एक पुस्तक प्रसिद्ध केले. त्यात ६९ अभंग महतीसागरांचे आले आहेत. शके १८५० मध्ये नाना रामचंद्र नाग यांनी ६४ अभंग छापले. शके १८५१ मध्ये वीरचंद कोदरजी गांधी, फलटण यांनी " श्री आदिनाथ-पंचकल्याणिकोत्सवादि " छापले. त्यानी चोवीस तीर्थंकर पंचकल्याणिकोत्सव लिहिले आहेत. प्रकाशित साहित्यात " महतीकाव्यकुंज " हे महत्त्वाचे आहे.

यात—संबोधसहस्रपदी–६४ पदे, दर्शनाष्टक, पंचपरमेष्ठीगुणवर्णनपर अभंग १९, जिनस्तुती अभंग ३०, दानमाहात्म्य अभंग ३, स्वर्गवर्णन अभंग ३, पंचकल्याणिकवर्णन अभंग ३४, चोवीस तीर्थंकर पदे २४, अरहंताष्टक ( संस्कृत ), देवेंद्रकीर्तींची लावणी, सरस्वतीस्तोत्र, षट्कालवर्णन, चोवीस तीर्थंकर स्तुती, आदित्यवार कथा, दशलाक्षणिकव्रतकथा, रत्नत्रय व्रतकथा, षोडषकारण व्रतकथा, ज्वालामालिनी अष्टक ( संस्कृत, ) चौदागुणस्थानप्ररूपणा, चतुर्विंशति प्ररूपणा, याप्रमाणे साहित्य प्रसिद्ध झाले आहे.

संबोधसहस्रपदीचे ६२ अधिकार[६] महतीसागराना करावयाचे होते. पण ८ अधिकारच पूर्ण झाले. स्वर्गवास झाल्याने पुढील रचना झाली नाही. पंचकल्याणिकवर्णनाची रचना – बाळापुर येथे आदिनाथ मंदिरात शके १७३२ माघ व ॥ १४ स झाली. रविवारव्रतकथेची रचना रिद्धपूर शके १७२३ भाद्रपद शु ॥ ५ स झाली. सोलापूर येथे देवेंद्रकीर्ती भट्टारकांनी महतीसागरास प्रथम दीक्षा दिली.

---

४. " श्रीमद भट्टारक श्री १०५ दंड देवेंद्रकीर्ति मत्रवादी बिनभूयासे पालखी चलावनवाले अभे शहापुरमध्ये बर्गाविमे निर्वाणनिमंय पदधारी हुए सो जाननार्जी । उनकार्या अतिशय बहोत भारी है। " उपर्युक्त पत्र.

५. प्रकाशक, वीरचंद कोदरजी गांधी, फलटण, शके १८५७.

६. महतीकाव्यकुंज, पृ. ३.

शके १७११ मध्ये पहिला चातुर्मास मंगरुळ गावात झाला. महतीसागराने मराठीची थोर सेवा केली आहे.

आदिनाथ पंचकल्याणिकोत्सवात त्याने स्वतःच्या साहित्यरचनेसंबंधाने पुढील श्लोक लिहिले आहेत. ते महत्त्वाचे आहेत.

" प्रथम ते दशलाक्षणिची कथा ।
वर्दविली बहु आग्रहि मतकथा ।
मतकथा मज पोडशकारणी ।
वदविली गुरुने मज तारणी ॥ १४४ ॥
जाणोनि सद्गुरुचिन्हे मज वालि आश ।
कल्याणिकोत्सवकथा करिजे ममाना ।
वांछा धरोनि मनि आयु समास केला ।
कल्याणिकोत्सव तहा मग त्या रचीला ॥ १४५ ॥ "

गुरु देवेंद्रकीर्ती यांची इच्छा पूर्ण करण्यासाठी त्याने ही 'कल्याणिकोत्सवकथा' लिहिली. त्यांच्याच आग्रहाने त्याने प्रथम ' दशलाक्षणिक व्रतकथा ' लिहिली व नंतर ' पोडशकारणव्रतकथा ' लिहिली.

● दयासागर ( सन १८१३ ) —

हे दयासागर कोणाचे शिष्य होते हे समजत नाही. त्याचा मराठीत एकच ग्रंथ उपलब्ध आहे.

हनुमानपुराण — ७ अध्यायांचा हा ग्रंथ आहे. ब्रह्मजिनदासाच्या ' हनुमंतरास ' या ग्रंथावरुन हा मराठी ग्रंथ रचल्याचे कवीने सांगितले आहे. शके १७३५ फाल्गुन वद्य बीजेस मंगळवार दिवशी हा सात अध्यायांचा ग्रंथ पूर्ण झाल्याचे कवी प्रशस्तीत[७] सांगतो. अंजनापवनजयाची जी कथा पद्मपुराणात आली आहे तीच येथेही आहे. हनुमंताच्या पराक्रमाचे विशेष वर्णन केले आहे.

● रत्नकीर्ती ( सन १८१३ ) —

हा विदर्भाकडील कवी होता. याचा एकच मोठा ग्रंथ उपलब्ध आहे.

उपदेशरत्नमाला — संस्कृतमध्ये आचार्य सकलभूषण यांनी १८

---

७. ब्रह्मजिनदासें घातला घडा । तोच माझा गुरु वडा ।
अल्पमती असे बोवडा । अज्ञानी पै ॥ ८८ ॥
शके सत्राने पस्तीस । फाल्गुन वद्य बीजेस ।
सुवेळ मगळवार दिवस । सात अध्यायी ग्रंथ पूर्ण ॥ ८९ ॥
— हनुमानपुराण, अध्याय ७.

अध्यायांचा हा ग्रंथ संवत १६२७ मध्ये रचला होता. 'षट्कर्मोपदेश रत्नमाला[8]' असेही या ग्रंथाचे नाव आहे. रत्नकीर्तीनी त्याचा मराठीत अनुवाद केला आहे.

रत्नकीर्ती याने विस्तृत अनुवाद करुन ३० अध्यायांत हा ग्रंथ पूर्ण केला आहे. श्रावकाचे – देवपूजा – गुरुपास्ती, स्वाध्याय, संयम तप दान या षट्कर्मांचे वर्णन ग्रंथात उत्तम रीतीने केले आहे.

ग्रंथप्रशस्तीत[9] मूळ ग्रंथाचा व स्वतःच्या गुरुचा परिचय कवीने दिला आहे. संस्कृतचे ज्ञान पंचमकाळात उत्तरोत्तर कमी होऊ लागले. त्याच्या वाटेला लोक जात नाहीत म्हणून मी मराठी काव्य करतो असे कवीचे म्हणणे आहे. अमरावती येथे संवत १८६९ मध्ये ( श्रीमुख संवत्सर ) हा ग्रंथ आदिनाथ मंदिरात चैत्रशुद्ध नवमी – शुक्रवार रोजी पूर्ण झाला. रत्नकीर्ती यांचे गुरु भट्टारक सिद्धसेन होते. रत्नकीर्ती यांना आचार्यपद लावले आहे. त्यावरुन त्यांची योग्यता मोठी होती हे सिद्ध होते.

**रत्नकीर्ती यांचे गुरु[10] —**

भट्टारक सिद्धसेन हे रत्नकीर्ती यांचे गुरु होते. सिद्धसेन हे सेनगण भट्टारक पीठापैकी होते. त्यांचे उल्लेख संवत १८२६ ते १८६९ मध्ये पाहण्यास मिळतात. रत्नसा, माधव, रावजी इत्यादि त्यांच्या शिष्य मंडळीनी छोट्यामोठ्या कविता केल्या आहेत. सिद्धसेन यांची व त्यांचे गुरु शांतिसेन यांची गाठ कोल्हापूर येथे पडल्यानंतर सिद्धसेन कारंजास आले व नंतर तिकडेच राहिले. संवत १८२६ मध्ये त्यांनी एक मूर्ती स्थापिली आहे.

**● चंद्रकीर्ती ( सन १८१६ ) —**

१८व्या शतकाच्या अगदी अखेरीस चंद्रकीर्ती नावाचा एक कवी झाला असून

---

८. जिनरत्नकोश, पृ. ५१ ( VI )

९. तद्‌गुरु भ्राता सकलभूषण । उपदेश रत्नमालाभिधान ।
संस्कृत केले असे पुराण । ते जानिया सुगम असे ।। ४६ ।।
या पंचमकाळामाजि मती । उत्तरोत्तर हीन होती ।। ४८ ।।
या संस्कृताचे नवि जाति वाटे । म्हणोनिया श्लोक करी म्हराटे ।। ४९ ।।
अमरावती पुण्यनगरी । श्री आदिनाथ जिनमंदिरी ।
ग्रंथ आरंभिला थोरी । साह्यकारी असे शारदा ।। ६३ ।।
संमत अटरासे एकोन्याहत्तर । श्रीमुख नामे संवत्सर ।
चैत्र शुद्ध नवमी शुक्रवार । पावला ग्रंथ सार पूर्णता ।। ६४ ।।
इति भट्टारक सिद्धसेन प्रियशिष्याचार्य रत्नकीर्तिविरचित उपदेशरत्नमाला अध्याय ४० ।।

१०. म. सं. पृ. ३५

पीठांत मराठीचा उपयोग होऊ लागला असे दिसते. लोकव्यवहार मराठीत झाल्यानंतर धर्मोपदेशही मराठीतून व्हावा हे ओघानेच आले. या भागात कविवर जिनसेन हे या काळात श्रेष्ठ ग्रंथकार झाले. **यांचे तीन ग्रंथ उपलब्ध** आहेत.

१ ) जंबूस्वामी पुराण २ ) उपदेश रत्नमाला ३ ) पुण्यास्त्रव पुराण.

**जंबूस्वामी पुराण** :— जंबूस्वामी हे महावीर-कालात झालेले अंतिम केवली होत. त्यांचे चरित्र वीर, शृंगार, शांत रसांनी परिपूर्ण आहे. या चरित्रावर संस्कृत-प्राकृतांत अनेक ग्रंथ आहेत, मराठीत हे २ रे चरित्र होय. पहिले दामा-पंडितकृत आहे. या चरित्रात अनेक कथा-उपकथा आहेत. चरित्र अत्यंत रसाळ आहे. हे छापून शके १८२६ मध्ये नांदणी येथून प्रसिद्ध झाले होते. प्रकाशकांनी प्रस्तावनेत पुढील माहिती दिली आहे :

" हे पुराण स्वतिश्री भट्टारक पट्टाचार्य श्री जिनसेनस्वामी संस्थान मठ नांदणी या गादीवरील पूर्वीच्या एका मुनींनी मूळ संस्कृतावरून मराठीत ओवीबद्ध लिहिलेले आहे, ते आम्ही महाराष्ट्र जैन वाचकांच्या स्वाध्यायाकरिता छापून प्रसिद्ध केले आहे."

या पुराणात ११ अध्याय आहेत. भट्टारक सकलकीर्ती यांनी संस्कृतमध्ये ११ सर्गांचे 'जंबूस्वामीचरित्र' लिहिले आहे, त्याच्याच आधारे ही मराठी रचना झाली आहे. मराठी रचना अत्यंत प्रौढ व श्रेष्ठ दर्जाची आहे.

ग्रंथात प्रारंभी उत्थानिका दिली असून नतर गुरुपरंपरा[१३] दिली आहे.

विद्यासागर-जिनसेन-जिनसेन याप्रमाणे परंपरा सागून ग्रंथकर्त्याने स्वतःचे नाव मात्र सांगितले नाही. पण बाकीच्या ग्रंथावरून त्याचेही नाव जिनसेनच होते हे सिद्ध होते. मनमर्कट[१४] बाधण्यासाठी हे पुराण सकलकीर्ती[१५] यांच्या ग्रंथाधारे तयार केल्याचे कवीने सांगितले आहे.

---

१३. तदन्वयीं सेन गणाग्रणी । श्री विद्यासागर मुनि दिनमणि ।
निरिखें वादिवृंद एका क्षणीं । ते गुणमणि प्रार्थिले ॥ १.१८
तेचि पट्टोदयाद्रीवरि भास्कर । श्री जिनसेनाचार्य दिगंबर ।
तत्पादपंकजीं होवोनी भ्रमर । भक्ति आदरें वंदिलें ॥ १.१९ ॥
तत्करकमळीं घेवोनि जन्म । दानस्पति जिनसेन नाम ।
तत्परी जन्मला गुणोत्तम । तेंचि नाम पावले ॥ १.२० ॥
१४. काव्य वर्णनाची नाहीं मति । सदा स्वरूपीं रहावया नाहीं शक्ति ।
परि मनमर्कट बाधावयाची युक्ति । ग्रंथार्थी हेतु लागला ॥ १.२४ ॥
१५. श्री जंबूस्वामीचें गुणकीर्तन । पूर्वी वर्णिलें श्री सकलकीर्ति मुनिजन ।
तीं गीर्वाण भाषा न कळे म्हणून । करितो बाल्यबोधार्थ ॥ १.२५ ॥
— जंबूस्वामी पुराण.

**उपदेश रत्नमाला** :— हाही ग्रंथ छापून प्रसिद्ध झाला आहे. त्याच्या प्रकाशकांनी प्रस्तावनेत ग्रंथासंबंधी पुढील निवेदन केले आहे.

" उपदेश रत्नमाला हा ग्रंथ मूळ संस्कृत भाषेत भट्टारक सकलभूषणाचार्यकृत असून याचे प्राकृत ओवीबद्ध भाषांतर कोल्हापूर प्रांतीकी, जैन संस्थान नांदणी येथील भट्टारक पट्टाचार्य श्री जिनसेन गादीवरील एका पूर्वाचार्यांनी शके १७४३ या वर्षी केले आहे. यांत प्रथम धर्माधर्माचे स्वरूप व भेद सक्षेपाने सांगून नतर श्रावकाच्या षट्कर्माचा उद्देश केला आहे. तमेच सम्यग्दर्शन, श्रावकांचे आठ मूलगुण आणि उत्तरगुण ( बारा व्रते ) यांचे चांगले निरूपण केले आहे. "

या ग्रंथाचे अध्याय २३ आहेत. भाषा अत्यंत मनोहर आहे. विषय तात्त्विक असूनही कथनपद्धतीने त्यात गोडी आली आहे

याही ग्रंथात प्रारंभी आणि अंती प्रदीर्घ गुरुपरंपरा दिली असून त्यात विद्यासागराने दिल्लीस जाऊन वाद जिंकल्याचा उल्लेख केला आहे. येथेही मनमर्कट बांधण्यासाठी ग्रंथरचना केल्याचा उल्लेख असून शक वर्ष १७४३ मध्ये नांदणी येथील आदिनाथ मंदिरात ग्रंथ पूर्ण झाल्याचे सांगितले आहे. नांदणी गावचे वर्णनही छान केले आहे.

गुरुपरंपरेत मात्र तीच तीच नावे वारंवार आल्याने नावाचा नीट उलगडा होत नाही.

जिनसेन–स्थूलभद्र – वीरसेण – समंतभद्रादि अनेक – विद्यासागर – जिनसेन जिनसेन ( गुरु ). अशी ही परपरा आहे.

विद्यासागरानंतर तिसरे जिनसेन हे या ग्रंथाचे कर्ते ठरतात. या सदैव विषयासाठी मूळ प्रशस्ती[16] अभ्यासयोग्य आहे.

---

१६. ज्ञानभूषण विजयकीर्ति धर्मपोषक । शुभचंद्र सुमतिकीर्तिभट्टारक ।
तस्य गुरु भ्राता संतोषपोषक । सकलभूषण ॥ १२ ॥
त्यांनी उपदेश रत्नमाला । संस्कृत भाषात्मक निर्मिला ।
ग्रंथ महारसाळ कोमळ । जनानंदास्तव ॥ १३ ॥
त्या पद्मपंकेरुहासी दिनकर । महाप्रतापी विद्यासागर ।
जिंतोनी समस्त वादिनिकर । मोक्षमार्ग स्थापिती ॥ १९ ॥
तदर्थी उपजोनि महाप्रचंड । जिंतिले विद्याबळे काम्यादि खंड ।
जंबीर बाधोनिया शिबिका दंड । गेले दिल्लीसी ॥ २० ॥
त्यांचे नाम **विद्यासागर** । तत्पट्टधारी जातत्वाधार ।
जिनागमशास्त्र महाचतुर । निर्ग्रंथाचार्य ॥ २२ ॥
त्या गुरूचे परमशिष्याचार्य । बृहस्पतिसम भुवनाचार्य ।
समस्ताचार्य अंबरी सूर्य । श्रुतसागर ॥ २३ ॥

**पुण्यास्रव पुराण** :— हाही जिनसेन स्वामींचाच ग्रंथ आहे. ज्यांनी 'उपदेश रत्नमाला' लिहिली त्यांनीच 'पुण्यास्रवपुराण' लिहिल्याचा पुरावाही[१७] आहे. शके १७७२ मध्ये जिनसेनाच्या शिष्याने – गिरिसुत ठकाप्पा याने कागलजवळील बोरगोळी येथील वृषभनाथ मंदिरात 'पांडवपुराण' पूर्ण केले. त्यात गुरुसंबंधी माहिती देताना वरील दोन ग्रंथ त्यांनी लिहिल्याचे त्याने सांगितले आहे. यावरून जंबूस्वामी-पुराण या जिनसेनाचे आहे किंवा नाही अशी शंका येते. पण ग्रंथाची पद्धती आणि गुरुपरंपरेचे साम्य पाहता तोही याचाच ग्रंथ आहे यात शंका राहात नाही. या ग्रंथाची रचना शके १७५१ मध्ये झाली.

'पुण्यास्रवपुराण' मुळातच मोठा ग्रंथ आहे. संस्कृतात मुमुक्षु रामचंद्र यांनी पुण्यास्रवपुराण लिहिले आहे. जिनसेन यांनी मात्र कन्नड ग्रंथाधारे मराठीत हा ग्रंथ आणल्याचे सांगितले आहे. शके १२५३ मध्ये नागराज[१८] नामक लेखकाने कन्नडमध्ये ' पुण्यास्रवकथा ' नावाचा ग्रंथ लिहिला आहे. कदाचित् त्याच्या आधारे हा मराठी ग्रंथ लिहिला गेला असावा.

---

त्या पट्टोदयाद्रीं सूर्य । विख्यात जिनसेनाचार्य ।
पुरवी भक्तांचे मनोरथकार्य । ते गुरु नमियेलें ॥ २४ ॥
आतां नमितो स्वगुरुतात । तेचि पट्टी जगविख्यात ।
दिगंबरधारी मानवर्जित । जगत्प्रियकर ॥ २५ ॥
तत्कर तनुओ–दभव तनेज । तेंच नांव पावोनि निज ।
पट्टो दयाद्रीं जिनसेन राज । भव्यांभोज भास्कर ॥ २८ ॥
त्याची उपदेश रत्नमाला । शक वर्ष सत्राशें त्रेताळ ।
फाल्गुन कृष्ण पंचमी वार मंगळ । केला ग्रंथ समाप्त ॥ २९ ॥
जंबूदीप सरोवर विशाळ । त्यामधें नांदणी ग्राम कमळ ।
कर्णिकेसम जिनागार सळाळ । सुवर्ण शिखरांकित ॥ ४० ॥
तया गांविचा प्रभु आदिनाथ । जया मागत्या देतसे चिंतितार्थ ।
होती धार्मिक जन कृतार्थ । पूजोनिया पादपद्म ॥ ४१ ॥ अध्याय २३.
— उपदेश रत्नमाला

१७. उपदेशरत्नमाला पुण्यास्रव । ज्याने वर्णिले ग्रंथ अपूर्व ।
तारावया सकल जीव । हितास्तव पैं ॥ १·१६
ज्ञानाचा असे सागर । धन्य धन्य गणधर ।
सिंहासनाधिष्ठित जिनेश्वर । सूर्य पै ॥ १·१७ ॥
केवलज्ञान मुक्त जाण । अनुयायी परंपरे जिनसेन
अशा निर्ग्रंथाचे चरण । साष्टांग वंदितो ॥ १.१८ ॥ – (पुण्यास्रवपुराण

१८. जिनरत्नदेश, पान २५२

या मराठी ग्रंथाचे अध्याय ७९ आहेत. ग्रंथविस्तारही बराच मोठा आहे. जैन पुराणात आढळणाऱ्या बहुतेक कथा येथे एकत्रित करण्यात आल्या आहेत. लोककथा, पौराणिक कथा, दैवतकथा यांचा अभ्यास या ग्रंथाच्या अभ्यासाशिवाय अपूर्ण समजला पाहिजे. यात तीर्थंकर, नारायण, प्रति-नारायण, चक्रवर्ती, बलभद्र आणि इतर पुण्यपुरुष यांच्या कथा आहेत. प्रत्येक कथेला आख्यान असे म्हटले असून या ग्रंथात पुढील आख्याने आहेत

१० व्या अध्यायाच्या अगोदरचा भाग प्रतीत नसल्याने त्या भागातील कथा माहीत होऊ शकल्या नाहीत. दहाव्या अध्यायापासून पुढीलप्रमाणे कथा आहेत.

अध्याय १० वज्रदंत आख्यान.
,, ११ ऋषभउद्धरण–सुग्रीव आख्यान.
,, १२ वानर उद्धरण.
,, १३ विद्यार्थी कथा.
,, १४ चारुदत्त आख्यान.
,, १५ ,, ,,
,, १६ धरणेंद्र पद्मावती आख्यान.
,, १७ ,, ,,
,, १८ दृढसर्पकथा.
,, १९ सुदर्शनकथा आख्यान.
,, २० ,, ,,
,, २१ ,, ,,
,, २२ वाली आख्यान.
,, २३ प्रभामंडळ आख्यान.
,, २४ अयमयोगी आख्यान.
,, २५ सुकुमार आख्यान.
,, २६ ,, ,,
,, २७ ,, ,,
,, २८ तस्करउद्धरण आख्यान.
,, २९ व्याघ्रउद्धरण आख्यान.
,, ३० पूर्णभद्रमणिभद्र आख्यान.
,, ३१ मेघेश्वर आख्यान.
,, ३२ कुबेरप्रियाख्यान.
,, ३३ सीतादेवी कथा.
,, ३४ ,, ,,

अध्याय ३५ सीतादेवी कथा
,, ३६ प्रभावती आख्यान.
,, ३७ वज्रकर्ण कथा.
,, ३८ नीलावती आख्यान.
,, ३९ मातंग आख्यान.
,, ४० नागकुमार चरित्र.
,, ४१ ,, ,,
,, ४२ ,, ,,
,, ४३ ,, ,,
,, ४४ ,, ,,
,, ४५ ,, ,,
,, ४६ भविष्यदत्त आख्यान.
,, ४७ ,, ,,
,, ४८ ,, ,,
,, ४९ रोहिणी कथा.
,, ५० ,, ,,
,, ५१ ,, ,,
,, ५२ भद्रबाहू–चन्द्रगुप्तकथा.
,, ५३ ,, ,,
,, ५४ ,, ,,
,, ५५ जांबावती आख्यान.
,, ५६ ललितघटकथा.
,, ५७ अंत्यज आख्यान.
,, ५८ श्रीदेग कथा.
,, ५९ महाधवळ आख्यान.
,, ६० ,, ,,

| | | | |
|---|---|---|---|
| अध्याय | ६१ महाबळ आख्यान | अध्याय | ७१ धारण आख्यान. |
| ,, | ६२ ,, ,, | ,, | ७२ मार्मंडल आख्यान. |
| ,, | ६३ ,, ,, | ,, | ७३ सुसीमा आख्यान. |
| ,, | ६४ ,, ,, | ,, | ७४ गांधारी आख्यान. |
| ,, | ६५ ,, ,, | ,, | ७५ ग्रामागौरी आख्यान. |
| ,, | ६६ शक्तिसेन आख्यान. | ,, | ७६ पद्मावती आख्यान. |
| ,, | ६७ मुकेतु आख्यान. | ,, | ७७ धन्यकुमाराख्यान. |
| ,, | ६८ सगर चक्रवर्ति कथा. | ,, | ७८ ,, ,, |
| ,, | ६९ नळनील आख्यान. | ,, | ७९ यक्षिणी कथा. |
| ,, | ७० लवांकुश आख्यान. | | |

ग्रंथाच्या प्रशस्ती वरून[१९] ग्रंथ कन्नड भाषेतील ग्रंथाधारे लिहिला असे सिद्ध होते. गुरुपरंपरा दिली असून विद्यासागराने वाद जिंकल्याचा उल्लेख आहे. तो स्वतः पूर्वी अत्यंत अज्ञानी होता. खेळात बालपणी वेळ जात होता. पण गुरू जिनसेन याच्या आशीर्वादाने लाभ झाला असे कवी म्हणतो. यांच्याच गुरुपरंपरेतील एका जिनसेनाने कन्नड 'पूर्वपुराण' लिहिल्याचा उल्लेख केला आहे.

● दिलसुख ( सन १८२३ ) —

यांनी 'स्वात्मविचार' नावाचा एक न्यायपद्धतीचा ग्रंथ लिहिला आहे. "इति स्वात्मविचारे श्रीमाज्जिनेंद्रप्रणीत सिद्धान्तानुसारे श्री भट्टारक पद्मनंदी प्रियशिष्य दिलसुख विरचिते भूलोकमापान्वय विचार संपूर्णमस्तु" असा ग्रंथाच्या शेवटी ग्रंथकाराने ग्रंथनाम व गुरुनाम यांचा उल्लेख केला आहे. हा ग्रंथ अनुवादित नसून मराठीत स्वतंत्र ग्रंथनिर्मिती करण्याच्या उद्देशानेच तो निर्माण करण्यात आला

---

१९. ज्यांणी रचोन पूर्वपुराण । केला उपकार भव्यजीवाकारणें ।
सहजि होता त्याचें स्मरण । होये हरण पापातें ॥ ७९.१८६
त्या संततीमाजी सद्‌गुरु । झाले आणीक मुनिवर ।
जग विख्यात विद्यासागर । धराश्चर्यप्रचंड ॥ १८७ ॥
आनेक वादि गजंचानन । जींतुन बौद्धादिक सर्व निसूण ।
घेतली जयपत्रे सर्वांपासून । धरामंडळी प्रसिद्ध ॥ १८८ ॥
नेणें शास्त्र कथाकुशळ । मतिमंद अज्ञानबाळ ।
खेळत बाळपणाचा खेळ । वर्तन सदा ॥ १९२ ॥
पाहुन कर्नाटक भाषा ग्रंथ । केले मन्हाट ओवियुक्त ।
कोणामात्रा नघडिया ज्ञानवंत । शोधन करुन लिहिजे त्वरित ॥ १९३ ॥
सके १७५१ विरोधी नाम संवत्सराश । गुरुवारे मरणी नक्षेत्राश ।
ग्रंथ संनाम जाहाला । — पुण्यास्त्रवपुराण, ७९ वा अध्याय.

आहे. ग्रंथात आत्म्याचे अस्तित्व जैन दर्शनात कसे मानले आहे हे इतर दर्शनांचे खंडन करून सांगितले आहे. ग्रंथकर्त्यांना संस्कृताचा अभ्यास चांगला असावा म्हणूनच या ग्रंथात संस्कृत ग्रंथातील उतारेही त्यांनी दिले आहेत. प्रश्नोत्तररत्नमाला, पंचास्तिकाय, पद्मनंदी पंचविंशति या ग्रंथांतील श्लोक ' उक्तंच ' म्हणून आलेले आहेत. मराठी भाषासुद्धा येथे संस्कृत वाक्यरचनेच्या वळणावर गेली आहे.

● दिलसुख–गुरु —

पद्मनंदी हे दिलसुखचे गुरु होते. ते कारंजाच्या बलात्कारगणाच्या भट्टारक पीठावर संवत १८५० ते १८७९ च्या दरम्यान झाले. सिद्धक्षेत्रांची वंदना करीत असता अपघात होऊन मुक्तागिरीजवळ वारले. मुक्तागिरीजवळ खरपी येथे त्यांची समाधी आहे. दिलसुख हा त्यांच्या हयातीतच झाला असला पाहिजे. त्याचा काळ सन १८२३ च्या सुमाराचा समजावा लागतो.

● गिरीसुत ( ठकाप्पा ) ( सन १८५० ) —

प्राचीन मराठी जैन वाङ्मयाच्या परंपरेतील हा शेवटचा कवी समजावा लागेल. यानंतर समाजाची स्थितीच पालटली.

**पांडवपुराण :–** गिरिसुत याने मराठीत पांडवपुराणाची रचना केली आहे. कन्नडमध्ये कवी नागराजेंद्र यानी ' हरिवंश ' ग्रंथ लिहिला होता. त्याच्याच आधारे मराठीत सदरहू ग्रंथ केला असल्याचे कवीने सांगितले आहे. ग्रंथात ३२ अध्याय असून तो छापला गेला आहे.

" पांडवपुराण ग्रंथ सुंदर । कर्नाटक भाषा हरिवंश आधार ।
त्यातील निवडून सारासार । प्रथम अध्याय कथिलें ॥ "

अशीच ओवी प्रत्येक अध्यायाच्या शेवटी येते.

कागलजवळ कोगनोळी येथे गिन्याप्पा मगदुम होते. त्याना ठकाप्पा हा मुलगा झाला. तोच गिरिसुत होय. वृषभनाथांच्या सुंदर मंदिरात शके १७७२ मध्ये वसंत ऋतूत वैशाख मासात शु. द्वादशीस सौम्यवासरी हा ग्रंथ पूर्ण झाल्याचे कवीने सांगितले आहे.[20] जैन पांडवपुराणाची कथा या ग्रंथात सांगितली आहे. ग्रंथाची प्रशस्ती विस्तृत[21] आहे. उपदेशरत्नमाला व पुण्यास्रव लिहिणारे जिनसेन हे गिरिसुताचे गुरु होते.

---

२०. पांडवपुराण अध्याय ३२ – ८९ ते ११४ ओव्या.
कागल सन्निध कोगनोळी नगर । तेथींल मगदुम निराधार ।
गिरिआपा मगदुम त्याचा कुमर । ठकाप्पा नाम तयाचे ॥
शके सत्राशे बहात्तर । साधारण नाम संवत्सर ।
वसंत ऋतु मनोहर । मास सुंदर वैशाख ॥

२१. पांडवपुराण १.१६.

## अनिर्णीत काल

**काही ग्रंथकार आणि ग्रंथ :–** ज्या लेखकांच्या ग्रंथांचा काल कोणत्याही साधनाने ठरविता येणे अशक्य झाले त्या ग्रंथांसंबंधी व ग्रंथकारांसंबंधी येथे माहिती एकत्रित करून ठेवीत आहे. तसेच काही ग्रंथ अथवा किरकोळ रचनाही अशा आहेत की ज्यांचा कर्ता सुद्धा कळू शकत नाही. अशावेळी त्या ग्रंथासंबंधी विवेचन करणे फारच कठीण होते. त्याचा काल अगर कर्ता जरी अज्ञात असले तरी ते ग्रंथ मोलाचे आहेत. त्यांचीहि माहिती याच विभागात देण्याचा प्रयत्न केला आहे. प्रत्यक्ष काही पुरावा नसल्यामुळे काही निर्णय घेता आला नाही.

० **नींवा :–** हा एक जुना कवी आहे. पण त्याच्या कालाचा नक्की बोध होत नाही. त्याच्या काही किरकोळ रचना आहेत. त्या ज्या प्रतीत आहेत ती प्रत शके १६४८ ची आहे. म्हणजे त्यापूर्वीचा तरी त्याचा काळ असलाच पाहिजे. त्याची अन्य कोणतीही माहिती मिळत नाही. त्याच्या 'अहिराणी गीता'मुळे त्याविषयी विशेष कुतूहल वाटते. या पोथीत ज्या रचना संकलित आहेत त्यांचे मेघा, गुणकीर्ती, गुणदास, ब्रह्मशांतिदास हे कवी १५ व्या शतकातले आहेत. त्यावरून नींवाचाही काळ तितकाच जुना असावा असे वाटू लागते. सदरहू पोथीत पान ८५ व ८६ वर नींवाकृत दोन पदे पाहण्यास मिळतात.

**अहिराणि गीत :–** ५ कडव्यांचे हे गीत आहे. अंती " इति अंतरिक्ष पार्श्वनाथ अहिराणि गीत समाप्त " असे लिहिले आहे. यामुळेच गीतास अहिराणि गीत नाव दिले गेले असावे. अंतरिक्ष पार्श्वनाथ आज वऱ्हाडातील वाशिम जिल्ह्यात ' शिरपूर ' येथे आहे. गीतात अंतरिक्ष पार्श्वनाथाची स्तुती आहे. ही मूर्ती किंचित अधर असल्याने तीस " अंतरिक्ष " म्हणतात. भाषा अहिराणी पूर्वी स्वतंत्र होती असे या उल्लेखावरून वाटते. मुद्दाम ते गीत येथे समग्र देत आहे :

श्रीपुर नग्र सुहावने सहिये । तठे स्वामि जीन पास ।
नीलवरन शरिर वो त्यान्हा । सोहे वो उग्रवंस ।
मन भावे वो तुम्ही पूजा वो सही । पुरहि मननी आस ॥
पैला जीनवरु पैला जीनवरु । अंतरिछु तो मे देखा ।
आनंदे निर्भरी जाइयो साजनी । कलीकाल ना काई लेखा ।
पद्मावती धरणेंद्र सहित । पूजू वो स्वामि जीनंद ।
तो अंतरिछ स्वामि । विघ्न निवारन । विश्वसेनाकुलि चंद ।
मग स्वरूप सुंदर माहापरम छंदाति कंद ।
ब्रह्मादिकां हरि हरा अति स्याहाना । न कल्नीया भेद ॥ २
दुरा निरखुनि राया दरशण दीवे ।
तो भक्तजन पैवारी त्याने साष्टांग नमन मैवो साजणी ।
माथ ठेवा चरणावरि । देवाधिदेवो त्रिभोवन नाथ ।

तो स्वामी मान्हा । साहाकारी वो पै ॥ ३ ॥
तो प्रसिध प्रगट प्रत्येक जाया । सकळ गुणनिधान ।
श्रीपाल राय ते बहुत काळ दुखी । त्याले दिध जीवदान ।
तो कृपावंत कृपानिधि स्वामी । त्यान्ह मोट महिमान वो ।
रिधिसिधिना दायकु । साजनी वदती भविक जन वो ॥ ४ ॥
मनो भावे ज्या पूजति स्वामिळ । त्या सुख पावती सार ।
तो चीदानंद पद मुगतीदातार । तो भक्तजन आधार ।
नीवा म्हणे शरणगत स्वामी भवबंधन कर्म निवार ।
आनदे अस्तुति कइ वो साजनी । म्रतना जयजयकार वो ।
पैल जिनवर पैल जिनवर ॥ ५ ॥

स्त्रियांनी सामुदायिक रीतीने गाण्याचे हे गीत आहे. विभक्तिप्रत्यय, क्रियापद यांचा अभ्यास मापेच्या दृष्टीने महत्त्वाचा होईल. अहिराणीच्या अभ्यासकांना हे गीत महत्त्वाचे वाटेल यात शंका नाही.

**नेमीश्वर मन्हाटी गीत** :—नीवाकृत दुसरे पद या नावाचे आहे. हे ३ कडव्याचे आहे. शिवादेवी नेमिनाथाना दीक्षा घेऊ नको म्हणून विनवणी करीत आहे. शेवटचे कडवे पुढीलप्रमाणे आहे :

" आइकौनि बोले शिवा देवि माया । हा रे तु जाउनि वैसे पद्मासनि ।
उन्मनी मुद्रा लाउनि । वैसलारि ध्यानीं । हा रे रे ध्यानमुध ते केवलज्ञानीं ।
हा रे रे नीवा म्हणे तुम्ही रालावें चरणीं ॥ ३ ॥ "

' नीवा ' किंवा ' नींवा ' नाव असू शकेल.

● **सोमवंशी तुकुजी** :—यांची एकच ' श्रेनको ' नावाची किरकोळ रचना आहे. शिरडशहापूर हस्तलिखित क्रमांक १ मध्ये ती आहे.[1] ' पद्मावती गीत ' असेही याचे नाव दिले आहे. या गीतात ५ कडवी आहेत.

**गीताचा प्रारंभ**—" सीरी कोतकोडंड जाईन । आहो जाईन :
गिरिनारीसमान पद्मावती उमाजीस पाहीन ।
आहो पाहीन । काहीं फल मार्गीन ॥ सीरी को. ॥ १ ॥ "

**गीताचा अत्यंभाग** :—" सोमवंसी तुकुजी अगन्यानी ।
असे अगन्यानी । तासी झाली परत्नी ॥ सीरी को. ॥"

हस्तलिखिताचा काल मिळत नाही. सोमवंशी म्हणजे कासार–घोगार जात असावी.

---

१. अभ्यासाची साधने १ पाहा.

● **राया** :—' राया ' हे नाव शेवटी आलेल्या बऱ्याचशा आरत्या पाहण्यात आल्या आहेत. पण हा राया कोण, त्याचे गुरु कोण अथवा त्याचा काल कोणता यासंबंधी काहीच माहिती मिळत नाही.

| | |
|---|---|
| माणिकस्वामी आरती ५ कडवी. | नेमीश्वर आरती—? |
| गोमटस्वामी आरती ३ कडवी. | क्षेत्रपाल आरती ३ कडवी. |
| शांतिनाथ आरती १ ली, ३ कडवी. | पार्श्वनाथ आरती ३ कडवी. |
| शांतिनाथ आरती २ री, २ कडवी. | |

अशा या रचना आहेत. या सर्व आरत्या शिरड शहापूर हस्तलिखित क्रमांक १ मध्ये आहेत. माणिकस्वामी आरतीत यातगिरी श्रीपूरचा, गोमटस्वामी आरतीत चांमुडरायाचा, क्षेत्रपाल आरतीत सगरदेशातील जेउरगीपुरचा, शांतिनाथ आरतीत सीतानगरीतील शांतिनाथाचा, पार्श्वनाथ आरतीत वालकुडपुरीच्या पार्श्वनाथाचा आणि दुसऱ्या शांतिनाथ आरतीत कुंतल देशातील वडगावचा उल्लेख आहे. वडगाव हे कोल्हापूरजवळचे होय. तेथील ' अप्पना सः देसाई ' या व्यक्तीचा उल्लेख आहे. रायाच्या या आरती कलादृष्टयाही बऱ्यापैकी आहेत. राया हा जिनभक्त श्रावक असावा आणि तीर्थक्षेत्रांची वंदना करणे, तेथील मूळनायकाचे गुणगान करणे यातच त्याला आनंद वाटत असावा.

● **कवींद्रसेवक** :—कवींद्रसेवक या नावाने मराठीत अभंग आणि इतर काही ग्रंथ पाहाव्यास मिळतात. चिमनापंडिताने अपूर्ण ठेवलेले अभंग त्याने पूर्ण केले[२] असत अभंगाची संख्याही हिंगोलीच्या हस्त. क्रमांक ८ मध्ये ५४५ आहे. प्रत्येक अभंगाच्या शेवटी तुकारामाप्रमाणे—' कवींद्रसेवक म्हणे ' चा उल्लेख येतो. अभंगात भक्ती आहे. दोंगावर टीका आहे आणि जिनेंद्रदेवांशी भांडणही आहे. अभंगाची ही हस्तलिखित प्रत शके १७३१ मधील आहे. म्हणजे सन १८१० पूर्वीच कवींद्र झाले आहेत यात शंका नाही. पण केव्हा हे निश्चित समजत नाही.

**सुमतिप्रकाश** :—या नावाचा २३७२ ओव्यांचा एक ग्रंथ कवींद्रसेवकांचा आहे. ग्रंथाचे हस्तलिखित अभ्यासावयास मिळू न शकल्याने त्यासंबंधी विशेष चर्चा करणे अशक्य आहे. परंतु दिल्ली येथे जाऊन मोगल बादशहाच्या दरबारात विजय-पत्र मिळवून आणणाऱ्या जैन भट्टारकाची कथा त्यात आहे, असे कळते. ग्रंथाची शेवटची ओवी अशी आहे :

> हे सुमतिकथा पंचमकाळीं । संवत झालसे पंचेवीस साली ।
> कवींद्रसेवक श्रोत्याचरणतळीं । लीन झाला असे ॥

यातील संवत १६२५ हा काही ग्रंथाचा काळ नाही. कवींद्रसेवकाचा काळ

---

२. महतीसागराचे व कवींद्रसेवकाचे अभंग या नावाचे पुस्तक सन १९२२ साली श्री. हि. ने. दोशी यांनी प्रकाशित केले होते.

इतका काही खुना नाही. कदाचित ग्रंथातील कथाघटनेचा तो काळ असावा.

○ **बोप** :—हिंगोलीच्या हस्तलिखित क्रमांक ८ मध्ये कवी बोपकृत 'तीर्थंकरांची भूपाळी' पाहावयास मिळते. हस्तलिखित शके १७३१ चे असल्यामुळे कवी बोपचाही काळ आपोआपच त्यापूर्वीचा ठरतो. परंतु निश्चित निर्णय घेता येत नाही. तीर्थंकरांची भूपाळी या रचनेत १६ कडवी आहेत. तो आपला गुरु म्हणून दयाळकीर्तीचा उल्लेख करतो. हे दयाळकीर्ती कोण हेही समजत नाही. भूपाळीत तो शेवटी या गोष्टीचा पुढीलप्रमाणे उल्लेख करतो :

" दयाळकीर्तीचा पैदास । बीनंती करितो अरिहंतास ।
देहबुद्धीचा प्रकाश । वचन जैन बोपाचे ॥ १६ ॥ "

○ **देवेंद्रकीर्तिशिष्य** :—स्वतःला देवेंद्रकीर्तीचे शिष्य म्हणवून घेणाऱ्या एका कवीची 'पद्मावती पाळणा' या नावाची एक रचना उपलब्ध आहे. त्यात १८ कडवी आहेत. या रचनेत या देवेंद्रकीर्तिशिष्याने शके १६९३ मधील दक्षिण देशातील जयसिंगनगर येथील पद्मावतीच्या उत्सवाचा उल्लेख केला आहे. पण स्वतःचे प्रत्यक्ष नाव मात्र त्याने घातले नाही. " देवेंद्रकीर्तीचा प्रियशिष्ये । पाळणा चालवी हरुषे । " इतकाच उल्लेख त्याने केला आहे. दक्षिणदेशातील जयसिंगनगर कोणते असावे हाही एक प्रश्नच आहे.

**कर्त्याचे नाव नसलेले ग्रंथ : (१) ज्ञानोदय** :—तीन अध्यायांचा व ९९ ओव्यांचा हा एक आध्यात्मिक विषयावरील लहानसा ग्रंथ आहे. ग्रंथकर्त्याने गुरूचे नाव दिले असून स्वतःचे मात्र सांगितले नाही.

प्रारंभीच्या काही ओव्या—

सकल महन्त सीरोमणी । सदा विचारवंतांतःकरणी ।
शककीर्ति शुद्धमनीं । मार्गे स्तवीना ॥ १·५ ॥
याप्रकारें स्वेष्ट वंदुन । ग्रंथारंभिला ज्ञानोदय करुन ।
ज्ञानार्थि नाव लोकाने ठेवुनें । मुखाकारणें ॥ १·६ ॥

शेवटची ओवी—

तेव्हा शद्गुरु वदत्मधुर वचन । श्रवण करीरे सच्छिष्य सिरोरत्न ।
किंचित कुशास्त्राचें मिथ्या निरोपन । मद्द भ्रमन्त ते ॥ ३·३० ॥

शककीर्ती म्हणजे देवेंद्रकीर्ती होत. पण त्यांचा हा शिष्य कोण समजू शकत नाही.

**(२) आत्मख्याती** :—हा पद्यटीकात्मक ग्रंथ असून विस्ताराने मोठा आहे. मराठी भाषासुद्धा संस्कृत टीकेप्रमाणे वाटावी इतकी प्रौढ आहे. पण रचना फार प्राचीन नाही. कुंदकुंदाचार्यांच्या समयसार ग्रंथावरील मराठी आत्मख्याती टीका म्हणजे एक मौलिक ग्रंथच आहे. समयसार ग्रंथात शुद्धात्मस्वरूपाचे बहारीचे वर्णन आहे. मराठी वाचकांना हा ग्रंथ कळण्यासही सोपा आहे. ग्रंथाचे अध्याय ७ आहेत. मुळांतील आत्मख्याती टीकेचे संस्कृत श्लोक देऊन ही मराठी टीका केली

आहे. टीकेचा नमुना--

" इति या प्रकारें करुन । आत्म्याचे तत्त्व हा. परमार्थ मूर्तस्वरुप ।
ज्ञानमात्र अवस्थित जाले । कसे आहे ते ज्ञानमात्र तत्त्व ।
अखंड हा. अनेक ज्ञेयाका तथा प्रतिपक्षीकर्म येकरुन खंड खंड दिसत होते ।
ते ज्ञानांत नाहीसे जाले । यापासुन एकरुप आहे ॥ "

पण या टीकेचा कर्ता कोण किंवा त्यासंबंधी काहीही उल्लेख मिळत नाही.

समारोप :--

१ ) इ. सन १४५० ते इ. सन १८५० मधील प्राचीन मराठी जैन वाङ्मयाचा हा इतिहास पाहिला तर तो निश्चित गौरवास्पद आहे असे म्हणावे लागेल. जवळ जवळ ५० च्या वर लेखक किंवा कवी आढळतात. त्यांच्या लहानमोठ्या रचना-ग्रंथ याची संख्या १५० तरी सहज भरते.

२ ) पद्मपुराण, हरिवंशपुराण व कालिकापुराण हे ग्रंथ ओवीसंख्येच्या दृष्टीने प्रचंडच म्हणावे लागतील. १५,०००; ७,३५५; ११,००० अशी त्याची अनुक्रमे ओवीसंख्या आहे. पद्मपुराण व हरिवंशपुराण हे दोनच ग्रंथ असे आहेत की जे एकापेक्षा अधिक लेखकांच्या हातून पूर्ण झाले आहेत.

३ ) पद्यवाङ्मयाप्रमाणेच गद्यवाङ्मयाकडेही जैन ग्रंथकाराचे लक्ष चागले होते असे दिसते. धर्मामृत, रत्नकरंडश्रावकाचार मराठी टीका, स्वात्मविचार व आत्मख्याती हे ग्रंथ गद्य-ग्रंथ आहेत.

४ ) स्वकालीन एकाही व्यक्तीचे चरित्र अथवा इतिहास ग्रंथरुपाने जैन ग्रंथकारानी लिहून ठेवलेला नाही. महानुभाव ग्रंथकाराशी तुलना केली तर या बाबतीत जैन ग्रंथकार हे फारच वेगळे वाटू लागतात.

५ ) सर्वच ग्रंथकार दिगंबर जैन पंथातील आहेत. श्वेतांबर अथवा स्थानकवासी पंथातील एकही ग्रंथकार मराठीत आढळला नाही. याचा अर्थ हा आहे की त्या पंथातील कोणाचीच वस्ती मूळ महाराष्ट्रीय नसावी.

६ ) महतीसागरासारखा अलीकडील एखादा ग्रंथकार वगळल्यास इतर एकाचेही जन्मसाल मिळू शकत नाही. मूळ लेखकाची अथवा समाजाचीही ग्रंथकारासंबंधी एक प्रकारची ही अनास्थाच म्हणावी लागेल. समाजाला जसे ग्रंथाचे महत्त्व वाटे तसे ग्रंथकाराचे वाटले नाही.

० ० ०

## प्रकरण २ रे : परिशिष्ट
## प्राचीन मराठीतील जैन ग्रंथकारांचा कालपट
### ( इ. सन १४५० ते इ. सन १८५० )

| अ. नं. | ग्रंथकाराचे नाव | ग्रंथकाराचे गुरु | ग्रंथकर्त्यांचा काळ | ग्रंथकर्त्यांचा प्रमुख ग्रंथ |
|---|---|---|---|---|
| | | | इ. सनाचे पंधरावे शतक | |
| १. | ब्रह्म गुणदास | ब्रह्म जिनदास | इ. स. १४५० | श्रेणिकचरित्र. |
| २. | गुणकीर्ति | भुवनकीर्ति | इ. स. १४७० | धर्मामृत, पद्मपुराण. |
| ३. | जिनदास ( देवगिरी ) | उज्जंतकीर्ति | इ. स. १४९३ | हरिवंशपुराण. |
| | | | इ. सनाचे सोळावे शतक | |
| ४. | पंडित मेघराज | ब्रह्म शांतिदास | इ. सनाच्या सोळाव्या शतकाचा प्रारंभ | जसोधररास. |
| ५. | कामराज | ब्रह्म शांतिदास | ,, ,, | सुदर्शनचरित्र. |
| ६. | पंडित सूरिजन | ब्रह्म शांतिदास | ,, ,, | परमहंसकथा. |
| ७. | नागोआया ( कोटनगर, वऱ्हाड ) | माणिकसेन | इ. स. १५४० | यशोधरचरित्र. |
| ८. | गुणनंदी | धर्मभूषण | इ. स. १५८१ ( ? ) | जशोधरपुराण. |
| | | | इ. सनाचे सतरावे शतक | |
| ९. | अभयकीर्ति | अजितकीर्ति | इ. स. १६१६ | अनंतव्रतकथा |
| १०. | वीरदास–पार्श्वकीर्ति ( औरंगाबाद ) | धर्मचंद्र | इ. स. १६२७ | सुदर्शनचरित्र. |

| अ. नं. | ग्रंथकाराचे नाव | ग्रंथकाराचे गुरु | ग्रंथकर्त्यांचा काळ | ग्रंथकर्त्यांचा प्रमुख ग्रंथ |
|---|---|---|---|---|
| ११. | दामा पंडित | दयासागर ( ? ) | इ. स. १६५० | दानशीलतपभावना. |
| १२. | दयासागर | ... | ... | सम्यक्त्वकौमुदी. |
| १३. | चिमना पंडित ( पैठण) | अजितकीर्ती | इ. स. १६५१ नंतर | अनंतव्रतकथा. |
| १४. | पुण्यसागर | विशालकीर्ती | इ. स. १६५८ नतर | रविव्रतकथा. |
| १५. | विशालकीर्ति | देवेंद्रकीर्ती | ... | धर्मपरीक्षा. |
| १६. | पंत सावाजी | विशालकीर्ती | इ. स. १६६५ | सुगंधदशमी–व्रतकथा. |
| १७. | विशालकीर्ति | अजितकीर्ती | इ. स. १६७० | रुक्मिणीव्रतकथा. |
| १८. | मानकीर्ति (औरंगाबाद) | धर्मभूषण | इ. स. १६३६ ( ? ) | चार पदें. |
| १९. | राय ( मल्लाजिपुत्र ) ( निर्मलगांव ) | ... | इ. स. १६८४ | जिनवर–विनती. |
| २०. | रत्नसा ( देउळगांव ) | ... | इ. स. १६८८ | दामा पंडितकृत जंबूस्वामी चरित्र पूर्ण केले. |
| २१. | गंगादास | धर्मचंद्र | इ. स. १६९० | पार्श्वनाथभवांतर. |
| २२. | महीचंद्र ( लातूर ) | विशालकीर्ती | इ. स. १६९६ | आदिनाथपुराण. |
| २३. | महाकीर्ती | महीचद्र | इ. स. १६९८ | शीलतरंगिणीपुराण. |
| २४. | ब्र. चिंतामणि | महीचंद्र | ... | पद्मपुराण ( गुणकीर्तिकृत ) पूर्ण केले. |
| २५. | रामकीर्ती | महीचद्र | ... | पद्मावती आरती. |
| २६. | पुण्यसागर | आनंदसागर | ( ? ) | पद्मपुराण पूर्ण केले ( गुणकीर्तींचे ) |

| अ. नं. | ग्रंथकाराचे नाव | ग्रंथकाराचे गुरु | ग्रंथकर्त्याचा काळ | ग्रंथकर्त्यांचा प्रमुख ग्रंथ |
|---|---|---|---|---|
| | | इ. सनाचे अठरावे शतक | | |
| २७. | देवेंद्रकीर्ती | महीचंद्र | इ. स. ...... | कालिकापुराण |
| २८. | छत्रसेन | समंतभद्र | इ. स. १७०३ | आदीश्वर भवांतर |
| २९. | सटवा | महीभूषण | इ. स. १७१८ नंतर | शिवानेमिसंवाद. |
| ३०. | यादवसुत | गुणसागर ( ? ) | इ. स. १७१८ नंतर | अष्टकर्मप्रकृति. |
| ३१. | जिनसागर | देवेंद्रकीर्ती | इ. स. १७२४ | जीवंधरपुराण. |
| ३२. | माणिकनंदी | देवेंद्रकीर्ती | इ. स. १७२४ | तीन आरत्या. |
| ३३. | लक्ष्मीचंद्र ( मानव्रत ) | ... | इ. स. १७२८ | मेघमालाव्रतकथा. |
| ३४. | अर्जुनसुतसोयरा ( देऊळगाव ) | समंतभद्र | इ. स. १७४६ | कर्माष्टमीकथा. |
| ३५. | तानू पंडित | ... | इ. स. १७५१ नंतर | पार्श्वनाथ आरती. |
| ३६. | चिमणा ( अर्जुनसुत ) ( वाशीम ) | शांतिसेन | इ. स. १७५१ | रविवारकथा. |
| ३७. | रतनसा | सिद्धसेन | इ. स. १७४९ | सिद्धसेन गुरु आरती. |
| ३८. | दिनासा | ... | इ. स. १७७० | बारमासी. |
| ३९. | राघव | | इ. स. १७७१ नंतर | नेमिमाहात्म्य. |
| ४०. | अनंतकीर्ती | चंद्रकीर्ती | इ. स. १७७५ | दशलाक्षणिक व्रत कथा. |
| ४१. | जनार्दन | चंद्रकीर्ती | इ. स. १७७५ | श्रेणिकचरित्र. |
| ४२. | भीमचंद्र | अनंतकीर्ती | इ. स. १७८१ | |

| अ. नं. | ग्रंथकाराचे नाव | ग्रंथकाराचे गुरु | ग्रंथकर्त्यांचा काळ | ग्रंथकर्त्यांचा प्रमुख ग्रंथ |
|---|---|---|---|---|
| ४३. | महतीसागर | देवेंद्रकीर्ती | जन्म इ. स. १७७२ | अभंग-रचना |
| ४४. | दयासागर | ? | इ. स. १८१३ | हनुमान पुराण. |
| ४५. | रत्नकीर्ती | सिद्धसेन | इ. स. १८१३ | उपदेश रत्नमाला. |
| ४६. | चंद्रकीर्ती | ? | इ. स. १८१६ | संमेदशिखर-माहात्म्य. |
| ४७. | जिनसेन ( कोल्हापूर ) | जिनसेन | इ. स. १८२१ | जंबूस्वामी पुराण. |
| ४८. | दिलसुख ( कारंजा ) | पद्मनंदी | इ. स. १८२३ | स्वात्मविचार. |
| ४९. | गिरिसुत ( ठकाप्पा ) | जिनसेन | इ. स. १८५० | पाडवपुराण. |

## अनिर्णीत काल असलेले ग्रंथकार

| | | |
|---|---|---|
| १. | नीबा | अहिरणी गीत. |
| २. | तुकुजी ( सोमवंशी ) | कोनको. |
| ३. | राया | सात आरत्या. |
| ४. | बोप | तीर्थंकराची भूपाळी. |
| ५. | कवींद्रसेवक | सुमतिप्रकाश. |

## प्रकरण ३ रे

# प्राचीन मराठी जैन वाङ्मयातील तत्त्वज्ञान

**प्रास्तविक :–** पंधराव्या शतकापासून तो १९ व्या शतकाच्या प्रथमार्धापर्यंतच्या प्राचीन मराठी जैन वाङ्मयाचा इतिहास दुसऱ्या प्रकरणात सांगितला आहे. या प्रकरणात त्या वाङ्मयातील जैन तत्त्वज्ञान पाहावयाचे आहे. केवळ भाषा, रस, अलंकार किंवा काव्यगुण इतक्यावरच प्राचीन मराठी साहित्याचे समीक्षण अवलंबून ठेवल्यास त्या साहित्याचे पूर्ण मूल्यमापन होणे शक्य नाही. नाथ, भागवत, महानुभाव, रामदासी किंवा दत्त इत्यादी सांप्रदायिकांनी त्या त्या काळी निर्माण केलेले साहित्य हे मुख्यतः धर्मप्रेरित आहे. केवळ तत्त्वज्ञान कथन करणारे किंवा आचारधर्म प्रतिपादणारे धर्मविषयक ग्रंथच नव्हेत तर कथा, आख्याने व पुराणे यांतही अनेकदा धर्म हाच प्रामुख्याने वावरतो.

अर्थातच याला जैन मराठी वाङ्मयही अपवाद असण्याचे कारण नाही. किंबहुना अभ्यासती असे निश्चित वाटू लागते की इतर प्राचीन मराठी साहित्यापेक्षा हे साहित्य अधिक धार्मिक आहे. म्हणून या साहित्याच्या अभ्यासाच्या पूर्णतेसाठी त्यांतील तत्त्वज्ञान आणि आचारधर्म यांचा अभ्यास हा आवश्यक आहे. प्रथमतः जैन तत्त्वज्ञानाचा विचार करून मग आचाराकडे वळणे इष्ट होईल.

कालापेक्षेने विचार केला तर मराठी भाषा ही जैन तत्त्वज्ञानाच्या मानाने फारच अलीकडची. मराठीला मातृस्थानी असलेल्या महाराष्ट्रीनही जैनधर्मविषयक वाङ्मयाचीच भर अधिक आहे. संस्कृत आणि प्राकृत या दोन्ही भाषांत जैनधर्मविषयक वाङ्मय विपुल आहे. महानुभाव पंथाला जशी मराठीचीच मर्यादा आहे तशी मर्यादा जैन तत्त्वज्ञानाबाबत नाही. उलटपक्षी जैन तत्त्वज्ञानाच्या उत्कर्षाचा व भरभराटीचा काळ हा मराठीच्या वाट्यास आलाच नाही. संस्कृत–प्राकृत भाषांनीच तो मान मिळविला. मराठी भाषेतील जैन वाङ्मय हे जैन धर्म त्या काळी महाराष्ट्रात तरी विस्नावस्थेत होता त्या काळचे आहे. म्हणून मराठी भाषेत जे आले आहे किंवा जसे आले आहे तेवढेच किंवा तसेच जैन तत्त्वज्ञान आहे असा सिद्धान्त मांडता येणार नाही.

वैदिक तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठी ज्याप्रमाणे वेदोपनिषदांचा अभ्यास हा

आवश्यकच आहे तसा जैन तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठी त्या धर्मातील प्राचीन ग्रंथांचा अभ्यास हा आवश्यक आहे. हा अभ्यास जरी प्रस्तुत अभ्यासाच्या मर्यादेच्या कक्षा ओलांडीत असला तरी त्याचा निदान आधार तरी घेणे आवश्यक आहे. म्हणून प्रथमतः जैन तत्त्वज्ञानाचे मूळ व ते तत्त्वज्ञान यांची ओळख करून घेऊनच मराठी ग्रंथातील त्या त्या स्थलांचा विचार करणे योग्य होईल.

## जैन तत्त्वज्ञानाचा उगम —

......भारतीय दर्शनात जैन दर्शनाचे स्थान व स्वरूप ठरविताना साधारणपणे हे दर्शन वैदिक दर्शनापासून भिन्न अथवा अभिन्न असा पहिला प्रश्न पडतो. आजपर्यंतच्या अभ्यासकांत स्थूलमानाने यासंबंधी दोन मतप्रवाह दिसतात. जैन धर्म हा वैदिक हिंदूंनीच निर्माण केला. जैन तत्त्वज्ञानाचे मूळही वैदिक दर्शनात आहे असे मानणारा सनातन विचाराचा एक पक्ष आहे. या पक्षाचे म्हणणे प्रातिनिधिकरूपाने पुढीलप्रमाणे आहे :

"हिंदूंनी इ. स. पू. सहाव्या शतकात ज्याप्रमाणे बौद्ध धर्माला जन्म दिला त्याचप्रमाणे जैन धर्मालाही दिला. जैन धर्माची पूर्वपरंपरा बुद्धाच्या पूर्वीपासून चालत आली होती असे कित्येक म्हणतात......बुद्धधर्माप्रमाणेच जैनधर्मही हिंदु-धर्मांतील वैदिक परंपरेपासून फुटून निघालेली शाखा आहे ही गोष्ट अमान्य करता येत नाही. वैराग्य व सन्यासदीक्षा मोक्षसाधन म्हणून वैदिक, बौद्ध व जैन हे तिन्ही संप्रदाय मानतात. म्हणून जैनधर्म हा वेदविरोधी असूनही हिंदू संस्कृतीतीच विकसित झालेली शाखा आहे असे म्हणणे अधिक सयुक्तिक दिसते.[१]"

दुसरा पक्ष मात्र जैन धर्म व त्याचे तत्त्वज्ञान स्वतंत्र आणि वैदिकाप्रमाणेच प्राचीन असल्याचे मानतो. वैदिक संस्कृतीचा जसा वेदकालापासून विकास होत होत पुढे तिला हिंदू संस्कृतीचे स्वरूप प्राप्त झाले, त्याचप्रमाणे आर्यांच्या आगमनापूर्वी भारतात प्रचलित असलेल्या एका अतिप्राचीन संस्कृतीचा विकास होऊन त्यातून जैन, बौद्ध, योग सांख्यादिकांचे तत्त्वज्ञान परिपुष्ट झाले.[२] वैदिकांनी सुद्धा त्या वेदपूर्व संस्कृतीचा अनेक बाबतींत अंगीकार वेळोवेळी केला म्हणूनच काही गोष्टी जैन व वैदिक यांच्यात समान दिसतात.

इ. स. पूर्व सहाव्या शतकात भ. महावीरकाली जैन तत्त्वज्ञान जन्मास आले हे म्हणणे बरोबर नाही. उलटपक्षी त्याकाळी त्या तत्त्वज्ञानाच्या विकासाची सीमा ही एका उत्कृष्ट मर्यादेला जाऊन पोहोचली आहे असे म्हणावे लागेल. जैनधर्म हा

---

१. वैदिक संस्कृतीचा विकास, पृ. २१४.

२. Studies in Jainism Dr., Hermann Jacobi, Ahmadbad, Page, 1

म. महावीरांच्या अगोदरपासूनच भारतवर्षात होता याला या पक्षातर्फे पुढील आधार दिले जातात.

१ ) वैदिककालपूर्वी भारतात दुसरी एक संस्कृती अस्तित्वात होती. ती 'श्रमणसंस्कृती' या नावाने वैदिकांना विरोधी म्हणून ओळखली जाऊ लागली. सांख्य, बौद्ध, जैन आणि आजीवक हे एकाच श्रमणसंस्कृतीचे वारसदार आहेत. प्राचीन जैन ग्रंथात 'श्रमणा' चा उल्लेख अनेकदा येतो.

२ ) वैदिकांनी सुद्धा या प्राचीन श्रमणसंस्कृतीतून काही परंपराना आत्मसात् केले. वेद न मानणाऱ्या सांख्य तत्त्वज्ञानाचा समावेश वैदिक संस्कृतीत झाला हे याचे उदाहरण म्हणून सांगता येईल. वैदिकेतर आगमांचा स्वीकार वैदिकांनी कसा केला व काही काळानंतर त्याच आगमांना वैदिक तत्त्वज्ञानात श्रेष्ठ स्थान प्राप्त झाले याचे उदाहरण वैष्णव व शैव याचे देता येईल. हे एकेकाळी वैदिक संप्रदायाहून भिन्न तर होतेच पण विरोधी होते. वैदिकाचार्य वैष्णव व शैव आगमाना प्रथम प्रथम 'वेदबाह्य' मानीत. सांख्य तत्त्वज्ञानही असेच वेदबाह्य गणले गेले होते. ब्रह्मसूत्र-शंकर-भाष्यात कापिल-सांख्य दर्शनाला स्पष्टपणे अवैदिक म्हटले आहे.[४] त्यावरून अशा सहज ध्वनी निघतो की ती परंपरा-प्राग्वैदिक-वैदिकेतर मानावी.[५] सांख्य दर्शनाची ही अवैदिकताच श्रमण संस्कृतीतील जैन तत्त्वज्ञानाची प्राचीनता सिद्ध करते.

३ ) भारतीय वाङ्मयाचा अभ्यास करीत असताना साधारणतः आपण वेदापासून आरंभ करतो, पण आपण जेव्हा उपनिषदात प्रवेश करतो तेव्हा एकदम येथपर्यंत वैदिक संस्कृतीत न दिसून येणारी तत्त्वे दिसू लागतात.[६] आत्म्याचे अस्तित्व येथे प्रगट झाले आहे. वैराग्याबरोबरच आत्मविद्येचाही विचार येथे मौलिक वाटू लागतो. यज्ञविद्या निषेधिली गेली आणि आत्मविद्या ही सर्वात श्रेष्ठ गणली जाऊ लागली. ही आत्मविद्या वैदिकांनी वेदपूर्वकालीन भारतीय संस्कृतीतून उचलली व स्वतःचा विकास करून घेतला. पंजाबातून

---

३. निर्ग्रंथसंप्रदाय, पंडित सुखलाल संघवी. पृ. १
४. न तया श्रुतिविरुद्धमपि कापिलं मतं श्रद्धातुं शक्यम् । ब्र. सू. शा. भा. २ । १ । १
५. जैनदर्शन, (बनारस) प्रस्तावना, मंगलदेवशास्त्री, पृ. १०.
६. बृहत्कथाकोश--Dr. A. N. Upadhye, Introduction, Page, 12

प्रगती करीत पूर्व भारतातील गंगाकिनारी जेव्हा वैदिक संस्कृती पोहोचली तेव्हा त्या भागात अस्तित्वात असलेल्या प्राचीन भारतीय श्रमणसंस्कृतीचा व या वैदिक संस्कृतीचा संगम झाला. ज्यांनी वैदिकांना विरोधच करावयाचे ठरविले ते जैन आणि बौद्ध मात्र अखेरपर्यंत अवैदिकच राहिले.

४ ) ही वेदपूर्वकालीन भारतीय संस्कृती नक्की कोठे होती आणि त्या संस्कृतीची व्यवच्छेदक लक्षणे कोणती होती याविषयी आजवरच्या विद्वानानी जे संशोधन केले आहे त्याचा सारांश पुढीलप्रमाणे सांगता येईल. ही संस्कृती नक्की कोणत्या नावाने ओळखली जात होती त्याचा विचार करता तिला ' श्रमण–संस्कृती ' असेच नाव देणे योग्य होईल. श्रमण व ब्राह्मण यांचा विरोध हा फारच प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे.[७] पतंजलींनी आपल्या महाभाष्यात शाश्वत विरोध असलेल्या युग्मांची उदाहरणे देताना अहि-नकुल, गो-व्याघ्र, यानतर ब्राह्मण–श्रमण असे उदाहरण दिले आहे. यावरून आणि प्राचीन जैन ग्रंथात येणाऱ्या व बौद्धग्रंथातही वारंवार उल्लेखिलेल्या ' समण ' शब्दावरून हे निश्चित होते की श्रमणसंस्कृती ही एक व्यापक संस्कृती होती. याची लक्षणे जरी सर्व विद्वानानी एकच ठरविली असली तरी नावे मात्र वेगवेगळी दिलेली दिसून[८] येतात. याला याकोबी ' Popular Religion ' म्हणतो. तर ल्युमान ' परिव्राजिक ' असे नाव ठेवतो. ' विंटरनिट्स ' ' सन्यासमार्गी ' ( Ascetic ) म्हणतो तर गार्बे त्याला ' क्षत्रियाचा धर्म ' ठरवितो. आणि ऱ्हेइस ( Rhys ) " Well organised Sophistic Wanderers " म्हणतो.

डॉ ए. एन्. उपाध्ये हे या पूर्व भारतीय धर्माला 'मागध धर्म'[९] ( Magadhan Religion ) असे म्हणतात. या सगळ्या नावांचा अर्थ एकच आहे आणि तो हा की मगध देशात गंगेच्या किनाऱ्यावर एक आत्मप्रधान संस्कृती वावरत होती. तिच्यातूनच सांख्य, जैन, बौद्ध व आजीवक असे वेगवेगळे संप्रदाय नतर दिसू लागले. जैन व बौद्ध तत्त्वज्ञानाला उपनिषदावर परिपुष्ट झालेले तत्त्वज्ञान म्हणता येणार नाही. या दोन्हीही तत्त्वज्ञानांच्या मुळाशी एकच श्रमण संस्कृती

७. महाभाष्य २. ४. ९

८. बृहत्कथाकोश, Dr. A. N. Upadhye, Introductinn, Page 12

९. प्रवचनसार Dr. A. N. Upadhye, Introduction, Page, 12, 13

आहे. ती संस्कृती मुख्यतः संन्याशांची होती, संसारापासून विरक्त झालेल्यांची आणि द्वैत सिद्धांतावर विश्वास असलेल्यांची ती संस्कृती होती. सांख्य, जैन व बौद्ध ह्या तिन्हींमध्ये असलेली साम्यस्थळे आणि त्यांचा वैदिकांशी असलेला समान विरोध ह्यांचा एकत्रित विचार करता हे तिन्ही एकाच परंपरेचे[10] आहेत ह्यात शंका राहत नाही. यज्ञविरोध, वेदाचे अपौरुषेयत्व अमान्य, कर्मसिद्धांतावरील विश्वास, सृष्टिकर्तृत्व अमान्य व आत्म्याचे स्वातंत्र्य आणि त्याचा परिपूर्ण विकास ह्या गोष्टी जैन बौद्ध व सांख्य तत्त्वज्ञानात समान दिसून येतात.

५ ) भगवान् महावीरापासून जैनधर्माचा प्रारंभ झाला अशी जैनमान्यता कुठेच नाही. वर्तमान चोवीस तीर्थंकरांपैकी महावीर हे चोवीसावे तीर्थंकर झाले अशीच दिगंबर आणि श्वेतांबर ह्या जैन धर्माच्या दोन्हीही संप्रदायांची परंपरागत मान्यता आहे. चोवीस तीर्थंकरांपैकी प्रथम तीर्थंकर भगवान् ऋषभदेव हे फक्त जैन धर्मासच मान्य आहेत असे नसून त्यांचे चरित्र किंचित् फरकाने वायु, ब्रह्मांड, अग्नी, विष्णू, मार्कण्डेय, कूर्म, लिंग, वराह, स्कंद व भागवत यादी ग्रंथात[11] त्यांचे थोर तपःसामर्थ्य आणि त्यांची नामसुद्रा यांचे वर्णन आले आहे. परमहंस, अवधूत, योगी, जटाधारी अशा अनेक नावांनी त्यांचा उल्लेख येतो. म्हणून भगवान् ऋषभदेव ही व्यक्ती काल्पनिक नसावी असे म्हणता येणार नाही. पौराणिक म्हणून त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. उलटपक्षी पौराणिक[12] धर्माचाही संबंध वेद-काळाच्याही पूर्वी चालत असलेल्या लोकधर्मांशी पोहोचविता येणे शक्य आहे, म्हणूनच ऋषभदेवासारखी एखादी व्यक्ती ब्राह्मण व श्रमण या दोघनाही पूज्य झाली असावी. कदाचित त्या काळी ऋषभदेवाच्या धर्माचे विकसित स्वरूप म्हणजे आजचा जैन धर्म असे म्हणण्यास हरकत नसावी. ऋषभदेवानंतर झालेल्या अन्याच तीर्थंकरांची ऐतिहासिकता सिद्ध करणे ही गोष्ट आज तरी अशक्य आहे. परंतु महावीरापूर्वी फक्त अडीचशे वर्षे झालेले श्री पार्श्वनाथ तीर्थंकर ही व्यक्ती मात्र इतिहासात मान्य आहे. बौद्धाच्या वाङ्मया-

---

१०. बृहत्कथाकोश, Dr. A. N. Upadhye, Page, 13 ( Introduction ).

११. वैदिक संस्कृतीचा विकास–पृ. २१६.

१२. वैदिक संस्कृतीचा विकास पृ. २१५.

तही पार्श्वनाथांचा धर्म त्यावेळी " चाउज्जाम धम्म[13] " या नावाने प्रसिद्ध होता.

चोवीसावे तीर्थंकर भ. महावीर यांच्या ऐतिहासिकतेसंबंधी तर संशयच नाही. परंतु महावीरांच्या जीवनचरित्रातून दिसणाऱ्या काही ठळक गोष्टींवरून महावीरापूर्वीच जैन परंपरा ही चालत आली होती असे सिद्ध होते. बुद्धाने महाभिनिष्क्रमणानंतर सहा वर्षे निरनिराळ्या प्रचलित धर्मपंथांचा अनुभव घेऊन आपला नवा मार्ग शोधून काढला. परंतु महावीरांनी अशा निरनिराळ्या धर्मपंथांचा अनुभव घेत न बसता कुलपरंपरेत चालत आलेल्या धर्माचा श्रद्धेने स्वीकार केलेला दिसतो.[14] बुद्धाने ज्याप्रमाणे चार आर्य सत्ये शोधून काढली असे स्वतः म्हटले आहे, तसे महावीरांनी स्वतःचे नवीन तत्त्वज्ञान शोधून काढल्याचे सांगितले नाही. एका पार्श्वापत्याने महावीराना काही प्रश्न विचारले तेव्हा महावीरानी पार्श्वनाथांच्या वचनांचा आधार घेऊन त्याला उत्तरे दिली असा उल्लेख भगवतीसूत्रात[15] ( ५, ९, २२५ ) मिळतो.

महावीर हे विहार करीत असताना चैत्यात राहत असत. चैत्य हे पूर्वीचेच होते. [16]

एकंदरीत जैनतत्त्वज्ञानाचा आरंभ इ. स. पूर्व सहाव्या शतकातच झाला असे वरील निरनिराळ्या मुद्यांचा विचार करता म्हणता येणार नाही. तपस्वी मुनींचा संप्रदाय ऋग्वेदकाळाच्यापूर्वीपासून चालत आला आहे. तोच संप्रदाय ऋग्वेदकाळानंतर जैन-श्रमण ह्या नावाने ओळखला जाऊ लागला असे वाटते.

**जैन तत्त्वज्ञान :-**

जैन धर्माची प्राचीनता पाहिल्यानंतर त्या धर्माचे तत्त्वज्ञान थोडक्यात पाहावयाचे आहे.

---

१३. धर्मानंद कोसंबी, पार्श्वनाथाचा चातुर्याम धर्म. पृ. १४.
१४. Studies in Jainism, Jacobi, Page 4.
१५. निर्ग्रंथसंप्रदाय, सुखलाल संघवी, पृ. ९.
१६. " Some kind of worship, however, seems to be implied from the oldest times by the mention of the various ceiya ( चैत्य ) or shrine, in the sacred books. These shrines were situated in gardens in which Mahavira resided during his visits to the towns to which they belonged. " of Hoernle, Uvasayadasao
Tr, p. 2. Note 4
Studies n Jainism, Jacobi, Page 9.

विश्वाच्या बाह्य आणि आंतरिक स्वरूपासंबंधी तसेच त्याच्या सामान्य आणि व्यापक नियमासंबंधी जो मूलगामी विचार तेच तत्त्वज्ञान होय. मी काय आहे? हे विश्व काय आहे? या सर्वांचे स्वरूप काय आहे? इत्यादी प्रश्नासंबंधी इतर भारतीय तत्त्वज्ञानाप्रमाणे जैन तत्त्वज्ञानानेही उत्तरे दिली आहेत. 'तस्य भावः तत्वं' ही जैनांची तत्त्वव्याख्या आहे[१७] तत्त्व म्हणजे त्या त्या वस्तूचा धर्म. वस्तूचा धर्म हा स्वतः सिद्ध असतो. 'धम्मो वत्थुसहावो' ही धर्माची व्याख्या म्हणजे तत्त्वज्ञानाचीच व्याख्या आहे.[१८]

वस्तूच्या स्वभावाविषयी विचार करताना जैनांनी आपल्या दृष्टीपेक्षा वस्तूच्या स्वभावाला जास्त महत्त्व दिले आहे. स्वभाव तर त्या त्या वस्तूतच राहणार आहे. फक्त पाहणाऱ्याने आपली दृष्टी पक्षपातविरहित ठेवून वस्तूकडे पाहावे म्हणजे तत्त्व नीट समजू शकेल. प्रत्येक वस्तू म्हणजे परस्परविरोधी अशा अनेक धर्मांचा स्वभावांचा समुच्चय आहे. अशी जैन दृष्टी आहे. ही दृष्टी म्हणजेच 'स्याद्वाद' किंवा 'अनेकान्तवाद' होय. सत्, असत्, एक, अनेक, नित्य, अनित्य हे परस्परविरोधी गुण एकमनयावच्छेदेकरून एकाच वस्तूत असतात अशी जैन दर्शनाची मूलभूत मान्यता आहे.[१९]

विश्वाचा विचार करताना उपनिषद् काळात वैदिक तत्त्वज्ञानाने आत्मवादालाच प्राधान्य देऊन त्यातही नित्यात्मवादाला प्राधान्य दिले. केवलाद्वैतसिद्धान्त हा त्यातूनच निघाला. ब्रह्म सत्य मानल्यात येऊन जग हे मिथ्या ठरले. पण ब्रह्म जीव हा जसा सत्स्वरूप आहे तसेच जड जगतही सत् आहे असे जैन तत्त्वज्ञानाने मानले, म्हणजे मुख्यतः सत्संबंधी आणि सत्च्या स्वरूपासंबंधी जैनदर्शनात व वैदिक दर्शनात भिन्नता दिसून येते. सत् हे केवळ चैतन्यमय नाही. ते केवळ एक नाही. ते केवळ नित्य नाही. असे जैन तत्त्वज्ञान मानते. म्हणून जीवाबरोबरच अजीवही आहे. जीव आणि अजीव हे वेगवेगळे आहेत. ते दोन्ही नित्य असूनही त्यांच्यात परिवर्तन चालू आहे. साधारणपणे ही जैन तत्त्वज्ञानातील मूलभूत विचारसरणी आहे.

---

१७. जैन संस्कृती संशोधन मंडळ, (बनारस) पत्रिका नं. १७
ले. सुखलाल संघवी. पृ. १.

१८. स्वामी कार्तिकेयानुप्रेक्षा, गाथा ४७८.

१९. जैनदर्शन, ले. पं. महेंद्रकुमारजी न्यायाचार्य. पृ. ६१.

## लोकव्यवस्था —

हे जग काय आहे व कसे निर्माण झाले? हा प्रश्न तत्त्वज्ञान्यांच्यापुढे फार महत्त्वाचा होता. या विश्वात अत्यंत व्यवस्थित व नियमबद्ध संचालन चालू आहे. हे सर्व बुद्धिपूर्वक चालू आहे की अनादिसिद्ध आहे? जर बुद्धिपूर्वक असेल तर ती

बुद्धी कोणाची ? तो बुद्धिमान विद्यमान असेल तर स्वतः तटस्थ राहून विश्वाचे नियमन करतो की स्वतःच विश्वरूपाने परिणमतो ? का त्याचा केवळ आभासच होत आहे ? ही अशी प्रश्नमालिका विश्वासंबंधी दार्शनिकाच्या मनात निर्माण झालेली दिसून येते.

प्राचीन भारतीय विचारवंतांनी वरील प्रश्नांची उत्तरे दिली आहेत, त्यांचे वर्गीकरण[२०] केल्यास साधारणपणे पुढील विचारप्रवाह त्यात दिसून येतात.

१ ) **परिणामवाद** :– बाह्य विश्व हे उत्पन्न झाले आहे, परंतु प्रथम काहीच नव्हते आणि नंतरच हे उत्पन्न झाले असे मात्र नाही. दुधात लोणी विद्यमान आहेच, त्याचा आविर्भाव मात्र केव्हा तरी होतो. त्याप्रमाणे हे स्थूल विश्व कोणत्या-तरी सूक्ष्म कारणाने आविर्भूत होते. ते सूक्ष्म कारण मात्र अनादिसिद्ध आहे. असे हे परिणामवादाचे स्वरूप आहे.

२ ) **कार्यवाद** :– हे विश्व कोणत्याही एका कारणाने उत्पन्न झाले नाही. स्वाभाविकच अशी काही भिन्न कारणे आहेत आणि भिन्नभिन्न काष्ठखंडांनी एखादी गाडी तयार व्हावी त्याप्रमाणे त्या भिन्न भिन्न मूळ कारणाच्या संश्लेषण विश्लेषणांनी बाह्य विश्व अगदी नवीनच उत्पन्न होते. याला कार्यवाद म्हणतात.

परिणामवाद व कार्यवादातील मतभेद फक्त बाह्यविश्वासंबंधी आहे. आत्म-तत्त्वाच्या अनादित्वासंबंधी त्यांच्यात मतभिन्नता नाही.

३ ) **ब्रह्मवाद** :— जीव आणि जगत् म्हणजे आंतरिक विश्व व बाह्य विश्व हे एकाच अखंड सत्चे परिणाम असून त्यात कार्यकारणभावसुद्धा नाही. असे ब्रह्मवादाचे मत आहे.

उपनिषद्‌काली तर काल, स्वभाव, नियती, यदृच्छा, भूत ( पृथिव्यादी ) आणि पुरुष यांना जगत्कारण म्हणून मान्यता देणारे वेगवेगळे विचारप्रवाह[२१] दिसून येतात. कालादी कारणे किंवा पंचमहाभूतादी अचेतन कारणे पुरुषाशिवाय काही करू शकत नाहीत आणि पुरुष कालादी अचेतन कारणाच्या सहाय्याशिवाय काही करू शकत नाही असा उपनिषदाचा निष्कर्ष आहे.

## जैन विचारप्रवाह :–

जैन दर्शनात 'सत्' चे लक्षण उत्पाद व व्यय व ध्रौव्य–स्वरूप मानले आहे. प्रत्येक पदार्थ उत्पन्न होत आहे, विनष्ट होत आहे आणि ध्रुव आहे.

---

२०. जैन तत्त्वज्ञान, ले. पं. सुखलाल संघवी, पृ. ३.

२१. कालः स्वभावो नियतिर्यदृच्छा भूतानि योनिः पुरुष इति चिन्त्या ।
संयोग एषां न त्वात्मभावादात्माप्यनीशः सुखदुःखहेतोः ॥
श्वेताश्व उ. १. २.

याप्रमाणे जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश व काल या सहा द्रव्यांचे हे अकृत्रिम विश्व बनले आहे.

## सारांश –

१ ) जैनदर्शनाप्रमाणे हे विश्व स्वयंचलित आहे. त्याला कर्ता नाही. ते अनादी आहे.

२ ) लोकात जीवादी सहा द्रव्ये आहेत.

३ ) द्रव्य हे सत् लक्षणयुक्त आहे.

४ ) सत् हे उत्पाद व्यय ध्रौव्ययुक्त आहे.

५ ) प्रत्येक द्रव्य आपापल्या विशेष गुणांनी वेगवेगळे आहे.

## ६- सप्ततत्वे ––

पदार्थव्यवस्था किंवा लोकव्यवस्था या दृष्टीने हे विश्व षड्द्रव्यमय आहे. परंतु मोक्षप्राप्तीसाठी धडपडणाऱ्या व शाश्वत सुखाच्या सिद्धीसाठी प्रयत्न करणाऱ्या जीवाच्या अपेक्षेने जैनदर्शनात श्रद्धेय अशी सप्ततत्त्वे मानली आहेत. गौतमबुद्धाने निर्वाणासाठी चार आर्यसत्याचा उपदेश दिला होता. दुःख, समुदय, निरोध आणि मार्ग. ही ती चार आर्यसत्ये. जैनदर्शनातही याच पद्धतीने सात तत्त्वे वर्णिली आहेत.

१ ) जीव २ ) अजीव ३ ) आस्रव ४ ) बंध ५ ) संवर ६ ) निर्जरा ७ ) मोक्ष. ही तत्त्वे मुमुक्षूला श्रद्धा ठेवण्यास योग्य आहेत.[३२] हाच त्याचा मुक्तीचा मार्ग आहे.

संसारी जीव मुक्त होऊ इच्छितो म्हणजे काय ? व त्याची प्राप्ती कशी करून घेतो याची प्रक्रिया या सात तत्त्वात वर्णिली आहे. हा मोक्षमार्ग सांख्य व योगशास्त्रात हेय, हेयहेतू, हानोपाय आणि हान या चार तत्त्वात सांगितला आहे आणि वैशेषिकात संसार मिथ्याज्ञान, तत्त्वज्ञान आणि अपवर्ग असा हा क्रम आहे. हेच वर्णन वेदान्तदर्शनात संसार, अविद्या, ब्रह्मभावना आणि ब्रह्मसाक्षात्कार या नावाने केले आहे. सर्वच दर्शनात मोक्षप्राप्ती अथवा ब्रह्मप्राप्ती हा हेतू प्रमुख आहे. जरी जैनदर्शन याला अपवाद नसले तरी त्याच्या मोक्षप्राप्तीच्या उपक्रमात मात्र भिन्नता आढळते. याचे कारण त्याच्या तत्त्वज्ञानातील मूलभूत फरक हाच मानावा लागेल.

सात तत्त्वात मुख्य तत्त्वे दोनच. जीव व अजीव. अजीवापासून जीवाने स्वतःला वेगळे करणे म्हणजेच जीवाचा मोक्ष होय. संसारात आत्मा कर्मबद्ध आहे. हा कर्मबंध ( अजीवबंध ) का होत आहे ? हा बंध कसा थांबेल याचाच विचार मोक्षमार्गी जीवाच्या अपेक्षेने अत्यंत महत्त्वाचा आहे.

---

३२. तत्त्वार्थसूत्र....१.४,

जीव ज्ञानदर्शनमय आहे. अजीव जड आहे. जीव स्वतःच्या रागद्वेषादिका-मुळे अजीवामध्ये स्वस्वरूप मानतो. त्याच्या संयोग वियोगात सुखदुःख मानतो. तो क्रोधादी कषाय करतो आणि त्यामुळे सर्जाव कर्मवर्गणा त्याच्याकडे येतात. हा आस्रव होतो. आलेले कर्म परमाणू जीवाशी एकरूप होऊन बांधले जातात. हा बंध घडतो. शाश्वत सुखासाठी प्रयत्न करणारा जीव संयम करतो, व्रत करतो. क्रोधादी कषाय आवरतो. त्यामुळे नवीन कर्म बांधले जात नाहीत. हा संवर होतो. मग संचित कर्म नष्ट करण्यासाठी जीव तप करतो. हळूहळू संचित कर्म दूर करतो. ही निर्जरा आणि शेवटी सर्व कर्मापासून जीव मुक्त झाला की त्याचा मोक्ष होतो. असा हा सप्ततत्त्वांचा क्रम आहे. या सात तत्त्वावर यथार्थ श्रद्धान म्हणजेच सम्यग्दर्शन आणि त्याचे यथार्थ ज्ञान म्हणजेच सम्यग्ज्ञान होय. मोक्षासाठी शुद्धाचरण-स्वरूपप्राप्ती म्हणजे सम्यक्-चारित्र होय.

### जैनमत आणि ईश्वर —

जैनांच्या मते मोक्षप्राप्तीच्या मार्गात ईश्वराचे कोठेच स्थान नाही. जगाच्या व्यवस्थेतही त्याला स्थान नाही. सृष्टिकर्तासंहर्ता असा कोणीही ईश्वर जैनदर्शनात मानलेला नाही. लोक हे प्रवाहरूपाने अनादी अनंत आहे. त्याची रचना करणारा कोणीही नाही. प्रत्येक जीव स्व-भावाचा कर्ता व भोक्ता आहे. तात्त्विक दृष्टीने पाहिले तर प्रत्येक जीव हा मोक्षप्राप्तीनंतर ईश्वरभावच होतो. पण हा ईश्वर वीतराग व सर्वज्ञ असा असतो. असा हा मुक्त जीव सामान्य लोकाच्या अपेक्षेने उपास्य बनतो. पण तो मात्र कोणतीही सांसारिक क्रिया करीत नाही. योगशास्त्रातही ईश्वर हा केवळ उपास्यच आहे. कर्ता-संहर्ता नाही. पण योगशास्त्र-संमत ईश्वर हा सदा मुक्त आहे. जैन शास्त्र असे सांगते की प्रयत्नाने कोणीही ईश्वर होऊ शकतो. तो क्षुधादी अठरा दोषांनी रहित असतो. आप्तपरीक्षा, (विद्यानंदी), आप्तमीमांसा (समंतभद्र) या ग्रंथात ईश्वरवादाचे खंडन केलेले आहे.

आठ कर्मे — जीवाच्या गुणांना प्रकट न होऊ देणारी आठ प्रकारची कर्मे मानली आहेत. ज्ञानावरण, दर्शनावरण, मोहनीय, अंतराय, वेदनीय, आयु, नाम, गोत्र. पैकी प्रथमची चार कर्मे नष्ट झाल्यानंतर जीवास अरिहंत अवस्था प्राप्त होते. आणि सर्व कर्मे नष्ट झाल्यानंतर जीव सिद्ध होतो. प्रत्येक कर्माच्या वर्गणा जड स्वरूपात विश्वात विद्यमान आहेत. जीव ज्यावेळी पापक्रिया वा पुण्यक्रिया करतो त्या त्या वेळी त्या कार्मणा-वर्गणांचा पुण्य वा पापबंध होतो. कर्मांचे सूक्ष्म प्रकारे १४८ भेद मानले आहेत. सप्ततत्त्वात आस्रवाच्या वर्णनात याचे वर्णन येते. कर्मांचे येणे, कर्मबंध होणे, कर्मबंध थांबविणे, संचितकर्म नष्ट करणे व सर्व कर्मापासून मुक्त होणे याप्रमाणे सप्ततत्त्वांपैकी जवळ जवळ ५ तत्त्वांचा कर्मसिद्धांताशीच संबंध येतो.

(उप्पेज्जेई वा विगमेई वा धुवेई वा). उत्पाद व्यय ध्रौव्य यांनी युक्त असणे हेच सत्‌चे लक्षण आहे. या लक्षणात स्यात् रूपाने नित्यवाद आणि स्यात् रूपाने उच्छेदवाद यांचा स्वीकार करण्यात आला आहे. सत् हेच द्रव्याचे लक्षण मानल्याने उत्पाद, व्यय आणि ध्रौव्यस्वरूपाने असणे हा वस्तूचा स्वभाव आहे, असे जैनदर्शन मानते. आपल्या स्वभावानेच प्रत्येक सजीव निर्जीव वस्तू प्रतिक्षणी उत्पन्न होत आहे, विनष्ट होत आहे. व नित्यही आहे. आणि म्हणूनच "जगात जे नाही ते उत्पन्न होत नाही आणि जे आहे त्याचा सर्वथा नाश होत नाही. सर्व पदार्थ स्वतःच्या गुण आणि पर्यायाच्यारूपाने उत्पादव्यय करीत आहेत.[२२]

पड्द्रव्य व्यवस्था —

या विश्वात जैन तत्त्वज्ञानाप्रमाणे सहा द्रव्ये आहेत. जीव, पुद्‌गल, धर्म, अधर्म, आकाश आणि काल अशी त्याची नावे आहेत. यातील प्रत्येक द्रव्य स्वयंभू व स्वतंत्र आहे. त्यांचा कोणीही कर्ता नाही. आकाशद्रव्य स्वतः अनंत आहे. त्याच्या जितक्या भागात जीवादी द्रव्ये राहतात त्या भागाला 'लोक' अशी संज्ञा आहे. त्या लोकाच्या बाहेरील आकाशास अलोक म्हणतात. या पड्द्रव्यांनी युक्त असे हे विश्व अकृत्रिम[२३] आहे.

'द्रु' या धातूपासून द्रव्य शब्द बनला आहे. 'द्रु' म्हणजे जाणे. जे आपल्या त्या त्या पर्यायाना प्राप्त करून घेतो पण सत्तारूपाने अभिन्न असतो. त्याला त्याला द्रव्य म्हणावे अशी द्रव्याची धात्वर्थयुक्त व्याख्या[२४] करण्यात आली आहे.

जीव द्रव्य चेतनायुक्त असून जीवाची लोकातील संख्या अनंत आहे. प्रत्येक जीव स्वतंत्र आहे. एकमेकापासून भिन्न आहे. जीव म्हणजेच आत्मा. संसार बंधनातून मुक्त होणे हे सर्वस्वी जीवाच्या पुरुषार्थावर अवलंबून आहे. जीवाचे यथार्थ लक्षण उपयोगमय, अमूर्तिक, कर्ता, भोक्ता, स्वदेहप्रमाणाचा, संसारी, सिद्ध आणि स्वभावाने ऊर्ध्वगमन करणारा अशा विशिष्ट विशेषणांनी जैन शास्त्रात करण्यात आले आहे.[२५]

---

२२. भावस्स णत्थि णासो णत्थि अभावस्स चेव उप्पादो ।
गुणपज्जएसु भावा उप्पादवए पकुव्वंति ॥ १५० ॥ — पंचास्तिकाय.

२३. लोगो अकिट्टिमो खलु ॥ ७१६ ॥
— मूलाचार

२४. दवियदि गच्छदि ताइं ताइं सब्भावपज्जयाइं जं ।
दवियं तं भण्णंते अणण्णभूदं तु सत्तादो ॥ ९ ॥ — पंचास्तिकाय.

२५. जीवो उवओगमओ अमुत्ति कत्ता सदेहपरिमाणो ।
भोत्ता संसारत्थो सिद्धो सो विस्ससोड्ढगई ॥ २ ॥ — द्रव्यसंग्रह.

पुद्गल म्हणजे स्पर्श, रस, गंध आणि वर्ण यांनी युक्त पदार्थ. साधारणतः आपल्यासमोरील संपूर्ण दृश्यमान विश्व हे पुद्गलमय आहे. पुद्गलाचे परमाणू व स्कंध असे दोन भेद मानण्यात आले आहेत. अनेक परमाणु एकत्रित आले की स्कंध तयार होतो. स्कंध हा दृष्टिगोचर असतो, परमाणू दृष्टिगोचर होत नाही. जैन सिद्धांतात परमाणूचे स्वरुप पुढीलप्रमाणे सांगितले आहे. "जो स्वतःच आदी, स्वतःच मध्य व स्वतःच अंत स्वरूपाचा आहे. आदी, मध्य, अंत हा भेद ज्यात राहिला नाही, जो इंद्रियांच्याद्वारे ग्रहण केला जात नाही त्या अविभागी द्रव्याला परमाणू म्हणावे."[२६] विश्वात असे अनंतानंत परमाणू आहेत. त्यांच्यातूनच दृश्य-मान असे हे विश्व तयार झालेले दिसते. स्निग्धत्व आणि रूक्षत्व गुणांच्या योगाने परमाणूंचे स्कंध बनतात.[२७] शब्द, अंधार, छाया, प्रकाश या सर्वांना जैनागमात पुद्गल म्हटले आहे.[२८] इंद्रिये, शरीर, मन, इंद्रियांचे विषय, श्वासोच्छ्वास हे सर्व पुद्गलाचे परिणमन[२९] आहेत.

विश्वातील सहा द्रव्यांपैकी जीव व पुद्गल या दोन द्रव्यांत हलनचलनाची क्रिया होते. म्हणून प्रश्न असा निर्माण होतो की, ही द्रव्ये हलनचलन कशी करतात ? आणि एकदा गती प्राप्त झाल्यानंतर थांबू कशी शकतात ? म्हणजेच जीव व पुद्गलांना गती व स्थिती या क्रियेमध्ये मदत करणारे कोणीतरी असावेत असे मानावे लागते. त्यासाठी अनुक्रमे धर्मद्रव्य व अधर्मद्रव्य अशी दोन स्वतंत्र द्रव्ये जैन दर्शनकारांनी मानली[३०] आहेत. आकाश द्रव्य हे सर्व द्रव्यांना राहण्यास जागा देते. लोकाकाश व अलोकाकाश असे त्याचे दोन भेद आहेत. आकाशाच्या ज्या विशिष्ट भागात जीवादी द्रव्ये राहतात त्याचे भाग लोकाकाश होय. बाकीचा भाग हा अलोकाकाश होय.[३१]

प्रत्येक द्रव्यात प्रतिक्षणी परिवर्तन चालू असते. हे परिवर्तन घडण्यास निमित्त असणारे द्रव्य हे कालद्रव्य आहे.

---

२६. अत्तादि अत्तमज्झं अत्तंतं णेव इंदिएगेज्झं ।
अविभागी जं दव्वं परमाणू तं विआणाहि ॥ २६ ॥ – नियमसार.

२७. स्निग्धरूक्षत्वाद्बंधः । ५. ३३, तत्त्वार्थसूत्र.

२८. सद्दोबंधो सुहुमो थूलो संठाण भेद तम छाया ।
उज्जोदादवसहिया पुग्गल दव्वस्स पज्जाया ॥ १६ ॥ – द्रव्यसंग्रह.

२९. शरीरवाङ्मनः प्राणापानाः पुद्गलानाम् । ५.१९ – तत्त्वार्थसूत्र.

३०. गतिस्थित्युपग्रहौ धर्माधर्मयोरुपकारः । ५.१७

—तत्त्वार्थसूत्र.

३१. अवगासदाणजोग्गं जीवादीणं वियाण आयासं ।
जेण्हं लोगागासं अल्लोगागासमिदि दुविहं ॥ १९ ॥

—द्रव्यसंग्रह.

याप्रमाणे जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश व काल या सहा द्रव्यांचे हे अकृत्रिम विश्व बनले आहे.

## सारांश –

१ ) जैनदर्शनाप्रमाणे हे विश्व स्वयंचलित आहे. त्याला कर्ता नाही. ते अनादी आहे.

२ ) लोकात जीवादी सहा द्रव्ये आहेत.

३ ) द्रव्य हे सत् लक्षणयुक्त आहे.

४ ) सत् हे उत्पाद व्यय ध्रौव्ययुक्त आहे.

५ ) प्रत्येक द्रव्य आपापल्या विशेष गुणांनी वेगवेगळे आहे.

## ६- सप्ततत्त्वे —

पदार्थव्यवस्था किंवा लोकव्यवस्था या दृष्टीने हे विश्व षड्द्रव्यमय आहे. परंतु मोक्षप्राप्तीसाठी धडपडणाऱ्या व शाश्वत सुखाच्या सिद्धीसाठी प्रयत्न करणाऱ्या जीवाच्या अपेक्षेने जैनदर्शनात श्रद्धेय अशी सप्ततत्त्वे मानली आहेत. गौतमबुद्धाने निर्वाणासाठी चार आर्यसत्याचा उपदेश दिला होता. दुःख, समुदय, निरोध आणि मार्ग. ही ती चार आर्यसत्ये. जैनदर्शनातही याच पद्धतीने सात तत्त्वे वर्णिली आहेत.

१ ) जीव २ ) अजीव ३ ) आस्रव ४ ) बंध ५ ) संवर ६ ) निर्जरा ७ ) मोक्ष. ही तत्त्वे मुमुक्षुला श्रद्धा ठेवण्यास योग्य आहेत.[३२] हाच त्याचा मुक्तीचा मार्ग आहे.

संसारी जीव मुक्त होऊ इच्छितो म्हणजे काय ? व त्याची प्राप्ती कशी करून घेतो याची प्रक्रिया या सात तत्त्वात वर्णिली आहे. हा मोक्षमार्ग सांख्य व योग-शास्त्रात हेय, हेयहेतू, हानोपाय आणि हान या चार तत्त्वात सांगितला आहे आणि वैशेषिकात संसार मिथ्याज्ञान, तत्त्वज्ञान आणि अपवर्ग असा हा क्रम आहे. हेच वर्णन वेदान्तदर्शनात संसार, अविद्या, ब्रह्मभावना आणि ब्रह्मसाक्षात्कार या नावाने केले आहे. सर्वच दर्शनात मोक्षप्राप्ती अथवा ब्रह्मप्राप्ती हा हेतू प्रमुख आहे. जरी जैनदर्शन याला अपवाद नसले तरी त्याच्या मोक्षप्राप्तीच्या उपक्रमांत मात्र भिन्नता आढळते. याचे कारण त्याच्या तत्त्वज्ञानातील मूलभूत फरक हाच मानावा लागेल.

सात तत्त्वात मुख्य तत्त्वे दोनच. जीव व अजीव. अजीवापासून जीवाने स्वतःला वेगळे करणे म्हणजेच जीवाचा मोक्ष होय. संसारात आत्मा कर्मबद्ध आहे. हा कर्मबंध ( अजीवबंध ) का होत आहे ? हा बंध कसा थांबेल याचाच विचार मोक्षमार्गी जीवाच्या अपेक्षेने अत्यंत महत्त्वाचा आहे.

---

३२. तत्त्वार्थसूत्र....१.४,

कर्मांच्या भेद प्रभेदाचे वर्णन तत्त्वार्थसूत्र ( उमास्वामी ) व सर्वार्थसिद्धी ( पूज्यपाद ) या ग्रंथांत आले आहे.

## मराठी ग्रंथातील जैन तत्त्वज्ञान —

आतापर्यंत जैन तत्त्वज्ञानाचे स्वरूप काय आहे हे अनेक अभ्यासक व प्राचीन जैन ग्रंथ यांच्या मदतीने थोडक्यात पाहिले आहे. जैन तत्त्वज्ञान हा विषय स्वतंत्र अभ्यासाचा असल्याने येथे त्याचा समग्र ऊहापोहही अशक्य आहे. मराठीतील जैन ग्रंथांचा अभ्यास करीत असताना या तत्त्वज्ञानाची तोंडओळख तरी झालीच पाहिजे. कथाग्रंथ असो किंवा चरित्र ग्रंथ असो त्यांचीही निर्मिती एक विशिष्ट तत्त्वज्ञान सांगण्याच्या हेतूनेच झालेली असते. म्हणूनच आतापर्यंत या तत्त्वज्ञानाचे स्वरूप पाहणे हे क्रमप्राप्त झाले.

मराठी भाषेतील जुन्या जैन वाङ्मयात संपूर्ण जैन तत्त्वज्ञान आले आहे असे नाही. त्यादृष्टीने हे मराठी साहित्य स्वयंपूर्ण नाही. तत्त्वज्ञानापेक्षा आचारधर्म किंवा पुराणकथाच सामान्य जनांना प्रिय असतात. शिवाय मध्ययुगात तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात एकमेकावर मात करण्याची जिगिषु वृत्ती जैनधर्मात राहिली नव्हती. त्याकाळी धर्मसंरक्षणाचीच चिंता धर्माचार्यांना विशेष लागून राहिली होती. भोळ्याभाबड्या लोकांसाठी पुराणे, चरित्रे, कथा, व्रतकथा, आरत्या यांचाच अधिक उपयोग होई.

मराठीत जैन तत्त्वज्ञानाचे विवेचन करणारे ग्रंथ फार कमी आहेत. जरी कर्ता आणि काळ याचा उल्लेख नसला तरी तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाच्या दृष्टीने 'आत्मख्याती टीका' हाच एक ग्रंथ श्रेष्ठ दर्जाचा झाला आहे. दिल्सुखमुनिरचित 'स्वात्मविचारा'चेही महत्त्व या क्षेत्रात असामान्य आहे. परमहंसकथा, रत्नकरण्डकश्रावकाचारावरील मराठी टीका, गुणकीर्तिकृत धर्मामृत या ग्रंथातही प्रसंगोपात्त जैन तत्त्वज्ञान आले आहे. याशिवाय पद्मपुराण, आदिनाथपुराण, कालिकापुराण, जनार्दनकृत श्रेणिकचरित्र, वीरदासकृत सुदर्शनचरित्र या कथाप्रधान ग्रंथातही जैन तत्त्वज्ञानाचे बरेचसे विस्तृत वर्णन केले गेले आहे.

तत्त्वज्ञान तेच पण ते वेगवेगळ्या ग्रंथात आले आहे म्हणून जैन तत्त्वज्ञानातील काही महत्त्वाच्या विषयांचे वर्णन करणारी उपर्युक्त ग्रंथातील स्थळे येथे फक्त अभ्यासकाच्या नजरेस आणतो.

### मोक्षमार्ग —

'रत्नत्रय' हाच मोक्षमार्ग आहे. सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक् चारित्र्य या तिघांची एकता म्हणजेच मोक्षमार्ग होय. आत्म्यावर श्रद्धा म्हणजे दर्शन, त्याचे ज्ञान आणि त्याच्या गुणाचा अनुभव म्हणजे चारित्र्य, यामुळे आत्मा किंवा जीव कर्मबंधनातून पूर्ण मुक्त होऊन मोक्षास जातो. केवळ श्रद्धा, केवळ ज्ञान अथवा केवळ

चारित्र्य यामुळे मुक्ती मिळत नाही.

( रत्नत्रय म्हणिजे सम्यक्दर्शन, सम्यक्ज्ञान, सम्यक्चारित्र्य । दर्शन म्हणिजे काय । आपन कर्तृत्व भोग्तृत्व, बद्धमोक्षादि विरहित सर्व व्यापक सर्वोत्कर्ष, सकल सिद्ध परब्रह्म, सर्वाधिष्ठ ऐसा निश्चय त्यास दर्शन जाणावें । आनि ऐसाच बोध त्यास ज्ञान जाणावें आनि ऐसाच अनुभव तो चारित्र्य जाणावा ।... ज्ञाननिरपेक्ष चारित्रेंकरोण स्वार्थ– ( मोक्ष ) आनि दर्शनावाचोन ज्ञानचारित्राची शुद्धि नाही. त्यास्तव दर्शनविरहित स्वार्थसिधि नाही ।–स्वात्मविचार )

सप्ततत्त्व–षड्द्रव्य :–

सप्ततत्त्व— तत्त्वावर श्रद्धा म्हणजे सम्यक्दर्शन आणि जीव, अजीव, आस्रव, बंध, संवर, निर्जरा व मोक्ष ही सप्त तत्त्वे होत. या सातही तत्त्वांवर श्रद्धा म्हणजे सम्यक्दर्शन. जीव आणि अजीव यांच्या संयोगातून व वियोगातून पुढील ५ तत्त्वांची निर्मिती होते. जीव हा ज्ञानदर्शनोपयोगांनी युक्त, रत्नत्रयात्मक, अनंतचतुष्टयसहित, ऊर्ध्वगतिस्वभावाचा, उत्पादव्ययध्रौव्य–संयुक्त, असंख्यातप्रदेशी असा आहे. अजीव तत्त्व जड आहे. जीवाला अशुभ परिणामामुळे कर्माश्रव होतो. ते कर्म जीवाशी बांधले जातात. संयमामुळे संवर होतो. चारित्र्यामुळे निर्जरा होते. रत्नत्रयाची आराधना पूर्ण झाली म्हणजे मोक्ष होतो. – ( रत्नकरण्डश्रावकाचार मराठी टीका : प. ११ ). यांतील जीवतत्त्वाचे महत्त्व फार आहे. जीवाला जाणले की सर्व तत्त्व जाणल्याप्रमाणेच आहे. ( जीव गुण आराधिता सकल तत्त्व जानीजती । रत्न. श्रा. म. टीका ) वीरदासकृत सुदर्शन चरित्रात सप्ततत्त्वांचे विस्तृत वर्णन दिले आहे ( ८ वा अधिकार ).

षड्द्रव्य— जीव, पुद्गल, धर्म, अधर्म, आकाश व काल ही सहा द्रव्ये होत. यांपैकी प्रत्येक द्रव्याचे बरेच विस्तृत वर्णन ठराविक पद्धतीने बऱ्याच ग्रंथात करण्यात आले आहे.

( सु. च. वी. – सहावा अध्याय पूर्ण. )

( आदिपुराण, महीचंद्र– ९, १९ ते ३२ ओव्या. )

पंचास्तिकाय— अस्तिकाय म्हणजे बहुप्रदेशी. सहा द्रव्यांतील जीव, पुद्गल, धर्म, अधर्म व आकाश ही पाच द्रव्ये अस्तिकाय आहेत म्हणजे बहुप्रदेशी आहेत. कालद्रव्य हे एकप्रदेशी आहे. त्यामुळे त्याला अस्तिकाय म्हणत नाहीत. ( जीव अजीव भेद दोन । धर्माधर्म मिळोन । आकाश पाचवें लागून । पंचास्तिकाय म्हणताति ॥ ९.२८ ) ( आदिपुराण ).

नऊ पदार्थ— सप्त तत्त्वातूनच नऊ पदार्थांची निर्मिती होते. सप्त तत्त्वांत पुण्य व पाप मिळविले म्हणजे नऊ पदार्थ होतात. जैन शास्त्रात याना पदार्थ अशी संज्ञा आहे. ( जीवा जीव आश्रवबंध जाण । संवर निर्जरा मोक्ष म्हणून । सात

तत्त्वांचें कथन । केले ते वेळीं ॥ ९.२३, सात तत्त्व आणि पापपुण्य । हे नव पदार्थ म्हणती जाण । तुम्ही ऐका श्रोतेजन । स्थीर चित्त करोनी ॥ ९.२४ ) – आदिपुराण. ( एवं तत्त्व सात जाणावे । यांतु पुण्य पाप मिळौनि तरि हे नव पदार्थ जाणावे ॥ घ. प. १७८ ).

आत्मा–जीव— इतर द्रव्यापेक्षा जीव द्रव्याचे अथवा तत्त्वाचे वर्णन मराठी जैन ग्रंथांत विशेष आले आहे.

इंद्रिये म्हणजे आत्मा नाही, श्वासोच्छ्वास म्हणजे आत्मा नाही, मन म्हणजे आत्मा नाही, — मग आत्मा म्हणजे काय आहे ? सांख्य हे सुषुप्ती अवस्थेला आत्मा–शुद्धात्मा मानतात. मीमांसक चराचरात जे व्यापक आहे त्याला आत्मा मानतात; वैशेषिक बुद्धी, सुखदुःख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, धर्म, अधर्म व संस्कार या नव गुणांनी सहित असणाऱ्यास आत्मा मानतात. पण हे जैन दर्शनास अमान्य आहे. बौद्ध हे आत्म्याला शून्य कल्पितात त्यावर जैनदर्शन म्हणते —तर हेहि नाही । कां जे शून्य म्हणजे कांहिच नाहीं । आपन तर कोन्हि आहों । या विषयीं संशय नाहीं । तस्मात शून्य म्हणता महद्दूषण ॥ " याप्रमाणे प्रत्येकाच्या मतातील दोष काढून शेवटी " आत्मा दनमनवचनेंकडून जाणावया योग्य नाही । तो स्वतःच स्वपर-संवेद्य आहे । मन वचन काय याचा पूर्ण निरोध झाल्यानंतर जे उरले ते आपण । ते फक्त आत्मा - गम्य आहे. इंद्रियगम्य नाही. " असे सिद्ध करण्यात आले आहे.

ज्ञान आणि आत्मा यांचे द्वैत की अद्वैत आहे ? या प्रश्नाचे उत्तर– दीपप्रकाश भिन्न नाही, अग्नी आणि उष्णता भिन्न नाहीत, कर्पूर - परिमल्ता भिन्न नाहीत त्याप्रमाणे ज्ञान व आत्मा अभेद आहेत. - गुणगुणी यात अभेदता आहे " आत्मेकरोन आत्मा वेद्य आहे ! "

ज्ञानाकडून जाणला गेलेला आत्मा कसा आहे ? याचे उत्तर–" ते सांगता येत नाही कारण तेथ परिच्छेद नाही, ' ते वाचेसीक येत नाही. " स्थूल म्हणावे तर तो मूर्तिमंत पाहिजे, इंद्रियगोचर पाहिजे, सूक्ष्म म्हणावे तर त्यातील अनंत- गुणांचा अभाव होत आहे. स्वसंवेद्य म्हणावे तर गुरु कशाला पाहिजे ? अवेद्य म्हणावे तर अनुभवाचा अभाव होत आहे. शून्य म्हणावे तर आपण कोणी आहो याचा प्रत्यय नसावा. एक म्हणावा तर वर्णाश्रमाचा अभाव होत आहे. अनेक म्हणावे तर अभेदाचा अभाव होतो. अप्रमाण म्हणावे तर प्रमाण न पडता असंभावना होते. प्रमाण आहे म्हणावे तर मोठा लहान अनुभवात येतो. वचनात येत नाही म्हणावे तर दुःख्यास उपदेश न होता. ज्ञानस्वरूप म्हणावा तर शास्त्र- पठन - पाठन कि निमित्य, अज्ञानरूप म्हणावे तर स्वयंबुद्ध या चिद्रूप म्हणता येत नाही व दुसरा त्याला उपदेशकर्ता दिसत नाही. जर पूर्वोक्त सर्व स्वरूप आत्मा

समजावा तर व्यवहारच सत्य होत आहे आणि व्यतिरेक प्रतिपाद्य होत नाही. ' जर वचनात येत नाही ' म्हटले तर हेही वचन प्रतिपाद्य आहे. म्हणून शेवटी " म्हणून आत्मस्वरूप शब्दातीत जाणावें " असा निष्कर्ष काढला गेला आहे. ( हे सर्व विवेचन ' स्वात्मविचार ' या ग्रंथाधारे केले आहे. )

आत्मा एकदा परमात्मा झाल्यावर पुनः संसारात येत नाही. शिधूत शेत होत नाही. पाषाणावर कमळ उगवत नाही. पाषाणातून गाळून तयार केलेले सोने पुनः पाषाण होत नाही ( धर्मपरीक्षा, विशालकीर्ति–६०९, ६१० ).

आत्मा येतो आणि जातो परंतु दिसत नाही. त्याचा निवाउ कायारूपी घटात आहे. तो शरीरात असूनही शरीरापासून जलकमल न्यायाने भिन्न आहे. पाषाणात सोने, दुधात तूप किंवा तिळात तेल व्यापून असावे तसा तो शरीर व्यापून आहे. गुरुवचन व बुद्धिबळ यांच्या व ध्यानमौनादिकांच्या उपायांनी आत्म्याला देहभिन्न करता येते. ( प. क. पृ. १, २ ) हा जीव जेव्हा कुटुंब, घर, राज्यादिकांना स्वतः स्वरूप मानतो तेव्हा तो बहिरात्मा जाणावा. बाह्य पदार्थ नाशिवंत जाणून त्यापासून आत्मा भिन्न मानतो तेव्हा अंतरात्मा जाणावा आणि संपूर्ण धर्माचा क्षय झाल्यावर हा आत्मा परमात्मा बनतो. हा आत्मा शरीरप्रमाणही आहे. लोकप्रमाणही आहे. तो नित्यही आहे आणि अनित्यही आहे. एकही आहे. अनेकही आहे. तो चेतनही आहे. अचेतनही आहे. दृश्य आहे. अदृश्यही आहे. " अजर, अमर, अच्छेद, निरवलंब, निर्विकार, निरूप, निराबाध, निर्द्वंद्व अइसा परमात्मा आहे. , ( प. क. पृ. ३, ४ ).

जीव द्रव्य हे ज्ञानदर्शनोपयोगमय, रत्नत्रयात्मक, अनतचतुष्टयसहित पंचप्रकारचा ( एकेंद्रिय ते पंचेंद्रिय ), ऊर्ध्वगतिस्वभावाचा, उत्पादव्ययध्रौव्यसयुक्त असा, असंख्यात प्रदेशी, अनंतराशी असे आहे.— ( रत्नकरण्डश्रावकचार मराठी टीका. )

त्रैलोक्यात जीवतत्त्व सामावले आहे. ते असंख्यात आहे. स्वर्ग, मृत्यु, पाताळ जीवांनी व्यापून गेले आहेत विश्वात तिळभर जागा रिकामी नाही. जीवात्मा निजरूप आहे. काळा श्वेतादी रंग त्यास नाहीत. निर्गुण, निराकार, निरामय अशा आत्मतत्त्वास जन्म जरा, मरण, नाही. ( श्रे. च. ज., २५. ७८–९२ ).

जे परमार्थे आत्मस्वरूप जाणत नाहीत आणि व्यवहारातच विमूढ होऊन राहिले । शरीरादी परद्रव्यासच आपुले जाणतात ते जसे तुष तंडुलाचा भेद न जाणता तुषच कुटितात । त्यास तंडुलाची प्राप्ती नाही. ।। ४९ ।। ( आत्मख्याती टीका ).

मराठी ग्रंथात आत्म्यासंबंधी तात्त्विक अशी माहिती बरीच दिली गेली आहे.

## लोकरचना आणि ईश्वरवाद —

या विश्वाची रचना कशी आहे? त्याचा नियंत्रक कोण? ईश्वर–सृष्टिकर्ता आहे काय? अशाही प्रश्नांचा ऊहापोह बऱ्याच ठिकाणी करण्यात आला आहे.

त्रिलोकरचनेसंबंधी विचार करणे हे सुद्धा एक धर्मध्यान आहे. यालाच संस्थानविचयधर्मध्यान म्हणतात. (ध. प. १२९). आकाश अनंतानंत आहे.–त्या धुंधुनाकार अनंत आकाशात अधर निरालंब असा हा त्रिलोक आहे. (त्रिया अधर गगनिं पर्शी।) हा त्रिलोक अधोलोक, मध्यलोक, ऊर्ध्वलोक यांनी बनला आहे. तो तनू, घनू आणि प्रमरण या तीन वातवलयांनी ·वेष्टित आहे. (जैवि कांबलेनि बांधली कणाचि मोट, तेवा वायोनि बांधला त्रिलोकु जाणावा।). हा कोणी तयार केला नाही. (कव्हणाचे रचिले नव्हति। कव्हणाचे कृत्यु नव्हे।). हे जगत् अकृत्रिम असून सहजसिद्ध आहे. (ध. प. १३०, १३१.)

अलोकाकाश अनंत प्रदेशी आहे. त्यात लोक आहे. तो पुरुषाकार आहे. चौदा राजू उंच आहे. त्यात षड्द्रव्ये भरली आहेत. (अनादि निधन हा संसार। कोणी रचिला नाही निर्धार। आदि पु. १. ५८, विराट पुरुषाचे परी। षट्द्रव्य भरले तया भीतरी। मुक्तिशिळा मस्तकावरी। नेमिली असे॥ १. ६२॥ ब्रह्मा नसे कर्ता जाण। विष्णु न करी पालन। रुद्र न करी हनन। हेचि सत्य असे पै॥ १.६३, आदि. पु.).

याप्रमाणे लोकरचनेसंदर्भी मराठीत बरीच माहिती आली आहे. सात नरकभूमी, मध्यलोकस्थ महामेरु, जंबूद्वीपादी द्वीप, भरतादी सप्तक्षेत्रे, भोगभूमी, युगपरिवर्तन आणि चौदा मनु-कुळकर याची संपूर्ण चर्चा मराठीत करण्यात आली आहे. युगप्रलयही जैन धर्मास मान्य आहे. (ध. प. १२९–१३६).

## देव–अवतार —

अवतारवादाचे खंडन बऱ्याच ग्रंथांत करण्यात आले आहे. मत्स, वच्छ, कूर्म, वराह, नारसिंह, परशुराम, राम, कृष्ण, बौद्ध इत्यादी अवतार हे मान्य नाहीत. स्वतंत्र दुःखे भोगणारे हे जीव आहेत. ते सामान्य आहेत. एकदा शुद्ध झालेला परमात्मा पुनरपि संसारात अवतार घेत नाही. मग तरून गेलेला तो निरंजन देव काय पुनः अवतार घेईल? साखरेतून पुनः ऊस कसा होणार? एकदा कर्मापासून वेगळा झालेल्या आत्मा पुनः कर्मात का सापडणार? (धर्मपरीक्षा,–विशालकीर्ति, ६०७–६२२). काळ अनंतानंत आहे. जीव अनादी आहे. भवसागर अनादी आहे. त्याला अंतपार नाही. तो अनादी सिद्ध आहे. विश्वाचा त्रिविध व्यापार सहज आहे, घडविणारा ब्रह्मा नाही. प्रतिपालन करणारा विष्णू नाही. मोडणारा रुद्रही नाही. षड्द्रव्यांना हा त्रिविध व्यापार आहे. जीव अमर आहे. यात अवताराचा, सृष्टिकर्त्यांचा काही संबंध नाही. (धर्मपरीक्षा,–विशालकीर्ति, ४९०–४९५).

मग जैन धर्मात देव कोण ? याचे उत्तर अनेक ग्रंथांत देण्यात आले आहे. कोणताही जीव की जो कोणी कर्मनाश करून शुद्ध बनला असेल तो जीव हा देव आहे, अशी जैनमान्यता आहे. वीतराग, सर्वज्ञ, जन्ममरणादी अष्टादशदोषविनिर्मुक्त जीव हा देव होय. आठ कर्मांपैकी चार कर्मे नाश करणारा तो अरिहंत आणि आठही कर्मे नाश करणारा तो सिद्ध. म्हणूनच 'णमोकार' मंत्रात प्रथमतः या दोघांना नमस्कार करतात. ( ध. प. ५-९ ). हिंसा कर्म करणारे, हातात शस्त्र धारण करणारे जीव हे देव कसे होऊ शकतात ? ( देव देव ऐसें बोलती । वृद्ध देहीं शस्त्र हाती । मन वच काया हिंसावृत्ति । देव म्हनति कैसेनि ॥ १६. २३, सु. च. वी. ).

जिनेंद्र देवालाही महादेव, ब्रह्मा, विष्णू , शूलपाणी, त्रिपुरारी, शंकर, शिव, महेश, प्रजापती, विश्वनाथ, त्रिलोचन, श्रीपती अशा नावानेही संबोधले आहे. पण त्या शब्दांचा अर्थ जैन मान्यतेप्रमाणे बसविण्यात आला आहे. जिनसेनाचार्यांनी संस्कृतात सहस्रनाम स्तोत्र रचून ही पद्धत पाडली होतीच. ( श्रे. च. गुण. १. २७-३४, श्रे. च. ज. - ३. १०-१४. ).

अष्टकर्म –

कर्मसिद्धान्ताची चर्चा मराठीत कमीच आहे; पण यादवसुतकृत 'अष्टकर्मप्रकृती' हा ग्रंथ आठ कर्मे आणि त्यांचे भेदाभेद वर्णन करणारा मराठीत एकच स्वतंत्र ग्रंथ आहे. ज्ञानावरण, दर्शनावरण, वेदनीय, मोहनीय, आयू, नाम, गोत्र आणि अंतराय ही आठ कर्मे आहेत. जीवाच्या शुभाशुभ भावनेमुळे—परिणामामुळे ते ते कर्म परमाणू जीवाकडे येतात आणि जीवाशी एकरूप होतात. कर्म किती काळापर्यंत जीवाजवळ राहणार हे त्या त्या भावनेच्या तीव्रतेवर अवलंबून असते. शेवटी कर्मफळ देऊन जीवाजवळून जुनी कर्मे निघून जातात आणि पुनः नवी कर्मे येतात. ही क्रिया प्रतिक्षणी चालू असते. अशुभ परिणामामुळे अशुभ कर्मे येतात, शुभ कर्मामुळे शुभकर्मे येतात. मुक्तीसाठी शुभ किंवा अशुभ भावना उपयोगी पडत नाही. तर शुद्ध भावना उपयोगी पडते. ( अष्टकर्मप्रकृति ).

ध्यान –

आर्तध्यान, रौद्रध्यान, धर्मध्यान व शुक्लध्यान असे ध्यानाचे चार प्रकार आहेत. आर्त-रौद्रध्याने ही दुर्ध्याने आहेत. इष्टवियोग, अनिष्टसयोग, पीडाचिंतन, निदानबंधन हे आर्तध्यानात येतात. हिंसानंद, मृषानंद, स्तेयानंद व विषयसंरक्षण हे रौद्रध्यानात येतात. आज्ञाविचय, उपायविचय, विपाकविचय, संस्थानविचय असे धर्मध्यानात येतात.

आणि शुक्लध्यान हेच खरे आत्मध्यान आहे. पदस्थ, पिंडस्थ, रूपस्थ व रूपातीत असे याही ध्यानाचे चार प्रकार आहेत. रूपातीत हे ध्यान सर्वोत्तम ध्यान होय. ( ध. प. १२०, १८८ ).

## समारोप –

मराठीत गुणस्थानादी चर्चा करणारे ग्रंथ नाहीत. अनेकांत–स्याद्वादाची सूक्ष्म चर्चा करणारे ग्रंथही नाहीत. सप्ततत्त्वे, षट्द्रव्ये, आत्म्याचे स्वरूप, लोकरचना, खऱ्या देवाचे स्वरूप आठ कर्मांचे स्वरूप हे विषय मात्र मराठी जैन ग्रंथांत पाहावयास मिळतात. जैन तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात प्राचीन मराठीतील ग्रंथकारांनी कोणतीच नवीन भर घातली नाही.

● ● ●

## प्रकरण ४ थे

# प्राचीन मराठी जैन वाङ्मयातील आचारधर्म

**सम्यक्चारित्र** — सम्यग्दर्शन, सम्यग्ज्ञान व सम्यक्चारित्र्य या तिन्हींची एकता म्हणजेच मोक्ष असे जैन धर्मांचे मत[1] आहे. दर्शन म्हणजे श्रद्धा. श्रद्धा, ज्ञान व चारित्र्य ( आचार ) या तिघांचेही मोक्षाच्या अपेक्षेने समान महत्त्व आहे. सम्यग्दर्शन व सम्यग्ज्ञानपूर्वक जो आचार पाळावयाचा असतो त्याला जैन ग्रंथात ' सम्यक्चारित्र्य ' अशी संज्ञा आहे. हा आचार केवळ मोक्षासाठीच कारण आहे. जीवाने स्वप्रयत्नाने कर्मबंधनातून स्वतःची सुटका करून घ्यावयाची असते. कर्म हे जड आहे. आणि जीव तर चैतन्यस्वरूप आहे. कर्मापासून आत्मा पूर्णपणे मुक्त झाला म्हणजेच त्याला स्वस्वरूपाची प्राप्ती होणे शक्य आहे. कर्मापासून आत्म्यास मुक्त करण्याचा जो आचार तोच सम्यक् आचार अथवा चारित्र्य म्हटले पाहिजे.

**आचारधर्मविषयक प्राचीन जैन ग्रंथ** — आचार हा धर्मातील अत्यंत महत्त्वाचा भाग असल्याने ' चारित्तं खलु धम्मो ' – चारित्र्य हाच खरा धर्म असेही प्रतिपादन केले गेले आहे. जैन आचारधर्म कथन करणारे ग्रंथ बरेच आहेत. अत्यंत प्राचीन असे जे अंग ग्रंथ त्यात आचारांगाचे स्थान सर्वप्रथम आहे.[2] अनुयोगपद्धती स्वीकारून जैन ग्रंथांचे वर्गीकरण करतानाही चरणानुयोग हा आचार-धर्मांचे प्रतिपादन करताना दिसतो.[3] चरणानुयोग शास्त्रात श्रावक व मुनी यांच्या आचारधर्माचे वर्णन असते. वट्टकेरकृत मूलाचार, कुंदकुंदकृत चारित्तपाहुड, उमास्वातिकृत तत्त्वार्थसूत्र ( अध्याय ७, ८ ), समंतभद्रकृत रत्नकरण्डश्रावकाचार, वसुनंदीकृत श्रावकाचार, पंडित आशाधरकृत सागारधर्मामृत व अनगारधर्मामृत असे कित्येक

---

१. सम्यग्दर्शनज्ञानचारित्राणि मोक्षमार्गः । १.१ – तत्त्वार्थसूत्र.

२. " अंग पवि_ट्ठस्स अत्थाधियारो बारसविहो तं जहा आयारो—"

पट्खंडागम, पृ. ९९ ( भाग १ ).

३. गृहमेध्यनगाराणां चारित्रोत्पत्तिवृद्धिरक्षांगम् ।

चरणानुयोगसमयं सम्यग्ज्ञानं विजानाति ॥ ४५ ॥ – रत्नकरण्ड श्रावकाचार.

प्राचीन जैन ग्रंथ[४] आचारधर्माचे वर्णन करण्यासाठीच लिहिले गेले आहेत. कथा ग्रंथांत चारित्र्याचे वर्णन अनेक ठिकाणी आलेले असते.

## प्राचीन मराठीतील आचारधर्मविषयक जैन ग्रंथ

जैन धर्मातील रहस्य व मुनी यांचा आचार प्रतिपादन करणारे ग्रंथ प्राचीन मराठीत तरी दोनच आहेत. 'धर्मामृत' आणि 'रत्नकरण्डश्रावकाचार मराठी टीका' अशा दोन्ही ग्रंथांत प्रामुख्याने आचारधर्माचेच वर्णन आले आहे. त्या दोन्ही ग्रंथांचे कर्ते आचार्य गुणकीर्ति असावेत, गुणकीर्ति हे इ. स. च्या पंधराव्या शतकातील एक बहुश्रुत 'आचार्य' व भट्टारक असल्याने त्यांनी लिहिलेले आचारविषयक हे दोन्ही ग्रंथ प्रामाणिक आणि प्रातिनिधिक स्वरूपाचे आहेत. महाराष्ट्रीय जैन समाजास प्राचीन ग्रंथातील जैनाचार कळावा या उद्देशाने या दोन्ही ग्रंथांची त्यांनी रचना केली आहे.

**रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका** — या ग्रंथाचे कर्ते गुणकीर्तीच आहेत असे सबळ पुराव्यानिशी म्हणता येईल अशी जरी स्थिती नसली तरी तेच त्याचे कर्ते असावेत असे अनुमान निघते; त्याविषयी ऊहापोह दुसऱ्या प्रकरणात आलेलाच आहे. आचार्य समंतभद्र (इ. स. ३ रे शतक) यांचा रत्नकरण्ड श्रावकाचार हा ग्रंथ सर्वप्रथम मराठीत आणण्याचे श्रेय गुणकीर्तींना आहे. समंतभद्राच्या संस्कृत रत्नकरण्ड श्रावकाचाराचे (उपासकाध्ययन) स्थान श्रावकाचारातील ग्रंथात तरी अनन्यसाधारण आहे. तोच ग्रंथ "अथ श्री समंतभद्रस्वामि विरचित श्री रत्नकरण्ड ग्रंथ श्रावकाचार व्याख्यान मऱ्हाष्ट भाषा" स्वरूपात गुणकीर्तींने गद्य भाषेत मराठीत आणला. अत्यंत व्यवस्थितपणे आवश्यक ती टिपणे देत पदरचे काहीही न घालता हा ग्रंथ मराठीत रचला असल्यामुळे मराठीतून जैनाचाराचा अभ्यास करणाऱ्यांना हा ग्रंथ अतिशय प्रमाणभूत मानावा लागतो. या प्रकरणात आचारधर्माचे विवेचन करताना या ग्रंथाची मदत सर्वात अधिक घेतली आहे.

**धर्मामृत** — हा ग्रंथ मात्र गुणकीर्तींचाच आहे. कोणत्याही विशिष्ट मूल ग्रंथाची ही टीका नव्हे. हा एक स्वतंत्र ग्रंथ आहे. याला आधार मात्र अनेक प्राचीन ग्रंथांचा घेतला आहे. या ग्रंथाची प्रतिज्ञा अशी आहे—"शिष्य पुसे गुरुप्रति, देवदर्शन तरि सांगा। पाखांड तरि सांगा। — पक्षपाती बन पडले। सत्य असत्य स्थापिते जाले। परि काही निवडु नव्हेचि। तरि कवणु हा धर्म सांगावा। कवणे मार्गी चालावे। कैसा आचारू पाळावा। कवण शास्त्र पढावे।"

याप्रमाणे खरा धर्म काय आहे हे समजावून घेण्याची इच्छा झाली म्हणून

---

४. वसुनंदी श्रावकाचार, (भारतीय ज्ञानपीठ, काशी.) प्रस्तावना. श्रावकधर्मका क्रमिक विकास, पृ. ४३.

गुरूने त्याला तो धर्म समजावून सांगितला. आचारधर्माशिवाय इतरही बरेच विषय या ग्रंथात आले आहेत.

## आचारधर्मांचे दोन भेद –

श्रावकाचार व यति-आचार असे जैन आचारधर्मांचे दोन प्रमुख भेद आहेत. श्रावकाचाराला 'विकलचारित्र' व यति-आचाराला 'सकलचारित्र' अशा संज्ञा[५] आहेत. त्यांनाच अनुक्रमे सागारधर्म व अनगारधर्म असेही म्हणतात. श्रावक हे परिग्रहसहित असतात आणि यती हे सर्वसंगरहित असतात.

## श्रावकाचा – ( गृहस्थाचा ) आचारधर्म –

( हे सर्व विवेचन 'रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका' या ग्रंथाच्या आधारे केले आहे. संदर्भ देताना प्रत्येक वेळी त्या ग्रंथाचा उल्लेख न करता फक्त प. म्हणजे त्यातील परिच्छेदाच्या अंकाचा उपयोग केला आहे. )

**सम्यक्दर्शनज्ञानचारित्र** – मोक्षमार्गाचे हे त्रिविध साधन आहे. यांनाच रत्नत्रय म्हणावे. ( स्वस्तिरूपें सगुण सम्यक्दर्शन सम्यक्ज्ञान सम्यक्चारित्र । रत्नत्रयो म्हणिजे. प. २ ). त्यापैकी सम्यक्दर्शन सर्वात महत्त्वाचे आहे.

**सम्यक्दर्शन** – आप्ततत्त्वावर आणि जिनदेव–गुरु–शास्त्र यांच्यावर अकाट्य अशी श्रद्धा असणे म्हणजे सम्यक्दर्शन असे त्याचे सामान्य स्वरूप आहे. सम्यक्दर्शन हे पंचवीस गुणयुक्त असावे. ( आता पंचवीस सांघेन प. ६ ). हे सम्यक्-दर्शन आठ अंगांनी सहित, आठ मदांनी रहित, षट् अनायतनांनी रहित आणि तीन मूढतांनी रहित असावे.

**आठ अंगे** – १ ) निःशंकित २ ) निःकांक्षित ३ ) निर्विचिकित्सा ४ ) अमूढदृष्टि ५ ) उपगूहन ६ ) स्थितीकरण ७ ) वात्सल्य ८ ) प्रभावना.

१ ) जिनागमाचे – गुरूचे स्वरूप समजावून घेऊन मनात संदेह न ठेवणे हे निःशंकित अंग.

२ ) दुःखाचा उदय झाला असता सुखाची इच्छा न करणे हे निःकांक्षित अंग.

३ ) सम्यक्दृष्टी साधु पुरुषांना काही शारीरिक व्याधी असल्यास त्यांच्या गुणावर प्रेमभाव ठेवून त्यांच्या शरीरासंबंधी किळस न करणे हे निर्विचिकित्सांग.

४ ) कुदेव, कुगुरु व कुशास्त्र यांच्यावर श्रद्धा न ठेवणे हे अमूढदृष्टी अंग. ( कुदे-वाची क्षांति आईकुनु मन वचन काय मवित न कीजे । प्रसंसा नमस्कार न कीजे । कुशास्त्र

---

५. सकलं विकलं चरणं तत्सकलं सर्वसंगविरतानाम् ।
अनगाराणा विकल सागराणां ससंगानाम् ॥ ५० ॥

— रत्नकरण्ड श्रावकाचार.

व्याख्यानु आइकीजो ना । कुगुरुची महिमा आइकुन त्याचिया स्थाना जाइजेना । प्रसंशा मिथ्यागुणकीर्तन विनय स्नेहे । उत्तम ह्मणोन ह्मणावे ना । त्याचि माया व्यंतर दिवी कुधर्मी चमत्कार देखोन चित्ता भ्रम होऊ ने दिजे । प. ६ ). परधर्मीय देव, गुरु शास्त्र यांच्याकडे स्वधर्मातील लोक आकर्षिले जाऊ नयेत हाच हे अंग सांगण्याचा प्रमुख उद्देश असला पाहिजे.

५ ) ऋषी — अर्जिका आणि श्रावक श्राविकांमध्ये अज्ञानामुळे अथवा कर्मोदयामुळे काही दोष दिसून आले तर ते इतर लोकांजवळ प्रकट न करता झाकून ठेवणे हे उपगूहन अंग आहे.

६ ) जर कोणी अज्ञानपणे अथवा विषयासक्तीने किंवा क्षुधा–तृष्णा किंवा लोच यांच्या भयाने व्रत सोडून देत असतील तर त्यांना उपदेश करून पुन्हा धर्ममार्गात स्थिर करणे हे स्थितीकरण अंग होय. ( क्षुधा तृष्णा लोचादि भये व्रत सोडु पाहे त्यासि संबोधिजे — प. ६ ).

७ ) उत्तम, मध्यम आणि जघन्य अशा त्रिविध पात्रांवर स्नेह करणे हे वात्सल्यांग होय. ( त्रिविध पात्रींसी यथाशक्ति यथायोग्य भक्ति — स्नेह कीजे ते वात्सल्ये अंगु । प. ६ ).

८ ) चतुर्विध संघ, सप्तक्षेत्र, वीतरागदेव, शास्त्र आणि मुनी यांची प्रशंसा करणे — त्यांना दान देणे — पूजा करणे हे प्रभावना अंग आहे. ( चतुर्विधा संघाचे दान वखानिजे दान पूजा कीजे । श्री जिनेश्वराचि करणी मुनिस्वराची प्रभावना । प. ६ ).

या आठही अंगांचे महत्त्व जरी सम्यक्‌दर्शनाच्या विवेचनात सांगितले असले तरी त्यांचे खरे महत्त्व चारित्र्याच्या अपेक्षेने आहे. म्हणूनच रत्नकरण्डश्रावकाचारात त्याचे सविस्तर विवेचन समंतभद्राचार्यांनी केलेले आहे. तेच मराठीतही आले आहे.

आठ मद् — जातीमद, रूपमद, गोत्रमद, विद्यामद, राजमद, तपमद, बल्मद, ज्ञानमद, हे आठ मद् सांडिजे । तरी सम्यक्त दृढ होई ॥ ( प. ७ ).

षट् अनायतने — सम्यक्‌दृष्टि पुरुषाने कुदेव, कुदेवधारी पुरुष, कुशास्त्र, कुशास्त्रधारी पुरुष, कुगुरु आणि कुगुरुधारी पुरुष या सहाही जनांना नमस्कार करू नये. त्यांचा विनय करू नये. रागद्वेषसहित देव हा कुदेव व त्याचा भक्त तो कुदेवधारी पुरुष. चोरी, हिंसा, व्यभिचार हे ज्या शास्त्रात सांगितले असतील ते कुशास्त्र आणि त्याचा भक्त हा कुशास्त्रधारी पुरुष आणि अनाचारी गुरु तो कुगुरु. त्याचा भक्त हा कुगुरुधारी पुरुष. ( जया शास्त्री : चोरमार्ग, हिंसाधर्म : त्रियाविभिचार ॥ ऐसे शास्त्र ते कुशास्त्र । ते कुशास्त्र म्हणीजेती । कुशास्त्र पढे वाखाने : कुशास्त्र धर्मीत्र धर्म करी । आनित्या–हार्वी करवि त्यावरि स्नेहलोभु धरी । तो कुशास्त्रधंतु पुरुष ह्मणीजे । एवं षट् ॥ इतुके जो परहरी । तरी सम्यक्त दृढ होय । प. ८ ).

तीन मूढता — जैनाचाराला म्हणजेच मोक्षप्राप्तीसाठी साधकाला जी प्राथमिक

तयारी करावी लागते त्यात त्याची मनःप्रवृत्ती इतर मार्गाकडे न वळावी व जैनधर्मात तो स्थिर राहावा म्हणून जशी आठ अंगे पाळावयाची असतात, आठ गर्वांचा व सहा अनायतनाचा त्याग करावयाचा असतो त्याचप्रमाणे तीन मूढतांवाही त्याग त्याने केला पाहिजे. त्या तीन मूढतांचे स्वरूप पुढीलप्रमाणे सांगितले आहे :

१ ) देवमूढ २ ) लोकमूढ आणि ३ ) पाखांडमूढ ( हे तिनि मूढ हाणिजेति । )

१ )—रागद्वेषसहित अज्ञानी अशा देवता वांछित देतात अशी अभिलाषा करून कुदेवांची मन-वचन-कायेने भक्ती, पूजा, नमस्कार करणे, त्यांची यात्रा करणे, नवस बोलणे ही देवमूढता होय. ( कुदेवाच्या ठायेंदेवु मानि। उपासि यक्ष भक्ति मंत्र जाप्य—आराधना : कुविद्या सिके । आनिक । सिकवित : बहुमान प्रशंशा करी ! तो देव मुढ हाणीजे । प. ९ ).

धर्मामृतात खालील गोष्टी अधर्म स्वरूपाच्या म्हणून सांगण्यात आल्या आहेत. श्राद्ध करणे, डोके घोडविणे, तीर्थात हाड व केस टाकणे, होळी, गणगौरी, मायराणीची पूजा, जाग, मोग, पोळा, नागपंचमी, जिउत्या, मातीचे नाग, मातीचे बैल, नवरात्र, मुंडण, इत्यादी सर्व प्रकार सम्यक्दृष्टी श्रावकाला वर्ज्य आहेत. ( ध. प. ११० ते ११२ ).

२ )—लोकपरिपाठी म्हणून नदी, समुद्र, गंगा, याचे स्नान पुण्य समजून करू नये. वडपिंपळाची, ग्रह, गाई, भूमी यांची पूजा न करणे. असे करणारा तो लोकमूढ समजावा. ( गाई भुमि अशा पुजावनि । आदित्य नाग चंद्रादिक पुजा. संग्राम मरणा इच्छा करी, हीवाले माघी विवलप्रवेसु – पुण्यनिमित्त वीहरी कुवा तलाव सरोवरादिक हे अक्रिया । ). गोदान, भूमिदान, ग्रहणस्नान, संक्रांतिदान या सर्वांचा समावेश लोकमूढतेत करण्यात आला आहे. दया म्हणून या क्रिया करणे वेगळे आणि पुण्य समजून करणे हे वेगळे. ( प. ९).

३ )—आरंभ आणि परिग्रह बाळगणाऱ्या व चमत्कार करून लोकांना फसविणाऱ्या गुरूच्या नादी लागणे ही पाखंडी मूढता आहे. ( कुविद्याग धरान्वेनि बळें चमत्कार दाखवी । माया मौन्य ध्यान धरी ।—स्त्रिसेवादि हिंसा सहितु—ऐसे जे ते पाखांडि हाणिजति । ).

वरील पंचवीस गुणांनी युक्त सम्यक्दृष्टी जीव हा सर्व प्रकारच्या सौख्यांचा उपभोग भोगून शेवटी मोक्षास जातो असे सम्यक्दर्शनाचे फल सांगितले आहे. ( सौभाग्य : अधिक भोगु । अधिक होई–मोक्षास जाई मोक्षस्यानि अनंत सौख्य प्राप्ती होई । प. १० ).

**गृहस्थाचे चारित्र्य**—गृहस्थ म्हणजेच श्रावक. प्राचीन मराठीत तरी श्रावकाचाराचेच वर्णन करणारे ग्रंथ आहेत. मुनि आचाराविषयक ग्रंथ दिसत नाही. गुणकीर्ति आचार्यांनी रत्नकरण्ड श्रावकाचारात मुख्यतः गृहस्थाच्या चारित्र्याचे –

आचाराचे वर्णन केले आहे. श्रावकाच्या आचाराला विकलचारित्र्य आणि मुनींच्या चारित्र्याला सकल चारित्र्य या संज्ञा आहेत.

विकलचारित्र्य—विकल चारित्र्य हे बारा व्रतात्मक असते. ("आता विकल चारित्र सांघेन ॥ पंचाणुव्रत ॥ ५ ॥ तिनि गुणव्रतें ॥ ३ ॥ च्यारि सिक्षाव्रतें ॥ ४ ॥ एवं बारा व्रत ॥ १२ ॥" प. १२).

अणुव्रते—

श्रावकाच्या आचारधर्मात या पाच अणुव्रतांचे असाधारण महत्त्व आहे. १ अहिंसा, २ अनृत, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य, ५ परिग्रहपरिमाण अशी ही अणुव्रते पाच आहेत. स्थूलरूपाने हिंसादी पाच पापांचा हा त्याग असल्याने या व्रतांना अणुव्रते म्हणतात. हीच व्रते सूक्ष्मपणे पाळली तर ती महाव्रते होतात. पण श्रावकाला पोटासाठी व कुटुंबासाठी उद्यम किंवा धंदा करावा लागतो म्हणून त्याच्या व्रतांना अणुव्रते म्हणतात.

१. अहिंसाणुव्रत—

मन वचन कायेने स्वतः कोणाची हिंसा न करणे आणि दुसऱ्याकडूनही न करविणे हे अहिंसाणुव्रत आहे. (कोन्हि घात करून आला। देखुन भले केलें ऐसे न म्हणिजे।—आपुला दुर्जन होय तरि जीवा कवना प्रकारें वर्जिजे। पुण्य करूं दीजे।—घरिचे कर्म्म आरंभ करिता। तें जीवा दृष्टि देखिजे जीव त्याचि रक्षा किजे। वाटे चालिता जीव दया पालिजे। चमकत चालिजेना।—पाईं मुंगिंची ना रगडिजे। एवं स्थूल अहींसा व्रत होई ॥ प. १५).

प्रत्येक व्रत हे निरतिचार पाळले जावे म्हणून त्या त्या व्रताचे पाच पाच अतिचारही सांगितले आहेत.

अहिंसाणुव्रताचे अतिचार—

१) पशूंना त्रास होईल अशा बंधनात ठेवू नये.

२) पशुपक्षी, नोकरचाकर यांचे हस्तपाद कर्णनासिकादी अवयव छेदू नयेत.

३) सर्व जीवांना बंधूप्रमाणे मानावे. (सर्व जीवबंधु होनेंसाधा).

४) शक्तीपेक्षा अधिक ओझे पशु–नोकर यांच्यावर लादू नये.

५) पशूंना वेळेवर अन्नपाणी द्यावे. (अन्नपानि निरोध न करावा। इति अहिंसाव्रत संपूर्ण ॥ प. १५).

२. सत्याणुव्रत—

सत्य बोलावे. दुसऱ्याचे वाईट होईल असे शब्द बोलू नये. (जे असत्य

बोलिता । आणिका वोखटे होई । हित बोलावे ). जीवरक्षण होत असेल तर काही वेळा असत्यहि बोलणे धर्म्यच होय. ( जैसे पुढिलासि हीत होई । जीवरखा होई । तैसे बोलिजे । प. १६ ).

## सत्याणुव्रताचे अतिचार —

१ ) वाईट उपदेश देऊ नये ( कुश्रितु उपदेसु दिजे ना । ).

२ ) दुसऱ्या स्त्रीपुरुषांच्या एकांतातील वार्ता ऐकून दुसऱ्यांना सांगू नये. ( स्त्रीपुरुषा एकांति वार्ता आइकुन । कोन्हा सांगिजेना । ).

३ ) कोणी काही म्हटले तर त्यात आपले काही मनाचे घालून कोणाला सांगू नये. ( कोन्ही कोन्हा कांहीं मनिजे । ते आइकुन । आपुली बुधि आगलि करुन बहुत बोलिजेना ).

४ ) दुसऱ्यांनी आपणाकडे काही वस्तू ठेवली असल्यास तीत अर्धी हीन वस्तु मिसळून त्यांना फसवू नये.

५ ) खोटे कागदपत्र, रोखे वगैरे करू नये.

## ३. अचौर्याणुव्रत :—

या व्रताचे नाव अस्तेय अथवा अदत्त वर्जन असेही आहे. ( आता तिसरे व्रत अदत्तवर्जना सांगेन । प. १७ ). स्वतः चोरी करू नये. करवू नये आणि कोणी केली असल्यास भले केले असे म्हणू नये. आपणावर विश्वास ठेवणाऱ्याची फसगत करू नये. व्यापारात देताना लहान व घेताना मोठी मापे वजने वापरू नयेत. तूपतेलादि पदार्थांचे मिश्रण करू नये. अज्ञानाने कोणी अधिक मोलाची वस्तू कमी मोलात देऊ लागले तर ती घेऊ नये. ( विश्वासु करी त्यासि क्षितरिजेना । अधिक घेइजेना । उने देइजेना तुपातेलाची आदिकरून रस भेदा ना कीजे । अजानि कोहनी अधिका मोलाची थोडेना मोलें विके ते घ्यावी ना ॥ प. १७ ).

## ४. ब्रह्मचर्याणुव्रत :—

गृहस्थाच्या बाबतीत स्वदारासंतोष हेच ब्रह्मचर्य होय. परस्त्री ही वृद्ध असेल तर मातेसमान, तरुणी असेल तर बहिणीसमान आणि धाकटी असेल तर पुत्रीसमान मानावी. परविवाह–करण्यातही स्वतः पुढाकार घेऊ नये. ( धर्मानिमित्ये आणिकाचा विवाहा कीजेना । मेलविजेना । प. १८ ). अश्लील व अवाच्य शब्द बोलू नयेत. ( भंड शब्द बोलिजेना ) नख केश चुंबनादिकांची अभिलाषा करू नये. ( कामविषे संतोषु किजे । तरी ब्रह्मव्रताचि प्राप्ती ॥ प. १८ )

## ५. परिग्रहपरिमाणाणुव्रत :—

लोभ कमी व्हावा म्हणून सर्व प्रकारच्या बाह्य परिग्रहाची काही मर्यादा ठरवावी आणि त्या मर्यादेतच संतोष मानावा. ( सोने, रुपे, द्रव्य, मुक्ताफळ, वस्त्रा-

मरण, मंडमाजन, क्षेत्र, पाईक, घोडे, बैल, गाय, हैसी, दासी, चंदन, कर्पूर, कुंकुम, पाटोळे, चवर, गृह, क्रीक्रयविक्रया। हे आदिकरून... परिग्रह प्रमाणु किजे ॥ प. १९ ). अतिलोभ, अतिसंग्रह करू नये. दुसऱ्याचे धन पाहून स्वतःच्या मनाला विस्मय वाटू देऊ नये. ( अतिविस्मयो न किजे । ) लोभाने प्राण्यावर अतिभार घालू नये. ( अतिमारु घालिजेना । लादिजेना । )

श्रावकास हे पंचाणुव्रतांचे पालन आवश्यक आहे. हिंसा, असत्य, चोरी, कुशील आणि परिग्रह या पाच पापांमुळेच जीव दुःखी होतो. त्या पापापासून सुटण्यासाठी ही पाच व्रते आहेत.

## तीन गुणव्रते —

वरील अणुव्रतांचे परिपालन योग्य तऱ्हेने व्हावे म्हणून ही तीन गुणव्रतेही श्रावकाला पाळावी लागतात. ती अशी : दिग्व्रत, अनर्थदंडव्रत आणि भोगोपभोगसंख्या.

१. **दिग्व्रत** — 'दिगविरति' म्हणजे दिशांचा त्याग. दहाही दिशांची मर्यादा काही काही काळापर्यंत करून त्या मर्यादेबाहेर जाऊ नये. ( नदी, समुद्र, द्वीप, पर्वत, नगर, पट्टण, देश, गाव, भूम्यादी योजने से दोनि अथवा च्यारि दशांति चतुर्दिशु च्यारि विदिशु, अध, ऊर्ध्व प्रमाण कीजे । जे मर्यादा वर्तमाना वचन केल्या जाइजेना ॥ प. २२ ) मर्यादा करून विसरू नये. एकदा मर्यादा केल्यानंतर पश्चात्ताप करू नये. अशा रीतीने मर्यादा घेतल्याने त्या मर्यादेच्या बाहेरच्या जीवांचे रक्षण होते. ( त्या जीवा सर्वा अभयदान दिल्हियाचे फल होई । प. २२ ).

२. **अनर्थदण्डव्रत** — अनर्थदंडव्रताचे पाच प्रकार सांगितले आहेत. ( प. २३ ) पाप उपदेशु, हिंसादानु, अपध्यान, दुःश्रुति, प्रमादचर्या. वृथा पाप न व्हावे म्हणून या पाचांचा त्याग सांगितला आहे.

१ ) **पापोपदेश** – ( क्लेश वाणिज्य करिता ना करावी ना । ). विशेषतः पशुपक्ष्यांच्या व्यापारासंबंधी कोणास उपदेश देऊ नये. आयुधविद्या शिकू नये. ( आयुधविद्या सिखिजेना । सिकविजेना । प. २३ ).

२ ) **हिंसादान** – हिंसेची उपकरणे कोणाला देऊ नयेत. त्यांचा व्यापारही करू नये. हिंसादानात कऱ्याच गोष्टींचा समावेश मराठी रत्नकरण्ड टीकेत केला आहे. ( खाटा, कटारि, धनुष, तीरडांग, फरशी, कुदालि, फावडे, सांबळ, टोळ, पाखाल, पोहरा, लोहखंड, लाख, मधु, तील, चींचा इत्यादि अनर्थ व्यापारु । न करावा. प. २३ ). इतकेच नव्हे तर — ( निल, घाइपुल, सनल्खार, गावण, मेण, महुये, विष, आपु, इत्यादि आर्य व्यापारु न करावा । करविजे ना । देवविजे ना । या वस्तु मोले घेऊन दीजेना । देवविजे ना । संग्रह किजेना । ). घोडे, बैल, गाई, हैसी, सेलि, दासी, बकरा, नख, कांबळा, चर्म, गाटा, तोणी, एरंडी, हळद

यांचादि व्यवसाय करू नये. श्वान, कुक्कुट, शूकर, मांजर, पारवे, साळुंकी, मोर, तितर, कोकिळ, ससाणा, कडडिया इत्यादी प्राणी जवळ बाळगू नयेत. ( या पापीया दुष्ट जीवान्हा संग्रहो न किजे । ). अग्नि, सिसे, कुदारी, फणी, बडवणी, आते या वस्तू दान देऊ नयेत. ( प. २३ ).

३ ) **अपध्यान** – नासिका, वृषण, कर्ण यांचे छेदन करू नये. परस्त्री स्वरूप पाहून अपध्यान करू नये. ( नासिक छेदना, वृषणगाळण, पुंसगाळण, कर्णछेदन – मेदाछेदना कीजेना ।– परस्त्रि स्वरूप देखुन कुचर्या कीजेना । करवीजेना । प. २४ ).

४ ) **दुःश्रुति** – संग्रामाची वार्ता करू नये. वाणिज्यवार्ताही वेप्रमाण करू नये. अमितक्रूरवार्ता, पद्मुल्यवार्ता, स्त्रीवर्णन वार्ता, राजअन्यायवार्ता, भोजनवार्ता करू नयेत. स्त्रीकथा, चोरकथा, भोजनकथा, राजकथा यांच्यात वेळ घालवू नये. ( कामशास्त्र, युद्धशास्त्र, कुविद्याशास्त्रादि सीखवेना ॥ प. २५ ).

५ ) **प्रमादचर्या** – विनाकारण जमीन खोदणे, पाणी सांडणे, वृथा अग्नी जाळणे, वृथा परिभ्रमण करणे, वृथा वनस्पतिछेदन करणे, वृथा धारा करणे या क्रिया प्रामादिक समजून त्यांचा त्याग करावा.

फार बोलणे, विषयाची अभिलाषा फार बाळगणे, अविचाराने भोग घेणे, अनवरत कामसेवन करणे यांचाही समावेश अनर्थदंडात होतो. त्यांचाही त्याग करावा.

३. **भोगोपभोगपरिसंख्याव्रत** – गुणव्रतातील तिसरे व्रत भोगोपभोगसंख्या आहे. भोग्य आणि उपभोग्य पदार्थांच्या सेवनासंबंधी त्यागाचे व्रत घेणे हे भोगोपभोग-संख्याव्रत होय.

**भोग** – एकच वेळा ज्या पदार्थाचा भोग घेता येतो ते पदार्थ भोग समजावेत. ( यक वेळा भोगोन पुनरपि भोगिजेना । तो भोगु ह्मणिजे । प. २७ ).

**उपभोग** – ज्या पदार्थांचा पुनःपुनः भोग घेता येतो त्याचा समावेश उपभोगात होतो. ( एक वेळा भोगोनु पुनरपि भोगिजे । तो उपभोगु ह्मणिजे । )

भोग आणि उपभोग याची मर्यादा करून त्याग करावा.

**अपवित्र पदार्थ** – पण जे अपवित्र पदार्थ आहेत त्याचा कायमचा त्याग करावा. ( अपवित्रासी परिहरावे ). मद्य, मास, मधु, वड, पिंपर, पाक्र, उंबर, कटुंबर, *अनगालित पाणी, पखाल, चर्माचे पाणी, अनगलित तूप तेल, कंदमूळ, उळी, भोपळा,* आले, मुळा, कलिंगडे, वेरा, केवडा, कुसंबे, लोनसने, शिळे लोणी – ( लोनि दोनि दिन दिन उपरि ) – ताक, दही, काज, अज्ञातफल असंख्यफल हे सर्व अपवित्र आहेत. त्यांचा परिहार करावा. ( प. २७ ). रात्री भोजन करू नये.

**सप्तस्थानी मौन** – भोजन, देवपूजा, सामायिक मलत्याग, मूत्रत्याग, मैथुन, स्नान, वमन. ( सप्त मौन पालिजे । ). यावेळी मौन पाळावे.

**भक्ष्य वस्तु त्याग** – धान्य, दही, शर्करा, तांबोलादी भक्ष्य वस्तूंचाही त्याग वेळोवेळी करावा. ( भोजन एक वेळा अथवा दोनवेळा पिंडे चार अथवा पाच । संख्या

कीजे। रात्रीं स्नान ना किजे। श्रीखंड, कर्पूर, कुंकुम, पुष्प, केतकी हे पवित्र वस्तु झाणिजे याचि संख्या कीजे। हे भोग ).

उपभोगसंख्याव्रतांतही योग्य आणि अयोग्य पदार्थ येतातच. अयोग्य वस्तूंचा त्याग हा कायमचाच करावा.

**अयोग्य पदार्थ त्याग** ( दाताची सेंद, दाताचा करंडा, दाताचा सारफळ, *दाताची फणी, दाताची बाहुली, बुडे, कल्पवी, सिंगी, चर्माचा हाटपा, पोता, गादि,* बैसने मुंडा, आडगु, उमुसी, चर्माचा करंडा, बुधला हे आदि अयोग्य वस्तु परिहारू, कीजे।प. २७ ).

**योग्य पदार्थ त्याग** – बैल, गाई, हाती, आदिकांची संख्या परिमित करावी. शिवाय( *निळीचे वस्त्र, पुतळिचा दिवा, किसंगु, महुरपीयाचे नृत्य हे आदिकरून* परिहारावे।).

भोगोपभोगसंख्या व्रतात विषयस्मरण, विषयानुभव, अतिआसक्ती इत्यादी दोष टाळावेत असे म्हटले आहे.

**चार शिक्षाव्रते – एक शंका —**

रत्नकरण्डश्रावकाचार आणि धर्मामृत हे दोनच महत्त्वाचे ग्रंथ मराठीत तरी जैन आचारधर्मावरचे आहेत. ३ गुणव्रते व ४ शिक्षाव्रते असे मिळून हे 'व्रतशील' तयार होते. असे मूळ संस्कृत रत्नकरण्ड श्रावकाचारातही म्हटले आहे. पण ती व्रते कोणती हे सांगताना मात्र मूळ ग्रंथांचा आधार मराठीत सोडलेला आहे, असे दिसते.

रत्नकरण्डात[६] ( समंतभद्र ) देशव्रत, सामायिक, प्रोषधोपवास आणि वैयावृत्य *ही व्रते चार शिक्षाव्रतात सांगितली आहेत. यावाबतीत तत्त्वार्थसूत्र आणि मूळ रत्नकरण्ड* यात मतभेद आहेच.[७] पण मराठीतील उपर्युक्त दोन्ही आचारविषयक ग्रंथात देशव्रताचे नावच नाही. धर्मामृतात पुढील चार शिक्षाव्रते सांगितली[८] आहेत. "आता *शिक्षाव्रतें च्यारि, ते कवण कवणें। प्रथम सामायिक; दुजे शिक्षाव्रत पर्वतिथि* उपोषन, तिजे शिक्षाव्रत सचोप आचार तजावा। चौथे शिक्षाव्रत अतिथि संविभागु॥" मराठी रत्नकरण्ड टीकेत पुढील शिक्षाव्रते सांगितली आहेत–( प. २८ )—

> "आता च्यार॥ ४॥ शिक्षाव्रत सांघेन। *सामाइक। प्रोषधोपवास। अतिथि* संविभाग। अंते सल्लेखना काळु॥ हे च्यारि॥ ३॥ शिक्षाव्रतें॥"

---

६ देशावकाशिकं वा सामायिकं प्रोषधोपवासो वा। वैयावृत्यं शिक्षाव्रतानि चत्वारि शिष्टानि॥ ५. ९१.

७ तत्त्वार्थसूत्रात गुणव्रतांत दिग्व्रत, देशव्रत, अनर्थदंडव्रत ही नावे आहेत.

८ धर्मामृत पृ. २५.

तात्पर्य —धर्मामृतकारांनी देशव्रताचा शिक्षाव्रतात उल्लेख न करता "सदोष आचार तजावा" हे मत स्वीकारले आहे आणि रत्नकरण्ड टीकाकारांनी मुळातील देशावकाशिक–देशव्रत व्रत वगळून त्याऐवजी सल्लेखनेचा चौथे व्रत म्हणून स्वीकार केला आहे. पण हे परंपरेला धरून नाही हे स्पष्ट आहे. सागारधर्मामृत किंवा तत्त्वार्थसूत्र अथवा संस्कृत रत्नकरण्ड श्रावकाचार इत्यादी कोणत्याही प्राचीन ग्रंथात चार शिक्षाव्रतात सल्लेखनेचा समावेश केलेला दिसत नाही.

मराठी रत्नकरण्डकात चार शिक्षाव्रताचे वर्णन पुढीलप्रमाणे आहे. या चार व्रतांतून गृहस्थाला मुनिधर्माचे शिक्षण मिळते म्हणून त्याना शिक्षाव्रते म्हणतात.

## सामायिकव्रत —

पद्मासनावर बसावे ( पद्मासनि बसीजे ) सर्व प्रकारच्या बाह्य क्रियेपासून विरक्त व्हावे. आर्तरौद्रध्यानाचा त्याग करून मन स्थिर करावे. सिद्धभक्ती, देवतास्तवन करावे. नंतर पंचपदी म्हणून १०८ जाप्य द्यावेत. ५ परमेष्ठी गुणस्मरण करावे. चैत्यभक्ती, पंचमहागुरुभक्ती, समाधीभक्ती म्हणून नंतर गुरुभक्ती, देववंदना म्हणावी. शरीर अत्यंत स्थिर ठेवावे ( आपणाते यतिरूप चिंतिजे । शित उष्ण मोकोडा, मुंगी, मासी, पीसु हे आदिकरून उपसर्ग सहावे । मन निश्चल होऊ नेदिजे ।–काया दृढ कीजे। चित्त पसरू नादिजे । ). याप्रमाणे गृहस्थाने त्रिकाळ सामायिक करावे. ( प. २९ ).

## प्रोष–धोपवासव्रत —

प्रोषधोपवासाचे लक्षण पुढीलप्रमाणे आहे. " अष्टमि ॥ ८ ॥ चतुर्दशी ॥ १४॥ उपवास कीजे । तो प्रोषधोपवास म्हणीजे । सतमी ॥ ७ ॥ त्रयोदशी ॥ १३ ॥ एकभक्ति कीजे । " अष्टमी आणि चतुर्दशीला निराहार उपवास करावा, अथवा एकाशन करावे. ( अष्टमी चतुर्दसी ॥ १४॥ चा दिवसी अन्नपान लेह्य नेमीजती । निरहारू कीजे । अथवा यको भक्त कीजे ) हलके कांजीसारखे पेय घ्यावे, उपवासाच्या दिवशी सर्व प्रकारच्या गृहउद्योगाचा त्याग करून, शृंगाराचा त्याग करून ध्यान सामाइक यात वेळ घालवावा. भूमिशयन करून ब्रह्मचर्य पाळावे. ( प. ३० ).

देवपूजा[१] – तसे पाहिले तर देवपूजेचा समावेश नेहमी षडावश्यक क्रियेत करतात. पण रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीकेत शिक्षाव्रतातील प्रोषधोपवासात त्याचा समावेश केला आहे. पूजेचे महत्त्व प्राचीन ग्रंथांतूनही सांगितले आहे. दान आणि पूजा हेच श्रावकधर्माचे प्रमुख आधार आहेत. ध्यान आणि अध्ययन हे यतिधर्माचे

---

१. समंतभद्रांनी वैयावृत्य शिक्षाव्रतावरोबरच पूजेचे वर्णन केले आहे. तर सोमदेवानी सामायिक शिक्षाव्रतांत पूजेचा अंतर्भाव केला आहे. – धर्मामृत, प्रस्तावना पृ. १५

प्रमुख आधार आहेत. दानपूजेशिवाय श्रावक असू शकत नाही अशा अर्थाची एक गाथाही रयणसागरात[१०] कुंदकुंदाची आहे. करडंकु राजा आणि महावीर स्वामींची फलाने पूजा करणारा बेडूक, यांच्या कथा पूजेच्या संदर्भात मराठी ग्रंथात सांगण्यात आल्या आहेत. त्याही प्राचीन आहेत. (प. ३१).

श्रावकाने शुचिर्भूत होऊन अष्टप्रकारे पूजा करावी.

## अतिथिसंविभागव्रत —

शिक्षाव्रतातील हे तिसरे व्रत. याचे प्रकार चार आहेत : आहारदान, औषधदान, अभयदान आणि शास्त्रदान (एवं दान च्यारि प. ३२). हे दान ज्यांना द्यावयाचे ती पात्रे तीन प्रकारची आहेत. उत्तमपात्र, मध्यमपात्र आणि जघन्यपात्र. धर्मामृत ग्रंथात सत्पात्र, कुपात्र व अपात्र असे तीन पात्राचे प्रकार मानले आहेत. अपात्रात जिनमार्गाबाहेरील सर्व मतांचा समावेश केला आहे. ५ दर्शनातील ९६ पाखंडींची संख्या दिली आहे. आणि शेवटी म्हटले[११] आहे. — " एवं सर्व अपात्र जाणावे। यासि भजन न करावे। यासि भजन केलिया जिवासि निरये घडे। म्हणौनि यांसि संभाषण न करावे। जैसे सर्पाचे दरिसन देखौनि पळिजे तैसे यातें देखौनि पळावे। हे सर्व कुगुरु जाणावे। या कारणे कुपात्रे अपात्रे दान नेदावे। सर्वथा नेदावे। "

## सत्पात्र किंवा उत्तमपात्र कोण ?

मराठी रत्नकरण्ड टीकेत उत्तम पात्राची व्याख्या सम्यक्दर्शन ज्ञानचरित्र सहितु। बाह्याभ्यंतर परिग्रहरहितु। बाह्याभ्यंतर तपसंपन्नु ऐसे ते तपोधनु। अशी केली आहे. (प. ३२).

आहारदान — अशा उत्तम पात्राला आदर, विनय धैर्य, सर्वकाल, कुशलता एकचित्तता अशा सप्तगुणांनी[१२] युक्त होऊन दात्याने आहार द्यावा. तो आहार नवप्रकारच्या[१३] भक्तीने द्यावा. (पडीघाविजे। नमोस्तु वेळा ३ तिष्ट तिष्ट तिष्ट ३ वेळा म्हणीजे। धरामितरि उंचस्थानी बैसविजे। पादप्रक्षालन कीजे। पादार्चन कीजे। मागुता नमोस्तु कीजे। शुभ वाक्ये विनयो बोलिजे। एकचित्त किजे। शुध आहार

---

१०. दाणंपूजा मुक्खं सावयधम्मेण सावया तेणविणा।
झाणज्झयणंमुक्खं जइधम्मे तं विणा तहासोवि ॥ ११ ॥ रयणसार.

११. धर्मामृत पृ. ४०

१२. श्रद्धातुष्टिर्भक्तिर्विज्ञानमलुब्धता क्षमा सत्वम्। यस्यैते सप्तगुणाः तं दातारं प्रशंसन्ति ॥

१३. पडिगहमुच्चठाणं पादोदयमच्चणं च पणमंच।
मणवयणकायसुद्धी एसण सुद्धीय णवविहं पुण्णं ॥

कीजे । मनवचन काया शुद्ध कीजे हे नव भेदे विनयो कीजे । प. ३२ )

**आहारशुद्धी** — उत्तम पात्राना दान म्हणून जो आहार द्यावयाचा तो कसा शुद्ध असावा याचे वर्णन मराठी रत्नकरण्ड टीकेत पुढीलप्रमाणे आहे. कोणत्याही प्रकारचा जीवघात होणार नाही अशी काळजी घ्यावी. उखळ, जाते प्रथम पाहूनच त्यात धान्य घालावे. पाणी दाट वस्त्राने गाळावे. ताक, कांजी, घृत, दुग्ध, तेल या वस्तू गाळून घ्याव्यात. किड्याने खाल्लेले धान्य वापरू नये. ( कोमल हस्ते प्रासुक वस्तु सोधुन रांधीजे । प. ३३ ).

**औषधदान** — कष्टलेल्या रोग्याना रोगनिवारणार्थ औषधाची सोय करावी. शुश्रूषा करावी. ( जे वस्तु उपकारे ते ते दीजे । सुश्रुषा सामालुनु पथ । प. ३४ ).

**अभयदान** — सर्व जीवांना संरक्षण देऊन अभयदान द्यावे. त्यांची सेवा करावी. त्यागी लोकांना विहार, पट्टशाला बांधून द्याव्यात.

**शास्त्रदान** — ग्रंथ लिहून त्यागी लोकांना दान द्यावेत. त्यांना शिकवावे. ( आगम सिद्धान्तशास्त्र लेहुन दिजे । लिहुन समस्तशास्त्र पुस्तक दीजे । पढविजे । पढाविजे । व्याख्यानविजे । तो शास्त्रदान म्हणीजे । प. ३६ )

**दान कोणास देऊ नये ?** — दुःखितांना कृपादान द्यावे. परंतु जे निर्दय परिणामी लोक असतील किंवा मद्यमांस भक्षण करून जीवघात करणारे लोक असतील त्यांना दान देऊ नये. (ते निर्दय परिनामी । ते कुपात्र म्हणीजे । त्यासि दिधल्या फल न होई । मद्य मांसादिक भक्षणी जीवघात करिती .. त्यासी दानु न द्यावे । प. ३७ ) कुपात्र दान म्हणजे लोखंडी नाव. स्वतःसही बुडविते आणि दुसऱ्यांसही. ( जैसा लोखंडाचा प्रोहनु । आपण बुडे । आणिकाते बुडवि । ).

**सल्लेखना —**

मराठीत श्रावकाचार सांगताना सल्लेखनेचा बारा व्रतातच समावेश केला आहे हे मागे पाहिले आहे. देशव्रताऐवजी सल्लेखना व्रत सांगण्याचा प्रयत्न झाला आहे. सल्लेखनेचे महत्त्व विशेष असल्याने बारा व्रतांत त्याचाही समावेश करण्याचा प्रयत्न झाला असावा.[१४]

सल्लेखना म्हणजेच समाधि-मरण. सर्वप्रकारच्या मोहाचा त्याग करून शेवटी या समाधिमरणाचा स्वेच्छेने स्वीकार करावा. पण उपसर्ग, दुर्भिक्ष, म्हातारपण, भयंकर रोग, आता जेथे आपण वाचत नाही अशी खात्रीच होईल, सर्व उपाय थकतील त्यावेळी धर्म म्हणून मरणाचा स्वीकार करावा. हा आचारधर्म मोठ्या

---

१४. धर्मामृत ग्रंथांतही—सल्लेखना चौथ्या शिक्षाव्रतातच सांगितली आहे, " इतुक्या नवें चौथे सिक्षाव्रत जाणावें । एवं द्वादशव्रतें जाणावि " धर्मामृत, पृ. ४०.

मार्मिक रीतीने मराठी रत्नकरण्ड टीकेत वर्णिला आहे. तो मुळातून पाहिला पाहिजे ( साधारण कल्पना येण्यासाठी काही भाग येथे देत आहे. – प. ३८ ).

१. सर्वांना प्रथम क्षमा करावी व आपणही त्यांची क्षमा मागावी. ( मित्रादिका पुत्र स्त्रिय । बांधवादिका सहिता उत्तम क्षमा कीजे । कराविजे । वैरिया सहिता वैरा । काल्ह होये तयासहितु क्षमा किजे । कराविजे ).

२. सल्लेखना घेण्यापूर्वी आपल्या संपत्तीचा जिनधर्माच्या उद्योतासाठी जास्तीत जास्त उपयोग करावा. ( आपुल्या हिताआर जिनधर्मा येचिजे ) सदाव्रत घालून किंवा मंदिरास दान द्यावे. नानाविध चित्रपोथ्या बनवून, पुस्तके लिहवून दान द्यावीत. ( नानाविधा चित्रपोथी कोकाम जडो दिजे । सुवर्ण रुप्याची सलाका दिजे । पुस्तकालागुनु लिहविजे । जितुके द्रव्य लागे तितुके दिजे । विद्यार्थिकालागि पुस्तक दिजे । उपरांति कागद दिजे । ).

३. यानंतर सर्वसंगपरित्याग करून महाव्रती बनावे. सातही भयांचा त्याग करावा ( इहलोकभय, परलोकभय, अगुप्तिभय, अरक्षणभय, मरणभय, वेदनाभय, आकस्मिक भय ). आनंदाने धर्मध्यान करीत नवकार मंत्र स्मरण करावे. शेवटी फक्त ॐकार जपत समाधिमरण पूर्ण करावे.

आतापर्यंत मुख्यतः मराठी ग्रंथातील गृहस्थाच्या आचारधर्माचे वर्णन करणारा पंधराव्या शतकातील गुणकीर्तिकृत मराठी रत्नकरण्ड श्रावकाचाराच्या आधारे गृहस्थ धर्माचाराचे विवेचन केले.

### अन्य ग्रंथोक्त श्रावकाचार–

गृहस्थाचा आचारधर्म अन्यत्रही वर्णिला आहे. उपर्युक्त ग्रंथात न आलेल्या पण इतरत्र वर्णिलेल्या अशा काही विशिष्ट गोष्टींचेच विवेचन आता करीत आहे.

गुणकीर्तिकृत धर्मामृतातील गृहस्थधर्माचे वर्णन रत्नकरण्ड श्रावकाचाराशी मिळते जुळते आहे. विशेषतः बारा व्रताचे वर्णन अगदी समान आहे. पण नवीन गोष्टी खालील दिसतात.

१ ) त्रेपन्न क्रिया [१५] २ ) षट्कर्म

**त्रेपन्न क्रिया**–रत्नकरण्ड श्रावकाचारात बारा व्रतातच सर्व श्रावकाचाराचा समावेश केला आहे. पण धर्मामृतात त्रेपन्न क्रियेच्या रूपाने गृहस्थाच्या आचारधर्माचे निरूपण केले आहे. ( ध. प. ४ )

---

१५. त्रेपन्न क्रियाची गणना असलेली एक प्राकृत गाथा जैन ग्रंथात आढळते. पण तिचा मूळ उगम मिळत नाही.
गुणवयतव सम पडिमा दाणं जलगालणंच अणयमियं ।
दंसणणाण चरित्तं किरिया तेवण्ण सावया भणिया ॥

त्रेपन्न क्रियांची गणना अशी आहे.

१२ व्रते, ८ मूळ गुण, समताभाव, ११ प्रतिमा, ४ दाने, जलगाळण, रात्रिभोजनत्याग, रत्नत्रय, १२ तपे.

**१२ व्रते**–रत्नकरण्डकाच्या आधारे आतापर्यंत त्यांचे वर्णन सविस्तर केले आहे.

**८ मूळगुण**–मदिरा, मांस, मधु यांचा त्याग करणे आणि पंच उदुंबर फळांचा त्याग हे अष्टमूलगुण होत. (उंबरू, वडारू, पिपरू, पिंपरी, कठु उंबर) या पंचफळांबरोबरच जांबु, बोर, करिर, भोपळा, कलिंगड, पडवळ, पारिसा–टोडका, कोहळे (खुरासनी), वांगेचे भरित यांचाही त्याग सांगितला आहे. तसेच मदिरा या सदरात सिंधि, भंगणि, कांजि (जुनी), मांगी, आफु, जायफळ, जायपत्री, खुरासनि, चोवा, आटले दूध, पारा गुटिका, कामवटिका, धतुरबीज इत्यादींचा समावेश केला आहे. (पान. २१–२२) तसेच मांस या सदरात वडा, रोटी, दिवसे, दांथरा, इडरि, ढिढरि, वेढनि, ढोकळा या पदार्थांची यादी देऊन म्हटले आहे "ऐस्या अन्नामध्ये वाकळाळ उपजति, दिसति तितुके तजावे" (ध. प. ५६)

**जीवदया**–समताभाव ठेववा. हिंसा चुकवावी. (द्रिष्टी पाहौनि चालावे। वस्तु वाणिज्य करिता, देतां घेता, ठेविता द्रिष्टि पाहौनि जिवा जतन करावे (ध. प. ७१).

**जलगालन**–जलगालनास फारच महत्त्व दिले आहे. सदृढ वस्त्राने पाणी गाळावे. गाळलेल्या पाण्यात आगोसा विसळावा. ते पाणी पुनः मूळच्या विहिरीत अथवा नदीत टाकावे. (अनगालि उदके पोहावे ना। अनगालि उदक मुखप्रक्षालन न करावे॥ ध. प. ७२). पाणी गाळण्याची ही कमाल मर्यादा समजावी लागेल.

## सप्तव्यसन त्याग–

श्रावकास धारा व्रताचा स्वीकार करण्यापूर्वीच या सप्तव्यसनाचा त्याग करावा लागतो. जुगार, मांसभक्षण, मद्यपान, वेश्यागमन, पारधि कर्म, चोरी, परस्त्रीगमन अशा सप्त व्यसनाचा त्याग केला पाहिजे. (हे सप्त व्यसने सांडावी। ध. प. ७३).

## रजस्वला धर्म–

गुणकीर्तीने धर्मामृतात अनर्थदंड व्रताच्या प्रकरणात शेवटी हा रजस्वलाधर्म सांगितला आहे. रजस्वला स्त्री ही पहिल्या दिवशी मातंगिनीसमान, दुसऱ्या दिवशी चांडालिनीसमान, तिसऱ्या दिवशी वरठिनी (?) समान आणि चौथ्या[१६] दिवशी

---

१६. येथे ४ था दिवस स्त्रीसमागम वर्ज्य दाखविला आहे. पण पद्मपुराण, अध्याय ७ मध्ये अंजनापवनंजयाची भेट ४ थ्या दिवशी दाखवून समागमानंतर पवनंजय जेव्हा आश्रमास निघतो तेव्हा अंजना त्याला म्हणते–

शूद्रिणीसमान मानावी (पांचवा दिवसि पवित्र, सुद्ध, उत्तम जाणावि । तरि च्यारि दिवसवरि घरांतु स्पर्श विटाळु जोगवाव । जरि हा विटाळु जोगवेना, तरि त्या घरासि उदभव नव्हे । वंसवृद्धि नव्हे ।). या विटाळात स्त्रीसंग केल्यास पहिल्या दिवशी मातागमनाचा दोष लागतो. दुसऱ्या दिवशी कन्यागमनाचा दोष, तिसऱ्या दिवशी भगिनीगमनाचा दोष आणि चौथ्या दिवशी शूद्रागमनाचा दोष लागतो (अइसे जाणौनि सर्वथा हा विटाळु जोगवावा । एकाकारू न करावा । हे आदिकरौनि अनर्थदंडाचे बहुत भेद असती । घ. पृ. ८४ ).

**षट्कर्मे** – ५३ क्रियेत षट्कर्मे गणली नाहीत. पण गुणकीर्तीने त्याचे वर्णन धर्मामृतांत शेवटी केले आहे. ( पान ४३ ). श्रावकाच्या सहा क्रिया सांगणारा एक संस्कृत श्लोक प्रसिद्ध आहे.

" देवपूजा गुरूपास्ति स्वाध्यायः संयमस्तपः ।
दानं चेति गृहस्थानां षट्कर्माणि दिने दिने ॥ ॥ "

पैकी देवपूजा शिक्षाव्रतातील प्रोषधोपवासात वर्णिली गेली आहेच. दानाचे वर्णन अतिथिसंविभागव्रतात मागे आले आहे. गुरुपास्तीचा समावेशही अतिथिसंविभागव्रतात होऊ शकेल.

**अकरा प्रतिमा** – याचा समावेश ५३ क्रियेत होतो. मराठी रत्नकरण्ड-टीकेत वास्तविक मूलग्रंथाधारे अकरा प्रतिमाचे वर्णन यावयास पाहिजे होते. पण त्या टीकाकाराने तो भाग आणला नाही. धर्मामृतात मात्र ११ प्रतिमा सांगितल्या आहेत. ( घ. पृ. १०२ ).

अत्यंत थोडक्यात त्याचे स्वरूप त्यांनी सांगितले आहे.

१ – सम्यक्त्व दृढ असावे ।
२ – द्वादशव्रते जे सांघितली ते पाळावि ।
३ – सर्वस्तुतिं समताभावें असावें ।
४ – पर्वणि-तिथि पालाव्या ।
५ – सजिवा वस्तुचा त्यागु करावा ।
६ – दीहा ब्रह्मचर्य पाळिजे । रात्री चतुर्विध आहार वर्जिजे ।

---

" अंजना बोलली वाणी । स्वामी ऐका चित्त देउनि ।
तुम्ही आले त्या दिनीं । दिवस माझा चवथा ॥ २०७ ॥
जरि राहिलें गर्भाधान । तरी मी काय करावें बाण ।
तुम्ही सज्जना कळवून । जावें प्राणनाथा ॥ २०८ ॥ "

यावरून चौथा दिवस स्त्रीसंगास वर्ज्य जैन शास्त्रात मंतव्य आहे किंवा नाही अशी एक शंका येते.

७ – सर्व स्त्री जात तजावी।

८ – घरि राहुनि आरंभु प्रारंभु सांडावा।

९ – एक वस्त्र वांचोनि सर्व परिग्रह तजिजति।

१० – हिंसादिक कर्माचि अनुमतुणा, अनुमति, हरिपु न धरिजे।

११ – पंचघरिं भिक्षा किजे। अथवा माधुकरी भिक्षा उदंड भावरिं किजे।

अकरा प्रतिमा पाळून श्रावक हा त्यागी बनतो व त्यानंतर तो मुनि होतो. अकरावी प्रतिमा म्हणजेच मुनिधर्माची पहिली पायरी आहे.

येथवर प्रामुख्याने गुणकीर्तिकृत मराठी रत्नकरण्ड टीका आणि धर्मामृत या दोन ग्रंथांच्या आधाराने गृहस्थाच्या आचारधर्माचा विचार केला आहे.

## कथाग्रंथातील आचारवर्णनाची स्थळे —

चरित्र किंवा कथा ग्रंथ असूनही मधून मधून जैन आचार-धर्म अथवा तत्त्वज्ञान याचे वर्णन करण्याची जैन लेखकाची ही एक पद्धत आहे. त्यास अनुसरून वर जो श्रावकधर्म पाहिला त्याविषयी कोणत्या ग्रंथात काय उल्लेख आले आहेत त्यांची नोंद फक्त येथे करीत आहे.

### १.— दान शील तप भावना —

ही एक रूपक कथा आहे. दान शील तप, भावना हीच पात्रे आहेत. स्वमुखाने आपली श्रेष्ठता ती सांगतात.

**दानवर्णन** :— चार प्रकारच्या दानाचे वर्णन केले आहे. ( ओव्या ४० ते १९४ ) ( दान अधिकार प्रथम ).

**शीलवर्णन** :— ब्रह्मचर्य व्रताचा महिमा – ( ओव्या – १९७ ते २६५ )
( शील अधिकार – द्वितीय ).

**तपवर्णन** :— तपश्चर्येचा महिमा – (ओव्या २६७ ते ३११ )
( तप अधिकार तृतीय ).

**भावना** :— दान, शील किंवा तप यापेक्षा अंतःकरणातील धर्मभावना श्रेष्ठ आहे. म्हणून भाव तेथेच मोक्ष.
( ओव्या ३१२ ते ३४६ )
( भावना अधिकार चतुर्थ ).

चौघांच्या संवादाचा शेवट मोठा मार्मिक आहे.

" भावलेल्या भक्तिचें घर। दान करी रोगासी दूर।
शीलवंतें होये सुंदर। तपें पावतील स्वर्गमुक्तिपद पैं ॥ ३४८ ॥
एक करीतील देवपूजा। दुसरे सामग्री देतील वोजा।
तिसरे भावना भावितिं पादाजा। तिचा पुण्य समतुल्य ॥ ३४९ ॥

२. श्रेणिकचरित्र ( गुणकीर्ति ):--

रुपिणीची कथा. वनात रुपिणीला मुनींनी ५ व्रतांचे विशेषतः शील व्रताचे महत्त्व समजावून दिले आहे.

**३. गुणनंदीकृत जशोधरपुराण** — ६ व्या अध्यायात **बारा व्रतांचे** समग्र विवेचन केले आहे. यमदंड कोतवालास ज्ञानसागर मुनीने धर्मोपदेश केला त्याप्रसंगी हे व्रत प्रकरण आले आहे.

" आतां श्रावकाचे व्रत म्हणिजे द्वादश । ते त्वां घ्यावा उपदेश ।
तुज मी सांघेन रहस्य । वेगळे वेगळे ॥ ११६ ॥ पासून तो
ऐसे बोलिले बारा व्रते । जे नरनारी बोलती सदाते ।
त्यास सम्यक्दृष्टी म्हणति बहुते । श्रावक जन ॥ १३४ ॥ पर्यंत.

हे प्रकरण संक्षिप्त असून शास्त्रपरंपरेस धरून आहे.

**४. मेघराजकृत जसोधर रास** —मारिदत्त राजाच्या सभेत सुदत्ताचार्यांनी गृहस्थधर्माचे सुंदर विवेचन केले आहे. बारा व्रतांचे वर्णन ( ओव्या १०३९ ते १०५० ) मध्ये आहे. सप्तव्यसनांचे वर्णन व त्यागाचा उपदेश ओव्या १०५९ ते १०८५ मध्ये आहे.

**५. वीरदासकृत सुदर्शन चरित्र** :—सुदर्शनाच्या विवाहानंतर सुदर्शन सपत्नीक जिनमंदिरात गेले व त्यांनी गुरुचे दर्शन घेतले. गुरूने त्यांना सप्तव्यसनांचे स्वरूप सांगून त्याचा त्याग करावयास सांगितला. तसेच १२ व्रतांचे स्वरूपही पूर्णपणे सांगितले. जवळ जवळ सर्व श्रावक धर्मच तेथे सांगितला आहे. तो अत्यंत विस्तृत आहे. ( अध्याय ४ व ५ ).

" सप्तव्यसने जि टाळावि । बारा व्रतें पाळावि ।
त्रिपन क्रिया जि धरावि । सुद्धभावे सम्यक्त ॥ ७ ॥
षट्कर्मे जि आचरावि । पंचशून्यें [१७] जि टाळावि ।
सप्ततत्त्वें जानावि । शुद्धभावें सिद्धांति ॥ ८ ॥
अष्टमुळगुण जि पाळावे । पंच उंबरे त्रिमकार टाळावे ।
अपवित्र जि म्हणावे । नित्यवर्जावे सर्वथा ॥ ९ ॥

अशी प्रस्तावना करून नंतर समग्र विवेचन केले आहे. १४ व्या अध्यायात जळगाळण, रात्रिभोजनत्याग याचे वर्णन सविस्तर केले आहे.

६. कामराजकृत – सुदर्शनचरित्र :– चौथ्या अधिकारात सप्तव्यसने,

---

१७. पंचशून्याचे वर्णन गृहस्थाचाराच्या कोठे कोठे केले आहे– कांडणे, पिसणे, चूल जाळणे, पाणी भरणे, घर झाडणे, या पाच क्रियांत गृहस्थाला व गृहस्थिणीला काही पाप लागतेच, त्यामुळेच गृहस्थ मोक्षाला जात नाही. अशा अर्थाचा एक संस्कृत श्लोक नेहमी उद्धृत केला जातो.

बारावते यांचे विवेचन केले आहे.

७. आदिनाथपुराण :— अकरा प्रतिमांचे विस्तृत वर्णन पाचव्या अध्यायात केले आहे.

८. भविष्यदत्त बंधुदत्त पुराण — दुसऱ्या अध्यायात – दोघेही बंधू द्वीपांतराय चालले आहेत. त्यांच्या पित्याने त्यांना धर्मोपदेश केला. त्यात प्रथमतः षट्कर्मांचे विवेचन केले आहे.

" हे श्रावकाची आहे षट्कर्म । हे पाळावें वईस कुळधर्म ।
हे वृद्ध गतिचें जाणा वर्म । सत्य जानोनि पै ॥ ८५ ॥ "

यानंतर ८७ ते ९५ ओव्यात पंच अणुव्रते सांगितली आहेत. त्यानंतर ते कुमार रत्नद्वीपाला गेले.

९. श्रेणिकचरित्र (जनार्दन) :— या ग्रंथांत तत्त्वज्ञान आणि आचारधर्माचे विवेचन फार आले आहे. किंबहुना कथा त्यातून अडचणीने वाट काढते.

बाराव्या अध्यायात १३ चारित्रांचे वर्णन करून शीलाचे १८ हजार भेद करून दाखविले आहेत.

चौतीसाव्या अध्यायात ५३ क्रिया व १२ व्रते यांचे वर्णन आणि पस्तीसाव्या अध्यायात गुणव्रते, ११ प्रतिमा व १२ तप यांचे सविस्तर वर्णन केले आहे.

१०. पद्मपुराण — अध्याय ७ मध्ये रावणाने तीर्थयात्रा करून ज्यावेळी मेरुगिरीवरील अकृत्रिम जिनबिंबाचे दर्शन घेतले त्यावेळी तेथे अनंतवीर्य नावाचे मुनी आले आणि त्यांनी रावणाने विचारलेल्या प्रश्नास उत्तर म्हणून ५३ क्रियांचे सविस्तर वर्णन केले आहे. त्याची प्रस्तावना अशी आहे.

" अनंतकीर्ती मुनिवर । सांगे धर्माधर्म विचार ।
त्रेपन्न क्रिया श्रावकाचार । निरूपी पै ॥ १३ ॥

१४. नैमित्तिकव्रते —

श्रावकांनी १२ व्रते ही नित्य व्रते म्हणून पाळावयाची असतात. पण काही नैमित्तिक व्रतेही त्यांनी पाळली पाहिजेत. अर्थात ती कालिक स्वरूपाची असतात. तशी त्या व्रतांची संख्या फारच मोठी आहे. ती व्रते घेऊन नंतर दानधर्मासह उद्यापन करावे लागते. भट्टारक युगात अशा व्रतांना आणि उद्यापनांना फारच जोर चढला होता.

मराठी ग्रंथात जी व्रते आणि ज्या व्रतकथा आहेत त्यावरून त्यांचे स्वरूप थोडक्यात येथे पाहावयाचे आहे.

१ ) अनंतव्रत —भाद्रपद शु. ॥ एकादशीपासून त्रयोदशीपर्यंत तीन दिवस करतात. यात ऋषभदेवापासून अनंतनाथापर्यंतच्या चौदा तीर्थंकरांची पूजा करतात. ( अनंतव्रतकथा, जिनसागर ).

२ ) **पुष्पांजली व्रत** —भाद्रपद शु॥ ९ पासून करण्यात येणाऱ्या, मेरू पर्वतावर असलेल्या पाच जिनमंदिरांच्या पूजेला पुष्पांजली व्रत म्हणतात.

( पुष्पांजलीकथा, जिनसागर ).

३ ) **आदित्यवार - रविवारव्रत** —आषाढातील अंतिम रविवारापासून नऊ रविवारपर्यंत करतात. पार्श्वनाथ तीर्थंकरांची पूजा ही प्रमुख असते.

( आदित्यावारव्रतकथा, जिनसागर ).

४ ) **सुगंधदशमीव्रत** —भाद्रपद शुद्ध दशमीला हे व्रत करतात. चोवीस तीर्थंकरांची पूजा करतात.

( सुगंधदशमीकथा, जिनसागर ).

५ ) **नंदीश्वरव्रत** —आषाढ, कार्तिक, फाल्गुन या तीन मासांतील शुक्ल पक्षात अष्टमीपासून पौर्णिमेपर्यंत या व्रताचा पूजाविधी असतो. ३, ५ किंवा ७ वर्षे हे व्रत पाळावयाचे असते.

( नंदीश्वरकथा, महीचंद्र )

६ ) **गहूव्रत** —कालिकापुराणात इंद्रसेनादी चारही राजांनी हे व्रत केल्याचा उल्लेख आहे. चैत्रातील अमावास्येला हे व्रत करावे.

७ ) **गरुडपंचमीव्रत** —श्रावण शुद्ध पंचमीसी। उपोषण करावे ते दिवशीं। आरंभ करावा न्हवनासी। चैत्यालयात ॥ ४१ ॥ पाच वर्षेपर्यंत हे व्रत पाळावे.

( गरुडपंचमीकथा, लक्ष्मीचंद्र )

८ ) **मेघमालाव्रत** —हे व्रत भाद्रपदाचे पहिल्या पाच दिवसात करावयाचे असते.

( लक्ष्मीचंद्रकृत मेघमालाव्रतकथा )

९ ) **रुक्मिणीव्रत** —आइका याचे विधान। भाद्रपद शुक्लपक्ष जाण। अष्टमी कीजे उपोषण। भावसहित पै ॥ १२४ ॥ अष्टविधपूजा, न्हवन, शांतिक, अष्टप्रहर पूजा करावी. प्रभाती पारणे. चतुर्विध संघास दान. याप्रमाणे ८ वर्षे व्रत करावे. मग उजवन. आठ आठ वस्तूंचे दान. रुक्मिणीने पूर्वभवात ( लक्ष्मीमती ) हे व्रत केले म्हणून श्रीकृष्णासारखा पति मिळाला. ( १२४ ते १३१ ओव्या ).

( रुक्मिणीव्रतकथा, विशालकीर्तिकृत ).

१० ) **कलशदशमीव्रत** —हे व्रत श्रावण शुक्ल दशमीला करतात. यात शीतलनाथ तीर्थंकरांची पूजा करतात.

( कलशदशमीकथा, जिनसागर ).

११ ) **दशलक्षणव्रत** —प्रथम भाद्रपदमास। शुक्लपक्षें पंचेमि दिवस। आरंभ कीजे व्रतास। दसलाक्षनि ॥ १२ ॥ प्रथम किजे कथा श्रवणे। मग किजे न्हवने। मनी भाव धरून। व्रताचा पै ॥ १३ ॥

पंचवर्ण रांगा काढाव्या, दहा प्रकारची फळे आणावी, दहा अष्टके द्यावीत. अंग जयमाला म्हणाव्या. मध्यभागी सिंहासन मांडून त्यावर चोवीसी स्थापन करावी. दशधर्मांची पूजा करावी. नंतर अर्हंत, श्रुतपूजा कराव्या. दहा दिवस उपवास करावेत, नाहीतर एकाशने करावीत. याप्रमाणे दहा वर्षे हे व्रत पाळावे. मग उद्यापन करावे. मंदिरात दहा दहा वस्तूंचे दान द्यावे. ( १२–४३ ओव्या विधि ).

( दशलाक्षणिकव्रतकथा, अनंतकीर्ति ).

१२ ) **कर्माष्टमीव्रत** ––भवहरणअष्टमीव्रत – आषाढ शुद्ध अष्टमीस उपवास अथवा एकभुक्ती. पंचपूजा – तीळ, तांदूळ, लवण, वाल, तुरी मिळून पूजा करावी. पंचज्योति, पंचामृत अभिषेक, मुनीस दान, तिळामुळे पुत्रप्राप्ति, तुरीमुळे धन, लवणामुळे सौभाग्य, वाल चढविता श्रीमंत हे फळ.

( कर्माष्टमीकथा, अर्जुनसुतसोयरा ).

**यती – मुनी धर्म ––**

आचार हा दोन प्रकारचा. एक श्रावकाचार आणि दुसरा मुनी–आचार. जैन ग्रंथात श्रावकाचाराासाठी ' विकलचारित्र ' आणि मुनि आचारासाठी ' सकल-चारित्र ' अशा पारिभाषिक संज्ञा आहेत. किंवा ' सागारधर्म व अनगारधर्म ' असेही त्यांना म्हणतात.

**चार आश्रम कल्पना** ––वैदिक परंपरेप्रमाणेच जैन परंपरेत चार आश्रमांना मान्यता आहे. " अजस्र विषयांचा त्याग करणे " ही गोष्ट माणसाला एकदम शक्य नाही. हळूहळू त्याने त्याग करावा. जैन पद्मपुराणात यासंबंधी एक प्रसंग मोठ्या मार्मिक रीतीने सांगितला आहे. रामाच्या वियोगाने भरत राज्यत्याग करून संन्यास-धर्म घेऊ पाहतो; त्यावेळी त्याचे वडील त्याला चार आश्रमाची कल्पना देऊन राज्य भार टाकू नकोस अशी विनवणी करतात.

" केवी टीकें गरुड वेगा । उड्डान केली पतंगा ।
तैसे बाल्वृद्धानुरागा । केवी पुरे पै ॥ २१९ ॥ २० वा अध्याय "

गरुडवेगाने पतंगाने उड्डाण करू नये. म्हणूनच श्रावकानेही ११ प्रतिमा पाळीत पाळीत यतिधर्मात प्रवेश करावयाचा असतो. म. आदि–ऋषभदेवाने चार आश्रम सांगितले आहेत आणि चौथ्या आश्रमात मोक्ष मिळविण्यास सांगितले आहे. सुदर्शनचरित्रात ( वीरदास ) सातही तत्त्वाचे वर्णनात मोक्ष तत्त्वाचे वर्णन करून ––

मोक्षतत्व याते झणिजे । चौ आश्रमि जि चिंतिजे ।
सर्व संगति परित्यागिजे । तव मिळिजे निजतत्वीं ॥ ६·७५. "

असे म्हटले आहे. ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि सन्यास या चार आश्रमांतूनच व्यक्तींचा पूर्ण विकास होतो ही कल्पना या धर्माचार्यांना होती.

**यतिधर्मविषयक मराठीतील ग्रंथ** — मराठीत खास यतिधर्माचेच वर्णन करणारा एकही ग्रंथ नाही. संस्कृत प्राकृतात असे बरेच ग्रंथ आहेत. नियमसार (कुंदकुंदकृत), मूलाचार (वट्टकेरकृत) भगवती आराधना (शिवार्यकृत), आचारसार (वीरनंदी) हे ग्रंथ प्रामुख्याने यतिधर्मविषयक आहेत. पण मराठीत असा एकही ग्रंथ नाही. येथे त्याच्या कारणाची चर्चा मी करीत नाही. या प्रकरणाच्या समारोपात त्याचा मी विचार करणार आहे.

येथे ज्या ज्या ग्रंथात यतिधर्माची, अथवा त्याच्या काही अंगांची माहिती अथवा चर्चा आली आहे त्यांच्या आधारे यतिधर्माचे विवेचन करणार आहे. श्रावकाचारात श्राविकेचाही आचार समाविष्ट आहे. स्त्रियांना ११ प्रतिमा पाळता येतात पण त्यांना दिगंबरदीक्षा घेता येत नाही, म्हणून त्यांच्यासाठी यतिधर्म नाही.

**यतिधर्माचे स्वरूप**– श्रावकधर्म हा जसा दान व पूजामुख्य असतो तसा यतिधर्म हा ध्यान व अध्ययनमुख्य असतो. आपणांस एक गोष्ट येथे ध्यानात घेतली पाहिजे ती ही की, श्रावकाचार हा पुण्यवर्धक असतो. तर यतिआचार कर्मनाशक असतो. पुण्य आणि पाप या दोघांच्याही नाशानंतर मोक्षप्राप्ति होते असे जैन धर्म मानतो. म्हणून कर्मांच्या जशा पापप्रकृती आहेत तशा पुण्यप्रकृती आहेत असे ते तत्त्वज्ञान सांगते. शुभकर्माने पुण्य बांधले जाते आणि अशुभकर्माने पाप बांधले जाते.[१९] म्हणून पुण्य असो अगर पाप असो त्या दोघांचाही नाश होऊन आत्मा शुद्ध अवस्थेत जाणे याचे नाव मोक्ष ही जैन कल्पना आहे.

मुनि किंवा यति यांना पुण्य मिळवायचे नसते तर पुण्याचाही च्छेद करावयाचा असतो. यतिमार्ग व श्रावकमार्ग यात येथे मूलभूत भेद हा मानावा लागेल. श्रावकाच्या सर्व क्रिया या पुण्यवर्धक आहेत तर त्याची पाच अणुव्रते पापनाशक आहेत असा दो मधला मार्ग आहे. यतिधर्माचे सामान्यस्वरूप पाहिल्यावर आता त्याचे विशेष स्वरूप पाहू.

**यतीचे २८ मूळगुण**–(हे विवेचन धर्मामृतातील परिच्छेद १७ ते २३ च्या आधारे केले आहे). साधुपुरुषाला हे अठावीस मूळगुण पाळलेच पाहिजेत. पंचमहाव्रते, पंचसमिती, पंचेंद्रियनिरोध, षडावश्यके, ७ प्रकीर्ण मूळगुण असे हे २८ गुण होतात.[२०]

---

१८. णाणज्झयणं मुक्खं जइधम्मो तं विणा तहा सोवि ॥ रयणसार. ११.

१९. शुभः पुण्यस्याशुभः पापस्य । तत्वार्थसूत्र । ६.३.

२०. मूलाचारातील मूळगुणाधिकारात (वट्टकेरकृत) हे २८ मूळगुण एकत्रित सांगितलेल्या दोन गाथा पुढीलप्रमाणे आहेत.
पंचय महव्वयाइं समिदीओ पंच जिणवरुद्दिट्ठा ।
पंचेविंदियरोहा छप्पिय आवासया लोचो ॥ २ ॥

**१. पंचमहाव्रते**–श्रावकासाठी पंचपापांचा त्याग हा स्थूलरूपाने सांगितला होता म्हणूनच त्या व्रतांना अणुव्रत म्हटले होते. पण मुनींना पंचपापाचा त्याग हा पूर्णतः करावयाचा असतो म्हणूनच ती व्रते महाव्रते म्हटली जातात.

१ ) अहिंसा महाव्रत ( सर्व जिवदयाप्रतिपाल । )
२ ) सत्य महाव्रत ( सर्वथा असत्य न बोलति । ).
३ ) अचौर्य महाव्रत ( सर्वथा चोरि न करिति । अदत्त कवणाचे नेवति । )
४ ) ब्रह्मचर्य महाव्रत ( सर्व आस्त्रि मातासमान धरिति । ).
५ ) अकिंचन्य महाव्रत ( सर्वथा ममत्वमाउ सांडिति । )

श्रावकाच्या अणुव्रतात ५ व्या व्रताचे नाव ' परिग्रहपरिमाण ' असे होते तर महाव्रतातील ५ व्या व्रताचे नाव ' अकिंचन महाव्रत ' असे आहे. स्थूल त्याग व सूक्ष्म त्याग यातील फरक समजण्यास या संज्ञा उपयुक्त आहेत.

**२. पंच समिती** –– मुनीने कसे चालावे, कसे बोलावे, आहार कसा घ्यावा, एखादी वस्तू घेताना अगर ठेवताना कसे वागावे, आणि मलमूत्रविसर्जनाची क्रियासुद्धा कशी करावी याचे नियम पंच समितीत सांगितले आहेत.

१ ) ईर्या समिती – ( द्रष्टि पाहुन पाउले ठेविति । )
२ ) भाषा समिती – ( भाषा विचारौनि बोलिति । ).
३ ) एषणा समिती – ( आहार सुद्धा निरमावरि करिति । )
४ ) आदाननिक्षेपण समिती – ( वस्तु प्रतिलेखुन घेति ठेविति । )
५ ) उत्सर्ग – ( प्रतिष्ठापना ) समिती – ( आंगिचे मलमूत्र निर्जिव भुमिका पाहौनि सांडिति । )

**३. पंचइंद्रियनिरोध** ––

१ ) स्पर्शनेंद्रियनिरोध ( सरिर आठ विषय वर्जिति । ) आठ प्रकारच्या स्पर्शाचा त्याग – हलका, भारी, कठोर, मऊ शीत, उष्ण, स्निग्ध, रूक्ष हे आठ प्रकार आहेत.

२ ) रसनेंद्रियनिरोध – ( जिव्हा इंद्रिय – पंच विषय रस विवर्जिति । ) आंबट, तिखट, खारट, मधुर, गोड हे पाच रस आहेत.

३ ) घ्राणेंद्रियनिरोध – ( नासिकाविषय दोनि सुगंध दुर्गंध भाव नेवती । )

४ ) चक्षुरिंद्रियनिरोध – ( चक्षुइंद्रिय ह्मणीजे लोचन विषय पाच वर्ण –– पांचाचे भाव तजिजति । )

---

अच्चेलकमण्हाणं खिदिसयणमदंतघंसणं चेव ।
ठिदिभोयणेय भत्तं मूलगुणा अठ्ठवीसादु ॥ ३ ॥
मूलाचारात या अठ्ठावीस गुणांचे सविस्तर आणि प्राचीन असे विवेचन आहे.

५) कर्णेंद्रियनिरोध – (श्रवण इंद्रिय म्हणिजे कान। — विषय सात स्वर नाइकति।)

४) षडावश्यके — १) त्रिशुद्धी सामाइक[२१].

२) स्तुतिस्तवन.

३) देववंदना.

४) प्रतिक्रमण.

५) कायोत्सर्ग.

६) ध्यान.

या षडावश्यक क्रिया दररोज मुनींनी केल्या पाहिजेत. यातील प्रतिक्रमणाची क्रिया ही सर्व जीव संरक्षणाच्या व स्वभावशुद्धीच्या अपेक्षेने फार महत्त्वाची मानावी लागेल. एकेंद्रियापासूनच्या सर्व सूक्ष्म जीवांची क्षमा प्रतिक्रमणाच्या वेळी मागावी लागते.[२२] कायोत्सर्ग म्हणजे शरीर ताठ ठेवून उभे राहणे, संयमासाठी ते आवश्यक समजले जाते.

**प्रकीर्णमूळगुणांत** — पुढील गोष्टी येतात.

१) अचेलकत्व – (पंचवस्त्रे त्यागु करिति – कोसज, बोंडज, वल्कल, चर्मज, रोमज। दिगंबर सॅर्व हींडति।)

२) अस्नान – (स्नान न करिति)

३) अदंतधावण – (दातवन न करिति).

४) भूमिशयन – जमीनीवर झोपणे.

५) स्थितिभोजन – (उभा भोजन करिति।).

६) एकभक्ति – एकच वेळा दिवसातून अन्नपाणी घेणे. (एकभक्ति टाइ अन्न उदक करिति।)

७) केशलोच करणे.

याप्रमाणे अठ्ठावीस मूळगुण मुनींनी पाळावे.

**पंचविध आचार, तेरा चारित्र्ये, १२ तप आणि दहा धर्म[२३]** — यांचाही समावेश यतिधर्मात होतो.

---

२१. सामाइक म्हणजे सर्व प्रकारच्या बाह्य विषयापासून अलिप्त होऊन आत्मध्यानात तल्लीन होणे.

२२. प्रतिक्रमण करिताना जो मूळ प्राकृत पाठ म्हणावा लागतो तो पुढीलप्रमाणे आहे. "पडिक्कमामि भंते। अ इरियावहियाए, णिग्गमणे, ठाणे, गमणे, चंकमणे, उव्वत्तणे, परियत्तणे, एइंदियाणं, बेइंदियाणं, तेइंदियाणं, चउरिंदियाणं, पंचिंदियाणं, जीवाणं, विराहणाए, संघट्टणाए, संघादणाए, ओद्दावणाए, परिदावणाए, एत्थ मे जो कोवि तस्स मिच्छा मे दुक्कडं।" (प्रतिक्रमणसूत्र)

**पंचविध आचार** — ( धर्मामृतात आचार्यलक्षण सांगताना यांचे वर्णन केले आहे. ध. १३ ).

दर्शनाचार, ज्ञानाचार, चारित्राचार, तपाचार, वीर्याचार, असे हे पंचाचार आहेत. अष्टांग सम्यक्दर्शन पाळणे, अष्टांगज्ञान प्राप्त करून घेणे, तेरा प्रकारचे चारित्र्य पाळणे, तपाचारात निपुण असणे, धर्मकार्यात पराक्रमी असणे असा त्यांचा क्रमशः अर्थ आहे.

**तेरा चारित्र्य** — धर्मामृतात यांचे वर्णन गृहस्थाचारात ५२ क्रियामध्ये केले आहे. पण त्यांचा समावेश यती–आचारात होतो. कुंदकुंदांनी नियमसारात मुनींच्या आचार सांगताना गाथा ५६ ते ७० मध्ये त्यांचे वर्णन केले आहे. वीरदासानेही मराठीत सुदर्शन चरित्रात अठराव्या अध्यायात १३ चारित्र्यांचे मुनि–आचार म्हणूनच वर्णन केले आहे. तेरा चारित्र्यांत पुढील बाबी येतात.

**पांचव्रते, पांच समिती** — यांचे वर्णन मूलगुणात आले आहेच.

**तीन गुप्ती** — मनोगुप्ती, वचनगुप्ती व कायगुप्ती. गुप्ती म्हणजे संरक्षण. मन, वचन व काय यांच्यावर अत्यंत संयमन असणे म्हणजे गुप्ती.

**बारा तपे** — धर्मामृतात ( ध. ११ मध्ये ) आचार्यलक्षण सांगताना १२ तपांचे वर्णन आले आहे.

१ ) अनशन — ( अनशन तप म्हणिजे उपवास सक्यनुसारि करि । ) — उपवास.

२ ) अवमोदर्य — अर्धा आहार घेणे ( अर्ध आहार उठि ).

३ ) वृत्तिपरिसंख्या — घरांची, वस्तूंची संख्या ठरवून प्रतिज्ञा करणे.

४ ) रसपरित्याग — पंचरसांचा अलटूनपालटून त्याग करणे.

५ ) विविक्तशय्यासन — एकांत आसनावर शयन करणे.

६ ) कायक्लेश — शारीरिक पीडा सहन करणे. ( कायाकष्ट करि )

७ ) विनय — थोरांविषयी, आचार्यांविषयी विनयभाव ठेवणे.

८ ) वैयावृत्य —आचार्यांची, वृद्ध मुनींची सेवा करणे.

---

२३. आतां सांघेण जे जती । आचरती धर्मु आइकें ॥ १०८९
पंचविध आचारू । चारित्र तेरा प्रकारू । तीन तप भेद बारा ।
आचरति देखा ॥ १०९० ॥
दहा लक्षणें धर्माची । जरी श्रुतानु सांघेन त्याची । तरि वाढेल या ग्रंथाची ।
कथनि देखा ॥ १०९१ —जसोधर रास

९ ) स्वाध्याय — वाचना, पृच्छना, अनुप्रेक्षा, आम्नाय व धर्मोपदेश असे पाच प्रकारचे स्वाध्याय करणे.

१० ) प्रायश्चित्त — नित्य व नैमित्तिक प्रायश्चित्त घेणे.

११ ) कायोत्सर्ग — उभे राहून तप करणे

१२ ) ध्यान — आत्मध्यानात मग्न असणे.

**दशधर्म** :— धर्मामृतात आचार्यलक्षण सांगताना ( पृ. १४ ) व वीरदासकृत सुदर्शन चरित्रात २४ व्या अध्यायात दशधर्मांचे वर्णन आले आहे.

१. उत्तम क्षमा, २. उत्तम मार्दव, ३. उत्तम आर्जव, ४. उत्तम शौच,
५. उत्तम सत्य, ६. उत्तम संयम, ७. उत्तम तप, ८. उत्तम त्याग,
९. उत्तम आकिंचन्य, व १०. उत्तम ब्रह्मचर्य

असे हे दशविध धर्म आहेत. भाद्रपद महिन्यात या दशधर्मांचा फार मोठ्या प्रमाणात उत्सव साजरा केला जातो.

कथाग्रंथांपैकी वीरदासकृत सुदर्शनचरित्र हा आचारधर्माच्या अपेक्षेनेही अत्यंत महत्त्वाचा आहे. विशेषतः १८ व्या अध्यायातील पहिल्या ८८ ओव्यांत संपूर्ण मुनिधर्म सांगण्याचा प्रयत्न त्याने केला आहे. थोडक्यात त्याने मुनींचा आचारधर्म पुढीलप्रमाणे सांगितला आहे :

अठाविस मूळगुण पाळितु । द्वादश भेद तप तो करितु ।
बारा अनुप्रेक्षा पाहतु । चिंतिचिंतु सुदर्शनु ॥ ८५ ॥
सत्तावन आश्रवे रुधितु । सत्ताविस विषय टाळितु ।
पंचविस दोष तो रहितु । व्रत पाळितु दिगंबर[२४] ॥ ८६ ॥

यापैकी बहुतेकांचे वर्णन वर आले आहेच.

सत्तावन प्रकारच्या कर्मप्रकृतींच्या आस्रवांना मुनी हा आपल्या निर्मळ आचाराने रोखतो. कर्म येऊ देत नाही. पंचेंद्रियांचे २७ विषय तो टाळतो आणि पंचवीस प्रकारच्या दोषांनी रहित असतो.

**बारा अनुप्रेक्षा** —( यातील सर्व उद्धरणे गुणकीर्तिकृत बारा अनुप्रेक्षांतील आहेत ).

जैन आचारधर्मात बारा अनुप्रेक्षांचे एक विशिष्ट स्थान आहे. मुनींचा आचारधर्म किंवा श्रावकाचा आचारधर्म सांगताना बारा अनुप्रेक्षांचा उल्लेख येत

---

२४. मुनिदीक्षा कोणास देऊ नये ?–त्याचे अंगी आहे व्याधिरोड —
जे आहेती ढाईचे वेडे – त्यासि दीक्षा नद्दे ॥ ८.५० ॥
ज्याचे अंग अधिक उणे – त्यासि दीक्षा नद्दे ॥ ८.५८ ॥
मुनिदीक्षा वरील दोषांनी युक्त असणाऱ्यांना देऊ नये असे सांगितले आहे.
—( यशोधरपुराण, गुणनंदी ).

नाही. पण संवराची कारणे सांगताना मात्र गुप्ती, समिती, धर्म, अनुप्रेक्षा, परिषहजय व चारित्र यांची नावे येतात. त्यात 'अनुप्रेक्षा' याना ४ थे स्थान आहे. संवर म्हणजे आत्म्याकडे नवीन येणाऱ्या कर्मांना रोखणे. अनुप्रेक्षामुळे आत्म्याकडे नवीन कर्मे येत नाहीत. बारा अनुप्रेक्षांना 'बारा भावना' असेही म्हणतात. या बारांचे चिंतन कर्मनाशार्थ वारंवार करावे. प्राचीन मराठी जैन ग्रंथात गुणकीर्तिकृत बारा भावना अतिशय लोकप्रिय असून त्यांची रचनाही फार चांगली आहे.

(त्या द्वादशानुप्रेक्षा कवणी । जे दीर्घ वैराग्याची ठेवनी । आता सांघेन नामाभिधानि ते परीयेसा पा ॥ १८ ॥ अनित्य १, असरण २, संसृति ३, एकत्व ४, अनित्यत्व ५, अशुचि ६, आश्रव ७, संवर ८, निर्जरा ९, लोकानुप्रेक्षा १०, बोधिदुर्लभानुप्रेक्षा ११, धर्मानुलब्धि अनुप्रेक्षा १२, एवं द्वादश भेदेवि जाना ॥ ).

**अनित्यानुप्रेक्षा** ---संसाराच्या अनित्यत्वाची भावना.

अनित्यानुप्रेक्षा कैसि । ---

या यौवनाचा भाउ कैसा । प्रातःदर्भाग्रीचा बिंदु जैसा ।
चंचला यौवना तैसा । कवणु विस्वासु ॥ २२ ॥
तैसि हे लक्ष्मि चंचळ । जैसी या सागराची वेळ ।
अगा जि होति जाति हे कळ । कव्हे जि ना ॥ २३ ॥

**अशरणानुप्रेक्षा** ---या संसारात ज्याला शरण जावे असा कोणीही नाही, अशी भावना भावणे.

या भूतजातित्ते ग्रासिता । अनुकंपा न ये कृतांता ।
जन्म न चुके संता महंता--। कारण देखा ॥ ८३ ॥

**संसृती अनुप्रेक्षा** ---हा जीव या संसारात अनादिकालापासून परिभ्रमण करीत आहे. दुःख भोगीत आहे.

**एकत्वानुप्रेक्षा** ---मी एकटाच जन्मतो. एकटाच मरतो. मला कोणी साहाय्यक नाही.

**अन्यत्वानुप्रेक्षा** ---माझ्यापासून सर्व काही अन्य आहे. संसारात माझे असे काहीही नाही.

**अशुचि अनुप्रेक्षा** ---माझे हे शरीर अतिशय किळसवाणे आहे.

आता अशुच अनुप्रेक्षा । किजे शरिराचि विवेक्षा ।
आत पाहता या देखा । घृणा उपजे ॥ १०९ ॥
शुक्र शोणिताचा बाधा । अस्थिपंजराचा साचा ।
अभेद मांसाचा कोश । कुश्चित देखा ॥ ११० ॥

**आस्रवानुप्रेक्षा** ---माझ्या रागद्वेषामुळे माझ्याकडे कर्म परमाणू येतात आणि संसारात मी अधिकाधिक गुरफटतो.

इच्छा न मोडे विषयाचि । तृष्णा न मोडे व्यापाराचि ।
आश न तुटे परद्रव्याचि । तव कर्मास्रव ।। २३२ ।।

**संवरानुप्रेक्षा** --माझ्याकडे येणाऱ्या कर्मांना रोखण्याचा उपाय मला पाहिला पाहिजे. गुप्ती समिती आदी उपाय त्यावर आहेत.

ध्यान मौन अनुष्ठान । संवरेसि परम निधान ।
संवरेविण निर्वाण । कदापि न घडे ।। २५१ ।।

**निर्जरानुप्रेक्षा** --माझ्या आत्म्याजवळ असलेले कर्म हळूहळू नष्ट झालेच पाहिजे. त्याची निर्जरा झाली पाहिजे. ( निर्जरा – निचरा )

जरि कर्मांचि किजे निर्जरा । तरि मुक्तिरामा ये सेंदरा ।
वंदनिक या हरिहरा । होइजे देखा ।। २६१ ।।

**लोकानुप्रेक्षा** —लोकरचनेचा विचार करणे. अध, मध्य, ऊर्ध्व अशा भेदांनी लोक उभा आहे. तो अकृत्रिम व सहजसिद्ध आहे. स्वयंभू आहे.

**बोधिदुर्लभानुप्रेक्षा** —या संसाराच्या परिभ्रमणात सम्यक्‌दर्शन – ज्ञानाची प्राप्ती होणे अतिशय दुर्लभ आहे.

दुर्लभ धर्माचे श्रवण । दुर्लभ सर्व प्रकारे पुराण ।
हे चोखाल अंतःकरण । दुर्लभ देखा ।। ३१९ ।।

**धर्मानुप्रेक्षा** --सम्यग्दर्शन ज्ञान व चारित्र या त्रयींनी युक्त धर्म हाच खरा धर्म आहे. त्याची साधना करावी.

जरि जिणें धर्मेविण गेले । ते मानव जिताचि मेले ।
इये वसुंधरेचे वोझे जाले । धर्मेविण देखा ।।

याप्रमाणे या बारा अनुप्रेक्षा असून कर्म-मुक्तीसाठी साधकाने त्यांचे चिंतन वारंवार करावयाचे असते. हाही एक आचाराचाच भाग आहे. याप्रमाणे प्राचीन मराठीतील जैन ग्रंथांच्या आधारे यतींच्या आचारासंबंधी जी माहिती मिळते तिचे या प्रकरणात संकलन करण्याचा प्रयत्न केला आहे.

काही निष्कर्ष —

## १ ) मध्ययुगीन-भट्टारककालीन जैन आचारधर्म-स्वरूप-

प्रस्तुत प्रकरणात १५ व्या शतकातील आणि त्यानंतरच्या मराठी जैन ग्रंथांच्या आधाराने आचारधर्माचे स्वरूप पाहिले आहे. हा काळ भट्टारकांच्या वर्चस्वाचा होता. धर्मगादी त्यांच्या ताब्यात होती. म्हणूनच व्रते-वैकल्ये याना फार महत्त्व आले होते असे दिसते. नित्य व्रतांची संख्या पूर्वीइतकीच राहिली; पण नैमित्तिक व्रतांची संख्या वाढलेली दिसते. रविवार, दशलाक्षणिक, सुगंधदशमी इत्यादी व्रते घेणे, उद्यापन करणे याकडे भट्टारकांनी समाजाचे लक्ष अधिक वळविले होते. नित्य व्रतांनाही दशदिग्व्रत फार भर पडली. विशेषतः अहिंसाव्रतात–त्याच्यातिच्यारच्या वस्तूं-वर फारच बंधने आलेली दिसतात. सर्वसामान्य माणसाला किंवा त्याची आर्थिक

परिस्थिती विशेष चांगली नाही अशांना ही व्रते पाळणे जड जाईल असे त्यांचे स्वरूप बनले होते. भट्टारक युगातील जैन आचाराचे हे वैशिष्ट्य समजावे लागेल.

## २ ) दान व पूजा यांवर अधिक भर–

श्रावकधर्म हा दानपूजाप्रमुखच असतो. पण पाच अणुव्रतांपेक्षा बहुतेक ग्रंथांत दान व पूजेचे अधिक वर्णन केलेले दिसते. दान करतानाही पात्रापात्रभेद फार कसोशीने पाळण्यात येई व ही पात्रताही जास्तीत जास्त बाह्य व्रताचारावरूनच मोजली जाई. दयादानापेक्षा पात्रदानातच अधिक पुण्य सांगितले गेल्याने मानवी जीवनातील दुसऱ्याची दारिद्र्यादी दुःखे दूर करण्याकडे कमी लक्ष गेले. शूद्रांना फारच हीन लेखले जाई. त्यांचा स्पर्शही विटाळ मानला जाई.

## ३ ) कृषिकर्म व व्यापारावरील परिणाम –

जीवदयेसाठी उद्योगधंदेही नकोत असा उपदेश सुरू झाला. एका बाजूला क्षत्रिय राजाचे चरित्र लिहिता लिहिता आचारग्रंथात मात्र शस्त्रविद्येचा अभ्यासही करू नये असे या काळात सांगितले जाऊ लागले. असि, मषि, कृषि, सेवा व वाणिज्य यातून फक्त जैन समाजास वाणिज्यच अहिंसक[२५] उद्योग वाटू लागला असावा. वाणिज्यातही अनेक वस्तुसंबंधाने बंधने आली होती. साबण, तीळ, तेल, हळद, चिंच, मेण, लोखंड इत्यादी वस्तूंचा व्यापार करू नये असे नियम आचारात सांगितले जाऊ लागले. शेतीचा धंदा हा भारतवर्षातील महत्त्वाचा व्यवसाय असूनही त्यात हिंसा होते म्हणून ' तले, मले, अड, विहिरी, वाडी, कुळवाडी न करावी ' असे सांगण्यात येऊ लागले. ( ध. प. ७६ ).

## ४ ) रात्रिभोजनत्याग व जलगाळन यांचे अतिशय महत्त्व–

बहुतेक ग्रंथात या दोन आचारासंबंधी काही ना काही विवेचन आढळतेच. निदान या दोन क्रिया तरी जैनत्वास आवश्यक आहेत असे मानण्याइतके याचे महत्त्व समाजात वाढले होते. प्रभु रामचंद्र व सीता यांच्याही काळी जलगाळण, चर्ममोटेचे पाणी न

---

२५. " कामशास्त्र, युद्धशास्त्र, कुविद्याशास्त्रादि सीखावेना । "

प. २५ – रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका.

" खाडा, कटारि, धनुष, तीरडाग, फरसी, कुद्दालि, पावडे, सांकल, दोरु, पाखाल, पोहरा, लोहखड...इत्यादि अनर्थ व्यापार. "

—रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका–प. २३.

कव्हणासि घर पधारा कराव्याचा उपदेसु नेदावा । कव्हणासि गारि माति भिंति कराव्याचा उपदेसु नेदावा । कव्हणाचा उद्यमाचा उपदेसु नेदावा । " (ध. प.८३).

गिणे ही मते होती, असे[26] सांगितलें आहे.

## ५ ) यति-आचारकथन कमी व श्रावकाचारावर भर-

मराठीतील आचारधर्मविषयक ग्रंथाचा अभ्यास केल्यानंतर आणि कथा किंवा पुराण ग्रंथांचेही निरीक्षण केले तर एक गोष्ट दिसून येते, ती ही की, मुनि आचाराचे प्रतिपादन या काळात कमी झाले आहे. जे थोडे झाले आहे ( धर्मामृत ) त्यात शास्त्रोक्त जे होते त्यापलीकडे त्यात तपशिलात भर पडली नाही. परंतु श्रावकाचारात मात्र विशेष भर टाकण्यात आली. रत्नकरण्ड श्रावकाचार व धर्मामृत हे दोनच मराठीतील प्रमुख आचारविषयक ग्रंथ. रत्नकरण्ड हा तर श्रावकाचारात्मकच ग्रंथ. म्हणून तेथे मुनि आचार नाही. धर्मामृतातही जो मुनि-आचार आला आहे तो पंचणमोकार मंत्रातील ' आचार्य ' व ' साधु ' या पदाचे विश्लेषण करीत असता, म्हणजे मुनी आचाराचे प्रतिपादन हा मुख्य हेतु नाही. सुदर्शनचरित्र ( वीरदास ) यात मुनि आचाराचे वर्णन आले ते सुदर्शन मुनींचे जीवन सांगण्यासाठी. यशोधर रास ( मेघराज ) मध्ये सविस्तर श्रावकाचार सांगून आला ग्रंथ विस्तार फार होईल म्हणून मुनिआचार सांगितला नाही. जनार्दनकृत श्रेणिक चरित्रात श्रावकाचाराचेच विशेष वर्णन आहे ( अध्याय ३४ ). पण मुनि आचारविषयक कथन नाही. म्हणजे एक गोष्ट स्पष्ट आहे की या काळात मराठीत मुनि-आचार सांगणारा एकही स्वतंत्र वा भाषांतरित ग्रंथ झालेला नाही. त्याची कारणे पुढील असण्याची शक्यता आहे :

१ ) बहुतेक ग्रंथकार ब्रह्मचारी अथवा पंडित-गृहस्थ होते. काही ग्रंथकार हे नंतरच्या जीवनात मुनी झाले आहेत ( उदा. गुणकीर्ति, वीरदास ). पण ग्रंथलेखन जास्त प्रमाणात या काळात तरी गृहस्थाच्या हातून झाले. समजात साधूंची संख्याही कमीच असावी. याच काळातील संस्कृत ग्रंथकार पंडित आशाधर- " समाजाने यती निर्माण करण्याचा प्रयत्न करावा " किंवा " अरेरे, धर्मोपदेशक साधु काजव्याप्रमाणे क्वचित दिसून येतात " असे उद्गार काढतात.[27]

२ ) मध्ययुगात मुसलमानी अत्याचाराचे परिणाम सर्वच भारतीय समाजाला भोगावे लागले. महाराष्ट्रातील जैन समाज त्याला अपवाद राहिला नाही. अशा अस्मानी सुल्तानी अवस्थेत यतिधर्माचे पालन करणे फार जड जात असले पाहिजे.

---

२६. प. पु. २४. १५

२७. जिनधर्मं जगद्बन्धुमनुबद्धुमपत्यवत् । यतीन् जनयितुं यस्येत्तथोत्कर्षयितुं गुणैः ॥
— सागारधर्मामृत २. ७१

खद्योतवत् सुदेष्टारो हा द्योतन्ते क्वचित् क्वचित् ।
— सागारधर्मामृत १.७

दिगंबरावस्थेत परिभ्रमण करणे हे अस्थिर राजकीय-सामाजिक वातावरणात कठीण झाले असले पाहिजे. म्हणूनच यतिधर्माचा उपदेश तितका झाला नसावा.

३) अशा त्या वातावरणात श्रावकधर्मांचेच पालन अशक्य झाले असल्यास नवल नाही. गृहस्थधर्म टिकला तर मुनिधर्म! प्रथमतः समाजात श्रावकात धर्म टिकून राहिला पाहिजे. म्हणून जैनत्वाची काही बाह्यचिन्हे का होईना ती निश्चित करून सर्व लोकांनी ती पाळावीत. असा दंडक तत्कालीन धर्माचार्यांनी घातला असावा. विशेषतः जैन समाज हा लोकांत भिन्न दिसत नाही. पण शाकाहार हे त्या समाजाचे पहिले वैशिष्ट्य संपूर्ण आचारधर्मावरून दिसून येईल. रात्रिभोजनत्याग-- 'त्याळू' 'ठ्हास' असे शब्द गुजरात व कर्नाटकात जैन समाजात रात्रिभोजनत्यागाबद्दल वापरले जातात-हे त्या समाजातील आचाराचे दुसरे खास वैशिष्ट्य समजावे लागेल. शिवाय आरोग्याच्या नावाखाली नव्हे तर धर्मातील एक प्रमुख क्रिया म्हणून पाणी गाळून पिणे हे या आचारातील तिसरे बाह्य वैशिष्ट्य आहे. इतर समाजातून जैनसमाज ओळखून काढण्यासाठी मध्ययुगात तरी ह्या क्रिया आवश्यक ठरवून भट्टारकांनी समाजातील 'जैनत्व' टिकविले. या अत्यंत प्राथमिक गोष्टी आहेत आणि त्यांचा उपदेश वारंवार व्हावा म्हणून या क्रिया आणि इतर श्रावकाचार सांगणारे ग्रंथ या काळात निर्माण झाले.

## ६) जैन आचारधर्म —नीतिमत्ता व सदाचार शिकविणारा —

गृहस्थधर्म किंवा मुनि धर्म यांच्या आचाराचा अभ्यास केला तर त्यात नीतिमत्ता कमी होईल किंवा सामाजिक सदाचार बिघडेल अशी एकही गोष्ट दाखविता येणार नाही. सामाजिक नीतिमत्ता उंचावणाऱ्या पुढील गोष्टी या विचारात दिसतील. केवळ सामाजिक नियम म्हणून नव्हे तर त्या गोष्टी धर्माचार म्हणून पाळाव्या लागल्याने खासच त्याचा चांगला परिणाम झाला असला पाहिजे. धर्माच्या नावाखाली किळसवाणी कोणतीही क्रिया सांगितली नाही.

१. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि परिग्रहप्रमाण ही पाच अणुव्रते त्या दृष्टीने मौलिक मानावी लागतील.

२. जीवदया पाळता पाळता, "माणुस जेविता चुकेले न उठवावे। कवणाचें पोट न जाळावें" हा पोटतिडकीचा उपदेश फक्त धार्मिकच वाटत नाही. यातील सामाजिकता फार तीव्र वाटते. (ध. प. ७६).

३. मद्य व मास याचा त्याग मूलगुणातच आवश्यक मानला आहे. सप्तव्यसनांची नुसती नावे पाहिली तरी त्यांच्या त्यागाचा खरा उद्देश व्यक्तीची व समाजाची नीतिमत्ता सुधारावी हाच दिसेल. — जुगार, मांसभक्षण, मद्यपान, वेश्यागमन, पारधिकर्म, चोरी, परस्त्रीसेवन (ध. प. ७३) यांचा त्याग करणाराच श्रावक होण्यास योग्य होतो.

७ ) अज्ञानजन्य क्रियाकांडावर व समाजघातक रूढींवर आघात —

केवळ इतरधर्मीय पाळतात म्हणूनच त्या गोष्टी जैनाचारात वर्ज्य मानल्या नाहीत. पण अज्ञानजन्य क्रिया मात्र त्यांनी टाळल्या आहेत. श्राद्ध करणे, होळी, मायराणीची पूजा, जाग, भोग, ( ध. प. ११० - ११२ ). वडपिंपळ पूजा, गाईपूजन, भूमिपूजन, नागपूजा, ग्रहणस्नान, नवस करणे याचा त्याग सांगितला आहे. धर्म म्हणून नदी–समुद्रस्नान वर्ज्य करावे. तसेच चमत्कार करून लोकांना फसविणाऱ्या गुरूंच्या नादी लागू नये. ( रत्नकरण्ड श्रावकाचार मराठी टीका प. ९ व १० ). हा सर्वच उपदेश समाजाला विवेकी बनविणारा आहे.

८ ) निवृत्तिमूलक आचारधर्म —

गृहस्थाचा असो वा यतींचा असो, जैन आचारधर्म हा निवृत्तिमूलक आहे. संसारातून सुटका करून घेणे हाच त्या आचारधर्मांचा उद्देश आहे. अहिंसादी बार व्रते, मूलगुण, सप्तव्यसनत्याग, दशधर्म, बारा अनुप्रेक्षा इत्यादी कोणतीही स्थळे पाहिली तरी संसाराविषयी अप्रीती निर्माण व्हावी व मायशाने सर्वसंगपरित्याग करून मोक्षाकडे वळावे हाच या आचारधर्मांचा उद्देश दिसतो.

९ ) अहिंसामूलक आचारधर्म —

सर्व आचारधर्मांचा पाया अहिंसाच दिसून येईल. मद्याचा त्याग ते केवळ मादक आहे म्हणून नव्हे तर त्यात जीवहिंसा होते म्हणून. जलगाळण, रात्रिभोजनत्याग, हरितपदार्थ न खाणे, (सचित्तत्याग प्रतिमा) या श्रावकाच्या क्रिया आणि समिती आदी मुनि-क्रिया यांचे मूळ उगमस्थान अहिंसामूलक दया आहे. बारा व्रतात पहिले स्थान अहिंसेला आहे. तीन मकाराच्या (मद्य, मांस, मध) त्यागाचे कारण अहिंसा आहे, शिवाय हिंसा ही शारीरिकच असते असे नाही; मनवचनाचीही असते असे सांगून सर्व प्रकारे हिंसात्याग हा आचारातून करविला आहे. म्हणून अहिंसा, सत्य, अचौर्य, अपरिग्रह आणि ब्रह्मचर्य यांच्या सर्वांच्या मुळाशी सुद्धा अहिंसाच आहे अथवा हिंसेचा त्याग आहे असे दिसून येईल.[२८]

---

२८ "Thus it is evident that as *himsa* is included in falsehood, theft, sexual impurity, and possession of goods, all the main five vows of Jains are based on the principles of *Ahimsa.*"

Jain Community, A Social Survey, Page 32.

## १०) साधुसंस्था व श्रावकसंस्था यांना एकत्रित जोडणारा आचारधर्म :–

असे मानले जाते की 'श्रावकाचारातून जर साधु–आचार परिणत झाले असतील तर त्या समाजात शिथिलता येत नाही. जैनाचाराचा अभ्यास केल्यानंतर दोन गोष्टी दृष्टोत्पत्तीस येतात.

### क्रमवृद्धी —

श्रावकाचार असो नाही तर मुनि–आचार असो त्यात विकासाचा क्रम आहे. श्रावकाच्या अकरा पायऱ्या अथवा साधू, उपाध्याय व आचार्य अशा क्रम या गोष्टी विकास–क्रम दाखविणाऱ्या आहेत.[२९] पुढील आचारधर्म हा मागील आचाराना पाळूनच अमलात आणावयाचा असतो. त्यामुळे आचारात एकसंधता व पूर्णता दिसून येते.

### श्रावकाचारातून यति-आचार :—

११ प्रतिमा पाळून पूर्ण श्रावक झाल्यानंतरच मुनिधर्म सांगितला आहे. श्रावकाची ५ अणुव्रते व मुनींची ५ महाव्रते यांचे स्वरूप पाहिले तर प्रकार तोच पण परिणामात फरक दिसेल. म्हणजे साधू व श्रावक यांना वेगवेगळ्या तत्त्वावर अधिष्ठित असे आचरण सांगितले नसून एकाच तत्त्वावर आधारित असे आचरण सांगितले आहे. अशा प्रकारे या उभय आचारधर्मांच्या संगमस्थानी श्रावक व मुनी एकत्रित आलेले दिसतात. श्रावक व मुनी हे एकमेकाविरुद्ध आचरण करताना दिसत नाहीत. यामुळे जैनधर्म हा चिकाटीने जगू[३०] शकला आहे. ते नसल्याने बुद्धधर्म भारतातून दूर झाला.

o o o

---

२९ सगुणाः पूर्व गुणैःसह संतिष्ठन्ते क्रमविवृद्धाः । ७.२

— रत्नकरण्ड श्रावकाचार

३० " It cannot be doubted that this close union between the laymen and monks brought about by the similarity of their religious duties, differing not in kind but in degree, has enabled Jainism to avoid fundamental changes within, and to resist dangers from without for more than two thousand years, while Buddhism being less exacting as regards the laymen, underwent the most extra-ordinary evolutions and finally disappeared in the country of its origin. "

" Jain Community – A Social Survey " Page, 234.

# प्रकरण ५ वे

# प्राचीन मराठी जैन साहित्यातील ऐतिहासिक व भौगोलिक माहिती

इ. सनाच्या १५ व्या शतकाच्या उत्तरार्धात विदर्भात प्राचीन मराठी वाङ्मयाचा विकास होऊ लागला आणि उत्तरोत्तर त्या वाङ्मयाच्या अभिवृद्धीबरोबर त्याचे क्षेत्रही विस्तृत झाले. वाङ्मयाचा विकास हा काही अंशी तरी काल व क्षेत्र यांच्याशी निगडित असतो. त्यांचा परिणाम वाङ्मयावर फार मोठ्या प्रमाणात झाल्याशिवाय राहत नाही. म्हणूनच बहुतेक प्रतिभावान कवी आणि लेखकांच्या वाङ्मयात त्यांच्या काळातील राजकीय व सामाजिक जीवन प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षरणे प्रतिबिंबित होते. पौराणिक स्वरूपाच्या कथेतही कालविपर्यासाचे दोष पत्करून स्वकालीन घटनांचे दिग्दर्शन मुक्तेश्वरासारखे कवी करीत असताना दिसतात. महानुभावाचे बहुतेक वाङ्मय स्वकालीन व्यक्ती व स्थळे याचा प्रामाणिक परिचय घडविणारे आहे.

प्राचीन मराठी जैन ग्रंथात पूर्णतः ऐतिहासिक वा सामाजिक स्वरूपाचा एकही ग्रंथ दिसला नाही. सर्वच वाङ्मय धार्मिक स्वरूपाचे आहे. शिवाय कथाग्रंथांची परंपराही स्वतंत्र नाही, ती पूर्वपरंपरेवर आधारित आहे. रामायण, महाभारत, भागवतादी ग्रंथांतून भागवत किंवा महानुभाव साम्प्रदायिक ग्रंथकार ज्याप्रमाणे कथेची निवड करीत असत त्याप्रमाणे जैन ग्रंथकारानी स्वतःच्या परंपरेतील संस्कृत, प्राकृत, गुजराती अथवा कन्नड ग्रंथांतून कथांची निवड केली आहे. पद्मपुराण, हरिवंशपुराण, महापुराण व इतर अनेक संस्कृत–प्राकृत ग्रंथ हे जैन ग्रंथकाराचे मूलाधार आहेत. अशा परंपरानिष्ठ वाङ्मयात लेखकाच्या स्वकालीन ऐतिहासिक व सामाजिक जीवनाचे अधिक प्रमाणात उल्लेख येणे हे फारसे अपेक्षित नसते. तरीही बहुतेक जैन ग्रंथकार हे समाजोन्मुख राहिले आहेत. स्वकालीन जनतेच्या मनावर धर्माचा परिणाम करण्यासाठी त्यानी ग्रंथाची निर्मिती केल्यामुळे त्याच्या वाङ्मयातील पात्रे, नावे व मुख्य घटना या बाबतीत पौराणिक असली तरी त्याचे खरे स्वरूप सामाजिक राहिले आहे. पोशाख, खानपान, मेळ, घरेदारे, उद्योगधंदे, सण–उत्सव इत्यादि प्रकारचे विविध सामाजिक जीवन हे अशा ग्रंथात पौराणिक न राहता स्वकालीनच बनते. बहुतेक जैन ग्रंथांच्या बाबतीत तसेच झाले आहे.

ऐतिहासिक घटना मात्र या वाङ्मयात कमी प्रमाणात उल्लेखिल्या गेल्या आहेत. एकंदरीत पाहिले तर या काळातील जैन लेखकाचे लक्ष इतिहासाकडे म्हणजेच इतिहास घडविणाऱ्या राजकारणाकडे कमीच आहे. असे असले तरी स्वतःच्या समाजाचा इतिहास दाखविणाऱ्या बऱ्याच गोष्टींचा उल्लेख त्यांनी केला आहे. बरेच प्राचीन ग्रंथ, ग्रंथकार, क्षेत्र, गुरुपरंपरा इत्यादींची माहिती या ग्रंथांत आली आहे. कित्येक ग्रंथांच्या हस्तलिखित प्रतीत प्रतिकर्ताही शेवटी काही माहिती लिहून ठेवतो. तीतही हा सामाजिक इतिहास कांहीसा सापडतो. प्रासंगिक अशा रचनेत मात्र काही घटनांचा इतिहास मिळतो. पोवाडे, स्तुती, आरत्या अशा पुष्कळ रचनेत स्थळे, व्यक्ती, मंदिरे, तेथील मूर्ती यांचा उल्लेख असतो, त्यामुळे समाजाच्या धार्मिक इतिहासातील कच्चे दुवे जुळतात.

**ऐतिहासिक माहिती :– ( जैन धर्मविषयक )** – या बाबतीत राजकीय इतिहासापेक्षा समाजाचा धार्मिक इतिहासच अधिक प्रमाणात पाहावयास मिळतो. जैन समाजाचा धार्मिक इतिहास अद्यापि सलग असा लिहिला गेला नाही. महाराष्ट्रातील जैन समाजाचा इतिहास हा मराठी ग्रंथांच्या व महाराष्ट्रातील मंदिरातील शिलालेख, यंत्रलेख, मूर्तिलेख, यांच्या अभ्यासातून मिळणार आहे. प्राचीन मराठी जैन ग्रंथांतही मुख्यतः ग्रंथाच्या प्रारंभी अथवा अंत्यभागी गुरुपरंपरा देण्याची पद्धती आहे. मध्ययुगात भट्टारक हे धर्मगुरू असत. त्यांच्याकडे जैन समाजाची धार्मिक सत्ता असे. अशा काही भट्टारकांची माहिती ग्रंथात आली आहे.

**प्राचीन परंपरा :–** म. महावीरांच्या काळी अथवा त्यानंतरही ६८३ वर्षे पर्यंत जैन परंपरेत लिखित साहित्याची प्रथा नव्हती. ज्ञान हे मुखोद्गत ठेवण्याचा तो काळ होता. महावीरानंतर ६८३ वर्षांत केवली, श्रुतकेवली, दशपूर्वधारी, अकराअंगधारी व एक अंगधारी अशा क्रमाने ज्ञान हे कमी होत आले. शेवटी तेही नष्ट होईल म्हणून धरसेन नावाच्या आचार्यांनी ते ग्रंथनिबद्ध केले असा इतिहास उपलब्ध[1] आहे. मराठीत तो इतिहास उपदेशरत्नमालेत जिनसेन आचार्यांनी थोडक्यात पण व्यवस्थित दिला आहे. ( उपदेशरत्नमाला, जिनसेन, १.२७ ते ३५ ). गौतम, सुधर्म, जंबू असे तीन केवली महावीरानंतर झाले. नतर नंदिमित्र, अपराजित, गोवर्धन, भद्रबाहू, प्रोष्ठिल, धृतिसेन, विजय, ललितांग हे श्रुतकेवली झाले.

दशपूर्वधारी मुनीनंतर नक्षत्र, जयपाल, पाण्डु, ध्रुवसेन, कुंभ, सुभद्र, यशोबाहू, लोहभानू असे एकांगधर झाले. अर्हद्बली, भूतबली, पुष्पदंत, व शेवटी धरसेन अशी ही आचार्यपरंपरा आहे. जैन समाजाच्या दृष्टीने ही परंपरा फार महत्त्वाची आहे. कारण महावीरानंतर त्या समाजात दिगंबर व श्वेतांबर हे भेद जवळ जवळ ६८० वर्षांनंतर पडले आहेत. तोपर्यंतचा दोघांचा इतिहास हा एकच आहे.

---

१. षट्खंडागमाची प्रस्तावना – डॉ. हिरालाल जैन. खंड १, पृ. २१.

**मध्ययुगीन भट्टारक :–** प्राचीन काळी साहित्यनिर्मिती, संघसंचालन व समाजाचे धार्मिक नियंत्रण आचार्य करीत असत. त्यांचे संघ असत. या संघपरंपरेचे रूपांतर पुढे शंकराचार्यांच्या मठाच्या अनुकरणातून भट्टारकपीठांत झाले. नंतर असा एक काळ आला की त्या भट्टारकाच्या गाद्या (पीठे) निर्माण झाल्या. भट्टारकांना, 'सिंहासनपति' किंवा 'तख्तपीठ' असेही म्हणण्यात येऊ लागले. इतकेच नव्हे तर त्या गादीच्या हक्कासाठी भांडणेही निर्माण होऊ लागली. सरकारदरबारही[2] झाले. पंडित भीमचंद्राने गुरुच्या आरतीत 'डोळी तक्त मळियाटि सींहासन दंग होंडुचे सोहे' असे म्हटले आहे. तसेच महतीसागराने आपल्या एका लावणीत "मळयखेड सिंहासनपति" असे म्हटले आहे. हे वर्णन कारंजाच्या भट्टारकाचे आहे. म्हणजे हे धर्मगुरू केवळ धर्मगुरू राहिले नव्हते तर समाजाचे शासक बनले होते.

मध्ययुगात म्हणजे १३ व्या शतकानंतर या भट्टारक पीठांचे प्रस्थ फार वाढले. ते १९ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत टिकले. ग्रंथलेखन, पूजाप्रतिष्ठा, इतकेच नव्हे तर सामाजिक रीतिरिवाजावर त्यांचे शासन चाले. जैन मराठी साहित्य हे त्याच काळात विशेषेकरून निर्माण झाले. या काळातील भट्टारकांनी व तदाश्रित ब्रह्मचारी व पंडितांनी काळाची गरज ओळखून संस्कृत अथवा अपभ्रंशात ग्रंथरचना करण्याचे सोडून दिले. आणि जनहितास्तव मराठीत ग्रंथलेखन ते करू लागले. म्हणून भट्टारक-युगाचा प्रभाव मराठी जैन साहित्यावर सर्वात अधिक पडला आहे. पूजाप्रतिष्ठा, होम-हवन, यंत्रमंत्र यांना अतोनात महत्त्व आले, हे व्रतकथांच्या संख्येवरून सहज लक्षात येते. 'भट्टारक संप्रदाय' या ग्रंथातही हाच निष्कर्ष काढण्यात[3] आला आहे.

**प्राचीन मराठी साहित्यातील भट्टारक संप्रदायाची परंपरा:–**मराठी वाङ्मयाशी ज्या भट्टारक संप्रदायाचा संबंध आला त्यात 'सेनगण' व 'बलात्कारगण'

---

२. प्रस्तुत प्रबंधाच्या तयारीसाठी कारंजा येथे गेलो असता तेथील बलात्कार गण मंदिरात जुने कागदपत्र पाहिले. त्यात हैद्राबादेस राजा चंदुलालकडे शिष्य मंडळीच्या हद्दीबाबत तक्रार करण्यात आली असता दरबारतर्फे हिजरी सन १२३८ मध्ये मिळालेला निकाल पाहण्यास मिळाला. त्यातील काही महत्त्वाचा भाग असा आहे : "बनाम दिवाण आता असलेले व पुढे होणारे देशमुख, देशपांडे, मुकदम, गुमास्ते, जागीरदार परगणे, हवेली, एलिचपूर, कारंजा, नांदगांव, पेठ, शिवळगाव, राजानाकगाव, कार्जी सुभा वऱ्हाड व पैनगंगा वगैरे ठिकाणचे लोकास कळावे की श्री देवेंद्रकीर्ति-स्वामी, जनी कारंजाचे गादीवर स्थापन झाले आहेत. त्यांच्या मानाप्रमाणे त्यांची सेवा व ताबेदारी चांगली मनापासून करावी. आंतर पाईन्त त्यास त्याच वेळी आमचे समोर बोलावून फर्जत करण्यात येईल."

३. भट्टारक संप्रदाय, जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, प्रस्तावना, पृ. १०.

हेच महत्त्वाचे आहेत.

**सेनगण**:–ही परंपरा प्राचीन असली तरी उत्तर भारतात याची पीठे नाहीत. महाराष्ट्रात कोल्हापूर व कारंजा ( विदर्भ ) या दोनच ठिकाणी ह्यांची पीठे दिसतात. नागपूरलाही सेनगण मंदिर आहे. पण पीठ नाही. सेनगण परंपरेत मराठीत ग्रंथरचना करणारे कवी व लेखक फार कमी. कारण त्याचे मुख्य कार्यक्षेत्र कर्नाटकात होते. संस्कृत व कन्नड वाङ्मयात मात्र या परंपरेने मोलाची भर घातली आहे. कोल्हापूर हे जरी भाषिकदृष्ट्या महाराष्ट्रात असले तरी एक वेळ तेथे कन्नड भाषा प्रमुख होती. कोल्हापूरच्या आसपास काही जैन शिलालेख कन्नडमध्ये[४] मिळालेही आहेत. पेशवाईत व त्यानंतर त्या भागात मराठीचा संचार मोठा झाला. त्या भागातील जैनांच्या घरची कन्नड भाषा जाऊन ती मराठी होऊ लागली. मराठीत ग्रंथरचना आवश्यक वाटू लागल्याने अठराव्या शतकाच्या अगदी उत्तरार्धात इकडील भट्टारकांनी मराठी ग्रंथ लिहिले. कारंजा येथेही या परंपरेतील लेखक कमीच दिसतात. प्रस्तुत अभ्यासाच्या मर्यादेत पुढील भट्टारकांचे उल्लेख महत्त्वाचे मानावे लागतील. रत्नकीर्ती यांनी 'उप-देश–रत्नमालेत' सिद्धसेनाचा उल्लेख केला आहे. राघव नावाच्या कवीने 'सिद्धसेन स्तुतीत' त्याची स्तुती केली आहे. हे सिद्धसेन कारंजा पीठावर इ. स. १८१२ च्या सुमारास झाले. इ. स. १७०३ मध्ये लिहिलेल्या आदीश्वर भवांतरात कारंजा पीठा-वरील सोमसेन, जिनसेन, समंतभद्र यांचा उल्लेख छत्रसेन कवीने केला आहे. ( आ. म. ६४, ६५, ६६ ). कोल्हापूर येथील जिनसेन भट्टारकांनी जंबुस्वामीपुराण व उपदेश–रत्नमाला या दोन्ही ग्रंथांत ( इ. स. १८२९ ) स्वतःच्या गुरुपरंपरेचा इति-हास पुढीलप्रमाणे दिला आहे: "प्रथम जिनसेन झाले. त्यांच्या पदावर स्थूलभद्र. नंतर वीरसेन. वीरसेनानंतर समंतभद्रादि झाले. नंतर विद्यासागर भट्टारक[५] झाले. विद्यासागराने शिविकादंड बांधून दिल्लीस जाऊन वादी लोकांना दरबारात जिंकले. जयपत्र मिळविले." अशा एका प्रसंगाचा उल्लेख जिनसेनांनी केला आहे ( उप-देश रत्नमाला, प्रशस्ति, ओवी २० ). मराठी लेखकांत रत्नकीर्ती, राघव, जिनसेन, गिरिसुत, छत्रसेन, हे सेनगण परंपरेतील होते.

**बलात्कार गण** –ईडर ( गुजरात ), कारंजा, लातूर, देवगिरी व औरंगाबाद या पीठांचा व तेथील भट्टारकाचा उल्लेख मराठी ग्रंथात येतो. भट्टारकाच्या इतिहासाच्या दृष्टीने काही उल्लेख अत्यंत महत्त्वाचे आहेत :

---

४. जैन शिलालेख संग्रह, तृतीय भाग, शिलालेख नं. ३२०.

५. प्रस्तुत विद्यासागरापासूनच कोल्हापूर येथे भट्टारक मठात दोन भाग झाले आणि विद्यासागराने स्थापन केलेल्या मठाला जिनसेन मठ म्हणू लागले अशी स्थानिक अनुश्रुती आहे. हे विद्यासागर अकबराच्या दरबारात दिल्लीस गेले आणि त्यांनी वादात इतरांचा पराभव केला असे सांगतात.

**ब्रह्मजिनदास** :–हे सुप्रसिद्ध गुर्जर कवी, १५ व्या शतकातील ईडरचे भट्टारक सकलकीर्ती याचे शिष्य–बंधू होते. त्यांचा गुरू म्हणून श्रेणिकचरित्राचे कर्ते ब्रह्मगुणदास यांनी उल्लेख केला आहे. हेच ब्रह्मगुणदास नंतर गुणकीर्ती भट्टारक म्हणून ईडरच्या गादीवर आले असावेत. गुणकीर्तीने स्वतः धर्मामृतपुराण व पद्मपुराण असे दोन ग्रंथ नंतर लिहिले आहेत.

**ब्रह्मशांतिदास**[६] :–ही व्यक्ती जरी ईडरच्या गादीवर नव्हती तरी ते भुवनकीर्तीचे शिष्य असल्याने त्यांनाही बरेच मराठी लेखक मानीत असत. पंडित गंगाजन याने परमहंसकथेत, पंडित मेघराजाने जसोधर-रासमध्ये आणि पंडित कामराजाने सुदर्शन–चरित्रात या शांतिदासाचा[७] फार आदराने उल्लेख केला आहे. कारंजाच्या बलात्कार गणपीठापैकी इ. सनाच्या १६ व्या शतकातील धर्मभूषणाचा गुणनंदीने जसोधरपुराणात व दामा पंडिताने दानशील तपभावनेत गुरू म्हणून उल्लेख केला आहे.

माणिकनंदी, जिनसागर व भीमचंद यांनी देवेंद्रकीर्ती याचा गुरु म्हणून उल्लेख केला आहे. पैठणच्या चिमनापंडिताने अजितकीर्ती[८] यांचा उल्लेख केला आहे.

**लातूरपीठ**–लातूरच्या पीठावरील अजितकीर्ती, विशालकीर्ती, महीचंद्र, चंद्रकीर्ती याचा गुरू म्हणून त्याच्या त्यांच्या शिष्यांनी उल्लेख केला आहे. अजितकीर्तीचा उल्लेख शके १५३८ मध्ये लिहिलेल्या अनंतव्रतकथेत अभयकीर्ती यांनी केला आहे. पुण्यसागराने हरिवंशपुराणात याच पीठावरील दुसरे एक अजितकीर्ती यांचा उल्लेख केला आहे. मराठी वाङ्मयाच्या दृष्टीने या पीठावरील सर्वात महत्त्वाचे भट्टारक म्हणजे महीचंद्र होत. स्वतः महीचंद्राने आदिपुराण हा ग्रंथ लिहिला. महाकीर्तीने शीलव्रतकेत, ब्रह्मचिंतामणि याने पद्मपुराणात (अध्याय २८ ते ३५), लक्ष्मीचंद्राने गरुडपंचमीव्रतकथेत, रामकीर्तीने पद्मावती–आरतीत व देवेंद्रकीर्तीने कालिकापुराणात या महीचंद्राचा गुरू म्हणून उल्लेख केला आहे.

**देवगिरी पीठ** :–जिनदासकृत हरिवंश पुराणात देवगिरी येथील पीठस्थापनेचा उल्लेख आला आहे. ईडरच्या भुवनकीर्ती भट्टारकांनी देवगिरी येथे वेगळ्या पट्टाची निर्मिती केली व त्या पट्टावर उदतकीर्ती यांना आचार्य म्हणून बसविले. याच उदंतकीर्तीजवळ जिनदासाने अभ्यास केला. देवगिरी येथे पट्ट असल्याचा मराठी ग्रंथातील हाच उपलब्ध पुरावा दिसतो. ( अध्याय २–५१, ५८, ५९ इ. पु. ).

६. 'सन्मति' डिसेंबर १९५८.

७. याच प्रबंधात प्रकरण २ रे पहा.

८. या सर्व उल्लेखांची अवतरणे या प्रबंधाच्या प्रकरण २ मध्ये दिले आहेत.

**औरंगाबाद पीठ**[१] :– " सम्यक्त्वकौमुदी " व ' भविष्यदत्तबंधुदत्तकथा ', लिहिणारे दयाभूषण हे औरंगाबादच्या पीठावरील तिसरे भट्टारक होते. त्यांनी सम्यक्त्वकौमुदीत औरंगाबादपीठाच्या स्थापनेचा उल्लेख केला आहे. कारंजापीठावरील धर्मचंद्रभट्टारकांनी ( संवत १६५६–१६७० ) सुदर्शनचरित्रकर्ते वीरदास यांना दीक्षा देऊन त्यांचे नाव पासकीर्ति असे ठेविले व त्यांची स्थापना औरंगाबादला केली.

पासकीर्तीनंतर भानुकीर्ति व त्यानंतर दयाभूषण अशी ही औरंगाबादपीठाची परंपरा आहे. विजयकीर्ति हे दयाभूषणानंतर झाले. सम्यक्त्वकौमुदी ग्रंथातील औरंगाबाद पीठासंबंधीचा उल्लेख मराठी ग्रंथात तरी एकमेव आहे. त्यामुळे त्याचे महत्त्व फार आहे.

प्राचीन मराठी जैन ग्रंथात सेनगण व बलात्कारगणातील भट्टारकांसंबंधी जे उल्लेख आले आहेत, त्यांतील महत्त्वाच्या भागाची चर्चा वर केली आहे. त्या पीठांचा हा सुसंबद्ध इतिहास नव्हे. येथे फक्त कोणी व कोठे उल्लेख केला व त्याचे महत्त्व काय आहे एवढे दाखविणे हाच हेतू आहे.

## ऐतिहासिक व राजकीय स्थितिदर्शक उल्लेख

प्राचीन मराठी जैनवाङ्मयात राजकारण फार आलेले नाही. प्रत्यक्ष तत्कालीन राजे अथवा राजकीय घटना यांचा उल्लेख फारच कमी येतो. ज्याकाळी मराठीत जैन ग्रंथरचना होऊ लागली त्यावेळी व त्यानंतरही दक्षिणेत मुसलमान राज्यकर्त्यांचेच वर्चस्व होते. विदर्भ आणि मराठवाडा या प्रदेशांत या ग्रंथांची निर्मिती झाली. तेथे राज्य म्लेंच्छांचेच होते. त्या राज्यकर्त्यांशी या धर्मीयांचे जिव्हाळ्याचे संबंध असणे संभवतही नव्हते.

प्रत्यक्ष राजकारणाशी संबंध दाखविणारा एकच ग्रंथ दिसतो तो महीचंद्रशिष्य देवेंद्रकीर्तिविरचित ' कालिकापुराण ' होय. कायार, बोगार व तगरबोगार या व्यापारी समाजाची निर्मिती कशी झाली आणि त्यात राजकर्त्यांचा संबंध कसा येत असे याचे दर्शन या ग्रंथात घडते.

**राजा हेमवंत** :— कालिकापुराणात गंगातीरी आशापूरची स्थापना करणार अश्वसेन, आशापूरच्या उत्तरेस मनपूरची स्थापना करणारा हेमवंत व चारुक्षेत्र निर्माण करणारा ( चारठाणा ) चारुदत्त यांची कथा आली आहे. ( का. पु. अध्याय ४२, ओव्या ११ - २० ). भारतात मुसलमानांचे राज्य होईपर्यंत दिल्लीला पांडव कुलातीलच राजे राज्य करीत असत अशी एक सामान्य समजूत प्रजेत होती. ( का. पु. ४२, १४ ते २० ). सत्या ऐतिहासिक घटना सुद्धा कथा काल्पनिक रीतीने

---

१. याची सविस्तर चर्चा मी ऑगष्ट १९५९ च्या 'सन्मती'मध्ये केली आहे. ( दामारंडिन ).

लिहिण्यात येत असत व इतिहासाचे पुराण कसे बनत असे हे पाहावयाचे असेल तर या ग्रंथाचे ४२ व ४३वे अध्याय पाहावेत. अश्वसेन, मनवंत, हेमवंत आणि चारुदंत यांनी अनेक दिवस राज्य केले. नंतर मुनीने भविष्य सांगितले की यापुढे आता 'मंले वंशी' जन्माला येईल व तो राज्य करील. यानंतर मुसलमान राज्यकर्त्यांची उत्पत्ती झाली. ही हकीकत पुढीलप्रमाणे सांगितली आहे : पांडवानंतर म्लेंछ राजे झाले 'आबुंधुघनास' नावाचा राजा झाला, त्याला एक कन्या होती. मुसल नावाच्या ऋषीने इंद्राकडून वर मिळविला. दिल्लीचे राज्यपद मागितले. रणकंट नावाच्या ऋषीने आबुंधुघनास याच्या कन्येशी ती निद्रिस्त असता संभोग केला. तिला गर्भ राहिला. त्या गर्भात मुसलऋषीचा जीव जन्मास आला. तोच मुसलमान होय. त्याची आई 'हिंदवानी' होती तिला त्याने 'कलमा' पढविला. त्याने मंदिरे पाडली. प्रतिमा फोडल्या. तो प्रतिमा नरणाखाली तुडवू लागला. आबुंधुघनासाने त्याला शिक्षा करण्याचा प्रयत्न केला. तो तरुण झाला. प्रधानकुमारीचे त्याच्यावर प्रेम बसले. नंतर त्याचा राज्याभिषेक झाला. "हामरपातशा" असे त्याचे नाव दिले. (नाव ठेविले हामरपातशा । मुसलऋषीने हिंदुस्तान देशा । राज्य करो लागला पातशा । तो मंले वौशी ॥ (का. पु. ४३. २५). यात सत्य इतिहास अंशतःही नाही. पण पौराणिक स्वरूपाचे सत्य आहे हे लक्षात आल्याशिवाय राहात नाही. हामरपातशानंतर तोमरपातशा तख्तावर आला. तोमरपातशाचे व हेमवंत राजाचे एका मोरपिणीला आश्रय दिल्याचे निमित्त होऊन वाकडे आले. तोमरपातशातर्फे शिकंदरखान हेमवंतवर चालून आला. हेमवंत बेदरच्या आश्रयाला गेला. शिकंदरखानाने बेदर सर केले. (का. पु. ४४.७९). बादशहाने बेदरवर शिकंदरखानाची नेमणूक केली पण हेमवंताच्या पराक्रमावर शिकंदरखान खूष झाला. त्याने त्याचे राज्य त्याला परत दिले. 'सेवगाव' बक्षिस म्हणून दिले. हेमवंताने खरवंडी गावाची स्थापना केली. असा हा दंतकथात्मक इतिहास आहे. पण यात एवढी गोष्ट निश्चित दिसते की कोणी शिकंदर खानाने हेमवंत नावाच्या राजाला मांडलिकत्व दिले होते आणि मुसलमान हिंदुधर्मीयांना त्रास देत असत.

**बोगार व तगर बोगार यांची मांडणी** :–कारंजापुराणाच्या अध्याय ४६मध्ये तगरबोगाराची उत्पत्ती कशी झाली याचा इतिहास सांगितला आहे. 'वेरुळ' नगरात 'बिज्जेळ' राजा होता. बिज्जेळ राजाची दासीची मुले 'तगरनगर' या नावानी ओळखली जाऊ लागली. पण बोगारानी त्यांना नीट वागविले नाही, म्हणून ते शिवभक्त झाले. बोगार हे सोमवंशी असून जैन होते. निलंगा नगरात तगर गेले आणि तेथील 'देवंग' जंगमानी पंचाक्षरी मंत्र सांगून त्याना लिंग बांधले. 'नगर' हे नाव बदलून 'वाणी' म्हणून त्याना संबोधण्यात येऊ लागले. बोगार हे व्यापारासाठी वाहनाचे साधन म्हणून बैल वापरीत असत. परंतु बैल म्हणजे बसव–त्याचा उपयोग करू नये म्हणून वाणी लोक गाढव (खर) वापरू लागले. निलंगा येथे नगराबाहेर वाण्याची

एक स्वतंत्र पेठ बसविली. हिंग, जिरे, मिरे विकून वाणी पोट भरू लागले. एकदा देवेंद्रकीर्ती निलंग्यास गेले. वाणी लोकांशी त्यांचा काही वाद झाला, रस्त्यावरून त्यांना जाण्यास प्रतिबंध केला असता ते म्हणाले, "हा मार्ग रास्त आसे सर्वांचा जाण । हे जमीन पातशाची म्हणोन । रस्ता तुम्हा काये होये । " ( का. पु. ४६-४७ ). नंतर वाणी आणि सोमवंशी बेगार यांची मारामारी झाली. ती खबर म्लेंच्छ-मोगलाकडे गेली. ( का. पु. ४६. ८२ ). पण त्याना कळून आले की, मगरवाण्यां-चीच खरी चूक आहे. तेव्हा शिकंदरखान वाण्याना म्हणाला, "तुम्ही ह्या देवेंद्र-कीर्ती स्वामींची अवहेलना केली आहे" त्या सर्वांना त्याने कैदेत टाकले. शेवटी देवेंद्रकीर्तींनी त्यांना सोडविले. पण खानाने वाण्यांना दंड केला. "हे जंगम सर्व चाडाळ जाण । हे कानडे कपटी जंगम ॥ " ४६. १०५ ॥ असे त्याचे मत होते; तीन लक्षांचा दंड केला; गुंडगी लखाईने शिकंदरखानाची भेट घेतली व मंत्र साम-र्थ्याने चौंडेश्वराला वश करून घेतले. तिने अमाप पैसा दिला. ते पाहून बेदरी शिकं-दरखानास आश्चर्य वाटले. तिच्यावर खूप होऊन शिकंदरखानाने गुंडगी लखाईस पट लिहून दिला की, तिला दिवसा मशाल वापरता येईल.

नंतर सोमवंशी बेगारानी विचार केला की तगर-मगरवाणी नेहमीच त्रासदायक होतील. त्यापेक्षा त्याना नगराबाहेरच काढावे. त्याप्रमाणे त्यानी शिकंदरखानास सांगि-तले की त्यांना तरी बाहेर काढा नाहीतर आम्ही तरी बाहेर जाऊ. राजाला भीती वाटली की बेगार गेले तर नगरातील व्यापारच बंद होईल. त्यापेक्षा तगरांना काढावे. नतर तगरांनी एक वेगळी पेठ वसविली. तेच 'तगरखेड' होय ( का. पु. ४६.१३६ ).

शिकंदरखान, निलगा, देवेंद्रकीर्ती, गुंडगी लखाई, तगरखेड या सर्व गोष्टी ऐतिहासिक असाव्यात. बेगार व लिंगायत वाणी याची भांडणे दक्षिणेत झाली आहेत. मराठी जैन ग्रंथात अशा घटनाचे वर्णन क्वचितच आले आहे. हे वर्णन सत्य असले पाहिजे.

**विजापूरच्या इंद्रसेनाने बेगारांना सारामाफी दिली** :—या 'कालिका-पुराणात' विजापूर दरबारातील एक महत्त्वाची घटना सागण्यात आली आहे. ( अध्याय ४८ ). विजापुरात इंद्रसेन राजा होता. त्याची तोरणमाला राणी होती. मथुरादास प्रधान होता. राज्यात 'छेतीस' ( ३६ ) कारखाने होते. एक दिवस एक चहाडखोर आला. त्याने राजास सागितले की, लोकांवर सैन्याच्या खर्चासाठी सारा बसवा. पण बेगारांना व पंचाळांना बादशहाने सारा कधीच न घेण्याचे वचन दिले होते, म्हणून बेगार—महाजन दरबारात आले व म्हणाले की, "आम्ही सोमवंशी राजे, आमच्यावर सारा बसवू नये. आम्ही छत्तीस कारखाने चालविणारे कारागीर म्हणजे खरे राजे. आम्ही तुमचे आधारस्तंभ." राजाला हे ऐकून समाधान वाटले.

त्याने त्यांना पूर्णपणे सारामाफी दिली. ही घटना ऐतिहासिक स्वरूपाची वाटते. पण ती केव्हा घडली हे समजणे कठीण.

**शहाण्णव कुळांचा उल्लेख :—** कालिकापुराणात ९६ कुळांचा उल्लेख आला आहे. त्यांची निर्मिती सांगणारी पौराणिक कथाही त्यात दिली आहे. सोमवंशी साठ गोत्रे व सूर्यवंशी ३६ गोत्रे मिळून ९६ गोत्रे होतात असे म्हटले आहे. (का. पु. ७.६४ ते ६८). साठ गोत्राची नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत.

१) आनंदुल. २) सिलवंत (शीलवंत). ३) मंगल. ४) वैराट ५) वानर. ६) तंवर. ७) कुंभकर्ण. ८) कटार. ९) ढोल. १०) दशमुख. ११) वैभुन. १२) झडर. १३) शतपुत्र. १४) ढोक. १५) पांडर. १६) नक्र. १७) देखन. १८) वेव्हार. १९) अंडिक. २०) कल्क. २१) भुजबळ. २२) मिषक. २३) माधिक. २४) ढाक्र. २५) चिकट. २६) कानड. २७) शकट. २८) लाखोल. २९) खुटाफल ३०) दहिमत्त. ३१) कुलदीपक. ३२) खैरावन. ३३) कंटक. ३४) पानसट. ३५) पोहोने. ३६) जैधव. ३७) बदंगे. ३८) हमाळ. ३९) तंटक. ४०) सिनगार. ४१) सागोळ. ४२) गडगड. ४३) गाडोल. ४४) ढोल्ल. ४५) तुवर. ४६) लहुलंट. ४७) मोसल ४८) गंभीरराव. ४९) अहेरराव. ५०) तेगि. ५१) कमटान. ५२) अटेल. ५३) स्वंमर. ५४) भुज्जंगराव. ५५) चोयर. ५६) धुमाळ. ५७) वौलन. ५८) रविराव. ५९) रणवीर. ६०) चव्हान.

(का. पु. ७. १०१–१२९) ही नावे बरीचशी अशुद्ध आहेत.[१०]

गुणकीर्तीने पद्मपुराणात सीतेच्या स्वयंवरास ९६ कुळीचे भूपती आले होते असा उल्लेख दोनदा केला आहे. (प. पु.१७.४२५ – १७.४७२).

***नागपूरचे भोसले*** **:—** *रघूने ' सेटिमहात्म्य ' या पोवाड्यात सन १७८७* च्या सुमाराच्या नागपूरच्या भोसले घराण्यातील बापूसाहेब, नानासाहेब, बाबासाहेब, आप्पासाहेब या व्यक्तींचा उल्लेख केला आहे.[११]

**आचार्य भद्रबाहु, सम्राट चंद्रगुप्त व श्वेतांबर दिगंबर पंथांची निर्मिती–** मराठी जैन ग्रंथात यासंबंधी प्रारंभीच्या ग्रंथात तरी काही विशेष माहिती मिळत नाही. पण जिनसेनकृत ' पुण्यास्त्रव पुराण ' या ग्रंथातील भद्रबाहू आख्यानात (अध्याय ५२, ५३ व ५४) काहीशा पौराणिक थाटात हा इतिहास आला आहे. अर्थात हा इतिहास त्यांनी त्या कन्नड ग्रंथाधारे या ग्रंथाची निर्मिती केली, त्यावरच

---

१०. महाराष्ट्रीय ज्ञानकोशात ' क्षत्रियोत्पत्ति दर्पणा 'च्या आधारे मराठ्यांच्या ९६ कुळींची नावे दिली आहेत. ती नावे प्रस्तुत यादीतील नावाहून बरीचशी वेगळी आहेत. ( महाराष्ट्रीय ज्ञानकोश. म. ५८ ).

११. युगवाणी, ऑगस्ट १९५८.

अवलंबून असणार ही गोष्ट निर्विवाद होय. तरी कन्नडमधील एतद्विषयक इतिहासाचा प्रवाह मराठीत आणल्याचे श्रेय या ग्रंथकाराला द्यावे लागेल. थोडक्यात या ग्रंथात आलेला इतिहास पुढीलप्रमाणे आहे. – पुरोहित पुत्र भद्रबाहु जन्मतःच शुभलक्षणी होते. गोवर्धन आचार्यांनी एकदा मुलांत खेळणाऱ्या भद्रबाहूला पाहिले. आणि ते श्रुतकेवली होतील हे ओळखले. त्यांना त्यांच्या मातापित्यांच्या अनुज्ञेने आपल्याजवळ आणून विद्याध्ययन करविले आणि आचार्यपद दिले. पाटलीपुत्रात त्यावेळी नंदराजा होता. त्याच्या चार प्रधानांपैकी 'कठाळ' नावाच्या मंत्र्याचा चुकून राजाकडून अपमान झाला. कठाळाला एके दिवशी पायाला टोचलेल्या दर्भाचे मूळ खणत असलेला चाणक्य ब्राह्मण दिसला. त्याने स्वतःच्या मनातील शल्य चाणक्याला सांगितले आणि नंदाचा वंशच्छेद करण्याचा बेत झाला. कठाळाने मुद्दाम चाणक्याला राजाच्या भोजनपंक्तीला बोलावून राजाच्या आज्ञेनुसार आपण त्याचा अपमान करीत आहोत असे दाखवून त्याला वंशच्छेदाची प्रतिज्ञा करण्यास भाग पाडले. त्याने तेथेच पंक्तीत वंशच्छेदाची प्रतिज्ञा केली आणि ती प्रतिज्ञा क्षत्रिय कुलोत्पन्न चंद्रगुप्ताने तेथेच ऐकली. त्याचे संगनमत होऊन नंदाचे राज्य जिंकण्यात आले. नंतर कठाळ व चाणक्य या दोघांनी दीक्षा घेऊन संसारत्याग केला. ते दोघे 'कथाशतक' ग्रंथाचे पारायण करू लागले. त्या ग्रंथात १०० कथा आहेत. चंद्रगुप्तानंतर सागरदत्त, अशोक, कुणाल अशी परंपरा झाली. कुणालाला नित्य शालिअन्न खावयास दिल्याने तो अंध झाला. त्याचे लग्न 'चंद्राननी 'बरोबर झाले. त्यांना चंद्रगुप्त नावाचा कुमार झाला. त्याला राज्य देऊन अशोक दीक्षा घेऊन तप करू लागला. तो चंद्रगुप्तकुमार मोठा झाला. त्याने कित्येक दिवस राज्य केले. एकदा वनात मुनी आले आणि त्याने त्यांना 'मला हे राज्य-वैभव का मिळाले' असा प्रश्न विचारला. मुनीने त्याला त्याचा पूर्वभव ऐकविला. नंतर कित्येक दिवसांनी चंद्रगुप्ताला एका पहाटे सोळा स्वप्ने पडली. त्याच दिवशी नगरात धर्माचा वर्षाव करणारे भद्रबाहु आचार्य आले. चंद्रगुप्ताने त्यांना स्वप्नफल विचारले. आचार्यांनी "आता या भागात बारा वर्षांचा दुष्काळ पडून मुनी लोक चारित्र्यभ्रष्ट होतील, संघात वेगवेगळ्या शाखा होतील. मध्य देशात धर्मलोप होईल. देशाच्या अंत्यभागी धर्म राहील. राजे लोक कुलहीन बनून स्वैराचार करतील." याप्रमाणे स्वप्नफल सांगितले आणि सर्व मुनि-संघाला धर्मरक्षणार्थ दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा दिली. चंद्रगुप्तानेही दीक्षा घेतली व तोही भद्रबाहूबरोबर दक्षिणेत आला. काही आचार्य श्रावकांच्या विनंतीनुसार उत्तरेतच राहिले. त्यात भद्रबाहू (मुन्याचार्य), रामाचार्य, स्थूलभद्राचार्य, सुराचार्य इत्यादी होते.

दक्षिणेत आचार्य भद्रबाहू वृद्ध झाले. त्यांनी विशाखाचार्यांना आचार्यपद देऊन त्यांना दुसरीकडे पाठविले. चंद्रगुप्त मुनी मात्र भद्रबाहूजवळ राहिले. भद्रबाहूने समाधिमरणाचे व्रत घेतले. एका विस्तीर्ण शिळेवर आसन मांडले आणि अंती ते

स्वर्गाला गेले. आचार्यांच्या कलेवरास 'उपचार' करून चंद्रगुप्तमुनी तिथेच तप करू लागले. इकडे उत्तरेकडे राहिलेले सर्व आचार्यसंघ चारित्र्यभ्रष्ट झाले होते. एकदा तर एका दुष्काळपीडिताने एका मुनीला मारून त्यांच्या पोटातील अन्न काढून घेतले. तो प्रसंग पाहून रात्री खाणे, खोलीत बसून खाणे, भिक्षा मागून आणून खाणे, विहार करताना दंड-काठी बाळगणे, इत्यादि गोष्टी उत्तरेकडच्या संघात सुरू झाल्या. एका दंडधारी दिगंबरास पाहून एका गरोदर स्त्रीस शिशुपात झाला म्हणून आचार्यांनी संघाला कांबळे व अर्धवस्त्र वापरण्यास परवानगी दिली. बारा वर्षांचा दुष्काळ संपला. आणि दक्षिणेतील संघ उत्तरेकडे येऊ लागले. उत्तरेकडील कित्येक तपोभ्रष्ट संघ प्रायश्चित्त घेऊन शुद्ध झाले पण काहींनी प्रायश्चित्त न घेता 'प्रायश्चित्त घ्या' म्हणून सांगणाऱ्या वृद्ध स्थूलभद्राचार्यांचा वध केला. स्वतःचे ग्रंथ तयार केले. संघ स्थापिला. तेच श्वेतांबर होत.

त्यांनी सौराष्ट्र देशातील वल्लभपूर (वलभी) नगरचा राजा वप्रादन याच्याशी आपल्या एका पदित शिष्यिणीचा विवाह घडविला आणि त्या राज्यात स्वतःचा प्रभाव वाढविला. त्या दोघा राजाराणींना एक मुलगी झाली. ती 'जाकलदेवी' होय. तिलाही श्वेतांबरांनी पळविले आणि तिचा विवाह करहाटक देशातील कोल्हापूरचा राजा 'भूपाल' याच्याशी केला. पण तिचा प्रभाव त्याच्यावर पडला नाही. उलट राजाने दिगंबर गुरूंनाच मान दिला.

तिकडे चंद्रगुप्तमुनी घोर तपश्चर्या करून समाधिमरणाने स्वर्गाला गेले. अशा हा या 'भद्रबाहू आख्यानाचा' सारांश आहे. येथे श्वेतांबर पंथाची निर्मिती सम्राट चंद्रगुप्त मौर्याच्या काळी (इ. स. पू. ३८१) झाली असे सांगण्यात आले आहे. पण भगवान पार्श्वनाथांच्या परंपरेतील आचार्य केशीकुमार श्रमण याने इंद्रभूती गौतमाला या पद्धतीविषयी प्रश्न[12] केला होता. तो विवाद त्या काळी शांत झाला. परंतु वस्त्रधारी साधूंची परंपरा तेव्हाही अस्तित्वात होती असे दिसते. बारा वर्षांच्या दुष्काळामुळे हे पंथातील अंतर अधिकच तीव्र झाले असल्यास नवल नाही.

सम्राट चंद्रगुप्त मौर्य हाच भद्रबाहू आचार्यांबरोबर दक्षिणेत आला आणि भद्रबाहूंच्या समाधिमरणानंतर १२ वर्षांनी श्रवणबेळगोळ येथे सल्लेखना घेऊन मरण पावला असे बहुतेक इतिहासकार मानतात. पण येथे कुणालपुत्र चंद्रगुप्त हा भद्रबाहूबरोबर दक्षिणेत आला असे सांगितले आहे. मौर्यघराण्यात पहिल्या चंद्रगुप्ताशिवाय दुसरा कोणी चंद्रगुप्त नावाचा सम्राट झाला नाही. मौर्यपरंपरा पुढीलप्रमाणे आहे.[13]

---

१२. केसीगोयमिज्ज अध्ययन, उत्तराध्ययनसूत्र २३ (सविस्तर चर्चा पाहा, भारतीय संस्कृतिमें जैन धर्मका योगदान. डॉ. हिरालाल जैन, पृ. २६-२७).

१३. Ancient India—T. L. Shaha, Page 234.

चंद्रगुप्त ( सन पूर्व ३८१ ), बिंदुसार ( स. पूर्व ३७३ ), अशोक ( स. पूर्व ३३० ), कुणाल, संप्रति व श्रमसेन. प्रस्तुत कथेत या बाबतीत फरक पडला आहे.

पण इतकी गोष्ट निश्चित आहे की चंद्रगुप्त हा भद्रबाहु श्रुतकेवलीबरोबर दक्षिणेत आला होता. आणि श्रवणबेळगोळ येथेच जैन धर्मानुसार त्याने समाधिमरण स्वीकारले होते. हे ऐतिहासिक सत्य[१४] या कथेत गोवले आहे.

## शिशुनागवंशीय बिंबिसार ऊर्फ श्रेणिक[१५] —

मराठीत गुणदास व जनार्दन यांनी श्रेणिक महाराजाचे चरित्र जैनपरंपरेप्रमाणे लिहिले आहे. श्रेणिक ही खरोखरीच ऐतिहासिक व्यक्ती होती काय ? असा प्रश्न संशोधकांसमोर पडतो आणि काहींनी याचे होकारार्थी उत्तर दिले आहे. मगधपती श्रेणिक हा म. महावीरांचा समकालीन राजा होता; बौद्ध इतिहासात ' बिंबिसार ' या नावाने ओळखला जातो. त्याची जैनधर्मीय राणी चेलना ही चेटककन्या — म. महावीरांची मावशी होती असे मानण्यात येते. अर्थात श्रेणिकचरित्रात तशा ऐतिहासिक घटना जवळजवळ नाहीतच. श्रेणिकाचा शोकान्त मात्र ऐतिहासिक असण्याची शक्यता आहे. त्याचा पुत्र कुणिक याने शेवटी त्याला बंदिवासात ठेवून त्याचा छळ केला, आणि त्यामुळेच श्रेणिकाने लोखंडी घणावर माथा आपटून प्राण दिला असे वर्णन प्रस्तुत दोन्ही मराठी रचनात आले आहे. अर्थातच खऱ्याखुऱ्या ऐतिहासिक घटनाही कालांतराने अद्‌भुत कथांचे स्वरूप धारण करतात. पण तसे पाहिले तर श्रेणिक[१६] चरित्रात अद्‌भुत अशा कोणत्याच घटना नाहीत.

---

१४. Mysore ond coorge from Incriptions P. P. 4, 5, and 8 —Rice B. L.

१५. डॉ. भांडारकरानी ' सेनिय — श्रेणिक ' यावरून त्याला सेनापति मानले आहे. तो वज्जीपैकी होता. वज्जीनीच त्याला राजा बनविले.

( Bharatiya Vidya Bhawan's History and Culture of the Indian People vol. II ).

१६. बिंबिसाराला ५०० बायका होत्या. चेलना ही लिच्छवीमुख्य चेटकाची मुलगी होती. अजातशत्रूला ' वैदेहिपुतो ' म्हटले आहे. चेलनेला ' वैदेही ' म्हणत असावेत. अजातशत्रूशिवाय कुणिक, हल्ल–वेहल्ल अशी मुले चेलनेला होती. अभयकुमार मात्र लिच्छवी अंबपालीपासून झाला होता असे म्हणतात.

( Bharatiya Vidya Bhawan's Histoy and culture of the Indian People Vol II )

## राजकीय स्थितिदर्शक उल्लेख —

मध्ययुगातील महाराष्ट्राचे राजकीय जीवन फार अस्थिर होते. मुसलमानांच्या आक्रमणाचा परिणाम सर्वांनाच भोगावा लागला. लोकांचे राजकीय जीवन दमे कष्टाचेच होते. सरकारदरबारात चोरांना मार मिळे तसा एखाद्या गरीब कारकुनासही मार मिळे. ( ध. प. ७६ ). परमहंस–कथेत रूपकात का होईना राजकीय जीवनाचे प्रतिबिंब व्यवस्थित उमटले आहे. बायका आणि मुले यांच्यामुळे राजवराण्यात भाडणे होत. प्रसंगी दूरच्या नातलगांनाही तुरुंगात टाकून राज्य बळकावण्याची वृत्ती मध्ययुगात वाढली होती. परमहंसकथेमधील आध्यात्मिक रूपक अशा राजकारणावर आधारले आहे. ' तराळा ' चे सामान्य जनतेला बरेच भय वाटत असावे. ( प. क. पृ. २०, २२, २७) तो नगरात येणाऱ्या जाणाऱ्या लोकांवर लक्ष ठेवीत असे. सुनहेर भिकाऱ्यांच्या वेशात राजकीय कामासाठी हिंडत ( प. क. पृ. ३७ ). विशालकीर्तिकृत धर्मपरीक्षेत मुसलमान लोक इतर धर्मीयांवर कोणते अत्याचार करीत याचे वर्णन केले आहे. हे म्लेंछ तुरक कृतांताप्रमाणे जीवांना मारीत. मूर्ती पाहून त्याचा छळ करतात, असे वर्णन येते. ( ध. प. वि. ९३३ ते ९३८ ). भारतातील परदेशी लोकांची नावे विशेषतः अरब, खुरासन, मुगल, हबसी यांची घेतली जातात, ( ध प. ६६ ). श्रे. च. ज. ( ३४. १३० ). धर्मामृत ग्रंथात पंचेंद्रिय मनुष्याचे वर्णन करताना पुढील नावे दिली आहेत. वानरमुखी, राक्षमुखी, मांजरमुखी, पंखिमुखी, घोडामुखी, गौमुखी, जलमनुष्य, महिषमुखी, एकल्यगे, मुरडकाने, लंबकर्ण, स्वानमुखी, रंगुळमुखी, अरबि, खुरासानी, मुगल, हापसि, मर्कटमुखी, गृद्धमुखी, गजमुखी, खरमुखी, उंदिरमुखी, अजमुखी, मेघमुखी इत्यादी. या नावात "आरबि, मुगल, खुरासनी व हापसि" एवढीच नावे देशवाची दिसतात. पण त्यांना ज्या इतर माणसांशी एकत्रित गोवले आहे ते पाहिले म्हणजे ते लोक भारतीय जनतेशी एकरूप झाले नव्हते असे दिसते. पद्मपुराणात बर्बर आणि म्लेंछांचा उल्लेख आला आहे. ( प. पु. १५. १२२–१२३ ). जनार्दनकृत श्रेणिक चरित्रातहि पंचेंद्रिय माणसांची नावे आली आहेत पण ती धर्मामृताशी समानच आहेत. विशेष म्हणजे शंखवक्री, गीवदर, म्हैसीसेंदरी यांची भर पडली आहे. ( श्रे. च. ज. ३४. १२६–१३१ ).

राजे लोकांच्या मिरवणुकांचे वर्णन काही ठिकाणी आढळते. बंदुका खांद्यावर घेऊन जाणारे ' पदाती ', नृत्यगना व त्यापुढे वारांगना मिरवणुकीत असत. मिरवणुकीपुढे सर्वात समोर ' तरकस ढाल ' पाठीवर बांधून जाणारे तराळ असत. हे वर्णन जिनसागराने केले आहे. त्याच्या काळी नागपूरकडे भोसले व वऱ्हाडातील निजाम यांच्या स्वाऱ्या अशा निघत असतील. ( निर्दोषसप्तमी कथा – जिनसागर २१, २४ ). कल्मा पढवून लोकांना मुसलमान करून घेण्यात येई. ( का. पु. ४२. १०४ ). नगराच्या चौकातही हिंदू मूर्ती मुसलमान राज्यकर्ते पायाखाली तुडवीत ( का. पु. ४२ – १३८. )

राज्य अस्थिर असले म्हणजे लोकांना धर्माचार पाळता येत नाहीत. धर्म टिकविणे कठीण जाते. मेघराजाने जसोधररासमध्ये तसे विचार स्वकालीन अनुभवाचरून मांडले आहेत ( वरि–राज्य थिर नाही जाणी । तरि होय धर्महाणि । त्या देशामाझीं ॥ ७८८ ॥ जरि राज्य असेल थिरु । तरि प्रजा वसे सुंदरु । चालविती सागारु । पूजादान ॥ ७८९. ज. रा. ). पद्मपुराणात गुणकीर्तीने अगू रामकालीन स्थिती बाजूला ठेवून स्वकालीन राजकीय वातावरणच चितारले आहे. " पुत्र्यंधर भूपति । म्लेंछ न जाणो किति । आला चालून आर्यदेशाप्रति । हो पैं. १६. १४, लोकांची फजीति करिती । देशचेका त्रास देतीं । प्रजा बाधोनि नेतीं । दुष्ट पैं ॥ १६. १५ ॥ " यापेक्षा साक्षात्कारी चित्रण दशरथास लिहिलेल्या पत्रात जनकाने रंगविले आहे. " सर्व आर्यदेश विध्वंसिला । किती एक लोक धरिला आणि महा भ्रष्ट माडिला नरेश्वरा पैं ॥ ( १६.४२ ). उजाड झाले नगरपुर । विध्वंसिलें मठमंदिर । म्लेंछ लुटिले भाडार । अनेक रायाचे पैं । पीडा झाली प्रजेकारण । नगर वेढिले म्लेंछ सैन्य । आता मी काय करणे नरेश्वरा ॥ १६. ४६ ॥ राजाचे आधारे प्रजा । महाधर्म करिती वोजा ॥ १६.५७ ॥ " मुस्लीम आक्रमणाचेच हे चित्र आहे, हे स्पष्ट दिसते.

एकंदरीत राजकीय जीवन अस्थिर आणि परकीयाकडून आक्रमित झाले तर धार्मिक व सामाजिक जीवनात स्वास्थ्य राहात नाही, हाच विचार १५ व्या शतकातील गुणकीर्ती व मेघराज या दोन्ही कवींनी माडला आहे. तो विचार स्वकालीन परिस्थिती पाहूनच त्याना सुचला आहे, त्यात शंका वाटत नाही.

सैन्यात गज, घोडे, पालखी, पायदळ असत. दमामा व नफेरी वाजवून युद्धास आरंभ होई. खड्ग, भाला, धनुष्यबाण या शस्त्रांचा उपयोग युद्धात होत असे. ( प. क. पृ. ४० ). युद्धास जाण्यापूर्वी पुरुषाना त्यांच्या वामकाकडून विडा दिला जाई. युद्ध शक्य तो दिवसाच्या चौथ्या प्रहरी खेळले जाई. पराभूत राजाची मिरदेही कधी कधी काढून घेतली जात. युद्ध जिंकून परत आलेल्या पुत्राचे स्वागत त्याच्या माता आरती ओवाळून करीत. ( प. क. पृ. ४० )

राजकीय शासनात परस्त्रीगमनाच्या अपराधास मोठी शिक्षा असावी असे दिसते. अशा माणसाचा घरलेल्च आणवून त्याला मार देत. मस्तकी मुंडमाला आणि भडवस्त्र देऊन फजीती करीत. ( सु. च. बी. ४.५६ ). चोराना आणि लबाडी करणाऱ्या कारकुनांनाही दरबारात आणून मार देण्यात येत असे. ( श्रे. च. ज. ३४.१७२ ). चोराचे प्रेत सुळावर टागून देत. कावळे त्यांचे मांस टोचून खात. ( ज. रा. ५.१०८१ ). बारूद गोळ्याचे तुटे रचले जात. त्यावर दीर्घ तोफा गडगडत असत अशीही दृश्ये कोठे कोठे दिसतात. ( श्रे. च. ज. १.४४ ). राजाच्या सेवक वर्गात पुढील लोकाचा समावेश होई. छत्रधर, चवरी ढाळणारे, दळवे, पुरोहित, तराल, सेलह, पडिहार, भांडारी, कोठारी, हडपी, पाणहारी, अंगरक्ष, फौज,

भानवसी, गुर्लीक (प. क. पृ. २२). महालधर, काटिया, अवसरिरी, दफातर्रा (प. क. पृ. ३८).

## उल्लेखित नगरे, क्षेत्रे, स्थळे व संबंधित घटना :

प्राचीन मराठी जैन ग्रंथाची निर्मिती ही ज्या प्रदेशात झाली तो प्रदेश विदर्भ, मराठवाड्यातला होता. नतर नंतर दक्षिणेत कोल्हापूरकडेही ग्रंथनिर्मिती होऊ लागली. विदर्भात आणि मराठवाड्यात जैन मठाधीश होते. त्यामुळे धर्माबरोबरच साहित्याचीही अभिवृद्धी त्या प्रदेशात अधिक झाली. बहुतेक ग्रंथकारांनी शेवटी आपला ग्रंथ जेथे पूर्ण झाला त्याचा व ज्या मंदिरात ती रचना पूर्ण झाली त्या मंदिराचे नाव देऊन उल्लेख केला आहे. त्यावरून मुख्यतः कोणत्या प्रदेशात व कोणत्या नगरात ग्रंथनिर्मिती झाली हे लक्षात येते. शिवाय त्या प्रदेशात किंवा नगरात ग्रंथकर्त्यांना धर्माच्या नावाने का होईना आसरा मिळत असे हे सिद्ध होते. आरती आणि पदे यांसारख्या किरकोळ कृतींतूनही कित्येक स्थळाचा व तेथील मंदिराचा बोध होतो. आरतीकार हा त्या मंदिरातील मूलनायक मूर्तीचा उल्लेख कित्येकदा करतो. प्राचीन मराठी जैन वाङ्मयात 'तीर्थवंदना' हा एक प्रकार आहे. त्या काळच्या प्रसिद्ध तीर्थक्षेत्रांचे स्मरण प्रातःकाळी व्हावे म्हणून या रचना निर्माण करीत असत. पण त्यामुळे त्या वेळच्या कित्येक तीर्थक्षेत्रांना एका मालिकेत गोवण्याचे श्रेय अशा कृतींना मिळाले आहे. महानुभावांप्रमाणे जैन साधूमुद्धा नित्य विहार करीत असत. त्यांचा मुक्काम बहुधा जिनमंदिरात असे. त्यामुळे जिनमंदिराला शिक्षणकेन्द्राचे स्वरूप येई. मंदिरात चातुर्मास होत. ग्रंथलेखन, प्रतिलिपीकरण व शास्त्रपठण ही कामे अविरतपणे होत असत. अशा स्थळांचे जे उल्लेख या वाङ्मयात आले आहेत त्यांचा येथे थोडक्यात आढावा घेत आहे. शिवाय ग्रंथात त्या वेळच्या ज्या ज्या प्रसिद्ध ठिकाणांचे उल्लेख आले आहेत त्यांचाही आढावा येथे घेतला आहे. म्हणून स्थळाचा उल्लेख दोन प्रकारचा समजावा लागेल. प्रत्यक्ष लेखकाशी व त्याच्या कृतीशी संबंध असलेल्या स्थळाचा उल्लेख व इतर स्थळाचा उल्लेख. इतर स्थळात तत्कालीन नगरे, व्यापारी पेठा, जैन व जैनेतर तीर्थक्षेत्रे यांचा समावेश होतो. ग्रंथकर्ते जैन असल्याने जास्तीत जास्त त्यांनी आपल्या समाजाशी संबंधित स्थळाचाच उल्लेख आपल्या ग्रंथात केला आहे. इतर स्थळाच्या उल्लेखाचे प्रमाण कमीच आहे. तरी पण या उल्लेखावरून त्या काळच्या महत्त्वाच्या स्थळांची काही प्रमाणात तरी माहिती मिळाल्याशिवाय राहात नाही.

## ग्रंथकारांशी संबंधित स्थळे : विदर्भ आणि मराठवाडा विभाग :

कारंजा—वऱ्हाडातील कारंजा या गावाला जसे व्यापारी महत्त्व होते, तसेच धार्मिक व साहित्यिक दृष्टीनेही त्याचे महत्त्व फार होते. जैन मराठी ग्रंथकारांनीही जिन-

सागराने आपल्या आदित्यवारकथा आणि जिनागमकथा या रचना तेथे पूर्ण केल्या आहेत. ( आदित्यवार कथा ४३ जिनागमकथा २१० ) चिमना पंडिताने चंद्रप्रभ आरतीत तेथील चंद्रनाथ मंदिरातील मूलनायक म्हणून चंद्रनाथांना उल्लेख केला आहे. पंडित भीमचंद्राने गुरूंच्या आरतीत कारंजा येथील चंद्रप्रभू मंदिराचा व तेथील सरस्वतीगच्छ बलात्कारगण भट्टारक पीठाचाही उल्लेख केला आहे. माणिकनंदीने अनंतनाथ आरतीत आणि चंद्रनाथ आरतीत चंद्रनाथ मंदिराचा उल्लेख केला आहे. कारंजा येथील चंद्रप्रभ मंदिर आजही महत्त्वाचे मानले जाते. राघव याने सिद्धसेन स्तुतीत[१७] आणि रतनसा याने सिद्धसेन-आरतीत[१८] या नगराचा उल्लेख आदराने केला आहे.

**नागपूर**—सन १७८१ च्या सुमारास बरधासा नामक सावकाराने नागपूर येथे जिनमंदिर बांधवून त्याची प्रतिष्ठा करविली असा उल्लेख कवी रत्नू यांनी केला आहे. नागपूरला तो फणिपूर असेही म्हणतो.[१९]

**वासीम**—यमासा अर्जुनसुत याने ' रविवारकथा ' वासीम येथील पार्श्वनाथ मंदिरात पूर्ण केली. तो वासीमला ' वत्सगुल्म ' म्हणतो. ( रविवार व्रतकथा यमासा—श्लोक ३२३ ).

**आकोट**—याचा उल्लेख ' कोटनगर ' म्हणून नागो आयाने आपल्या यशोधर चरित्राच्या प्रशस्तीत केला आहे. वऱ्हाडला तो ' वैराट ' म्हणतो. ( यशोधरचरित्र-नागोआया ओवी २८६ )

**मोरंबपूर**—मोरंबपूर म्हणजे कोणते गाव हे समजले नाही. तेथील मालातीर्थ चैत्यालयात गुणनंदीने यशोधर पुराण पूर्ण केल्याचा उल्लेख तो करतो. ( जसोधर-पुराण, गुणनंदी ८-२३२ )

**अमरावती**—अमरावती येथील आदिनाथ मंदिरात विक्रम संवत १८६९ मध्ये रत्नकीर्तिने ' उपदेश रत्नमाला ' ग्रंथ पूर्ण केला. ( ४०-६३ )

**तारापूर**—येथील शांतिनाथ मंदिरात महीचंद्राने आपला आदिनाथ पुराण ग्रंथ पूर्ण केल्याचा उल्लेख त्याने प्रशस्तीत केला आहे. ( आदि. पु. १०—१४६ )

**शर्कराग्राम**—सध्या या गावाचे नाव काय आहे, हे निश्चित करू शकले नाही. पण जनार्दन कवीने श्रेणिकचरित्रातील प्रशस्तीत याचा उल्लेख केलेला आहे. वासीम नगराच्या तळी नहसी गाव असून त्याच्या तळी शर्कराग्राम असल्याचे त्याने सांगितले आहे. कवी जनार्दन हा शर्करागावचा ( साखरगाव ? ) होता. ( श्रे. च. न. ४०—२७६ ).

१७ भट्टारक संप्रदाय—लेखांक ८३
१८ भट्टारक संप्रदाय—लेखांक ७८
१९ युगवाणी—ऑगस्ट १९५८

**देऊळगाव**–देऊळगावराजा असे सध्या या गावाचे नाव आहे. देऊळगाव येथे संमतभद्रशिष्य अर्जुनसुत सोयरा याने चंद्रनाथ चैत्यालयात कर्माष्टमी कथा पूर्ण केल्याचा तो उल्लेख करतो, (कर्माष्टमी कथा ओवी ११३–११४).

**मानवत**–याचा उल्लेख 'माननगर' असा येतो. मेघमालाव्रतकथेत लक्ष्मीचंद्राने तेथील चंद्रप्रभ जिनालयाचा उल्लेख केला आहे. जिनरात्रीकथेतही तो 'मान' येथील त्याच मंदिराचा उल्लेख करतो.

**निर्मलगाव**–मल्लाजीचा पुत्र रायाजी याने 'जिनवर विनंती' लिहिली (ओवी १६)

**नंदीपुर**–येथे आदिनाथ मंदिर आहे. आणि त्या मंदिरात अरिहंत आरती[20] केल्याचा उल्लेख महीचन्द्राने केला आहे. नंदीपूर म्हणजे नांदगाव असू शकेल, **रिधपूर**, काळापूर, खोलापूर, मंगरूळ–ही चारही स्थाने ब्रह्ममहतीसागराशी संबंधित[21] आहेत. रिधपूर येथे त्यांनी रविवार व्रतकथा लिहिली, काळापूरला त्यांनी पंचकल्याण ग्रंथाची रचना केली. खोलापूर येथे त्यांची व त्यांचे गुरु देवेंद्रकीर्ति यांची भेट झाली. मंगरूळ येथे महतीसागराचा पहिला चातुर्मास झाला.

**जैलिंगपेठ**–अनंतकीर्तीने जैलिंगपेठ येथे आदिनाथ मंदिरात दशलाक्षणिक व्रतकथा लिहिल्याचा उल्लेख केला आहे. (ओवी १८६). जयसिंगनगर येथे पद्मावतीचे देऊळ फार प्रसिद्ध असल्याचे सांगून ती देवी प्रत्यक्ष वर देणारी आहे. असे पद्मावती पाळण्यात देवेंद्रकीर्ती यांच्या एका शिष्याने सांगितले आहे. (ओवी ८) जयसिंगनगर हे दक्षिण देशात आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. जैलिंगपेठ व जयसिंगनगर हे एकच किंवा भिन्न हे मात्र निश्चित सांगता येत नाही.

**जितूर**–जिंतुर येथे शीतलनाथ मंदिर असल्याचा उल्लेख शीतलनाथ आरतीत आहे. या आरतीच्या कर्त्याचे नाव मात्र समजू शकले नाही.

**चक्रपूरनगर (?)**–पद्मकीर्तीने पार्श्वनाथ आरतीत चक्रपूरनगरातील पार्श्वनाथ मंदिराचा उल्लेख केला आहे.

औरंगाबाद व देवगिरी यांचा परिचय मागे आलाच आहे.

**दक्षिणेकडील काही स्थळे–**

**करवीर–कोल्हापूर**–सेनगणातील भट्टारक सिद्धसेन व त्यांचे गुरु शांतिसेन यांची भेट कोल्हापुरास झाली. तेथून ते कारंजाला आले. असा उल्लेख सिद्धसेन आरतीत[22] रतनसा याने केला आहे.

**नांदणी** (कोल्हापूर संस्थान)–शिरोळ पेठ्यात नांदणी हे गाव जिनसेन

---

२०. जिनेंद्रमंगल आराधना — पृ. १२३.
२१. महतीसागर चरित्र — केसरकर.
२२ भट्टारक संप्रदाय पृ. २३

मठामुळे प्रसिद्ध आहे. तेथील आदिनाथ मंदिरात जिनसेन भट्टारकाने ' उपदेशरत्न-माला ' ग्रंथ लिहिला, असे ग्रंथाच्या प्रशस्तीत म्हटले आहे. सुवर्णशिखरांकित असे जिनमंदिर त्या गावात आहे. लोक फार धार्मिक आहेत असे वर्णन आहे. ( उपदेश-रत्नमाला, जिनसेन-प्रशस्ति, ओव्या ४०–४१ )

**वडगाव**–' राया 'ने शांतिनाथ आरतीत कुंतल देशातील वडगावचा उल्लेख केला आहे. तेथे शांतिनाथ मंदिर असल्याचे त्यावरून दिसते. ' अप्पना देसाई ' या व्यक्तीचाही उल्लेख त्यात रायाने केला आहे. वडगावात अप्पना (सर) देसाई ही त्या वेळची व्यक्ती असावी.

**कागल**–कोल्हापूरजवळील कागल पूर्वी कुंतल देशात मानले जाई असे दिसते. छत्रसेन याने आदिनाथ भवांतरात कुंतल देशातील कागलचा उल्लेख करून तेथील शांतिनाथ मंदिरात आपली ग्रंथरचना पूर्ण झाल्याचे तसेच चातुर्मास केल्याचे सांगितले आहे. ( आदिनाथ भवांतर–६६-६७ )

**जेउरगीपूर** (?)–रायाने क्षेत्रपाल आरतीत जेउरगीपूरचा उल्लेख केला आहे, हे जेउरगी म्हणजे गुलबर्गा–सोलापूरकडील जेउरगी असेल कदाचित. तेथे शांतिनाथ मंदिर असल्याचे त्याने सांगितले आहे.

**सीतानगर**–शांतिनाथ आरतीत रायाने सीतानगरच्या शांतिनाथ मंदिराचा उल्लेख केला आहे. सीतानगर कर्नाटकातील सीतिमनी असू शकेल काय ?

**वालकुंड**–रायाने पार्श्वनाथ आरतीत या गावाचा उल्लेख केला आहे. तेथे पार्श्वनाथ मंदिर असल्याचे दिसते.

**तीर्थक्षेत्रांचे उल्लेख**–जैन धर्मात तीर्थयात्रेला अतिशय महत्त्व आहे. काही लेखकांनी प्रत्यक्ष तीर्थयात्राही केली असेल व काहींनी ग्रांथिक माहितीवरूनही क्षेत्राचे उल्लेख केले असतील. या जैन तीर्थक्षेत्रांचे उल्लेख या लेखकांनी भक्तीनेच केलेले आहेत. जैनेतर तीर्थक्षेत्रांचे उल्लेख मात्र त्या क्षेत्रांना भक्तांनी जाऊ नये म्हणून केले आहेत.

### जैन तीर्थक्षेत्रे —

**अंतरिक्ष पार्श्वनाथ ( शिरपुर )** :— बहुतेक लेखक वऱ्हाड व मराठ-वाड्यातील असल्यामुळे व अंतरिक्षपार्श्वनाथ हे देवस्थान वाशिमजवळील श्रीपुर–शिरपूर येथे म्हणजे वऱ्हाडात असल्यामुळे त्या क्षेत्रासंबंधी विशेष भक्ती दिसून येते. धर्मामृतात गुणकीर्तीने या क्षेत्राचा उल्लेख[२३] अतिशय–क्षेत्र म्हणून केला आहे. मेघराजाने पार्श्वनाथ भवांतराच्या प्रारंभी अंतरिक्ष पार्श्वनाथाला नमन करून

---

२३. श्रीपुरनगरी अतिशयवंतु श्रीपार्श्वनाथु अंतरिक्षु ( ध. प. १६७ ).

ही मूर्ती कलिकालात सुद्धा अधर शोभते असे म्हटले आहे.[२४] आणि यात्र रचनेत शेवटी 'वांछितदायक पार्श्वजिनेश्वर' 'अनेक अतिसयो' व 'अंतरिक्ष श्रीपुरी परमेश्वर' अशा या मूर्तीचा उल्लेख केला आहे.[२५] 'अहिराणी गीत' या रचनेत 'श्रीपुरनग्र सुहावने'। 'तो अंतरिखस्वामि' असा उल्लेख आहे. हे गीतच अंतरिक्षगीत म्हणून लिहिले गेले आहे. दुःखी अशा श्रीपाल राजाला सुख देणारी ही मूर्ती असे त्यात म्हटले आहे.[२६] चिमना पंडिताने तीर्थवंदनेत रावणकालीन खरदूषणाने ही मूर्ती पूजिल्याचे सांगितले आहे. तसेच श्रीपाल राजाने ही मूर्ती पाहिल्याचे सांगून पार्श्वनाथाचा 'पाशोजी' म्हणून उल्लेख केला आहे.[२७]

**कचनेर :—** मराठवाड्यातील हे एक क्षेत्र प्रसिद्ध आहे. चिमनापंडिताने चिंतामणि पार्श्वनाथ आरतीत या क्षेत्राचे वर्णन करुन तेथे कार्तिक शुद्ध पौर्णिमेला यात्रा भरुन महाअभिषेक पूजा होत असल्याचे नमूद केले आहे.[२८].

**पैठण**—मराठवाड्यातील हे एकनाथ-प्रसिद्ध पैठण जैनांच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे. विशेषतः चिमना पंडित पैठणचाच असल्याने त्याने या क्षेत्राचा महिमा विशेष सांगितला आहे. तीर्थवंदनेत त्याने म्हटले आहे की तेथे मुनिसुव्रत मंदिरात आदिनाथ व चंद्रनाथ यांच्या मूर्ती आहेत. प्रतिष्ठान हे महातीर्थ असून त्याला बारा दारवंटे व गंगातट आहेत.[२९] मुनिसुव्रतविनतीत तर त्याने या क्षेत्राच्या निर्मितीचा इतिहास दिला आहे; पण ही रचना हिंदीत असल्याने येथे विशेष उपयोगाची नाही. प्रतिष्ठान हे मालतीर्थ आहे आणि ते चक्रदत्त साहूच्या स्वप्नात येऊन दृष्टात दिल्याने

---

२४. अंतरिख श्रीपुरीं परमेस्वरू । अजारि सोहे ए कलिकालें अधरू ॥
(पार्श्वनाथ भवांतर १.)

२५. अनेक अतिसयो सुम गुणसागर । अंतरिख श्रीपुरी परमेश्वर । वांछितदायक पास जिनेसर । ब्रह्मज्ञाति प्रसादे मेघा म्हणे । (पार्श्वनाथ भवांतर ४७)...

२६. श्रीपाल राय ते बहुतकाळ दुखीं । त्याले दीध जीवदान ॥ ४ ॥
(अहिराणी गीत).

२७. महाराज तु श्रीपुरी अंतरीक्ष । खरदूषन पूजि प्रत्यक्ष ।
कैसा पावला पाहे राया श्रीपाल । ऐसा पाशोजी देखिला
(तीर्थवंदना, चिमना पंडित).

२८. महिमावंत तीर्थ कचनेर ग्रामीं । महायात्रा कार्तिक शुद्ध पौर्णिमीं ।
माहाअभिषेक होती पूजा गुणधाम । महाराज तुं तेथ भक्त जना विश्राम ॥
(चिंतामणि पार्श्वनाथ आरती).

२९. प्रतिष्ठान ग्राम महातीर्थ स्वामि । बारा दारवंटे गंगातट ज्यासी ।
मुनिसुव्रत स्वामिनिवास तेथे । आदीश्वर चंद्रप्रभु वंदि तेथे ॥
(तीर्थवंदना — चिमना पंडित).

निर्माण झाले. तेव्हापासून पैठण मुनिसुव्रततीर्थंकराबद्दल प्रसिद्ध झाले असे त्यात सांगितले आहे.[३०]

**शिरडशहापूर ( परभणी )** – हे एक अतिशय क्षेत्र म्हणून ओळखले जाते. जैन समाजापैकी तेथे कांबोजांची वस्ती विशेष आहे, असे जिनसागराने नमूद केले आहे. ( पद्मावती कथा ६१ ). तेथील शांतिनाथ मूर्तीचाही उल्लेख जिनसागराने केला आहे. ( जीवंधरपुराण १०, १९३; शांतिनाथ आरती ). १८ व्या शतकात मराठी जैन साहित्याच्या दृष्टीने शिरडला अधिक महत्त्व आलेले दिसते. कारंजा येथील शेवटच्या देवेंद्रकीर्ती भट्टारकांनी शिरडला समाधी घेतली. शिरडला त्यांच्या पादुका आहेत. त्यांची माहिती महतीसागराने पुढीलप्रमाणे दिली आहे.[३१]

" शिरडच्या ग्रामोद्यानात असून ते ( देवेंद्रकीर्ती ) संयमवृत्तीने भक्तजनांच्या इच्छा पुरवू लागले. दूरदूरचे लोक पादुका वंदावयास येतात. " सध्या शिरड येथे मल्लिनाथाची मूर्ती मुख्य मानली जाते. त्यासंबंधी असा उल्लेख येतो की[३२], " शिरडशहापूर या अतिशय क्षेत्रात ही मनोज्ञ प्रतिमा पद्मनंदी गुरुने स्थापन केली. " जिनसागराने अनंतव्रतकथा, लघुअंकुशकथा, जीवंधर पुराण आणि शांतिनाथ आरती या रचना शिरडला पूर्ण केल्या आहेत. ( प्रकरण २ मध्ये जिनसागराच्या संदर्भात पाहा ).

**कर्नाटकातील काही क्षेत्रांचे उल्लेख –**

**मलखेड**–कारंजाच्या भट्टारकांना ' मलखेडसिंहासनाधीश्वर ' असे म्हणण्यात येई. मलखेडला आजही भट्टारकपीठ आहे. ' गुरुची आरती ' मध्ये ' मलियाद्रि सिंहासन ' चा उल्लेख पंडित भीमचंद्राने केला आहे.

---

३०. हिंगोली हस्त. क्रमांक ९. पृ. २९ ( अभ्यासाची साधने १. )
" प्रतिष्ठाने सुग्राम । जनसुखधामं । चागदत्त साहू व्होए ॥ ५ ॥ सपने तस आव्या । शहूमनभाव्या । प्रगट हुवो जिनसुखकरए । तेने माला चढावि । न्युनमन भावि । लवलजा हुदुतक्षण ए । माला तीर्थ नामं हुवो अभिरामं । संघ आवे वाली अति घण ए । श्री मूळसंघे जान । महिलयमानं । बलात्कार गण राजतोए । सरसति गच्छेवर अजितकीर्ति गुरू । प्रणमि चिमना विनतीकर ए ॥ ९ ॥ "

३१. सिरडग्रामोद्यानीं जैमुनि करि संयमवृत्ति ॥ ६ ॥ भक्तजनाचें वांछित सर्वहि पुरवूं लागला । जन दूरदूरवर चे येति पादुका वंदावयाला, ॥ ( महतीकाव्य कुंज पृ. ९२ ).

३२. सिरडशहापूर अतिशय क्षेत्रीं मनोज्ञ ही प्रतिमा । पद्मनंदि गुरु स्थापी. जयकरि नित नमना । ६ । मल्लिनाथ आरती. जिनेंद्रमंगल आराधना पृ. १२५.

महतीसागराने देवेंद्रकीर्ती – लावणीत ' मलयखेट – सिंहासनपति ', असा कारंजाच्या देवेंद्रकीर्तींचा उल्लेख केला आहे. ( महतीकाव्य कुंज पृ. ९२ ).

**बेळगोळ**–श्रवण बेळगोळ ( म्हैसूर ) श्रवण बेळगोळची गोमटेश्वर बाहुबलींची प्रतिमा आणि ते तीर्थक्षेत्र जगप्रसिद्ध आहे. प्रमुख मराठी ग्रंथांत व काही किरकोळ रचनांत त्याचे उल्लेख आले आहेत. गुणकीर्तिकृत धर्मामृतात " बेलगुल गोमट स्वामिसि नमस्कारु माझा " म्हणून या प्रसिद्ध मूर्तीचा व क्षेत्राचा उल्लेख केला आहे ( ध. पृ. १६७ ).

मेघराजाने गोमटस्वामीगीतात गोमटेश्वराच्या ' भुजबली ' या नावाचा उल्लेख केला आहे. पंचमकालात प्रकट होऊन तू चामुंड राजाला तारलेस असे या गीतात त्याने म्हटले आहे. ( ऐसा भुजबली प्रथम केवली । गोमटा नाव साजे तुला । ).

चिमना पंडिताने तीर्थवंदनेत ' वेल्लिपल्लव वेष्टिले अंग ज्याचें ' अशा त्या देवाधिदेवाचे, पर्वतावर उभा असणाऱ्या गोमटाचे स्मरण केले आहे. ( तीर्थवंदना ओवी २ ). तसेच गोमटस्वामी गीतात[33] चिमना पंडिताने बेळगोळ क्षेत्राचा पौराणिक इतिहास दिला आहे. बाहुबली मुक्तीस गेल्यानंतर भरताने त्यांची चन्द्रकांत रत्नांची प्रतिमा धनकून प्रतिष्ठा केली. मस्तान ती मूर्ती स्थापन केली. बारा योजन उंच अशी ती प्रतिमा असल्याने त्या ठिकाणी देवादिक वंदनेस येऊ लागले. तेच पोदनपुर क्षेत्र होय. ही पूर्वकथा ऐकून चामुंडराज व त्याची राणी यात्रेस निघाले असता स्वप्नात बेळगुळ येथे दृष्टान्त होऊन चामुंडराजाला गोमटदेव पावले. चामुंडराजाने तेथे ती मूर्ती करविली. राया या कवीने गोमटस्वामी आरतीत या क्षेत्रासंबंधीची दुसरी एक पौराणिक कथा दिली आहे. ' क्षितिरति रावण ' याने जी गोमटेश्वराची प्रतिमा स्थापन केली होती, ती चामुंडरायापासून पुनः प्रकट झाली. ' बेळगुळपुरनायक ' असे त्या मूर्तीस रायाने संबोधिले आहे.[34]

**होंबुस**–हुंबच किंवा होंबुच हे कर्नाटकातील प्रसिद्ध असे पद्मावतीचे ( पार्श्वनाथ तीर्थंकराची यक्षिणी ) क्षेत्र आहे. त्याही क्षेत्राचा महिमा महाराष्ट्रीय जैन समा-

---

३३. चंद्रकांति रत्नाचि प्रतिमा । अनुक्रमे त्याचि प्रतिष्ठा केली भरतराया । उदयिनाजि यापिले मन उछाव । द्वादश योजन अतिशयो । महातीर्थ जाले पोयणपुर । तेथे यात्रेसी येति सुरनर...... । पूर्वकथा आईकोनि । चाउंड राजा राणी । यात्रामार्गें नगर बेळगुळी । त्यांति स्वप्न देउनि तयवेळीं । प्रगट झाले बाहुबली । चावुंडरायासि वेगि पावलासि । तयालागि । ( गोमटस्वामी–गीत, चिमनापंडित ).

३४. क्षितीरति रावणहरी थापीत तुझी परतीमा ।
चामुंडरायापासुनि परगटली अति महिमा ।
बेळगुळपुरनायक......तुज उपमा ॥ ३ ॥ ( गोमटस्वामी आरती, राया ).

वात फार होता असे दिसते. विशेषतः जिनसागराच्या साहित्यात पद्मावतीदेवीचा परिणाम जास्त दिसतो.

हांबुसच्या पद्मावतीची स्वतंत्र कथाच त्याने मल्लिसेनांच्या ग्रंथाच्या आधारे लिहिली आहे. " मथुरेच्या राजा ' साकार ' याला जिनदत्त नामक पुत्र होता. त्याच्या सावत्र मातेने त्याला ठार करण्याचा प्रयत्न केला. तेव्हा तो राज्यत्याग करून दक्षिणेकडे निघाला. यावेळी पद्मावतीने त्याचे रक्षण करून त्याला कर्नाटकात नेले. हॊंबुस येथे जिनदत्ताने नूतन राज्य स्थापन केले व पद्मावती देवीची प्रस्तुत मूर्ती स्थापन केली. " असा या कथेचा सारांश आहे [३५]

' या मूर्तीच्या दर्शनाला देशोदेशीचे जैन येत असत आणि तेथे ध्यानमंत्र होम, जाप्य साधीत असत. पुत्रसंतती सौख्य त्या अंबेजवळून मागून घेत ' असे या कथेत जिनसागराने वर्णन केले आहे.[३६] आजही तेथे हा प्रकार चालतो. हॊंब्रुस-पद्मावती ही ' सकुन ' सांगत असे, असे जिनसागराच्या कथेत ह्या रचनेवरुन दिसते. कोणाच्या तरी अंगात येऊन ती ' दादानो ऐका ', अशा आविर्मावात त्यावेळी ' सकुन ' सांगत असावी. अशा वेळी ती देवी म्हणते,

" पार्श्वनाथ देव, आम्हा हुंबस माझा गाव । दुरिला माझा देस, माझ पद्मावती नांव । सगुन सांगावया आली दादा ऐक भाव ॥"[३७]

जिनसागराने पद्मावतीआरतीत पद्मावतीचे वास्तव्य कर्नाटक देशातील पोंबुचपुरात आहे आणि तिचा नित्य उत्सव ' भृगुवासरी ' होत असतो, असे वर्णन केले आहे. ( पद्मावती आरती दुसरी. जिनसागर. ).

शके १६८९ ( सके सोळासे नौव्याऐंशी ) मध्ये ' विजयकीर्ति शिष्य ' म्हणवून घेणाऱ्या एका कवीने पद्मावतीचा पाळणा रचिला असून त्यात ' होमचपुरनगर व तेथील पद्मावती याचा उल्लेख केला आहे, आणि त्याच वर्षी चैत्र शुद्ध ९ मीस तेथे झालेल्या महोत्सवाचा उल्लेख केला आहे.

**पोदनपुर**–पोदनपुर ही बाहुबलीची ( आदिनाथ पुत्र ) याची राजधानी होती. सध्या ती कोणती यासंबंधी काही वाद दिसतात. मराठी ग्रंथातील उल्लेखावरूनही त्या वादात काही भर मिळू शकेल. " पोयणपूर या शहराचे दुसरे प्राचीन नाव तक्षशिला असे होते. ऋषभदेवाचे पुत्र बाहुबली याची ही राजधानी होती.

३५. जिनसागराची समग्र कविता–प्रस्तावना पृ. XI

३६. जैन लोक दर्शनास येत देशदेशिचे : ध्यानमंत्र होम जाप्य साधती श्रीदेविचे । पुत्रसतति अनेक लक्ष्मि सौख्य करिती । देई अंबिका समस्त लोकि मंदिरांगनी । देई अंबिका समस्त लोकि मंदिरागनी ॥ ( पद्मावती कथा. जिनसागर. श्लोक ५७. ).

३७. जिनसागर यांची समग्र कविता. पृ. १२५.

पश्चिम पंजाबच्या सरहद्दीवरील मध्याच्या अटक शहरानजळ हे शहर होते." असे मानले जाते.[३८] पण मराठीतील काही उल्लेख याहून भिन्न आढळतात.

गुणकीर्तीने फक्त "पोयनापुरिनगरि श्री बाहुबळीसी नमस्कार माझा." इतकेच म्हटले आहे. (ध. प. १६७). यावरून काहीच बोध होत नाही. चिमना-पंडिताने गोमटेश्वर गीतात या क्षेत्राचे पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे. "बाहुबलीला मुक्ति प्राप्त झाल्यानंतर भरताने त्यांची प्रतिमा करविली. प्रतिष्ठा केली. उदधिनाजि यांचि मन उछाव, द्वादश योजन अनिरुवे ॥ ३ ॥ बहू दिसी जगा जोनि । नक्ळे दिवस रात्रि । महातीर्थ जाले -पोयणपुर । तेथे यात्रेसि येति सुरनर । पुजावया गोमटेश्वर ॥ ४ ॥" अशी ही पूर्वकथा ऐकून चामुंडराजा यात्रेस निघाला. यावरून पोदनपुर कोठेतरी समुद्राजवळ असले पाहिजे असे दिसते.

दुसरा उल्लेख जंबूस्वामी चरित्र (रत्नकप्रत) या ग्रंथात ११ व्या अधि-कारात तीर्थवंदनेत आहे. अर्थात ब्रह्मजिनदासाच्या जंबूस्वामी रासवरच ही रचना अवलंबून असल्याने हा उल्लेख त्याचाच समजावा लागेल. त्यात

सिंधुदेस देखिला सुमस्थान । सुरमदेस पोयण पुरमान ।
तेथ पुजियले बाहुबलिस्वामी । पश्चिमदेसि समुद्रवेटिछीरनामी ॥[३९]
या वरूनही समुद्रातील एका बेटात ही मूर्ती होती असे दिसते.

याशिवाय किती तरी जैन तीर्थक्षेत्रांचे उल्लेख करण्यात आले आहेत. जंबुस्वामी-चरित्रात (रत्नक प्रत) अकराव्या अधिकारात (ओव्या ११९ ते १४५) जंबुकुमाराचा मामा आरंभ केलेल्या प्रवासाचे वर्णन करतो. त्यात त्याला ज्ञात अशा सर्व तीर्थांची तो यादी देतो. मांडवगढ्ग्वाल्हेर येथील किल्ल्यातील मंदिर, तळबाटचा नेमिजिन (?), तेलंगदेशातील माणिकदेव, आहीरदेशातील गजंपथ, तुंगी, कारंजा क्षेत्र, लाट देशातील पावागड, सोरठ देशातील शत्रुंजय, गिरनार, गुर्जर देशातील पंचासार्श्वनाथ, मेवाडदेशातील चितोडगडचे चोवीस जिन, तारंगा क्षेत्र, आबू क्षेत्र, सुरम देशातील पोदणपुर, मथुरेचे मल्लिनाथ, हस्तिनापुरचे शांति, कुंथु व अरनाथ, संभवनाथाची जन्मभूमी श्रावस्ती, ऋषभदेव, अजितनाथ, अभिनंदन, सुमति व अनंतनाथ या पाच तीर्थंकरांची जन्मभूमी अयोध्या, पद्मप्रभाची जन्मभूमी कौशांबी, पार्श्व व सुपार्श्व यांची जन्मभूमी वाराणसी, चंद्रप्रभाची चंद्रपुरी, पुष्पदंताची काकंदी, शीतलनाथाची भद्दिल-पुरी, श्रेयांसांची सिंहपुरी, वासुपूज्याचे मुक्तिस्थान चंपापुरी, विमलनाथाची जन्मभूमी कंपिल्यानगरी, धर्मनाथाची जन्मभूमी रत्नपुर, मल्लिजिनदेवांची मिथिला नेमिनाथांची मथुरा, महावीरांची जन्मभूमी कुंडलपुर व पार्श्वांची वीस तीर्थंकरांची मुक्तिभूमी संमेद-शिखर अशी ही तीर्थमालिका आहे. तीर्थात तीर्थंकर भूमी, मुनिभूमी व अतिशय-

---

३८. धर्मामृत प्रस्तावना पृ. ३२
३९. ज्ञिंतुर हस्तलिखित क्र. १

क्षेत्र असे तीन प्रकार केले जातात. जंबूस्वामी चरित्रात (रत्नक प्रतीत) त्या काळच्या कितीतरी ठिकाणच्या अतिशय मूर्तींचे उल्लेख आलेले आहेत. संशोधकांच्या दृष्टीने ही यादी महत्त्वाची आहे. ती अशी–

| | |
|---|---|
| प्रयाग – जटाधर आदिनाथ. | काशी – सुपार्श्वपार्श्वांच्या मनोज्ञ प्रतिमा. |
| टोडरपुर – आदिनाथाची विशाल प्रतिमा | उज्जैनी – चिंतामणिपार्श्व. |
| मांडवगड – महावीरमूर्ती. | श्रीपुर – सप्तफणायुक्त अंतरिक्ष पार्श्वनाथ |
| गोपाचल – बावनगजा मूर्ती. | तेरनगर – वर्धमानस्वामी. |
| कुल्पाक – नीलकांति माणिकदेव. | रामटेक – शांतिनाथमूर्ती. |
| यक्लनगर (वेरूळ ?) – धरणेंद्र पद्मावती-पार्श्वनाथ. | तलघाट – नारंगाच्या पंचवर्णीय प्रतिमा (कारकल – मूडबिद्री ?) |
| छायापार्श्व (पर्वतावर ?)– सुपार्श्व जिनाच्या मूर्तीची मनोज्ञ छाया. | नवनिधिपार्श्व – सप्तफणायुक्त मूर्ती. |
| अंकलेश्वर – नऊफणायुक्त पार्श्व. | महू – विघ्नहरपार्श्व. |
| वेटावद – अमृतझरपार्श्व. | लक्ष्मीश्वर – शंखजिन. |
| ईडर – संभवदेव प्रतिमा | पोदनपुर – बाहुबली. |
| मीलोडी – शांतिनाथ प्रतिमा. | दिव्य दलोल – नवखंडपार्श्वप्रतिमा. |
| चितोडगड – महावीरांची कंचनकाय प्रतिमा. | डभोई – लोढणपार्श्वनाथ. |
| जलधिदेव – सव्वापाचशे धनुष्य उंचीची मूर्ती. | धाराशिव – जलकुंडातील अग्गलदेव. |
| अलवार – रावणपार्श्वनाथ. | |

इ. स. १६८८ च्या सुमारास भारतात वरील क्षेत्रे व प्रतिमा जैनधर्मीयांच्या दृष्टीने महत्त्वाच्या मानल्या जात असत.

**जैनेतर तीर्थक्षेत्रे** — जिनभक्तांनी धर्म समजून काही तीर्थांची यात्रा करू नये या उद्देशाने पुष्कळदा जैनेतर तीर्थक्षेत्राचा उल्लेख येतो. गुणकीर्तीने धर्मामृतात जैनेतरांच्या ३८ क्षेत्रांची नावे दिली आहेत. याशिवाय या यादीत १५ नद्यांचीही नावे आहेत. नासिक, पंढरपूर, तुळजापूर, केदार, उडिसा जगन्नाथ, मल्लिकार्जुन, जटाशंकर, ओंकारमांधाता, कपिलधारा, प्रयाग–काशी, त्रिवेणी, गया, वाराणसी, रिद्धपूर, चांगदेव, एलोर, राजमहेंद्री, माहोर, द्वारका, सेतुबंध, रामेश्वर व लोणार ही तीर्थनामे होत. आणि चंद्रभागा, सरस्वती, गंगा, तापी, भिवरा, कृष्णगंगा, चंबळा, वरुणा, पैनगंगा, नर्मदा, पूर्णा, सिंधु, गोतमी, पाताळगंगा ही नदीनामे होत.

**समाजदर्शन**–इ. सनाच्या १५ व्या शतकापासून तो १८ व्या शतकापर्यंत निर्माण झालेल्या प्राचीन मराठी जैन वाङ्मयात जो समाज प्रतिबिंबित झाला आहे

त्याचे दर्शन निरनिराळ्या ग्रंथांत आलेल्या वेगवेगळ्या उल्लेखांच्या आधारे आपणास घेता येईल. त्या समाजाची स्थिती, त्याचे रीतिरिवाज, उद्योगधंदे व व्यापार, खानपान, पोषाख, अलंकार आणि समाजाच्या जीवनाशी संबंधित इतर काही गोष्टी यासंबंधी यत्रतत्र आढळणारी ही माहिती एकत्रित करण्याचा उद्देश हाच आहे की त्या समाजाचे दर्शन घडावे. पण त्याचबरोबर हेही लक्षात घेणे आवश्यक आहे की त्या विशिष्ट समाजाशी या लेखकांचा संबंध विशेषत्वाने आला तोच समाज या वाङ्मयात प्रामुख्याने दिसतो.

**जैनसमाज**–जैन समाजात वैश्य वर्गाचाच भरणा अधिक आहे. साधारणतः महाराष्ट्रापुरते बोलावयाचे झाल्यास दक्षिणेकडील चतुर्थजैन समाज हाच काय तो *प्रत्यक्ष स्वतः शेती करणारा जैनसमाज आहे.* इतर बहुतेकांचा धंदा व्यापाराचा आहे. जैन वाङ्मयातील कथा पाहिल्या आणि इतरही वर्णने वाचली तर एक गोष्ट मनाला जाणवल्याशिवाय राहात नाही की या कथा शेठ सावकाराच्या अथवा राजे लोकांच्या वरील असतात. पद्मपुराण, हरिवंशपुराण, आदिपुराण यासारखे पौराणिक नायकांचे ग्रंथ सोडले तरी जीवंधर, जसोधर, सुदर्शन, भविष्यदत्त हेही नायक वरच्याच घराण्यातले आहेत. महाकीर्तिकृत 'शीलतरंगिनीपुराण' यासारखा ज्याला परंपरागत फारसा आधार नाही असा ग्रंथ घेतला तरी त्यातील नायक आणि नायिका श्रीमंत समजल्या जाणाऱ्या वैश्य कुळातीलच आहेत. म्हणूनच राजघराणे अथवा वैश्य घराणे यांचेच दर्शन जैन ग्रंथांत प्रामुख्याने घडते. 'शीलव्रताके'चा नायक माणिकचंद म्हणजे चारुदत्ताचा नवा अवतारच मानावा लागेल. धनामुळे तरुण मुले व्यसनी कशी बनत व वेश्येच्या नादी लागून प्रत्यक्ष मातापिता आणि पत्नी यांना त्रासदायक कशी होत असत याचेच चित्र शीलव्रताकेत उभे केले आहे. याच संदर्भात जैन परंपरेतील चारुदत्तकथाही (पुण्यास्रव कथाकोश, जिनसेन, कथा १४) समाजाच्या अभ्यासाच्या दृष्टीने उपयुक्त ठरेल. ज्या समाजात हा लेखकवर्ग राहात असे तो समाज वैश्यसमाज होता. श्रेष्ठी, श्रेष्ठिणी, त्यांचे थाटाचे विवाह, मुलाचे जन्मोत्सव, भोजनसमारंभ, मोठमोठी देवालये–त्यातील साधुजन, त्यांच्याकडून श्रावकश्राविकांनी उपदेश–व्रते इत्यादी ग्रहण करणे, मंदिरातील पूजा अर्चा–अभिषेक, मुनी लोकांना आहार; व्यापार, व्यापारातील नफा-तोटा व त्यामागे असणारी समाजातील गतजन्माच्या पापपुण्याची कल्पना यांची चित्रे विशेषतः मराठीतील जैन वाङ्मयात अधिक आली आहेत. साधी 'रविवार व्रतकथा' घेतली तरी याची खात्री पटल्याशिवाय राहात नाही. ईडर, कारंजा, शिरडशहापूर, नागपूर, जिंतूर, वासीम, कोल्हापूर इत्यादी ठिकाणचे *श्रीमान जैन व्यापारी हे त्या वेळच्या भट्टारकांचे शिष्य होते.* या शिष्यांचा समाज हाच या लेखकांचा समाज होता.

अर्थातच समाजदर्शनातील हे एक न्यूनच समजावे लागेल. देशातील बहुजनसमाज आणि त्यांची परिस्थिती वाङ्मयात प्रतिबिंबित न होणे हा त्या वाङ्मयाचा

दोषच होय. पण त्याला कारणेही दिसतात. त्या काळी आजची ही वाङ्मयीन दृष्टी नव्हती. शिवाय जैनसमाज इतर समाजाकडून धार्मिक व काही सामाजिक बाबतीत अलगच पडत असावा. म्हणूनच परस्पर वाङ्मयीन देवाणघेवाण सुद्धा फार कमी आहे. याचे अजून एक महत्त्वाचे कारण हे सांगता येईल की, हे वाङ्मय त्या काळी तरी खास एका विशिष्ट सामाजिक घटकासाठी तयार करण्यात आले होते. ज्यांच्यासाठी या वाङ्मयाची निर्मिती होती तो समाज त्या वाङ्मयात दिसतो. हा जैन समाजही इतर समाजाहून स्वतःचे वेगळे अस्तित्व दाखविण्यासाठी श्रद्धापूर्वक काही खास गोष्टी आचारात आणीत असावा. पाणी गाळून पिणे आणि रात्री भोजन न करणे या गोष्टी तर जैन समाजाच्या धर्माचारात समाविष्ट झाल्या होत्या.[४०] आज सुद्धा जैन समाजात या दोन आचारांचे विशेष महत्त्व मानले जाते. मध्ययुगात त्याचे महत्त्व किती होते हे पद्मपुराण (गुणकीर्ती) श्रेणिक चरित्र (जनार्दन) इत्यादी ग्रंथात येणाऱ्या उल्लेखावरून दिसून येते. रामचंद्राबरोबर सीता वनवासात असताना अनगालित जल न पिणे व चर्माच्या मोटेचा स्पर्श झालेले पाणी न पिणे यासंबंधी आग्रह धरते असा उल्लेख गुणकीर्तीने पद्मपुराणात केला आहे. (२४.१५). यावरून इतके निश्चित दिसते की समाजात त्या गोष्टीचा फार बडिवार माजविला जात असला पाहिजे.

व्रते आणि वैकल्ये धर्माचारात विशेष वाढलेली दिसून येतात. प्रभु रामचंद्रानेसुद्धा कार्तिकात अष्टान्हिकव्रत केले असे वर्णन पद्मपुराणकर्त्यांनी केले आहे. (३०.५).

व्रते आणि वैकल्ये विधिवत् पार पाडण्यासाठी जवळ धन असणे आवश्यक असते म्हणून हा आचारधर्म धनिकवर्गात अधिक दिसू लागला. व्यापारातही अमक्याच वस्तूचा व्यापार करावा व अमक्या वस्तूचा व्यापार करू नये अशी बंधनेही आली. कापड विकणे, सराफी व सावकारी हे व्यवसाय अहिंसक मानले गेले असल्यास नवल नाही. मराठी जैन वाङ्मयातही त्याचेच उल्लेख अधिक येतात. या संदर्भात अर्जुनसुत यमासाकृत 'रविवारकथा' पूर्णपणे वाचनीय आहेत. हिंसा होते म्हणून तळे, विहिरी व आड खोदविणे, वाडी–कुळवाडी करणे हे व्यवसाय वर्ज्य मानले जाऊ लागले. (तले, मले, आड, विहिर, वाडि, कुळवाडि न करावि। ध. प. ७६)
शेती, फूलमळा याचाही त्याग हा समाज करू लागला. (श्रे. च. ज. ३. १४७).

अस्पृश्यता ही जैन समाजात या काळात विशेष प्रमाणात मानली जात होती. मलिन जातीच्या लोकांच्या हातचे पदार्थही वापरू नयेत. खाण्यापिण्याच्या वेळी शूद्रस्पर्श को अशा प्रकारचे दंडक आचारधर्मात घातले होते. (मलिन जातीच्या घराची

४०. ज्ञानेश्वरांनीही पाणी गाळून पिणाऱ्या लोकांचा खास उल्लेख केला आहे. ज्ञानेश्वरी (अध्याय १३ ओवी २३४.)

धन्‍ – तेल, तूप, ... मलिनाचां घरिचे उदक, मुसल, कटवटि, आलंदे, आदिकरौनि परिहारिजे । ध. प. ५६ ).

मांसाहार अतिशय निंद्य मानण्यात येऊन मांसाहारी लोकांच्या घरी जैन लोक आपली मुलगी विवाहासाठी देत नसत. ( श्रे. च. गुण ३.७५ ). मांसाचे नाव घेणेही अंतरायकारक समजले जाई. ( श्रे. च. गुण ३.२१५ ). भोजनप्रसंगी शूद्रस्पर्श होणेही मांसाहाराबरोबरच दोषास्पद समजले जाई. ( श्रे. च. ज. २४.६४ ). रजस्वला स्त्रीसुद्धा अस्पृश्याप्रमाणेच वागविली जाई. तिची अस्पृश्याशी तुलना करून तिच्याशी कोणत्याही प्रकारचे व्यवहार करू नयेत असे सांगण्यात आले आहे. चार दिवस तिला दूर ठेवावे. चार दिवसांपैकी पहिल्या दिवशी ती मातंगिनी, दुसऱ्या दिवशी चांडालिनी, तिसऱ्या दिवशी वरठिनी आणि चौथ्या दिवशी शूद्रा असे समजून तिच्याशी संबंध ठेवू नये असे धर्मामृतकार गुणकीर्ती ( ध. प. ८४ ) व श्रेणिकचरित्रकार जनार्दन ( ३०,४३ ) एकमुखाने सांगतात.

**जैन समाजाचे धार्मिक जीवन** — व्यापार उदीमादी करीत असताही धर्मकार्यात या समाजाचे विशेष लक्ष होते असे दिसते. आपल्या जवळचा पैसा धर्मकार्यात वेचावा व पुण्य मिळवावे हा आदर्श समोर असल्यामुळे धर्मकार्यासाठी खूप खर्च करण्यात येत असे.

काही लोक संघ चालवीत आणि समाजाकडून ' संघई ' अशी मानाची पदवी मिळवीत. परिणामतः आजही ' संघई ' ' सिंघी ' अशी आडनावे त्यांच्याकडे पाहावयास मिळतात. ती संघपती बनल्याची चिन्हेच होत. ' संघपती ' बनणे म्हणजे चतुर्विध संघाची तीर्थयात्रा स्वखर्चाने करविणे. हा मान फार मोठा समजला जाई. गुणकीर्तींच्या पद्मपुराणातील पवनजयही अंजनेची कित्येक दिवसांच्या विरहानंतर भेट झाल्यावर तिच्याबरोबर सिद्धक्षेत्राची यात्रा करीत संघपती होईन असा विचार करू लागतो. संघपती बनण्यात गुणकीर्तींच्या काळी किती भूषण वाटत असावे याची या वर्णनावरून कल्पना येते. ( प. पु. ८.९७ ). ' भविष्यदत्त बंधुदत्त पुराणा 'तही 'संघई' बनण्याचा प्रकार पाहावयास मिळतो. ( ६.३२ ). एखादे व्रत पूर्ण केल्यानंतर त्या व्रताच्या उद्यापनाच्या वेळी सत्पात्र बघून पुस्तक अथवा लेखनाचे साहित्य दान म्हणून दिले जाई ( अनंतव्रतकथा, ६०, जिनसागर ). दान हे वैश्य कुळाचे भूषण मानले जाई. ( भविष्यदत्तबंधुदत्त पुराण २१६२ ). श्रीमंत लोकांकडून जिनमंदिरांत महापूजा होई. अशा पूजेत कधी कधी दहीदुधाच्या कावडीने जिनाभिषेक होत असे. घृत, शर्करा यांचा प्रचंड प्रमाणात उपयोग केला जाई. गुणकीर्तीने प्रत्यक्षात अशी पूजा पाहिली असावी. म्हणूनच पद्मपुराणात अशा थाटाच्या पूजेचे वर्णन त्याने केले आहे. ( प. पु. १८.६९ ). दान करताना विद्यार्थी, सुवर्णशलाका, पुस्तके; क्षुल्लिका असल्यास साडी, विद्यार्थी असल्यास कागद इत्यादी वस्तू देण्यात येत. ( रत्नकरण्डश्रावकाचार मराठी टीका प. ३८. ) पूजा, प्रतिष्ठा,

मंदिरनिर्मिती यात धनिकांचा पैसा खर्च व्हावा म्हणून मुद्दाम प्रयत्न केला जाई. त्यासाठी एकमेकात चुरस लागे. पैजाही लावण्यात येत असत ( सु. च. वी. १६. ६० ). काही लेखकानी गजराजावरून सिद्धान्त ग्रंथाच्या ( धर्मामृत पुराण, दयासागर ४.२५ ) मिरवणुका निघाल्याचीही वर्णने केली आहेत. ती प्रत्यक्ष पाहिल्याशिवाय झाली नाहीत असे वाटते. सर्वच व्यापारी दानशूर होते असे समजण्याचे कारण नाही. संचय करावा, कपर्दिक जोडावी, कुंभ भरावेत, जमिनीत पुरावेत आणि कोठेतरी तीर्थयात्रेस विदेशी जाऊन मरावे अशी काहींची स्थिती होत असे ( रविवार कथा. यमासा ६६ ). जैन समाजातही काही जण घरी अन्न मिळत नाही म्हणून मुनिदीक्षा घेऊन भटकत असावेत ( रविवार कथा, यमासा ८१ – ८४ ) कृपण श्रीमंताची थट्टाही कोठे कोठे पाहण्यास मिळते. सदा तोंडाजवळ औषधाची वाटी असणारे, भूमीच्या पोटात माया साठवून ठेवलेले, देवपूजा न करणारे, घरी वाहने असताना अनवाणी चालणारे लोकही दिसतात. ( जंबुस्वामीचरित्र ९. २८ – ५० रत्नकप्रत ).

धार्मिक तत्त्वज्ञान आणि आचारधर्म या बाबतीत जैनांची भिन्नता दिसतेच; पण सामाजिक बाबतीत आपला वेगळेपणा निर्माण करण्यासाठी मध्ययुगात काही प्रयत्न झालेले आहेत. वाणी, वैद्य, उपाध्याय यातही जैनवाणी ( श्रे. च. ज. १६. २४ ) जैन उपाध्याय ( ज.रा. २९७ ) असा धर्मभेदमूलक उल्लेख करण्यात येत असे. विवाह–जन्मसंस्कारादि प्रसंगी जैन उपाध्ये बोलाविण्यात येऊ लागले होते.

**शेतकरी जीवन** — शेतकऱ्यांचा उल्लेख कुणबी या शब्दाने केला जातो. विदर्भात शेतकऱ्याना कुणबी म्हणण्याची रीत आजही आहे. गुणकीर्तीने पद्मपुराणात ( २२–१३३ ), गुणदासाने श्रेणिक–चरित्रात ( २.४०५ ) आणि जनार्दनाने श्रेणिक–चरित्रात ( ४.१३८ ) कुणबी शब्दाचा उपयोग शेतकरी या अर्थी केला आहे.

शेतकऱ्याचे जीवन साधारणपणे जैन वाङ्मयात पुढीलप्रमाणे प्रतिबिंबित झाले आहे. कोंबडा आरवला की उठून पखारा सोडावा, शेतात जाऊन दुपारपर्यंत आऊत नागरावे मग त्याच्या बायकोने त्याच्यासाठी भात घेऊन शेतात यावे, असे हे जीवन होते. ( श्रे. च. गुण. २.४६४ ); काही कुणब्यांची घरे पाषाणमृत्तिकेची असूनही त्यात पंचरंगी चित्रे, तीन दारवंटे, गोठ्यात बैल, म्हैस इत्यादींनी समृद्ध दिसतात. ( श्रे. च.ज. १२. ८. ).

बाराव्या वर्षीच शेतकऱ्यांच्या मुलींची लग्ने होत असत आणि बारा वर्षांची मुलगी भर तारुण्यात आली असे मानले जात असे. ( श्रे. च. ज. १२–११ ). कधी परचक्र येऊन शेतकऱ्याचे भरपूर नुकसानही होत असे. पद्मपुराणात सिंहोदराने दुर्गाला वेढा दिला. खेडी उद्ध्वस्त झाली, माणसे पळून डोंगरात गेली. गवत, घर जळून गेले, सूप, टोपरे व पेटारे डोक्यावर घेऊन जाण्याची एका शेतकऱ्यावर पाळी आली असे वर्णन केले आहे. रामकालाचे हे वर्णन असले तरी त्या काळाला हे

वर्णन शोभत नाही. मध्ययुगीन नेतृत्याचे अस्थिर जीवनच येथे सूचक स्वरूपात प्रकट झाले आहे. (प. पु. २२.४०७ )

ब्राह्मण वर्ग–ब्राह्मण वर्गाचेही दर्शन या वाङ्मयात काही ठिकाणी घडते. ब्राह्मण हे श्राद्धकर्मादी करून लोकांना फसवितात अशी टीका त्यांच्यावर झाली आहे. (ज. रा. ५३३ ).

ब्राह्मण–याचक वर्ग भोजनास फार महत्त्व देतो. त्याची थट्टा करण्यात आली आहे. ( सम्यक्त्व कौमुदी, दयासागर १३.६८ ). जनार्दनाच्या श्रेणिकचरित्रात धर्मक्रिया करणाऱ्या ब्राह्मण-वर्गाचे चित्र रंगविले आहे. द्वादशगंध, वैष्णव टिळा, वेदाध्ययन, ज्योतिष, व्याकरण याचा अभ्यास, पुंडरीक गंध, तुळशीमाळा यांनी सजलेले किंवा गायत्री जप करणारे हे खरे ब्राह्मण नव्हेत असे जनार्दन म्हणतो ( श्रे. च. ज. ४.६९,७०,७२ ).

'अर्थासाठी वेदाध्ययन आणि धनासाठी पांडित्यपुराण व कीर्तन' करणाऱ्या ब्राह्मणांची निंदा करून खऱ्या ब्राह्मणाची लक्षणे कशी असावीत हेही काही कवींनी सांगितले आहे. ( ऐसा जो ब्रह्मी स्थिरावला । कैवल्य स्वरूपीं तो बुडाला । त्याचे अभिधान ब्राह्मण बोला । इतरीं सर्व वृथा पैं ॥ ४.८१ श्रे. च. ज. ). जैन लेखकांना ब्राह्मणाबद्दल आदर होता; परंतु ब्राह्मणांच्या क्रियाकांडाबद्दल आणि धर्माला व्यापारी वस्तू बनविल्याबद्दल ते टीका करीत असे स्पष्ट दिसते.

**इतर समाजांतील दारिद्र्य**–समाजातील दीन, दलित व अस्पृश्य वर्गाची स्थिती एखादा लेखक चोखून दाखवितो. पौराणिक कथा सांगताना त्यांनी हे वर्णन केले आहे. पण त्यातही समाजाची स्थिती दिसल्याशिवाय राहत नाही. दुसऱ्यांच्या उदचावर जगणारी दरिद्री माणसे, डोक्यावर काष्ठभार आणून विकून स्वतःचे पोट जाळणाऱ्या स्त्रिया, ही चित्रे समाजातील दरिद्री अवस्था प्रकट करतात ( सुगंधदशमी-कथा, जिनसागर ३४, ३५ ). समाजात एक वर्ग सात खणाच्या माडीवर सुख भोगीत असतो तर दुसरा घरोघरी भीक मागतो; एकास खाण्यास पक्वान्न तर दुसऱ्यास खाण्यास चणेही नाहीत, हे वर्णन जरी कथेतले असले तरी प्रत्ययकारी नाही असे कोण म्हणेल ? ( प. पु. १८,२१ ). *कापूस उधार आणून रहाटावर सूत काढून आपले पोट भरणारे लोकही क्वचित् दिसतात ( धर्मपरीक्षा, विशालकीर्ती, ३५६ ).*

*" दरिद्री माणूस सत्य बोलला तरी ते त्याला असत्य मानते. श्रीमंत मनुष्य बोलेल ते खरे असते. त्यालाच चतुर म्हणतात. गरिबांच्या सौंदर्याला किंमत नाही. श्रीमंत मनुष्य कोळशासारखा असला तरी त्याला ' सावळा ' म्हणतात "* ही अर्जुनसुत यमासाची गरिबी-श्रीमंतीची तुलना समाजदर्शनाच्या दृष्टीने मोठी मार्मिक आहे ( रविवार कथा, यमासा अर्जुनसुत १५३ ते १५६ ).

**अस्पृश्य वर्ग**–चातुर्वर्ण्याची कल्पना समाजाच्या हाडीमासी इतकी खिळली होती की मानवाप्रमाणे पशूंतही–घोड्यांतही चार वर्ण मानले जात होते. ( क्षेत्रि, वैसु,

ब्राह्मनु, मुद्र–येवंविध तुरंगम. घ. प. १२६ ). या चातुर्वर्ण्य कल्पनेमुळे शूद्रांना अस्पृश्य मानून त्यांना हीन लेखण्याची प्रथा मध्य युगात तरी फार मोठ्या प्रमाणात होती. मातंग जन्म सर्वांत हीन समजून त्याची काकयोनीशी तुलना करण्यात आली आहे. ( श्रे. च. ज. २.१२६ ) महार लोक मेलेल्या जनावराचे मांस खातात असे वर्णन आले आहे. ( ब. रा. १०५६ ).

**उद्योगधंदे आणि व्यापार**–मध्ययुगीन महाराष्ट्रात गावगाड्यामध्ये पाच पांचाळांचे महत्त्व बरेच होते. त्यांच्या वेगवेगळ्या ' शाला ' असत. त्या शालेत सव्वाप्रहरपर्यंत बाण घडविण्याचे काम त्यांना करावे लागे. माल तयार झाल्यावर सोमवंशी राजाकडे ते देत असत असा उल्लेख येतो. ( का. पु. १४.४६ ) हे सोमवंशी राजे म्हणजे बोगार होत. ते अठरा वाणांचा व्यापार करीत. ( का. पु. १४.६१ ). पावशेरापासून ते शेरापर्यंत वजने वापरण्यात येत. ( का. पु. १४.५० ). ' पल्य ' हे वजनाचे साधन अस्तित्वात होते. ( श्रे. च. गुण. ३.४२४ ). अठरा वाणांत लोखंड, बीड, पोलाद, आगरेज, ताम्र, जस्त, पितळ, कथील, कासे, पाषाण, हिरा, पोवळे, काच, मणी, मोती, कंकर, भरत इत्यादिकांचा उल्लेख आला आहे. ( का. पु. १७.९ ते १६ ). कासे घडविणाऱ्याना कासार, ताम्र घडविणाऱ्यांना तांबटगार, लोखंड घडविणाऱ्याना लोहार आणि पाषाण घडविणाऱ्यांना 'पाथरट' असे म्हणत असत. ( का. पु. १७.१९–२० ). पाच पांचाळांत या पाचांचा समावेश होत असे. गारा कुटून त्यात ' खार ' मिळवून त्याच्या बांगड्या तयार करण्यात येत असत. याशिवाय हिरे, सुवर्ण, हरिदंत यांचाही उपयोग बांगड्यांसाठी करण्यात येई. ( का. पु. ४३.२४४ ). काचेच्या बांगड्या तयार करणाऱ्यांना ' सीसगार ' म्हणत असत. ( का. पु. ४३.२८० ). मोडीचे काम करणाऱ्यांना ' ओतारी ' म्हणत असत. ( का. पु. ४३. २९४ ). बोगार, मणियार, जेगी, जोहरी व ओतारी हा वर्ग वेगवेगळ्या वस्तू विकून उपजीविका, मुसलमानी सत्ता दक्षिणेत आल्यानंतर करीत असे. ( का. पु. ४३.२९५ ). युद्धाचे साहित्य तयार करण्यास छत्तीस कारखाने असत. ( का. पु. ४८ वा अध्याय; प. पु. १३.९६ ).

कापडाचा धंदा महाराष्ट्रात बऱ्याच ठिकाणी चांगला चालत असावा. कापडात ' छिट ' हा प्रकार होता. तो मात्र बंदरातून महाराष्ट्रात येत असे. ( निर्दोष सप्तमी कथा, जिनसागर २२ ). व्यापारात एखादेवेळी व्यापाऱ्यांना फार मोठी तूटही सोसावी लागे. ( रविवारव्रतकथा, धमासा ९३ ). काशी, पैठण, खंबाईत, क्न्यात येथील कापड तर प्रसिद्ध होते. पण बासिमच्या साड्या, बऱ्हाणपूरचे फेटे आणि बंदरचे छिटे याप्रमाणे निशान विदर्भ व मराठवाडा या भागात तरी कापडाचा बाजार दिसून येतो. ( रविवारकथा, धमासा. ८८.९१ ).

दुकानात गुमास्ते असत. त्यांच्यावर कारभार सोपवून मालक चैनही करीत (शील. पु. २.२१५). गावोगाव फिरून व्यापार करणाऱ्याना 'बंजार' लोक म्हणत (श्रे. च. गुण. ३.८७). वाण विकण्यासाठी कऱ्हावर माल लादून नेण्याची प्रथा दिसून येते. (का. पु. १४.९०).

जैन समाजात बोगार समाज हा विशेषतः मद्रकून १८ वाणांचा व्यापार करणारा होता असे 'कालिकापुराणा'वरून दिसून येते (१७.९). या बोगारातून फुटूनच 'मगर' आणि 'तगर' असे छोटे छोटे व्यापारी समाज नंतर दक्षिणेकडे तयार झाले. जैन बोगारांनी त्यांना हीन रीतीने वागविल्याने चिडून त्यांनी लिंगायत धर्माचा स्वीकार केला. लिंगायत धर्मात माल वाहण्यासाठी कऱ्हा (वसव) वापरण्यास बंदी असल्याने मगर लोक खरांचा उपयोग करू लागले. (४६.२८ ते ४२ का. पु.). लिंगायत वाणी हे 'कानडे वाणी' म्हणून ओळखले जात. आणि ते हिंग, जिरे, हळद, मिरे इत्यादी पदार्थ विकू लागले. या कानडे वाण्यांचा 'कपटी जंगम' म्हणूनही जैन ग्रंथात उल्लेख येतो. कालिकापुराणावरून असे दिसते की महाराष्ट्रीय जैन बोगार समाज आणि कर्नाटकातील वाणी याचे एकेकाळी बरेच विनसळे असावे. (का. पु. ४६.१०५). काही व्यापारी लोक मालांत भेसळ करून विक्री करीत. दुधात कांजी घालणे, तेलात तूप घालणे, सोन्यात तांबे घालणे यांचे उल्लेख आले आहेत. (प. पु. ४.३८). व्यापाऱ्यांच्या व्यापारविषयक चातुर्याचे वर्णन गुणकीर्तिने[४१] अचौर्य अणुव्रताच्या वर्णनात फारच वास्तव पद्धतीने केले आहे. अर्थात त्या गोष्टीचा निषेधच त्याने केला आहे. क्षत्रियांशी तुलना करता वाणी आणि ब्राह्मण हे भिन्नेच समजले जात (क्षत्रियाचे बीज असे। तरी मरणा भ्याले कसे। वाण्या ब्राह्मणाचे जसें। जीवित्व पै। —प. पु. १९.११३). वाण्यांत 'जैन वाणी' हाही एक वर्ग होता. (श्रे. च. ज. व श्रे. च. गुण. १६. २४ व ३.७९). वैश्यवर्गात शेटे महाजन मंडळी मोठी समजली जात (भविष्यदत्तबंधुदत्त पुराण २.६८). काही लोक दुसऱ्यांना रकमा कर्जाने देत असत आणि कर्ज जबरदस्तीने वसूल केले जात असे. ऋणकोच्या दारात कधी कधी 'उपास' धारण करून बसण्याचा प्रसंग धनकोवर येत असावा. (ध. प. ८३)

मातंग लोक मृतपशू ओढून नेत. त्यांचे मास काढून घेऊन त्यांच्या चर्माच्या वस्तू बनविण्यात येत असत. सिंदडी, पोहरे इत्यादी वस्तू तयार होत. (सु. च. वी. ७.१३-१४) व्यापारी वस्तूंचा निषेध सांगताना पुढील नावे गुणकीर्तिने धर्मामृतात

---

४१. कऱ्हनाचें अधिक नेघावें। उने नेदावे। वाट उने न करावें
तागडि कानि न करावी। माप अधिक उने न करावें।
छल छद्म न करावें। परद्रव्य नेघावे। घाटे पडलें नेघावे।
कुडा लेख न करावा। चोरि वस्तु मोलें नेघावि। (ध. प. ७८)

सांगितली आहेत. लोह, मध, विष, लाख, साबण, पान, धावडी, कुसुंभा, मोह, गेण, तीळ, चारोळी यांचा व्यापार जैन श्रावकाने करू नये असे सांगितले असले तरी कोणकोणत्या वस्तूंचा व्यापार समाजात चाले हे समजण्यासाठी ही नावे उपयुक्त आहेत. (धर्मामृत प. ७५). 'नानावटी' हा बाजारपेठेतील एक विश्वासू व्यापारी समजला जाई. (प. क. पृ. २८). तो नाणे खरे किंवा खोटे हे पाहण्याचे काम करीत असे. (धर्मपरीक्षा–देवेंद्रकीर्ती १५). बंदरात जहाजे येणे, त्याना नांगरणे किंवा गळ सोडून तारू सुटविणे याचेही उल्लेख आले आहेत. (भविष्यदत्तबंधुदत्त पुराण १०.१३).

वेगवेगळे धंदे करणाऱ्यांपैकी माळी, तांबोळी, वक्र, गांधी यांचा उल्लेख येतो (जीवंधर पुराण २. २४ ते २८).

## काही सामाजिक रूढी, रीतिरिवाज आणि समजुती–

प्राचीन मराठी जैन वाङ्मयात बहुतेक ग्रंथ कथात्मक स्वरूपाचे असल्यामुळे कथानकाच्या ओघात कित्येक ठिकाणी तत्कालीन रूढी, रीतिरिवाज लोकसमज यांचा उपयोग ग्रंथकारांनी केलेला आहे. समाज हा खऱ्या अर्थाने अशा रूढी, रीति-भाती आणि समजुती यांच्यातच जगत असतो. त्यांच्या अभ्यासाने त्या समाजाचे जिवंत चित्र पाहण्यास मिळते. पुढे निरनिराळ्या ग्रंथातील काही रूढी, रीतिरिवाज आणि समजुती यांचे संकलन केले आहे.

रजस्वला स्त्रीने विटाळ न पाळल्यास वंशवृद्धी होत नाही. ज्या वृक्षाला ती स्पर्श करील अथवा ज्याच्याखाली न्हाईल तो वृक्ष उभा सुकतो. आंब्याची अढी, पापड, कुर्वंडी तिच्या स्पर्शाने नासतात असा उल्लेख आला आहे (ध. प. ८४).

विंचू चावला असता केरसुणीने मांत्रिक विष उतरवीत. आजही खेड्यात हा उपाय केला जातो. (विंचुगीत–गुणदास). माहेराहून सासरी गेलेल्या मुलीसाठी 'मातुके' पाठविण्याची रीत होती. (ज. रा. ३७७).

बारशाच्या समारंभात चौघी सुवासिनी ओवाळून त्याच्याकरवी बालकास पाळण्यात घालण्यात येई. बाळगोपाळ मिळून गीत गात, सर्वजण मूठमूठ घुगऱ्या खात. बारशात घुगऱ्या खाण्याची ही रीत पंधराव्या शतकात होती असे गुणदासाच्या वर्णनावरून दिसते. (श्रे. च. गुण. २. २२७).

मुलांचा जन्मोत्सव आणि नामकरणविधी हे संस्कार थाटात केले जात. स्वजन-सोयरे एकत्रित येत, वाजंत्री लावून मंदिरात जात, लोकांना दान देत, मंदिरात जननी व बालक यांच्यावर गंधोदक शिंपडून त्याना शुद्ध करून घेत आणि सुवासिनी धवलमंगल गात.

बायकाबायकांत जिद्दीला पडून कधीकधी शीर सोडण्याची होड लागत असावी. सत्यभामा व रुक्मिणी यांच्यात अशी होड लागल्याचे हरिवंशकाराने वर्णन

केले आहे. या पैजेत जी हरेल तिचे शिर दुसरीने बोडावयाचे असते (हरिवंश-पुराण, अध्याय ५०).

स्त्रिया गर्भवती झाल्यानंतर ९ व्या मासात अंगसंगदीय वर्ज्य समजल्या जात. अशावेळी पुरुषांना दासीसंग करण्यास त्या स्वतःच परवानगी देत. (का. पु. ४६.२८).

गर्भवतीला दृष्ट लागू नये म्हणून लिंबलोण करण्यात येई. (प. पु. १४. ११७). वैधृती योगाचा प्रहर असताना मूळ नक्षत्रावर जन्मलेली मुले कुपुत्र होतात, पित्याला घातक होतात, असे समजण्यात येई. (श्रे. च. ज. ३१. ३३). जन्म झाल्यानंतर पंचांग पाहून मुलाचे जन्मनाव पाहण्यात येई. (७.८३ श्रे. च. ज.)

पित्याचा मृत्यू झाला असता त्याचा अग्निसंस्कार त्याच्या ज्येष्ठ कुमाराच्या हातून व्हावा अशी रूढी होती. (श्रे. च. ज. ८.५५-५६).

कांस्यपात्रात जेवणे हे कमीपणाचे मानले जाई. (श्रे. च. ज. ३४.५९).

कोणी नातलग अथवा स्वतःचा पती मरण पावला तर पाच दिवस रडणे हा लोकाचार मानला जाई. प्रेम नसले तरी कित्येक स्त्रियांवर लोकाचार म्हणून रडण्याची पाळी येत असावी. (जशोधर पुराण, गुणनंदी ४. २००).

सौभाग्यवतींच्या हातात बांगड्या भरीत असता प्रथम तिने चुड्यांना नमस्कार करण्याची रीत होती. बागडीवाल्या बोगाराने 'बहुत वर्तत व्हावे' असा आशीर्वाद देऊन मग चुडे भरण्याची पद्धत दिसून येते. (का. पु. ४३.२५७).

बाहुलाबाहुलीची लग्ने करून त्यावेळी मोठा समारंभ साजरा करण्याचा खेळ श्रीमंतांत असावा. (धर्मामृतपुराण, दयासागर ४.१५)

सत्त्वपरीक्षेत तप्त तेलास स्पर्श करणे हा प्रकार बराच जुना असून काही ठिकाणी त्याचे उल्लेख आले आहेत. (श्रेणिक च. जनार्दन १२. ३७).

स्त्रियांना जंघास्थानी तीळ असणे हे मोठे शुभ लक्षण समजले जाई. अशा मुलींचे भाग्य थोर मानण्यात येई. (श्रेणिक च. गुण. ३·४१).

समाजातील शुभाशुभ कल्पनात, आरण प्रवासाला निघाल्यानंतर पाठीमागे मांजर ओरडणे अथवा घुबड ओरडणे हे मरणसूचक समजले जाई. सर्प आडवा जाणे, हरिण डाव्या बाजूने जाणे, हेही मरणसूचक चिन्ह मानले जाई, (का. पु. १४. ९१, ९२). डावा डोळा स्फुरणे, भुजा स्फुरणे या गोष्टी शुभ मानल्या जात. (प. पु. ७·३२७).

मध्ययुगात स्त्री ही बाराव्या वर्षी मर तारुण्यात येते असे मानण्यात येई, असे दिसते. काही काही वेळा तर दहाव्या वर्षीच ती उपवर झाली असे सांगण्यात आले आहे. (श्रे. च. ज. १२·९; सुगंधदशमी कथा ६९).

फाल्गुनी पौर्णिमेची सोंगे मोठ्या प्रमाणात निघत असावीत. ते सोंग अत्यंत हिडीस असे. (श्रे. च. ज. २९·४७)

मनोरंजनाच्या साधनात 'मोरपिणीचा खेळ' हा प्रकार प्रिय असावा. शिर वर

जाणे, घट खाली राहणे असा हा प्रयोग या खेळात असे. ढोल वाजवून हा खेळ केला जाई. भोरप्याने "गौड देशके मोरपीन" म्हणून हाक मारावी आणि तिने पिवळे पातळ नेसून व हिरवा चुडा घालून हजर व्हावे असा हा एक मनोरंजक खेळ असे. (कालिकापुराण ४४. ३–२०). (श्रे. च. ज. २२.१३४).

## विवाहसंस्कार–

धन्याचया कथांतून विवाहसंस्कारासंबंधी माहिती आलेली आहे. साधारणतः सोळाव्या शतकापासून तो अठराव्या शतकापर्यंतच्या समाजात विवाहसमारंभ कसे साजरे केले जात हे या वर्णनावरून समजून येते. लग्न जमविण्यासाठी वरवधूचे पटचित्र काढून देशोदेशी पाठविण्यात येत. अर्थातच राजे किंवा अत्यंत श्रीमंत लोक असे करीत असत. (प. पु. ९.१४), (श्रे. च. गुण ३.२५). लग्नात आंदण देणे, (प. पु. ९.९२), वराने अश्वावर आरूढ होऊन तोरणद्वाराशी येणे, आडजमनिक धरून 'सावधान' म्हणून मंगलाष्टके म्हणणे या क्रिया आजच्याप्रमाणे इ. सनाच्या पंधराव्या शतकातही सर्वाच होत्या असे दिसून येते. (श्रे. च. गुण. ३. १७०, १७१).

विहिणीस लेणी-लुगडी होत (कालिका पु. १६.६१). लग्नसमारंभ चार दिवस चालून सीमंती, रुखवत, जानवसा, फळप्रदान, सकलीकरण, मंत्रघोष, अभ्यंगस्नान, नवपदी असे संस्कार होत असत असे हरिवंशपुराणावरून दिसते. (४३.८६).

श्रीमंतांच्या लग्नाचा थाट साधारणतः पुढीलप्रमाणे असावा असे जनार्दनाच्या श्रेणिक–चरित्रावरून दिसते. लग्नपत्रिका वाटल्या जात. एकदंती गज आणून तो सजविण्यात येई. सेंदुर, घंटा, सुवर्ण–साकळ्या, अंबारी यांनी तो शोभिवंत होई. मिरवणुकीत गुलाल उधळीत. वरास लिंबलोण करण्यात येई. मंगलाष्टके म्हणत, नृत्यांगना–पात्रा नाचवीत. लग्नात गणपती, मातृका, नवग्रहपूजा होत असे. लग्नाचा उत्सव पाच दिवस चाले. (श्रेणिक च. ज. ६.१७२–१९८). बंदुकीचे बार काढणे, नौबत, खंजीर, ताश ही वाद्ये वाजविणे हा मिरवणुकीचा थाट असे. (श्रे. च. ज. १७–३०).

जैन समाजातील विवाहसंस्कार जैन पंडित करीत असे दिसते. मंगलाष्टके म्हणताना एकेक श्लोक म्हणून ती क्रिया करीत. नमस्कारार्थ सावधान, सरस्वती नमस्कार, नानाविधि–विधान, होमद्रव्यापनप्रतिष्ठा, श्रीमंडपशोभा, द्वादशसभाविराजित, श्रीजिनकीर्तन, वधू–हेमार्पण, वधूशृंगारार्पण, षोडषाभरण याप्रमाणे एक एक श्लोक म्हणून शेवटी शुभमुहूर्त सावधान करावे लागे. या प्रत्येक क्रियेचे मराठी श्लोकही उपलब्ध आहेत. (रविवार कथा, यशास, २८७–३००).

वीरदासकृत सुदर्शनचरित्रात तत्कालीन विवाहसमारंभाचे सुंदर चित्र सुदर्शन

आणि मनोरमा यांच्या विवाहप्रसंगी रेखाटले आहे. प्रथमतः वरपित्याने वधूपित्याकडे जाऊन स्वपुत्रासाठी त्याच्या कन्येस मागणी घालावी. मग वाङ्निश्चय समारंभ करावयाचा. त्यावेळी तांबूलदान, फलदान, सग्यासोयऱ्यांसह भोजन करावयाचे, नंतर जिनपूजा करून विवाहक्रियेस आरंभ करावयाचा. मंडपनिर्मिती, मंडपात चित्रशाळा ध्वजा, तोरणे यांनी शोभा आणणे. मग वरशोभन, नातलगांना आमंत्रण करून सर्वजण जमल्यानंतर वरास घोड्यावर आरूढ करणे, धवलमंगल गीत गाणे, वरास बाशिंग बांधणे, याप्रमाणे सजवून वरास मंडपात आणणे. वधूवरात पडदा धरून उपाध्याने मंत्र म्हणून लग्न लावणे. याप्रमाणे विवाह पूर्ण झाल्यावर सर्वांना फलदान करणे, विडे देणे याप्रमाणे चार दिवस लग्नाचा उत्सव चाले. शेवटी मिरवणूक असे. मिरवणुकीत गज, घोडे, पालखी असत. पात्रा नृत्य करीत. लोकांना पानविडे देत. दारू उडवीत. हवाईनळे, भुईनळे, चंद्रज्योती हे दारूचे प्रकार असत. लग्नसंस्कार पूर्ण झाल्यानंतर वधूवराने जिनमंदिरात जाऊन अष्टविध पूजा करावी, गुरुवंदन करावे. शेवटी दोघांनी नगरातील प्रत्येक घरी जाऊन फळदान करावे. यावरून लग्नसंस्कार कसा चालत असे हे कळणे शक्य आहे. (सु. च. वी. अधिकार ३ रा पूर्ण).

## स्त्री-पुरुषांचे अलंकार व वस्त्रविशेष—

मोठ्या घराण्यातील स्त्रियांच्या अंगावरील दागदागिने आणि वस्त्रे यांची वर्णने अनेक ठिकाणी आली आहेत. यावरून त्या स्त्रियांच्या आवडी-निवडींचा बोध होतो. पायांत आदु, नूपुर, अंगावर सुरंग चोळा, चोळी, कंठी हार, मुखी तांबूल, कानी कुंडल, नाकी मुक्ताफळ, डोळ्यात काजळ, मस्तकी तारिका, माळावर हरिचंद्र अशा थाटात स्त्रिया—विशेषतः शेठी व श्रीमंत घराण्यातील नायका कधी कधी राहात असत. (व. रा. २२६–२३०). लुगडी, कमरबंध, टगली, निरतानी, एकताई, आणि, मुंडासा, कडिबंध, उत्तरासन, दडप, पासोडी, चोळी हे वस्त्रविशेष पंचराव्या शतकातील गुणकीर्तीने परिग्रहप्रमाण कशाचा करावा हे सांगताना सांगितले आहेत. (ध. प. ८०).

कोष, कापूस, चर्म, ऊर्णा व झाडाची साल यापासून वस्त्रे बनविण्याचे प्रकार होते. (ध. प. ८०). कधी कधी कंठात दुल्हडी, मोहनमाळ, गरसळी घालण्यात येत. (शील्वतरंगिनीपुराण १४–१५). केसात गोंडे, मूद आणि राखडी हे अलंकार वापरण्यात येत. (शील्वतरंगिनीपुराण १.५८–५९). विरोद्या, पोल्हारे, वाक्या, कटिसूत्र, कंकण (सुगंधदशमी कथा, ११४, ११५, ११६). दानवडे, सीसफूल, फुलांची वाळी, पाचही बोटांत अंगठ्या, मजुंदं (सुगंधदशमी कथा १-१६).याही अलंकारांचा उल्लेख येतो. स्त्रियांत तांबुलाचा उपयोग विशेष असावा. (श्रे. च. व. ६.२९.३०). (सुगंधदशमी कथा ११६). लहान मुली चिरडी

नेसत ( शीलतरंगिनीपुराण १.५८ ). स्त्रियांच्या पातळावर सारस, हंस, मोर, यांची चित्रे काढलेली असत ( सुगंधदशमीकथा ११३ ). कमळेही असत ( जीवंधर पुराण ६.२३ ).

महाराष्ट्रीय स्त्रिया आणि गुजराती स्त्रिया यांची वेषभूषा व रहनसहन वेगळी असल्यामुळे कधी कधी त्या एकमेकींना या बाह्य गोष्टीवरून हिणवीतही असाव्यात. महाराष्ट्रीय स्त्री कासटवाली आणि अर्धी चोळी घालून अंग उघडे ठेवणारी, थोडे सोने वापरणारी, सावळ्या रंगाची, पान खाणारी होती तर गुजराती स्त्री तुटक्या कानाची, भुरकट वर्णाची, जाडक नेसणारी, आणि लावेप्रमाणे दिसणारी होती. ( गुजराती मऱ्हाठी गीत, मेघा ). स्त्रिया अत्तराचा उपयोग करीत ( श्रे.च.ज.६.४६ ). हाताला मेंदी लावण्यात येत असे ( जीवंधर–पुराण ६.२५ ).

रंगेल पुरुषाचा पोषाख साधारणतः पुढीलप्रमाणे वर्णिला गेला आहे. तलम कापडाची अंगी, पागोटे, डोक्यावर तुरा, गळ्यात हार, अंगाला मैलागीर ( जीवंधर पुराण २.२३,२८ ). पुरुषही कंठी पदक, मोहनमाळ, हातात पेट्या, कंकण, कडे घालीत. ( श्रे. च. ज. ३६.१४५–१४६ ).

## बालकांची लेणी –

कडी, बिंदली, सांखळ्या, वाक्या, पोवळ्याच्या माळा, मनगटावर कृष्णमणी, काजळ, टोपी, मुकुट, चल्हारपट्टी, पिंपळपान, सोनसाखळ्या, मोहनमाळ, ताईत, करदोडा, कुंडल, पैंजण अशा नानाविध अलंकारांनी बालकांना सजविण्यात येत असे. ( जीवंधर पुराण, ४.५८–७२ ).

## खानपान –

विशेषतः विवाहवर्णनाच्या वेळी खाद्यपदार्थांची लांबलचक यादी देण्याची रीत या लेखकांची आहे. किंवा व्रतवैकल्ये सांगताना अमुक पदार्थ खावेत आणि अमुक पदार्थ खाऊ नयेत असेही सांगितले गेले आहे. देवतांना नैवेद्य कोणत्या प्रकारचे करावेत हेही सांगितले आहे. तेथेही काही पदार्थांची नावे आली आहेत. लेखक गुजरात, मराठवाडा, विदर्भ या भागातील असल्याने पदार्थही अनेक प्रदेशातले वर्णिले गेले आहेत.

धर्मामृत – ( गुणकीर्तिकृत ) हा ग्रंथ कालदृष्ट्या सनाच्या पंधराव्या शतकातील असल्याने आणि त्यातील खाद्यपेय पदार्थांची यादीही मोठी असल्याने या संदर्भात तो ग्रंथ बराच महत्त्वाचा मानावा लागतो. जनार्दनकृत श्रेणिकचरित्रात धर्मामृताची यादीच त्या त्या संदर्भात दिली आहे.

## उल्लेखित खाद्यपदार्थ –

खरा खिची, पिंड वंगणी, कांजि, भांग, अफू, जायफळ, खुरासानी, ओवा,

आटले दूध, पारा-गुटिका, कामवटिका, धोतरा-बीज या वस्तू मादक समजल्या जात. ( ध. प. ५५ ). ( श्रे. च. ज. ३४.४१ ). वडा, रोटि, दिवसे, दांधरा, ईडरि, ढिढरि, वेढनि, ढोकळा या पदार्थात जीवजंतू लवकर उत्पन्न होतात म्हणून ते मतिकांनी खाऊ नयेत असे सांगितले आहे. ( ध. प. ५६ ). ( श्रे. च. ज. ३४. ६१-६२ ). जनार्दनाने पुलावे हा एक पदार्थ यादीत वाढविला आहे. शिवाय आंबा-निंबूमिश्रित रायतं, माठ व मुळा यांचाही समावेश या पदार्थात केला आहे.

फक्त दुध्या रांधून खाल्या तर रोग होतो. सूड घेण्यासाठी अशा अन्नाचा उपयोग बायका करीत असाव्यात. ( सुगंधदशमी कथा. १२ ). लाडू, लापसी, खीर, विल्चे, मांडे, वडे, पोळ्या, भात, पापड, याचे नैवद्य क्षेत्रपालाला आवडते असे सांगितले आहे. ( क्षेत्रपाल स्तोत्र, ६ ). घार्षे, सेवया, घृतपुऱ्या, कढी, चटणी, ताक ( शान्तिरंगिनीपुराण, पान ४९ ). या पदार्थांचा उपयोग अन्नदानात विशेष केला जाई. लापसी हा पदार्थ गुजराती असून तो जास्त तुपात तयार केला जाई, ( प. पु. २० १३७ ). खाजे, फेणी, मोदक, खीर, पुरणपोळ्या, सुक्वडे, ( श्रेणिक च. ज. ८.११७-११९ ). या पदार्थाचा उपयोग लग्नजेवणात केला जाई. साखरेच्या पदार्थांचाही उल्लेख येतो. ( श्रेणिक च. ज. ३'१०५ ) जेवणानतर विड्यासाठी मराठवाड्यात तरी 'गंगेरी पान' व चिकन सुपारी वापरली जाई. (श्रे. च ज. ६.१४०). खाण्याच्या मधाचे पुढील प्रकार दिसून येतात. मक्षिकामधु भ्रमरिमधु, गंधिलिमधु, मधुकरमधु असे प्रकार असत. ( ध. प. ५७, श्रे च. ज. ३४.६७ ).

### अश्वशास्त्र –

प्राचीन मराठी जैन ग्रंथात विशेषतः घोडे आणि त्याच्या जाती यासंबंधी थोडी शास्त्रोक्त माहिती आली आहे. गुणकीर्तीने 'सालोत्राचा' म्हणजे शालिहोत्राचा उल्लेख केला आहे. शालिहोत्रकृत अश्वशास्त्राला धरून त्याने माहिती दिली आहे. गुणकीर्तीने घोड्याच्या पुढील जाती सांगितल्या आहेत : तुरुकी, पठाणी, मुगली, सिंधुया, जरदा, पंखसाली, जाक्षुनदा, करहडा, मरुवा, मेवाडा, किहाडा, पिंजरा, गंगोजला, निर्मला, हंसला, मोरि, मकुणा, मकुपाणा, मोहाडा, निला ज्ञैतवारु, कास्मिरा, जलहरा, मुघोरा, सिंधुसागरा, खुरासाणी याशिवाय बरीचशी नावे त्याने दिली आहेत. ( ध. प. १२६ ). पण प्रादेशिकता दाखविण्याच्या अपेक्षेने हीच महत्त्वाची आहेत.

दयासागराने आपल्या समक्त्वकौमुदीत घोड्याविषयी काही वैशिष्ट्यपूर्ण माहिती एकत्रित केली आहे. अश्वशाळेत कच्छी, तुर्की, तुरवार, विराखी, अरबी, पर्वती, घुडसार इतके अश्व आहेत असे कथेतील वारिदत्त मगधचाला सांगतो. ( सम्यक्त्व-कौमुदी, दयासागर १७.८४ ). या संदर्भात काही अश्वजातींची लक्षणे सांगितली आहेत. ती लक्षणे पुढीलप्रमाणे आहेत :

**सोरठी** – बलवान, सर्वांत उंच, आंगी पातळ, रणात शूर, सर्वांगी सरळ, रोडका दिसणारा. ( १७.८७ ).

**तुरकी** – चामराप्रमाणे आयाळ मृदु व लांब, दोन्ही बाजूस नेहमी खूर ठोकीत असतो. चपळ चालणारा. ( १७.८९ ).

**यदकगामी** – दोन्ही धडे उंच, ठोकळ खूर, फार खाणारा, आखूड कानाचा, रुंद मानेचा. युद्धात शत्रूसमोरून हाल्व नाही. ( १७.९० ).

**फांवळी** – हा युद्धास बरा. खुरसानी मुखी खरा. अरबी हा अत्यंत राजस असतो.

**कुमाईत** – जो तांबडा सकलवर्णं, विशाल डोळे। दांडी अयाळ ।
गुडघे पद कान काळे ।
जाणा कुमाइत कुरंगण जो बळाचा ।
युद्धात गाठ पडतां गुण घ्या तयाचा । १७.९३

**पर्वतघोडा** – चढे नीट जो शैल्य लहान घोडा ।
बाळपण वर्तुळ लांबीस थोडा ।
दकारे जसा चढे तो गिरी प्रचंडा ।
ऐसा पर्वत घोडा । सर्वांत शोभे ॥ १७.९५

——सम्यक्त्वकौमुदी-दयासागर. ( चवडे मुद्रित प्रत, वर्धा )

याप्रमाणे घोड्यांची माहिती पाहावयास मिळते.

## मनोरंजनाची साधने —

प्राचीन मराठी जैन वाङ्मयात त्या काळच्या समाजाच्या मनोरंजनाच्या साधनांचे उल्लेख ठिकठिकाणी आले आहेत. त्या उल्लेखावरून त्या काळच्या समाजाची कलात्मक प्रगती आपल्या लक्षात येऊ शकते. त्या दृष्टीने पुढील उल्लेख महत्त्वाचे आहेत :

मोरपिणीचा खेळ ( का. पु. ४४.३ ). मराठ्यांचे गोंधळ व डाकातुर वाद्य ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ति ६.११६ ). संबळयुक्त गोंधळ. ( का. पु. १३.२ ). नदीत अथवा जलाशयात मंत्र घेऊन जलक्रीडा करणे. ( प. पु. ४.८७ ). ताडवनृत्य आणि सप्तस्वरांचे गायन ( प. पु. १२.१५० ). नाटक ( प. पु. १२.१४० ). गजाची झोंबडी व मल्लयुद्ध. ( प. पु. १४.११० ). स्त्रियासुद्धा असे मल्लयुद्ध पाहाव असत. पात्रानृत्य (ध. प. ११७). बाहुलाबाहुलीचा खेळ, बाहुलाबाहुलीचे लग्न समारंभपूर्वक करीत. ( धर्मामृतपुराण, दयासागर, १४.१५ ). नगरांतील लोक सायंकाळी बरोबर खोजे घेऊन फिरण्यास बाहेर पडत असत. ( श्रे. च. ज. ४.१२३ ). धर्मामृतात कुश्रुतिरूप अधर्म सांगताना त्या काळातील पुढील महत्त्वाच्या धार्मिक व सामाजिक स्वरूपाच्या मनोरंजनाचा उल्लेख केला आहे. हरिजागरण, कीर्तन, अठरा पुराणे, गीता ऐकणे, बोहरूप ( बहुरूप्या ), कोल्हाट, पात्रनृत्य, गारुड, जलमांडवी,

बाजेगरी ( पुंगीवादन ), खांबसूत्र, इत्यादि. हे उल्लेख समाजदर्शनाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहेत.

## साहित्य, शिक्षण, कला आदि –

इ. सनाच्या १५ व्या शतकापासून ते १८ व्या शतकापर्यंत साहित्य शिक्षण आणि कलेच्या क्षेत्रात काहीही विलक्षण क्रांती घडलेली नाही. जे जुने होते तेच भट्टारक पीठांच्या आश्रयाने जिवंत राहण्याची धडपड करीत होते असे दिसते. जैनधर्मात उपाध्याय वर्ग स्वतः शिकणारा व इतर मुनींना शिकविणारा. हा सर्व विद्याशाखांत निपुण समजला जाई. तो चौदा विद्या, अष्ट महाव्याकरणे, पंचमहाकाव्ये, विविध निबंधे, आगम सिद्धांत, साहित्य, संगीत, भरत, पिंगल, संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, शौरसेनी, मागधी, पैशाची–षट्भाषा, चार उपवेद, छप्पन्न भाषा, सकल शास्त्र इत्यादि विद्येत निपुण असावा अशी अपेक्षा असे. ( ध. प. १६ ).

बहात्तर कलांचा उल्लेख करताना गणित, गीत, नृत्य, कविता, कथा, वचन, वस्त्र, नट, व्याकरण, छंद, अलंकार, वाद्य, भाषा, वैद्यक व नाद याचा समावेश केला गेला आहे. ही यादी तत्कालीन समाजाचा अभ्यास व रुची दाखविण्याच्या दृष्टीने महत्त्वाची आहे. ( ध. प. १२८ ). ज्योतिषशास्त्र, पिंगलकृत छंदशास्त्र व काव्यशास्त्र याच्या अभ्यासाचे महत्त्व विद्वान पंडित वर्गात विशेष असे. ( भविष्यदत्त-बंधुदत्त पुराण, १.८२ ). लीलावती, रघुवंश, किरात, कुमार, माघ, नैषध अष्टव्याकरण, छंदरत्नाकर, मीमांसा, इत्यादी ग्रंथांचा उल्लेख अभ्यासावयाच्या ग्रंथांच्या यादीत येतो. ( रविवारकथा, यमासा, ३७.३८ ).

संस्कृत प्राकृतातील मान्यवर जैन ग्रंथांचाही उल्लेख कित्येकदा मराठीतील जैन कवींनी केलेला आहे. नेमिचंद्रकृत गोम्मटसार, त्रिभंगीसार त्रैलोक्यसार, लब्धीसार ( सु. च. वीं. २४. ११८ ). शुभचंद्रकृत ज्ञानार्णव ( ह. पु. ४३. १९२ ). सोमदेवकृत यशस्तिलक ( ज. रा. १००५ ), जिनसेनकृत आदिपुराण व गुणभद्रकृत उत्तरपुराण ( भविष्यदत्तबंधुदत्तपुराण २.८४ ). मल्लिसेनकृत पद्मावतीकथा ( पद्मावतीकथा, जिनसागर ५९ ), मानतुंगकृत भक्तामर स्तोत्र ( श्रे. च. ज. २३.११३ ), धवल, महाधवल व विजयधवल ( जंबूस्वामीपुराण, जिनसेन ) इत्यादि ग्रंथाचे उल्लेख हे त्या त्या ग्रंथाचे महत्त्व त्याकाळी किती मोठे होते हेच सिद्ध करतात.

इ. सनाच्या १७ व्या शतकात विदर्भ व मराठवाडा या विभागात फार्सी भाषेचाही शिक्षणात समावेश झाला होता असे दिसते. तसेच पूर्व पंजाबातील भाषा फार्सीहून वेगळी मानली जात होती, ( रविवारकथा, यमासा, २४० ).

मुलगा पाच किंवा सात वर्षांचा झाला म्हणजे त्याच्या शिक्षणास आरंभ होत असे. ( जीवंधरपुराण ४.८६ ). ' ॐ नमः सिद्धेभ्यः ' या मंत्राने शिक्षणास

आरंभ होई. (आ. पु. ७.९५) त्यानंतर अकारादि बावन मातृका-अक्षरज्ञान, अंकगणित, दशांश, ज्योतिष, वाचन, लेखन असा हा अभ्यासक्रम पंतोजींच्या पाठशाळांत असावा. (आ. पु. ७.९५). जैन उपाध्यायास बोलावून जैन लोक मुलांच्या शिक्षणास प्रारंभ करीत (जशोधरपुराण, गुणनंदी, २.४७). जैन पंडितांच्या स्वतंत्र पाठशाळा असत. (भविष्यदत्तबंधुदत्तपुराण १.१०९). कोशग्रंथात 'अमरकोश'चा अभ्यास विशेष केला जाई. (श्रे. च. ज. ७.९६).

## सण —

विशेषतः आचारधर्मविषयक ग्रंथांत महाराष्ट्रीय जैन समाजाला उद्देशून अमुक सण पाळावेत अथवा अमुक पाळू नयेत असे सांगण्यात आले आहे. त्या ठिकाणी महाराष्ट्रीय सणाचा खास उल्लेख करण्यात आला आहे. गुणकीर्तीने कुदेवपूजारूप अधर्म व कुव्रतरूप अधर्म सांगताना तत्कालीन सर्वसामान्य महाराष्ट्रीय समाज कोणते सण अथवा उत्सव करीत होता याचीच यादी जणू एकत्रित केली आहे. उकरडा, होळी, गणगौरी, मावे, मायराणी, जाग मोग, पोळा, नागपंचमी, जिउत्या, मातीचे नाग, मातीचे बैल, नवरात, भुंडणा, अहेवनवमी, महानवमी, देन्हाडी, संकष्टी चतुर्दशी, मराडी, आदित्यवार, सोमवार, मंगळवार, बुधवार, गुरु, शुक्र, शनि, सोमवार अमावास्या, शिवरात्री, मित्ररात्री, भाद्रपदचतुर्दशी, गोकुलाष्टमी, संवत्सरी, संक्रांति, ग्रहण, एकादशी, ही यादी पाहिली म्हणजे (ध. प. ११२-११३) सतवेकल्ले आणि सणवार या बाबतीत पंधराव्या शतकातील महाराष्ट्रीय समाज व आजचा महाराष्ट्रीय समाज यात विशेष अंतर दिसणार नाही. महाराष्ट्राच्या सामाजिक इतिहासाच्या दृष्टीने उपर्युक्त उल्लेख महत्त्वाचे मानावे लागतील.

## स्थापत्य, गृह-नगर रचना —

मराठी जैन वाङ्मयात गृह-नगरादिकासंबंधी काही महत्त्वाचे उल्लेख आहेत.

शुभकर्माने मिळणाऱ्या गृहसंपत्तीचा विचार करताना गुणकीर्तीने घराचे पुढील प्रकार सांगितले आहेत. त्यात एक खणापासून ते तेरा खणी घरांपर्यंतचा समावेश आहे. सर्वतोभद्र मंदिरे, शांतशांतिमंदिरे, महासर्वतोभद्रमंदिरे, मेघमंडपमंदिरे, ऋतुदायक मंदिरे, देवमंदिरे, जिनमूर्तिमंदिरे, अष्टभोगमंदिरे, लक्ष्मीविलासमंदिरे, गजरथमंदिरे, अश्वरथमंदिरे, रूपरथमंदिरे अशी मंदिरांची नाममालिकाही गुणकीर्तीने दिली आहे. (ध. प. १२५). घरामोवती उपवने, वने, वाटिका असत (ध. प. १३५). माडी, धवळार, गोपूर असेही मंदिराच्या बांधकामात प्रकार असत. (श्रे. च. ज. १·१४). मंदिराच्या दरवाज्यावर कोरलेले मयूर, नक्षीदार कासवटे आणि बुळवटे यांनाही कनित् उल्लेख येतो. (श्रे. च. ज. १.५१).

जिनमंदिरांच्या रचनेचेही काही ठिकाणी सूक्ष्म वर्णन आले आहे. विशेषतः

रंगमंडप म्हणजे मंदिराचे एक आकर्षण असे, चौकीबद्ध खण, चांदवे, मेघडंबर पंचवर्णी पटकूलाचे अष्टदलकमल, मोत्यांचे घोस, चित्र्यांच्या भिंती, सोन्यारुप्याच्या रसाचे स्वस्तिक, जंबूद्वीप, अडीचद्वीप यांची माडणी, नंदीश्वर द्वीपांची रचना, त्रिलोक रचना, पंचमेरूची मांडणी आणि शांतिकाचे यागमंडल असा हा थाट रंगमंडपाचा असे. 'समोसरण रचना'ही येथे असे. तेथील चित्रशाळेत 'त्रेशष्ट शलाका पुरुषां'ची चित्रे असत. ( श्रे. च. गुण. १. २० ते ४० ).

नगरात मध्यभागी चौक असत. नगरामोवती तीन खंदक, कोट, कोठडी, दुर्ग. आणि पौवळी असत. ( श्रे. च. गुण १. २० ),

## सामाजिक जीवन दर्शविणारे काही संकीर्ण उल्लेख —

१ ) जहाजाने प्रवास करीत असता मीन वळी आत घुसतो. त्याला ध्यान तोफेने उडवावा अशा प्रकारचे रूपक इ. सनाच्या १८ शतकातील कवी जनार्दन याने योजले आहे. तोफेने मासा उडविण्याचा प्रकार केवळ कविकल्पनेतून निघाला नसेल असे वाटते. ( श्रे. च. ज. २५. १५१ ).

२ ) घरगुती वस्तूंतील पुढील वस्तूंचा उल्लेख महत्त्वाचा आहे. कुदळ, फावडे, पहार, गाडा, तलवार, नायण्याची दोरी, दाव, पालण, पाश, मुसळ, उखळ, चूल, ( श्रे. च. ज. ४३. ४४ ), पालखी, मकरमंचक, हंसतुलिका, डोल्हारे, सिंहासने, ( घ. प. १२७ ).

३ ) बायकांच्या तोंडी येणाऱ्या शिव्या :—( पुरुषाना दिलेल्या ) जळोजळो, डोळ्यात विंच्याची पिंडी घालीन, मरमर, काळतोंड्या, आग लागो तुझ्या लक्षणा, पाप्या, मेला, चांडाळा, दारची धूळ खाणारा, ( श्रे. च. गुण. ४.२०४, २.४५ ), श्वाना, राक्षसा, तरसा, मूर्खा, मुसळे चेंदा करीन ( श्रे. च. ज. २६.६७, ६८ ).

४ ) पुरुषांच्या तोंडातील शिव्या :--( स्त्रियांना दिलेल्या ) रांडे, चिपनखी, चटके, बटंकुर, पाइची वहान, ( श्रे. च. गुण. ३.२०९ – १२ ). चटवाकुळणी, आमसुकरी, मर्कटी, पिशाचा, वाम पायाची तुटकी वहाण, उंदर, ( श्रे. च. ज. २६.७९-९२ ).

५ ) लक्ष्मुळीचे तेल :--हे तेल कशापासून बनवीत हे समजत नाही. श्रेणिकचरित्रात त्याचा उल्लेख आला आहे. भारतात प्राचीनकाळी माजल्यावर या तेलाचा उपयोग करीत असावेत. सुवर्णांच्या वजनावर हे तेल विकले जाई. ( श्रे. च. गुण. ४.८५,८६, श्रे. च. ज. २४. ९४ ).

६ ) कुसुंब रंग :—कोसुंब रंग – कुसुंबाच्या टोपल्या फुलापासून हा रंग तयार करण्यात येई. हा रंग फार लवकर उडून जाई. ( ज. रा. २.२६१ ), ( श्रे च. ज. २९.२४. )

७ ) कृमिकार कंबळ :—माणसाच्या रक्ताने कांबळे रंगवून ते ' रत्न कांबळे ' म्हणून विकण्याचा उल्लेख येतो. कपिलद्वीपात हा धंदा चाले. माणसाच्या अष्टांगी शिरा देऊन गरम रक्त काढून त्यात कांबळे रंगवीत. ही चाल केव्हा व कोठे होती याची माहिती मात्र उपलब्ध होऊ शकली नाही. ( श्रे. च. गुण. ४.२३९ ).

८ ) मृतकासन व वेतालविद्या :—स्मशानात मृताप्रमाणे पडून ध्यान करणे हे मृतकासन असे. कधी कधी वेतालविद्या साध्य करणारे मांत्रिक स्मशानातील प्रेताच्या कवटीच्या चुलीवर खीर शिजवीत आणि तिचे सेवन करीत. मृतकासन करणाऱ्या साधूंच्या डोक्याचाही अशावेळी चुलीसाठी दगड बनविण्यात येई. ( श्रे. च. गुण. ४.७२ ).

## जैनेतर धर्मपंथ आणि देवदेवताविषयक उल्लेख —

मराठीतील जैन वाङ्मयातील जैनेतर धर्मपंथासंबंधी आणि देवदेवतासंबंधी आलेल्या उल्लेखाचा अभ्यास हा महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासाच्या अभ्यासकांना उपयुक्त होणार आहे. जैन ग्रंथांत जैनेतर धर्म किंवा पंथ याचे उल्लेख शक्यतो ते पंथ मिथ्या आहेत; जैन श्रावकांनी त्यांचा त्याग करावा या संदर्भात आहेत. गुणकीर्तिकृत धर्मामृत, रत्नकरण्डश्रावकाचार मराठी टीका, जनार्दनकृत श्रेणिकचरित्र, देवेंद्रकीर्तिकृत धर्मपरीक्षा, महीचंद्रकृत आदिपुराण, पंडित सूरिजनकृत परमहंसकथा या ग्रंथात जैनेतर धर्मपंथाविषयी टीका करताना काही माहितीही देण्यात आली आहे.

९६ पाखंडे — धर्मामृतात आणि जनार्दनकृत श्रेणिकचरित्रात ९६ पाखंडांचा उल्लेख आहे. तो वैशिष्ट्यपूर्ण आहे, दानाला पात्र नसलेल्याची यादी देताना ग्रंथकारांनी ही नावे दिली आहेत. हे दोन्ही ग्रंथ दिगंबर जैन लेखकांनी लिहिलेले आहेत. म्हणून श्वेतांबरादि जैन धर्मांगाचाही समावेश या ९६ मध्ये करण्यात आला आहे, पंधराव्या शतकातील गुणकीर्तींच्या मते ही ९६ पाखंडे पुढीलप्रमाणे होत :

१ ) जैनदर्शन पाखंड ( १६ )—श्वेतांबर, द्राविड, काष्ठ, आपल्संघ, भिलसंघ, अध्यात्मसंघ, लुंकासंघ, अपकर्मी, सुद्रसंघ, देवलोकी, एकमती, देवताकल्पी, संशयमती, समयमती, समानमती, वादादनमती. ऐतिहासिक दृष्टीने — श्वेतांबर, द्राविड, काष्ठा, लुंका, एवढेच महत्त्वाचे आहेत. जैनधर्मीयातही म. महावीरांनतर किती भेद पडले आणि तेही एकमेकांना कसे भिन्न लेखून स्वतःला मूळ मानू लागले याची कल्पना या यादीवरून येण्यासारखी आहे.

२ ) बौद्धदर्शनपाखंड (१६)—खंडचडे, खतघरे, डुंगरिये, कनिसर, वाकलिये, कुन्हाडे, नवघरे, येकल्वरती, जोडावरती, माल्यवरती, संशावरती, घंटावरती, वैशावरती, वायनिक, इच्छामोजनिक, बीजधर्मी. वरती म्हणजे व्रती. ती व्रते घेणारे एकेक संप्रदाय झाले असावेत. राहण्याची ठिकाणे, भिक्षा मागण्यासाठी निवडण्यात येणाऱ्या घरांची संख्या यावरूनही हे भेद पडले होते. पंधराव्या शतकात प्रत्यक्षात बौद्धधर्म महाराष्ट्रात

विशेषेकरून नव्हताच. पण यातील काही आडनावे मात्र सध्याच्या अस्पृश्य जातीत आढळतात असे धर्मामृत ग्रंथाचे संपादक[४२] म्हणतात.

३ ) **सांख्यदर्शनपाखंड** ( १६ ) — भगवंत, मरडे, स्नातक, चंद्रायणी, मुनिये, गुरव, गुगुळी, डंभिक, गलतिये, संखावादी, अवतारिये, नागरिये, पंचाक्षरिये, केवल सरिरिये, अर्कमतिये, कावडिये.

४ ) **शैवदर्शन पाखंड** (१६) — जटाधारी, लिंगधारी, पशुपति, कापालिक, चिलवंत, वीरभद्र, प्रसादिक, नग्नज, अयाचक, येकभिक्ष, मठपति, निरासि, जंगम, धाडिवाहे, पाउडिये, घंटावाल.

५ ) **मीमांसादर्शन** ( २६ ) — आवस्तिक, एकदंडी, द्विदंडी, त्रिदंडी, हंस, परमहंस, ब्रह्मयोगी, मायावादी, तत्ववादी, बोकडवादी, अग्निहोत्री, विपरित मति, जटकवडे, कीर्तनिये, कांचे, ध्यानिभट्ट.

६ ) **चार्वाकदर्शन पाखंड** ( १६ ) — जोगी, हरमेखली, इंद्रजाली, नागमती, कल्पमतिये, डांबकमती, घोडाचोली, नागपंथी, पागलपंथी, कापालिक, अवधूत, गर्भयोगी, अमरपंथी, पवनासनी, सून्यवादी, भूतवादी.

ही ९६ मते गुणकीर्तीने कोणत्या ग्रंथाच्या आधारे सांगितली आहेत हे समज शकले नाही. पण हीच नावे परंपरेने जनार्दनाने श्रेणिकचरित्रातही दिली आहेत. ( ध. प. ९२ ते ९९, श्रे. च. ज. अध्याय ३६ ).

**नाथपंथ** — *गुणकीर्तीने चार्वाकांत नाथपंथीयांचा समावेश केला आहे.* महाराष्ट्रात नाथपंथ ज्ञानेश्वरांच्या पूर्वी होता हे मुकुंदराजादिकांच्या–गुरुपरंपरेवरूनही स्पष्ट आहे. अवधूत–जोगी–कापालिक–अमरपंथी हीही नावे नाथपंथीयांचीच समजली जातात. जोगी हे मृगचर्म वापरणारे, मोकनी चेला-चेली ठेवणारे, मस्तकी जटा, कानी मुद्रा, गळ्यात रुद्राक्ष-रुंडमाला, हाती त्रिशूळ, घायळी झोळी, अंगी भस्मउटी अशा थाटात राहात असावेत असे मेदराजाने वर्णिलेल्या भैरव जोग्याच्या शब्दचित्रावरून दिसते. ( ज. रा. १.८६ ). हे योगी सुरा पिणारे, चौरदी गाणारे, नकटीसंगे गमन करणारे, शिंगिनाद करणारे, आणि गोरखीला स्मरणारे होते. (ज. रा. १.१६०-१६३ ). शंकर, नवनाथ, खंडेराव, मेंगनाथ, मैराल, वणग, छप्पनकोटी चामुंड्या आणि नवकोटी कात्यायणी यांचा समावेश नाथपंथीय देवदेवतात करण्यात आला आहे. ( ध. प. ३३ ). गुणकीर्तीने नाथपंथीयाचा उल्लेख चार्वाकांत करण्याचे कारण त्या काळचे त्यांचे वर्तन असावे. ज्ञानेश्वराचा आणि मुकुंद ' राजाचा अद्वयानंद ' सांगणारा नाथपंथ हा चार्वाक वाटत नाही. पण एक काळ असा आला असावा की शुभाशुभ कर्मात भेद न मानता भोगाळाच धर्म मानणे हेच भ्रष्ट नाथपंथीयाचे उद्दिष्ट झाले असावे. तेव्हा भोगवादी चार्वाक आणि हे नाथपंथीय एकच समजले जाऊ लागले.

---

४२. धर्मामृत प्रस्तावना २९.

' कवळिक ' आणि ' कानफाटे ' हे एकच समजले जाऊ लागले होते. ते कष्टविद्येसाठी प्रसिद्ध मानले जात. ( का. पु. ८.३३ ). नाथपंथाच्या उत्पत्तीसंबंधी जैन कल्पनेप्रमाणे एक कथा सांगण्यात येते ती अशी—

आदिनाथ भगवंतांनी दीक्षा घेतल्यानंतर एक वर्ष आहार घेतला नाही. त्याचे अनुकरण करण्याचा काहींनी प्रयत्न केला; पण त्यांची ती तपश्चर्या त्यांना झेपली नाही. अशा लोकांपैकी नाथपंथीयसुद्धा आहेत. कित्येक तापसी देवीकडे आले आणि आम्ही यावेळी कसे आचरण करावे ते सांगा म्हणाले. तिने जिनमुद्रा धारण करण्यास सांगितले. नंतर ते जिनेश्वराकडे आले. पण त्यांची ती शांत विकारहीन मुद्रा त्यांना फार कठीण वाटली. म्हणून मुदीच्या मुद्रा करून त्या तापस्यांनी भगवंतापुढे ठेवल्या आणि ग्रहण करा म्हणून त्याना विनंती केली. भगवंताची चरणधूळ मस्तकी लावली. तेव्हापासून नाथपंथ अस्तित्वात आला. ( मुद्रा केल्या असे मुदीच्या । चरणापुढे ठेविल्या स्वामीच्या । स्वामी घाला कर्णी अमुच्या । ह्या मुद्रिका ॥ चरणाची धुळी घेऊन । लाविली मस्तका उचलून । ही अमुची विभूति म्हणून । सर्वांनी तेधवा ॥ ३७ ॥ हे मत झाले तेथून । नाथपंथी ज्ञानहीन । सत्य उपदेशाविन । कदा नोहे ॥ आ. पु.-८.३६–३८.

**महानुभावपंथ** – महानुभावपंथाचा विशेष प्रसार विदर्भात होता. प्राचीन मराठी जैन वाङ्मयाची निर्मितिस्थानेही वऱ्हाडातच जास्त होती. पण महानुभावपंथासंबंधी उल्लेख मात्र जैन वाङ्मयात कमीच आले आहेत. गुणकीर्तीने मात्र कृष्ण, दत्त, चांग, गोंडमराउळ आणि चक्रधर या महानुभावीय देवतांचा उल्लेख केला आहे. ( ध. प. ३२ ). तसेच कुतीर्थांचे वर्णन करताना रिद्धपूर, चांगदेव यांचा उल्लेख केला आहे. ध. प. ११४ ).

**जंगम** – वीरशैवांपैकी जंगमाचा उल्लेख वन्याच वेळा येतो. पंधराव्या शतकातील गुणकीर्तीने शैवदर्शनपाखंड सांगताना तेरावा क्रमांक ' जंगम 'ना दिला आहे. ( ध. प. ९८ ). कुसंगरूप अधर्म सांगतानाही जंगममार्गाचा उल्लेख आला आहे. ( ध. प. ११५ ). कर्नाटकातून मराठवाड्याकडे लिंगायतधर्म जसजसा पसरू लागला तसतसे त्यासंबंधी उल्लेख मराठी जैन ग्रंथांत येऊ लागले असावेत. ' कानडे जंगम ' म्हणून त्यांना महाराष्ट्रीय लोक हीनही लेखत असावेत. ( का. पु. १३·२–३ ). जंगम हे नमस्कार करताना ' शरणार्थ ' म्हणतात. ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ति ७.१२५ ). जंगम लोक श्रीकृष्णाच्या प्रतिमेचा तिरस्कार करतात हे सांगताना जनार्दन म्हणतो, ' माधवप्रतिमा पाहून जंगमाला कंटाळा येतो तसे अहंकारी माणसाला माझे काव्य आवडणार नाही. ' ( श्रे. च. ज. २४.२४ ). जंगम हे नाव लिंगायत मठपतींना आहे. ते लिंगायत समाजातील धार्मिक संस्काराचे काम करतात. ते लोभीपणाने प्रेतदक्षिणेसाठी प्रेतामागे पळतात असा कालिकापुराणकारांनी उल्लेख केला आहे. ( ८.२२, का. पु. ).

**मुसलमान** – ज्या काळात मराठीत जैन साहित्याला आरंभ झाला, त्या

काळात महाराष्ट्रात मुसलमान धर्म हा रुजला होता. मुसलमानांना म्लेंच्छ म्हणून बहुतेक ग्रंथकार संबोधतात. ( ध. प. ११५ ). जैन धर्मात एकान्त, विपरीत, संशय, विनय, आणि अज्ञान अशी पाच मिथ्यात्वे मानली जातात. त्यांतील अज्ञान मिथ्यात्वात म्लेंच्छांचा समावेश केला जाऊ लागला. (प. क. पृ. २२). त्यांनी 'येश्कार' मानविल्याची तक्रार सुरू झाली. ( प. क. पृ. २३ ). 'अज्ञानमत तुरकाचे' असल्याचा उल्लेख 'धर्मपरीक्षाकारा'ने स्पष्टपणे केला आहे. त्यांच्यासंबंधी त्याने पुढील-प्रमाणे वर्णन केले आहे. ते पशुवध करतात, कृतांतासमान आहेत, बिंबमूर्ती पाहून उपसर्ग करतात, भिंतीला मशीद म्हणतात. मूर्तिकेवर वस्त्र व पुष्पे ठेवून पीर असे म्हणतात, 'अल्लक' म्हणून प्रार्थना करतात. ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ति, ७.७७,८.८५)

**श्वेतांबर** – जैनधर्मातील दिगंबर आणि श्वेतांबर संप्रदायांतील दार्शनिक मतभेद पुढेपुढे विकोपाला जाऊन दिगंबरपंथीय लेखक श्वेतांबरांना जैनदर्शन पाखंडात समाविष्ट करू लागले. निदान पंधराव्या शतकातील मराठी ग्रंथांवरून तरी तसे स्पष्ट दिसते. ( ध. प. ९४ ). श्वेतांबर हे संयम मिथ्याली समजले जात. ( प. क. पृ. २७ ). ते मल्लिनाथ तीर्थंकरांना स्त्री मानतात. थोडा ( फ्यू ) गणधर होता म्हणतात. दारोदारी भिक्षा मागतात. विटाळ मानीत नाहीत. दिगंबर मूर्तींवर दागिने चढवितात म्हणून त्यांच्यावर टीका केली जाई. ( प. क. पृ. २८ ). श्वेतांबर हे गृहस्थाश्रमात मोक्ष मानतात. 'केवली–कवलाहार' मानतात. चर्मात ठेवलेल्या पाणी, तेल आदि वस्तूंचा आहाराव स्वीकार करतात. चर्मातील हिंग खातात. हातात काठी बाळगतात. याप्रमाणे तत्त्वज्ञान व आचारविषयक भेद विकोपाला जाऊन श्वेतांबरांनाही जणू काही जैनेतर समजून दिगंबर लेखक या काळात टीका करू लागले होते. ( धर्मपरीक्षा, ७.६७–७२. देवेंद्रकीर्ती ).

**इतर** – भारतीय प्राचीन धर्म-दर्शनांपैकी शैव, यज्ञमार्गी, वैष्णव, बौद्ध, चार्वाक, नैयायिक, सन्यासमार्गी यांचा वेगवेगळा उल्लेख करून त्यांचे खंडन करण्यात आले आहे. (प. क. पृ २२.२७). तरी यांतील प्रत्येक दर्शन मध्ययुगात अस्तित्वात होते असे मात्र म्हणवत नाही. पण पुढेपुढे ही टीका आधिक्य स्वरूपाची होऊ लागली. लोकाचार व कुलाचार सांगून ब्राह्मण लोक लोकांना फसवितात. 'लोकु धंदावयाकरणे। हे मत स्थापिले ब्राह्मणे। वेदशास्त्रांचे बोलणे। कदापि नव्हे' ( ज. रा. ५.३३ ). असे म्हणून ब्राह्मणांच्या स्वार्थीपणावर आघात केला जात होता. श्रावणमासात दक्षिणेसाठी भट मांडतात. ( का. पु. ८.२२ ). दडधारी लोक बडबडतात. मदिरापान केल्याप्रमाणे त्यांची स्थिती असते. भिक्षान्नासाठी पोटार्थी बनलेले हे लोक पिंड पाहून कावळ्या-प्रमाणे कोल्हाळ करतात. अग्निहोत्री याग करतो पण अंग विकणाऱ्या गणिकेप्रमाणे त्याची अवस्था आहे अशी टीका करण्यात येऊन जटा वाढविणाऱ्या, लंगोट लाव-णाऱ्या, घरणे देऊन पोटास मागणाऱ्या लोकांवर 'दुनारामी' पद्धतीने जनार्दनाने हल्ला चढविला आहे. ( श्रे. च. ब. २६.३०१–१८ ). वैष्णव हे टिळा, पुंडरीक गंध,

तुळसीमाळा धारण करतात असे जनार्दन सांगतो. ( श्रे. च. ज. ४.२८--७२ ). भक्तीच्या नावाखाली देवाला जीभ, डोळे, अर्पण करणारे काही अघोरी पंथ असल्याचे दिसतात. ( सु. च. वीरदास १४.६१--६२ ). षड्दर्शने म्हणून दंडी, मूढी, कौली, रुद्र, बौद्ध आणि सिद्धांत हीही नावे पाहण्यास मिळतात. ( का. पु. ७.७१.८० ). वैरागी, साई, दुडिये, संशयी, घाटपंथी, ( ? ) अशा सहा पाखंडांचाही उल्लेख येतो. ( धर्मपरीक्षा देवेंद्रकीर्ती, ७.७३--७४ ). बौद्ध हे एकान्तमतवादी, ब्राह्मण हे विपरीत मतवादी, तापसी हे विनय मतवादी, श्वेतांबर हे संशयमतवादी, आणि तुरुक हे अज्ञान-मतवादी अशी टीका जैन लेखक करताना दिसतात ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ती ७.४९-५० ).

देवदेवता ---

जैन देवदेवतात तीर्थंकरांशिवाय पद्मावती व क्षेत्रपाल या देवतांचे सामान्य लोकात फार महत्त्व आहे.

**पद्मावतीः**--मध्ययुगात जैनपरंपरेत पद्मावती या देवतेला विशेष महत्त्व आले होते. मराठीतील जैन ग्रंथात तिच्याविषयी बरीच माहिती पाहण्यास मिळते. ऐतिहासिक दृष्टीने पाहिल्यास सन पूर्व ९ व्या शतकात झालेले तीर्थंकर पार्श्वनाथ यांची पद्मावती ही शासनदेवता मानली जाते.१ यांनी एकदा मरणासन्न नागनागिणीला धर्मोपदेश केला. त्यामुळे पुढल्या भवात त्या दोघाना धरणेंद्रदेव व पद्मावती देवी या नागकुमार देवतांचे पद-प्राप्त झाले. ही कथा जैन वाङ्मयात प्रसिद्ध आहे. पार्श्वनाथांनी संसारत्याग केल्यानंतर ते तप करू लागले. तेव्हा त्यांच्या पूर्वभवातला अन्यमतीय शत्रू कमठासुर याने त्यांच्यावर घोर उपसर्ग केला. त्यावेळी पाताळातून वर येऊन धरणेंद्र व पद्मावती यांनी उपसर्ग दूर केला. पद्मावतीच्या ज्या मूर्ती आढळतात त्यांत तिच्या मस्तकावर पार्श्वनाथाची प्रतिमा असते. त्यावर धरणेंद्र नागाचा फणा असतो. जैन यक्षयक्षिणींच्या नामावलीत पार्श्वनाथ तीर्थंकराची शासनदेवता म्हणून पद्मावतीचा उल्लेख येतो. ( प. प. ३५ ).

कालांतराने पद्मावतीची स्वतंत्र पूजा-अर्चा होऊ लागली. ती वरदायिनी व दुष्ट संहारिणी देवता मानण्यात येऊ लागली.

( अंबे तू प्रतिवासरी निजबले दुष्टासि संहारिसि । वेगी येऊनि धाव सत्वर करी साधूसि संरक्षिसी ॥ १ ॥ पद्मावती स्तोत्र, जिनसागर ). हीच पद्मावती बौद्धात 'तारा', शैवांत 'भगवती', कौलिकात 'वज्रायनी', वेदांत 'गायत्री', आणि सांख्यांत 'माया' म्हणून पूजिली जाते, असे जैन ग्रंथकारच सांगू लागले. ( पद्मावती स्तोत्र, ३ जिनसागर; श्रेणिकचरित्र, जनार्दन २५.८, कालिकापुराण, ७.८१, ८२, ८३ ). ही पद्मावती म्हणजे आदिशक्ति--मूलमाया आहे. जिनमतात 'सेवदा' असेही या देवीचे नाव आहे, असे कालिकापुराणकार सांगतात. ( का. पु. ७.८२ ). मराठवाडा आणि विदर्भात जैन लोकांत अद्यापि सेवदा पूजा-- ( पद्मा-

वतीचा उत्सव) फार मोठ्या प्रमाणात करण्यात येते. श्रेणिकचरित्रकर्ते तर 'मुसळधारिण, अंबिका' म्हणून पद्मावतीचे वंदन करतात. (श्रे. च. अ. २५. १, २). मुनेश्वराने विराट पर्वात " तारा तूच उत्तागमी । गौरी भगवती शैवधर्मी । वज्रादेवी यया नामी । कौलिकाचारे बोलिजे । जैन म्हणती पद्मावती । त्रिपदा गायत्री देवमती । सांख्य बोलती तुजप्रति । आदिशक्ति व्यापके । " ( १.७६, ७७ ). असा जो उल्लेख केला आहे त्याचाच परिणाम जिनसागरादि लेखकांवर होऊन पद्मावतीचे हे नवे रूप तयार झाले असावे.

क्षेत्रपालः—जैन पूजाविधानात पंचक्षेत्रपाल मानतात. प्रत्येक महत्त्वाच्या क्षेत्राच्या ठिकाणी मंदिराबाहेर क्षेत्रपालाचेही एक देऊळ असते. बेळगाव जिल्ह्यातील स्तवनिधीसारखी काही क्षेत्रे तर केवळ क्षेत्रपालासाठीच आजही प्रसिद्ध आहेत. विजय, वीरभद्र, मणिभद्र, भैरव, अपराजित असे हे पाच क्षेत्रपाल आहेत. स्तवनिधीचा क्षेत्रपाल मात्र ब्रह्माप्पा-भरमाप्पा म्हणून प्रसिद्ध आहे. क्षेत्रपाल हा जिनशासन देव आहे. तो जिनभक्तांचे रक्षण करतो या भावनेने मराठीतही त्यासंबंधी काही रचना झाल्या आहेत. या क्षेत्रपालाचे वर्णन जिनसागराने पुढीलप्रमाणे केले आहे. त्याला चार बाहू असतात. खड्ग, गदा, चक्र ही शस्त्रे त्याच्या हातात असतात. थाळी व तोरड हे त्याचे आवडते अलंकार आहेत. लाडू, लापसी, दुग्ध, तिळचे, मांडे, पोळ्या, पापड याचे नैवेद्य त्याला आवडते. त्याला पाहून भूत-प्रेत-पिशाच पळतात. ( क्षेत्रपाल स्तोत्र ४. ५. ६ ).

सरस्वतीः—सरस्वती किंवा शारदा ही देवी मानून ग्रंथारंभी अथवा प्रत्येक अध्यायाच्या आरंभी तिची स्तुती करण्याची रीत मराठीतील जैन साहित्यात विशेषतः अधिक दिसते. ही हंसवाहिनी असून तीर्थंकराच्या ध्वनीपासून उत्पन्न झाली असे मानण्यात येते. ( श्रे. च. गुणदास १. ७, ८. ). ही वाग्देवीच षड्दर्शनाची संस्थापिका आहे. विष्णू, रुद्र हे तिलाच अनुष्ठानात जपतात. ( जिनदास ह. पु. १. ६, ७. ). बहुतेक सर्व कवींनी सरस्वती ही हंसवाहिनी असल्याचा उल्लेख केला आहे. तिला 'मयूरवाहना' म्हणताना कोणीच दिसत नाही. या संदर्भात काही संशोधन [४३] झाले आहे. त्याचा विचार केल्यानंतर " दिगंबर पंथच महाराष्ट्रात प्रामुख्याने दिसत असून त्याने मूळच्या हंसवाहना सरस्वतीला मयूरवाहना करून महाराष्ट्राची विद्यादेवी शारदा बनविली. हे श्री. चिं. ग. कर्वे याचे मत[४४] कशावरून बनविले गेले हे समजत नाही.

दश अवतार :— मत्स्य, कच्छ, वराह, कूर्म, नरसिंह, वामन, परशुराम,

---

४३. Yasastilak and Indian Culture, page 404-5; अनेकान्त, वर्ष ८, किरण १.

४४. सन्मति, नोव्हेंबर १९५३.

कृष्ण व राम हे अतीत अवतार, बौद्धावतार हा वर्तमान व कलंकी अवतार हा अनागत अवतार मानून धर्मपरीक्षाकाराने हे सर्व जीव मिथ्यात्वी असल्याचे सांगितले आहे. ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ती, ५. ९, १०. ) धर्मामृतकाराने दशावतारांच्या नावानंतर दामोदर, पीतांबर, विठ्ठल, जगन्नाथ, त्रिमल्ल–तिरुमल यांची नावे दिली आहेत. ( ध. प. ३४ ). कल्की – कलंकी अवताराचे वर्णन जैन ग्रंथात[४५] अगदी प्राचीन काळापासून येते. मराठीत या अवताराचे वर्णन जिनसागराने केले आहे. हा कलंकी राजा यतींच्या आहारावरही कर बसवील आणि तेथून सर्वत्र हाहाःकार होईल असे जैन परंपरेत मानले जाते. ( कवने, जिनसागर ११ ).

**इतर देवता** :— इ. सनाच्या पंधराव्या शतकातील गुणकीर्तीने तत्कालीन अनेक देवतांचा उल्लेख केला आहे. त्यांपैकी पुढील उल्लेख महत्त्वाचे मानावे लागतील. म्हाळिसी, एकवीरा, तुळजा, गिरिजा, गौरी, भवानी, शक्ति ( ध. प. ३६, ३५ ). तेल, शेंदूर, पाषाण, एकत्रित आले की देव तयार होतो अशी टिंगलही या देवदेवतांचा सुकाळ पाहून जनार्दनाने केली आहे. ( श्रे. च. ज. ३७. ५० ). हरसुलीदेवी ही उज्जैनीकडे प्रसिद्ध असावी ( धर्मपरीक्षा, देवेंद्रकीर्ती, ६. १२३ ). कात्यायनी ही देवी कुलदेवता म्हणून पूजिली जात असे. ( ज. रा. २.३०८ ).

## काही निष्कर्ष —

या प्रकरणात तत्कालीन ऐतिहासिक, भौगोलिक व लोकांचे धार्मिक व सामाजिक जीवनदर्शन घडविणारे जे उल्लेख मराठीतील जैन ग्रंथात आले आहेत त्यावरून मिळणारी माहिती एकत्रित केली आहे. इ. सनाच्या १५व्या शतकापासून तो १८व्या शतकापर्यंत जवळ जवळ ४०० वर्षात विदर्भ व मराठवाड्यात जो जैन समाज राहात होता त्याचे जीवन या उल्लेखावरून साधारणपणे दिसून येते. इतर समाजही त्यात पाहण्यास मिळतो. पण तो प्रामुख्याने नव्हे.

ऐतिहासिक उल्लेखावरुन असा निष्कर्ष निघतो की जैन साहित्यात ऐतिहासिक घडामोडींचे प्रतिबिंब फार मोठ्या प्रमाणात उमटले नाही. मुसलमानांचे आगमन त्या काळात महाराष्ट्रात झाले होते. ही सत्ता बद्धमूल झाली होती. सर्वच धर्मीयांना त्यांचा त्रास होत होता. कधी कधी जैन समाजास मुसलमानी सत्ता मदतही करीत असे. असे कालिकापुराणातील कथेवरून वाटते.

सामाजिक दृष्टीने त्या काळातील लोकजीवन मराठीतील जैन ग्रंथांत जे उमटले आहे, त्यावरून ते सुखी होते असे म्हटले पाहिजे व्यापारी समाज हाच खरा या वाङ्मयात दिसणारा समाज आहे. गरिबी किंवा दारिद्र्य असणे हे पूर्वपापाचे फळ आणि वैभवाची प्राप्ती होणे हे पूर्वपुण्याचे फळ ही समजूत दृढ असल्याने वाट्यास

४५. तिलोयपण्णत्ती ४. १५०९ ते १५३०.

आलेली दुःखे लोक निमूटपणे भोगीत आणि वैभव प्राप्त झालेले लोकही इतरांची फारशी फिकीर न बाळगता आपले जीवन कंठीत असत.

धार्मिक दृष्टया ते जीवन अनेक शाखोपशाखांत दुभंगले गेले होते असे म्हटले पाहिजे. जैन धर्मातही पंथापंथांतील वैमनस्य वाढून एकमेकांवर टीका प्रतिटीका चालू झाल्या होत्या. मूळ वैदिक, सांख्य, चार्वाक, नैयायिक, मीमांसक व जैन ही षड्दर्शने प्रेमातच राहून पुढे पुढे त्यातून जे पंथ प्रस्थापित झाले आणि वेगवेगळ्या देवतांची उपासना प्रत्येकाने चालू केली. त्यामुळे ती ती ज्ञात वेगळी झाली. धंद्यावरून जाती तयार झाल्या. जाती, देवदेवता आणि बाह्य आचारधर्म यांच्या चक्रात तत्कालीन लोक-जीवन अडकले होते.

जैनेतर समाजाचे जीवन फारसे प्रतिबिंबित न होऊनही हे जैन वाङ्मय महाराष्ट्राच्या लोकजीवनाच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचे आहे. जैनेतरांसंबंधी जैनात काय बोलले जाई, जैन लेखक इतर समाजाकडे, पंथीयांकडे कोणत्या दृष्टिकोणातून पाहात असत हे समजण्याच्या अपेक्षेने या ग्रंथांचा अभ्यास हा महत्त्वाचा मानावा लागेल.

• • •

## प्रकरण ६ वे

# प्राचीन मराठी जैन साहित्याचे वाङ्मयीन परिशीलन.

### वाङ्मयीन परिशीलनाचे महत्त्व--

प्राचीन मराठीतील साहित्याकडे पाहताना अनेक दृष्टिकोण स्वीकारावे लागतात. ते साहित्य केवळ धार्मिक स्वरूपाचे आहे अथवा त्यातून पुराणकथा आणि तत्त्वज्ञान सांगितले गेले आहेत अथवा त्यातून तत्कालीन इतिहास व सामाजिक जीवन हे पाहण्यास मिळतात यामुळेच ते साहित्य श्रेष्ठ दर्जाचे आहे असे म्हणता येणार नाही. साहित्याचे मूल्यमापन हे वाङ्मयीन गुणांवर केले जाणे आवश्यक आहे. नरेंद्रकृत रुक्मिणी-स्वयंवर, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, तुकारामाची गाथा, मुक्तेश्वराचे महाभारत आणि मोरोपंतविरचित महाभारतादि ग्रंथ यांचे महत्त्व केवळ तत्त्वज्ञानविषयक अथवा पुराण कथा सांगणारे ग्रंथ म्हणून नाही. अंगभूत साहित्य गुणांनी ते ग्रंथ संपन्न आहेत म्हणून त्यांचे विशेष महत्त्व मानले जाते. मराठी जैन ग्रंथासंबंधानेही हाच दृष्टिकोण बाळगून त्या ग्रंथांचे वाङ्मयीन परिशीलन करणे आवश्यक आहे.

### मराठी भाषेसंबंधी जैन साहित्यिकांचा दृष्टिकोण--

प्रस्तुत साहित्याचे वाङ्मयीन परिशीलन करीत असता, प्रथम प्रश्न नजरेसमोर हा येतो की हे साहित्य निर्माण करणाऱ्या लेखकांचा अथवा कवींचा मराठी भाषेकडे पाहण्याचा दृष्टिकोण कोणता होता. त्याचे उत्तर एवढेच देता येईल की, नाथ भागवतादि पंथीय लेखकांची मराठी भाषेकडे पाहण्याची जी दृष्टी होती तीच याही लेखकांची होती. ज्ञानेश्वर ज्या वेळी ' अमृतातेहि पैजा जिंके । ऐसी अक्षरे रसिकें मेळवीन ' अशी प्रतिज्ञा करतात त्या वेळी ते संस्कृताचा अपमान करतात व मराठीची श्रेष्ठता वाढवितात असे म्हणता येणार नाही. त्यांच्या म्हणण्याचा आशय इतकाच घेतला पाहिजे की मराठीतही संस्कृतप्रमाणेच अर्थ अथवा रस यांची अभिव्यक्ती होऊ शकते. ज्या काळी जी भाषा लोकांना समजत नाही त्या काळी त्या भाषेचा साहित्यिकांनी उपयोग करण्यात विशेष अर्थ नसतो. जैन धर्मीय प्राचीन व मध्ययुगीन साहित्यिकांनी हाच दृष्टिकोण समोर ठेवला होता. म. महावीरांच्या काळी

प्राकृत, मध्ययुगात अपभ्रंश आणि नंतरच्या काळात देशी बोली यांचा उपयोग आपल्या धर्मप्रसारासाठी त्यांनी केला होता. असे असवाही मराठीत जैन साहित्य लवकर निर्माण होऊ शकले नाही हे थोडेसे विसंगत दिसते. पण याची चर्चा मी पहिल्या प्रकरणात केली असल्यामुळे येथे त्यासंबंधी काही ऊहापोह करीत नाही.

पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धापासून विदर्भ–मराठवाडा या प्रदेशात मराठीतून जैन साहित्य निर्माण होऊ लागले. गुणदास–गुणकीर्ती हा आज उपलब्ध लेखकांत पहिला जैन कवी मानावा लागेल. त्यांनी निर्माण केलेली ही मराठी जैन परंपरा थेट १९ व्या शतकापर्यंत चालत राहिली. एक गोष्ट निश्चित आहे की जैन लेखकांनी भाषा-अथवा प्रदेश यांचा अभिनिवेश कोठेही बाळगला नाही. मराठीसुद्धा इतर भाषां-प्रमाणेच एक भाषा आहे आणि महाराष्ट्रातील जनतेला धर्म किंवा धर्मकथा सांगावयाची तर त्याची भाषा जी मराठी तिच्यातून ते सांगणे आवश्यक आहे इतकाच त्यांचा दृष्टिकोण होता. महानुभावाप्रमाणे जैन धर्मीयांनी स्वतःवर प्रादेशिक बंधन लादून घेतले नव्हते. म्हणूनच गुजरात आणि कर्नाटक या प्रदेशांतूनही साहित्यिक देवाण मराठीत होऊ शकली. एकनाथ किंवा मुक्तेश्वराप्रमाणे जनार्दनालाही हटवादी संस्कृत-प्रिय पंडिताना स्वस्थ बसविण्यासाठी मराठीची तरफदारी करावी लागली हेही लक्षात घेतले पाहिजे. परंतु त्यामागे भाषाभिवृद्धीचा हेतू होता असे मात्र म्हणता येणार नाही. धर्मप्रसार हा हेतू असून संस्कृत-प्राकृतातील ग्रंथ लोकांना समजत नाहीत म्हणून आम्ही मराठीत ग्रंथरचना करतो असे सांगणारे साहित्यिक जास्त आहेत. मेघराज, कामराज, गुणदास, सूरिजन या प्रारंभीच्या आघाडीवरील जैन ग्रंथकाराची गुरु परंपरा पाहता ते गुजराती बोलणारे व वाचणारे होते आणि त्याचे ग्रंथाधार गुजराती होते हे विशेष आहे. ब्रह्म शांतिदासाला गुरू मानणाऱ्या बऱ्याच लेखकांनी व गुणदासानेही ब्रह्मजिनदासाचे गुजराती ग्रंथ मराठीत आणण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. गुजराती भाषेप्रमाणेच कन्नड भाषेशी मराठीचे सख्य जोडण्याचे काम जैन साहित्यिकांनी केले आहे. पुण्यास्रव कथा-कोश ( ७९. ९३ ), गिरिसुतकृत पांडवपुराण ( १. १५–१६ ), कर्माष्टमीकथा ( ११२ ), हे ग्रंथ कन्नडमधून मराठीत आणले गेले आहेत. म्हणजे तत्काळी इतर प्रदेशातील लोक-भाषेत असणारे साहित्य मराठीत आणून ठेवण्याचा प्रयत्न जैन लेखकांनी केला असे म्हणावे लागेल. केवळ जुन्या संस्कृत व प्राकृत या भाषांचाच आधार त्यांनी घेतला नाही.

मराठीसंबंधी जैन साहित्यिकाचा दृष्टिकोण समजावून घेण्याच्या दृष्टीने पुढील काही उल्लेख महत्त्वाचे आहेत.

—गोमटी अशी हरिवंशकथा मराठी भाषेच्या अमृतघटात आणल्याचे सांगून पुण्यसागराने मराठीची रुची वाढविली आहे[1]. मेघराज व कामराज या

१. हरिवंशकथा गोमटी । महाराष्ट्र भाषा अमृत घटीं ।
खडित पूर्ण केली शेवटी । पुण्यसागरें ॥ ६०.७८. ह. पु.

दोघांनीही आपणास मराठी भाषा चांगली येत नसतानाही मराठीत ग्रंथरचना करीत असल्याचे सांगितले आहे.[२] विदर्भातील जनतेला मराठीतून जैन ग्रंथ वाचण्यास मिळावेत हीच एकमेव इच्छा या प्रयत्नामागे होती. गंगादास तर स्पष्ट सांगतो की तो गुर्जर देशवासीय होता म्हणून त्याला मराठी भाषा विशेष चांगली येत नाही.[३]

मराठीची सर्वांत अधिक तरफदारी करणारा कवी जनार्दन आहे. तो म्हणतो "मराठीतील रचना आम्ही ऐकणार नाही. आमच्या जवळ शुद्ध संस्कृत आहे अशी अहंता पंडितांनी बाळगू नये. वास्तविक पाहता दोन्ही भाषात द्वैत नाही. संस्कृत भाषेत निंदा केली तरी ती काय महापावन होऊ शकेल? अथवा मराठीत स्तुती केली तर ती काय व्यर्थ जाईल? हे महाश्रोता! छप्पन भाषांपैकी कोणत्याही एका भाषेत जरी स्तुती केली तरी ती भगवंताला प्राप्त होते. सज्ञानी लोकांना संस्कृत किंवा प्राकृतापेक्षा भगवंताची गोडी असते. गाय काळी अथवा तांबडी असली तरी क्षीर-चव वाकडी असणार नाही."[४] कवी जिनसागरालाही मराठीचा अभिमान होता. "रसिक जनहो ही मराठी भाषा फार गोड आहे. जिनगुणकथा जींत भरली आहे अशी ही मिठाईच आहे." "मराठी भाषा ही अर्थाला खोल आहे. सज्जनाना शुभ तत्त्व खोलून दाखविणारी आहे." असे तो म्हणतो[५].

संस्कृत भाषा लोकांना कळत नाही म्हणून आम्ही मराठीत ग्रंथरचना करतो असे काहींनी स्पष्टपणे सांगितले आहे. "या पंचमकालात बुद्धी ही उत्तरोत्तर हीन होत जाते. संस्कृताच्या वाटेस कोणी जात नाहीत म्हणून मी मराठी श्लोक करतो आहे" असे उपदेशरत्नमालाकार रत्नकीर्ती म्हणतात.[६] हीच तक्रार जिनसेनाची आहे. "संस्कृत भाषा सर्वांना समजत नाही म्हणून मी मराठीत ग्रंथरचना करतो"[७] "पूर्वी सकलकीर्तीने जंबुस्वामीचे चरित्र संस्कृतात वर्णिले होतेच. पण ती गीर्वाण भाष

२. नेणुं मी मऱ्हाटें बोलणे। नेणुं वोवीची बंधने।
अक्षर होय अदिक उणें। ते नैनवे मज ॥ ५.११६० ज. रा.
नये मऱ्हाष्ट बोलता। नये वोवी बांधता।
क्षमा करावी बुद्धीवंता। श्रुतिया जी ॥ १५.९८३ सु. च. का.

३. मराष्ट भाषा न केले माझा गुजर देशे वास।
अल्पमति म्ये केला कविजन पाहावे विलास रे ॥

—पार्श्वनाथ भवांतर ४५.

४. श्रे. च. ज. २४. १९८, १९९, २००
५. अनंतव्रतकथा ६, आदित्यव्रतकथा ४.
६. उपदेशरत्नमाला, (रत्नकीर्ती) (४०.४९).
७ उपदेश रत्नमाला – जिनसेन १.१४.

कळत नाही म्हणून बाळबोधार्थ ही रचना मी करीत आहे " [८] असे त्यांनी सांगितले आहे.

" लोक प्राकृत आहेत. देशभाषेनेच त्यांचे समाधान होईल म्हणून मी मराठीत रचना करतो " असे सुदर्शन चरित्रात वीरदास सांगतात.[९]

" आदिपुराण गीर्वाणवाणीत होते. पण ते बाळगोपाळांना कळत नव्हते म्हणून ब्रह्मजिनदासाने ते रासभाषेत आणले. विशालकीर्तींच्या कृपेने मी रास पाहून देशभाषा–मराठीत त्याचे कथन केले. हिरा पारखण्यासाठी जोहरी लागतो. अज्ञान पारध्यांना काही कळत नाही. धर्मप्रभावनेसाठी ही कथा सुगम केली. लेकराहाती श्रीफळ देऊन त्याला काय स्वाद कळणार ? म्हणून त्याच्या हाती सोलून केळ दिले आहे. " असे आदिपुराणकार महीचंद्र म्हणतो[१०]. 'ही महाराष्ट्रवाणी लडिवाळ व रसाळ असून ती भावपूर्वक ऐका. हृदयातील मत्सरमळ काढून निर्मळ बुद्धीने ती ऐकावी, असे जनार्दन विनयाने प्रार्थितो[११]. ' केवळ माझा ग्रंथ मराठीत आहे म्हणूनच त्याची अवहेलना होणार असेल तर न मारिताच मला मरण आले म्हणावे लागेल ' अशी प्रखर भाषा जनार्दनाची मराठीतील स्वत:च्या ग्रंथावर आहे.[१२]

मराठी ही देशभाषा म्हणून तिचा अंगीकार करणे आवश्यक झाले. मराठीला देशभाषेचा मान मिळणे याचा अर्थ इतकाच आहे की, ती लोकभाषा झाली होती. कित्येक मराठी ग्रंथकार मराठीचा ' देशभाषा ' म्हणून उल्लेख करतात त्यावेळी ' देशीभाषा ' या अर्थी ती संज्ञा वापरतात की महाराष्ट्र देशाची भाषा म्हणून ती संज्ञा वापरतात याविषयी निश्चित मत व्यक्त करता येत नाही. महीचंद्राने गुजरातीला ' रासभाषा ' म्हटलें असून मराठीला 'देशभाषा' म्हटले आहे.[१३] पण रासभाषा म्हणजे त्यात रासाची रचना होई एवढाच येथे अर्थ घेतला पाहिजे. वीरदासदेखील मराठीला ' देसभासा ' म्हणतात. देशभाषेतील सुगम बोलांत देहपाश तोडण्याचेच सामर्थ्य आहे असे तो अभिमानाने सांगतो.[१४] या कवींनंतरी

८. जंबुस्वामी पुराण — जिनसेन १.२५
९. सु. च. वी. १. १३, १४.
१०. आदि पु. १. ४, ५, ६, ७.
११. महाराष्ट्र वाणी लडिवाळ । मार्वे परिसावी रसाळ ।
काढोनी हृदयींचा मत्सरमळ । बुद्धिनिर्मळ परिसा ॥ २७·२१३ श्रे. च. ज.
१२. श्रे. च. ज. ३२·३६.
१३. विशाल कीर्तिचें कृपेन । महीचंद्रे रास पाहून ।
महाराष्ट्र केलें कथन । देशभाषा ॥ १.५ आ. पु.
१४. ये कथेसि हेचि कारण । जे मन्हाष्ट्र केले निर्माण ।
देशभासे समाधान । प्राकृत जन म्हणोनि ॥ १.१३ सु. च. वी.

कारींनी मराठीलाच ' मागधी ' असेही म्हटले आहे. मागधी व महाराष्ट्रवाणी एकच असल्याची भाषाही ऐकू येते.[१५]

मराठी भाषेचा उल्लेख 'मराठी' म्हणून कोठेच आला नाही. 'मऱ्हाटें बोलणें' ( ज. रा. ५. ११६० ), ' म्हराष्टि ' ( ह. पु. २. ६६ ), मराष्ट भाषा ( पार्श्वनाथ भवांतर, ४५ ), मऱ्हाष्ट ( आदित्य-व्रतकथा ४, सुदर्शन च. कामराज १५.६८३ ), मऱ्हाष्ट ( सु. च. वी. १.१३ ), महाराष्ट्र भाषा ( जीवंधर पुराण १.८ ) याप्रमाणे विविध रूपे पाहण्यास मिळतात. ' महाराष्ट्र ' शब्दाची व्युत्पत्ती शोधताना ' महा ' नंतर ' राष्ट्र ' शब्द सांगितला जातो, पण बहुतेक उल्लेखात प्रथम ' मर ' येऊन नंतर ' हाट ' शब्द येतो. येथे या शब्दाची व्युत्पती प्रतिपादिणे हा हेतू नाही. जैन मराठी ग्रंथात उल्लेख कोणत्या पद्धतीने आले आहेत याचे दर्शन घडविणे एवढाच या नंतेना उद्देश आहे.[१६]

पूर्वे शास्त्रिवा विश्वासु । मऱ्हाष्ट्रिया केला प्रकाशु ।
सुगम बोलता देशभाषु । देहपासु तोडित ॥ १.१८ सु. च. वी.

संस्कृत व प्राकृत भाषा समजेनात, जनतेत मिथ्यात्व वाढू लागले अशावेळी ग्रंथांची आवश्यकता भासू लागली. गुरू त्याप्रमाणे शिष्यांना आज्ञाही देऊ लागले[१७] आणि मराठीत जैन कवी ग्रंथ लिहू लागले. थोडक्यात जनतेच्या गरजेतून हे ग्रंथ निर्माण झाले.

जरी भाषाभिवृद्धि हा हेतु जैन ग्रंथकाराचा नव्हता तरी धर्मप्रचारासाठी का होईना, आपण ' साहित्य ' निर्माण करीत आहोत ही जाणीव त्या ग्रंथकारांना होती.

---

१५. श्री गुरूच्या प्रसादें । गुणनंदी भरला आनदे ।
तो बोलों लागला आपुल्या छंदे । भाषा मागधी । १.१४
जशोधर पुराण ( गुणनंदी ).
तेवेळी श्रोतियाचें मनीं । विषमता नसे शब्दश्रवणीं
मागधी महाराष्ट्र एकची वाणी । स्वानंद श्रवणी चाखावा ॥
श्रे. च. ज. ३०.१०

१६. " माझ्या मते या देशाचे नाव मूळचें महाराष्ट्र नव्हें. मरहट्ट हेंच याचें मूळ नांव असून त्याचें संस्कृतीकरण होऊन महाराष्ट्र झाले, "
मऱ्हाठी संस्कृतिः शं. था. जोशी, पृ. ३१

१७. म्हणे तुम्ही जरी करूनि द्यावे प्राकृत । तरि लोक सांडिती मिथ्यात्व ।
आणि पुण्य लागेल बहुत । ऐकोनि स्वामिया ॥ ८.९७.
मग ऐकोनि बरसे वचन । मग प्राकृत केले रचन ।
ते ऐकोन आपले श्रवण । ते पुण्य पावती ॥ ८.९८.
—जशोधर पुराण ( गुणनदी ).

जसोधरपुराण ( गुणनंदी )—श्रावकजनांच्या उपकारासाठीच या ग्रंथाची निर्मिती झाल्याचे कवी सांगतो.

" हे केले उपकारानिमित्य । जे सांगतां ऐकतां त्यासि होय अत्यंत हित ।
ते वारिती मिथ्या मत । भव्य जन पैं ॥ १.१७ ॥
आता हे यशोधर रायाचे चरित्र । जे ऐकति होती पवित्र ।
ते सुखे पावती परत्र । स्वर्गमोक्षा-तें ॥ १.२१ ॥
हे चरित्र केले पुण्याकारणे परि नाही केले लोभाकारणे ।
श्रावक जन उपकाराकारणे । अक्षेप देखा ॥ ८.९६

आदिपुराण ( महीचंद्र )—धर्मप्रभावनेसाठी आणि परोपकारासाठी आदिपुराणाची रचना केल्याचे कवीने सांगितले आहे.

हिरा पारखु जोहरि जाणे । अज्ञान बापुडे काही न नेणे
धर्म प्रभावनाकारणे । सुगम केले ॥ १.६
आदीश्वराची ही रास । केली म्यां परोपकारास ।
जो ऐके श्रावकास । तो उद्धरेल पैं ॥ १५.१३५. "

जसोधररास ( मेघराज )—मिथ्यात्वाचे पाप फेडावे आणि श्रोत्यांना सम्यक्त्वाचा लाभ व्हावा हे या ग्रंथाचें प्रयोजन दिसते.

" आता सांघेन त्याचें चरित्र । फेडावया पाप मिथ्यात्व ।
उपजावया समकित । श्रोतयांसि ॥ १.६८ "

परमहंस कथा ( पं. सूरिजन )—श्रोत्यांना वैराग्याचा लाभ व सम्यक्त्वावर बुद्धि व्हावी अशी या ग्रंथाची फलश्रुती सांगण्यात आली आहे.

" जे भव्य जीव आइकति । त्या निर्मल वैराग्ये पावती ।
होये त्याहांसि सुमति । समकितावरी ॥ पृ. २. "

दानशीलतपभावना ( दामा )—भवभय चुकविण्यासाठी ग्रंथरचना केल्याचा उल्लेख दामा पंडिताने केला आहे.

" अनंत काळचा जीउ । बहुत हिंडता पावला हेऊ ।
तपचरणे करीजे ठेउ । तरिच भव चुके देखा ॥ ४१६
ऐसे भवापासुन भवरण । अवचित झाले स्मरण ।
मनवचनकायाकरुण । ग्रंथ केला ॥ ४१७ ॥ "

सुदर्शन चरित्र (वीरदास)—धर्मप्रभावना व्हावी असा हेतू कवी बोलून दाखवितो हा हेतू फलश्रुतीप्रमाणे वाटतो.

" हे कथा जे आइकति । आइकोनि जे आचरती ।
आचरोनी उपदेसिती । प्रभावनोत्पत्तिकारण ॥ २५.३१. "

सुदर्शन चरित्र ( कामराज )—भक्ती हा हेतू ठेवून त्यात वेळ जावा म्हणून ग्रंथ रचल्याचे कवी म्हणतो.

" मतीहीन अज्ञानी । रक्षा करा जनी ।
मक्तीवादे करोनि । काल गमावया ॥ १५.९८७ "

**जंबुस्वामी पुराण** ( जिनसेन )–मनमर्कट बांधण्याची युक्ती म्हणून ग्रंथात मन घातल्याचे कवी सांगतो.

" काव्य कवितांची नाही मती । सदा स्वरूपी राहावया नाही शक्ति ।
परि मन मर्कट बांधावयाची युक्ति । ग्रंथार्थी हेतु लागला ॥ १.२४ "

उपदेशरत्नमाला ( जिनसेन )–

" काव्य कविताची मति । नेणे छंद प्रबंधाची गति ।
परि मनमर्कट बांधावयाची युक्ति । हेतु ग्रंथार्थी लागला ॥ १.४७.

साधारणपणे उपर्युक्त तेरा महत्त्वाच्या ग्रंथांचा हेतू अथवा प्रयोजन पाहिल्यास भाषाभिवृद्धी, पांडित्यप्रदर्शन, एकमेकांशी स्पर्धा या गोष्टी दिसून येत नाहीत. शिष्य जनाना खरा धर्म समजावा, वैदिक कथेच्या ऐवजी जैन कथा त्याना समजावी, श्रोत्यांचे मिथ्यात्व जाऊन त्यांचे कल्याण व्हावे, धर्मप्रभावना व्हावी, श्रावक लोकांवर उपकार करावा, स्वतःचे भव-भ्रमण चुकवावे, भक्तीत काळ व्यतीत व्हावा. स्वतःच्या मनोमर्कटाला सत्कार्यात गुंतवून ठेवावे अशा विविध परंतु एकाच ' धार्मिक ' हेतूशी निगडित प्रयोजनांतून प्राचीन मराठीत जैन वाङ्मय निर्माण झाल्याचे दिसून येते. म्हणून प्राचीन मराठीतील जैन साहित्याचा अंतरंगातील हेतू पाहावयाचा झाल्यास तो धर्मप्रचाराचा होता या निष्कर्षाप्रत यावे लागते. लौकिक प्रयोजनातून त्या साहित्याचा जन्म झालेला दिसत नाही. अर्थातच सर्वच प्राचीन मराठी साहित्याची प्रेरणा ही धर्ममूलक आहे ही वस्तुस्थिती आहे. म्हणूनच या सर्व साहित्यात मोक्षहेतुत्वाची प्रधानता आहे.

पण हे साहित्य केवळ धार्मिक आहे या एकाच कारणामुळे ते साहित्य नव्हे असे मात्र म्हणता यावयाचे नाही. हिंदीतील प्रारंभीच्या साहित्यासंबंधी चर्चा करताना या बाबतीत पं. आ. हजारीप्रसाद द्विवेदी यांनी एक अत्यंत महत्त्वाचे निवेदन केले आहे ते तेथे उद्धृत करणे योग्य वाटते.

" धार्मिक साहित्य होनेमात्रसे कोई रचना साहित्यिक कोटिसे अलग नहीं की जा सकती। यदि ऐसा समझा जाने लगे तो तुलसीदासका " रामचरित मानस " भी साहित्य क्षेत्रमें अविवेच्य हो जाएगा।...वस्तुतः लौकिक निजन्धरी कहानियोंको आश्रय करके धर्मोपदेश देना इस देशकी चिराचरित प्रथा है। कभी कभी ये कहानियाँ पौराणिक और ऐतिहासिक चरित्रोंके साथ जुडदी जाती हैं। मध्य युगके साहित्यकी प्रधान प्रेरणा धर्मसाधनाही रही है। जो भी पुस्तकें आज संयोग और सौभाग्यसे बची रह गई हैं उनके सुरक्षित रहनेका कारण प्रधानरूपसे धर्मबुद्धि ही

ही जाणीव आणि तिचे प्रत्यक्षीकरण यासंबंधी नंतर चर्चा करावयाची असल्याने प्रथमतः या साहित्याचा अंतरंग हेतू कोणता याचा कानोसा घेणे महत्त्वाचे आहे.

## प्राचीन मराठी जैन साहित्याचे प्रयोजन –

'साहित्याचे प्रयोजना' चा परिणाम संपूर्ण साहित्यकृतीवर झाल्याशिवाय राहात नाही. " ज्ञानेश्वरांपासून रामदासापर्यंतच्या प्रत्येक कवीने ईश्वर गुणवर्णन हे आपल्या काव्याचे प्रयोजन आहे ही गोष्ट निरनिराळ्या शब्दांत सांगितली आहे " असा निष्कर्ष [१८] 'मराठीच्या साहित्यशास्त्र'कारांनी काढला आहे. त्याच पद्धतीने येथे प्रयोजन पाहण्याचा प्रयत्न केल्यास काही निष्कर्ष काढता येईल. त्यासाठी काही निवडक पण महत्त्वाच्या ग्रंथांचे प्रयोजन त्या त्या ग्रंथकारांनी काय सांगितले आहे हे पाहावे लागेल.

**धर्मामृत** ( गुणकीर्ती ) :– " आता शिष्यु पुसते श्री गुरुप्रति । देवा, दर्शने तरि सा, पाखंडे तरि त्र्याहाणो । एवं षट् दर्शने धर्ममारग जाले । इतुके देव जाले । इतुके गुरु जाले । आपुलाला मनि पक्षपति जन पडले । परि काहि निवाडु नव्हेजि । तरि कवण धर्मु करावा । कवण गुरु करावा । कवण मार्गि लागावें । कैसा आचारु पाळावा । "... [१९]

थोडक्यात खरा धर्म कोणता निवडावा हे शिष्याला समजेनासे झाले आहे. सर्वच धर्म पक्षपाती झाले आहेत. अशा वेळी गुरुने त्याला खरा धर्म समजावून सांगण्यासाठी 'धर्मामृत' ग्रंथ लिहिला. ग्रंथाच्या शेवटी ग्रंथकार म्हणतो [२०] "हे अवघेया नावे इतुलि धर्माचि जोडि वांचौनि न पाविजे तरी याकारणे जाणते नेणतेनि धर्माचा सग्रहो करावा । धर्माचा विषे आल्सु न करावा । अइसे धर्म सदा नित्य निरंतर करावे । अइसे कविश्वरू गुणकीर्ति म्हणतु असे ॥ " कवीश्वर गुणकीर्तीचा ग्रंथरचनेचा हेतू धर्म लोकांना कळावा हाच दिसतो.

**पद्म पुराण** ( गुणकीर्ती ) –

या ग्रंथाचे प्रयोजन जैन रामायण सागणे हे आहे. पण परंपरेप्रमाणे श्रेणिकाने महावीरास विचारलेल्या प्रश्नात ग्रंथाचे प्रयोजन अंतर्भूत केले आहे. ते असे आहे :

इक्ष्वाकु कुल विशाल । सूर्यवंशी राजा सोज्वल ।
असे दशरथ महा दयाल । जिनधर्मी वै ॥ १.३५
त्याला म्हणाति खेळला पारध । आणि श्रावणाचा वध ।
हे अति विपरीत अबद्ध । बोलणे हे ॥ १.३६

---

१८. मराठीचे साहित्यशास्त्र पृ. १३४.
१९. ध. प. १ व २.
२०. ध. प. १८९.

दाशरथी पुत्र राम नामी । तो असे मोक्षगामी ।
मृग कैसा वधिला त्यांनी । हे विपरीत बोलणे । १.३७
मोक्षगामी हो जीवासी । कपी म्हणती हनुमंतासी ।
मिथ्यामती बोलण्यासी । पार नाही । १.४१.
समुद्र असे खोलन । शिळा कैसी तरली जाण ।
त्यावरून गेले रामसैन्य । हे केवि घडे ॥ १.४२
अशी कुशास्त्रे मिथ्या मतांची । मी ऐकिली अन्य दर्शनांची ।
तयाची मज नवसे रुचि । स्वामिनाथा ॥ १.४३

याप्रमाणे वैदिक रामायणातील दोष दाखवून जैन मताप्रमाणे रामायण कसे आहे हे दाखविणे हे या ग्रंथाचे प्रयोजन आहे.

हरिवंशपुराण ( जिनदास ) –

रामायणाप्रमाणेच महाभारतकथा हीसुद्धा भारतीय वाङ्मयात फार श्रेष्ठ आहे. हा ग्रंथसुद्धा वैदिक महाभारतांतील दोषस्थळे जैनमतानुसार कोठे आहेत ती दाखवून जैन परंपरेतील महाभारत कथा सांगावी याच प्रयोजनाने लिहिला आहे. श्रेणिकाच्या प्रश्नांतून ग्रंथप्रयोजन दिसून येते ते असे आहे :

मज इच्छा आहे ऐकायची । जैन हरिवंश कथेची ॥
उत्पत्ति सांगावी या देवाची । स्वमुखे देवा ॥ ५.६३
कथा सांगा पांडव-पुराण । जैनमार्गी जे ते आख्यान ।
तुम्ही करावे आम्हा श्रवण । यथातथे ॥५.६४
म्या ऐकिल्या परमत कथा । बहुशास्त्रे वितंडे समर्था ।
देवा तेथिचे गुह्य सर्वथा । नय मनाजी ॥ ५.६५
ते सांगताती जे पुराण । तयामध्ये बहुत अवगुण ।
कवित्वे करिती ज्ञानहीन । विपरीत मते ॥ ५.६६

याप्रमाणे वैदिक कथेतील दोष टाळून जैन हरिवंश पुराणाची निर्मिती केलेली दिसून येते.

**श्रेणिक चरित्र** ( गुणदास ) – या ग्रंथाचे प्रयोजन कवीने स्वतःच्या दृष्टीने काही सांगितले नाही. पण ग्रंथाच्या अखेरीस ' फलश्रुति ' सांगताना श्रोत्याच्या अपेक्षेने प्रयोजन व्यक्त केले आहे.

" हे श्रेणिक रायाचे पुराण । जे भावेकरुनी ऐकति सुजाण ।
आणि संपजैल नव निधान । त्याचे घरी । ५.१३१
परीयसीजे पुराण विवेक । ते लाभती स्वर्गमोक्षाचे सुख ॥
ऐसें जाणोनि विद्वुल । श्रवण करावे ॥ ५.१३२ "

रही है। काव्यरसकी भी यही पुस्तकें सुरक्षित रह सकी हैं जिनमें किसी न किसी प्रकार धर्मभावका संस्पर्श रहा है।[21]

'जैन धर्मविषयक साहित्य' म्हणून मराठी वाङ्मयात या साहित्याला निश्चित स्थान द्यावे लागेल. धार्मिकता हा त्या साहित्याचा गुण समजावा लागेल; दोष नव्हे.

## परंपरागत परजीवी वाङ्मय —

प्राचीन मराठीतील हे जैन साहित्य जसे धर्मप्रसाराच्या किंवा स्वहिताच्या प्रयोजनातून निर्माण झाले आहे तसेच ते पूर्वपरंपरानिष्ठ राहिल्याने परजीवी स्वरूपाचे झाले आहे. ही परंपरानिष्ठा जशी विषयांत आणि कथांत दिसून येते तशीच ती निवेदनाच्या पद्धतीतही दिसून येते. इतकेच नव्हे तर समोर पहिला एखादा ग्रंथ ठेवूनच दुसरा ग्रंथ जन्माला आलेला दिसून येतो. स्वातंत्र्याचा उपभोग कोणताच कवी घेतांना दिसत नाही. पण प्राचीन मराठीतील बहुतेक वाङ्मय अशाच स्वरूपाचे असल्याने याच वाङ्मयाबाबतीत हा काही दोष मानता येणार नाही.

संस्कृत, प्राकृत, गुजराती, हिंदी, कन्नड इत्यादि भाषांतील जुने नवे ग्रंथ या ग्रंथकारांच्या समोर होते. त्या ग्रंथांतील विषयच मराठी वाचकांसाठी सुलभ करून सांगण्याचे काम त्यांनी पत्करले होते. महाराष्ट्रातील जैन समाज दिवसेंदिवस परपंथाकडे झुकू लागल्यामुळे त्या समाजाला त्याच्या धर्मात स्थिर करणे–जैन ग्रंथकारांच्या भाषेत सांगावयाचे झाल्यास त्या समाजाला सम्यक्त्वात स्थिर करणे हे महत्त्वाचे कार्य त्या साहित्यिकांच्या पुढे उभे राहिले असावे. राजाश्रय नाही, बहुजनसमाजाचा आधरा नाही, अवैदिक व नास्तिक म्हणून महाराष्ट्रातील बहुतेक धर्मपंथ जैनधर्माकडे विरोधक म्हणून पाहात असलेले आणि स्वतः जैन समाजही अज्ञानाने आचारविचारांच्या बाबतीतही परपंथाकडे झुकत चाललेला; अशावेळी उपर्युक्त कार्यच जैन साहित्यिकांना महत्त्वाचे वाटले असल्यास नवल नाही. प्राचीन मराठी जैन वाङ्मयाचा काल हा मुस्लिम सत्तेच्या आगमनानंतरचा काल आहे. त्या काळात बहुसंख्यांक असलेल्या हिंदू साहित्यिकांनाही या समाजाच्या स्थिरीकरणाचेच कार्य परंपरागत दृष्टिकोण ठेवूनच करावे लागलेले दिसते. या 'अस्मानी सुल्तानी' संकटात जैन समाज हा सामाजिक बाबतीत जिवंत राहण्यासाठी हिंदूंशीच एकरूप होई. धार्मिक बाबतीत मात्र आपले स्वातंत्र्य टिकविण्याचा प्रयत्न करी. मंदिर–संस्था आणि भट्टारकाचे मठ यांच्याकडूनच मुख्यतः या बाबतीत मदत होई.

संस्कृत आणि प्राकृत काळात जैन साहित्यिकांच्या स्फूर्तीचे अधिष्ठान अध्यात्माच्या प्रेरणेत असे. साहित्यात नवेपणा येण्यासाठी जीवन चैतन्यमय हवे असते. केवळ कसेतरी जिवंत राहण्यासाठी धडपडणाऱ्या समाजात नवे साहित्य जन्माला कसे

---

२१. हिंदी साहित्यका आदिकाल, पृ. ११, १२.

येईल ! जुन्याचे संरक्षण करणे हेच कार्य अशा काळात महत्त्वाचे मानले जाते. नव-विचारापेक्षा पूर्वीच्या आचार्यांनी केलेल्या विचारांची ओळख करून घेणे आवश्यक होते. म्हणूनच या काळात आधारित व अनुवादित वाङ्मयाची निपज जास्त झाली. हे साहित्यिक बहुधा ब्रह्मचारी, साधू असत अथवा पंडित असत. संस्कृत-प्राकृतादि भाषा त्यांना उत्तम येत असत. भट्टारकांच्या मठांत अथवा मंदिरांत ही ज्ञानसाधना केली जाई. ही संपूर्ण स्थिती ध्यानात घेतल्यानंतर प्राचीन मराठी जैन वाङ्मयात नवीन तेज अथवा स्फूर्ती का नाही, त्यात चर्वितचर्वण अथवा पिष्टपेषण का आहे हे कळून येईल.

तपशिलात शिरून अभ्यास केला तर हे बहुतेक ग्रंथ परंपरानिष्ठ पूर्वग्रंथांचे अनुवाद तरी दिसतील अथवा त्यावर आधारित असलेले तरी दिसतील.

**धर्मामृत** : (गुणकीर्ती) — या ग्रंथासंबंधी जरी हा ग्रंथ अनुवादित स्वरूपाचा नाही असे म्हटले तरी हा ग्रंथ संकलनात्मक स्वरूपाचा आहे हे मान्य करावे लागते. त्रेपन क्रिया, बारा व्रते, आठ मूलगुण, अकरा प्रतिमा, चार दाने, जळगाळन, रात्रिभोजनत्याग, बारा तपे, रत्नत्रय, सहा कर्मे, मुनिधर्म, ध्यानविचार आणि त्रिलोकरचना यासंबंधीची परंपरागत माहिती येथे एकत्रित आणण्यात आली आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वाधारासंबंधी संशोधन झाले आहे [२२]

**जसोधर रास** — मेघराजाने या ग्रंथात सकलकीर्तीचा आधार घेतला आहे. [२३]

**यशोधर चरित्र** — (नागोआया) – प्रस्तुत रचना वादिराजकृत यशोधर चरित्रा-(संस्कृत) वर पूर्णपणे आधारलेली आहे. [२४]

**परमहंस कथा** (पं. सुरिजन) — ही कथा ब्रह्मजिनदासाच्या परमहंस रासची मराठी प्रतिकृती आहे. [२५]

**श्रेणिक चरित्र** – मराठीत ब्रह्मगुणदास आणि जनार्दन या दोन कवींनी श्रेणिक चरित्र लिहिले आहे. ब्रह्मगुणदासाचे श्रेणिकचरित्र ब्रह्मजिनदासाच्या श्रेणिक-रासवर आधारित आहे, तर जनार्दनाचे श्रेणिकचरित्र ब्रह्मगुणदासकृत मराठी श्रेणिक-चरित्रावर आधारित आहे. जनार्दनाने स्वतःच म्हटले आहे.

" श्रेणिकचरित्र महाकथन । हें कथिलें आदिजिन ।
वृषभसेन महागण । निरोपिलें पृथ्वीतें ॥ ४०–२६१.

---

२२. धर्मामृत, प्रस्तावना. पृ. ११ ते १८.
२३. ज. रा. प्रस्तावना, पृ. ४१.
२४. ज. रा. प्रस्तावना, पृ. ४१.
२५. परमहंसकथा, प्रस्तावना पृ. १२–१३.

तेथोनिया ब्रह्मजिनदास । मागधी पाहून रास भाष ।
केला जगातें उपदेश । महाराष्ट्र भाषा गुणग्रह्या ।
तो महाराष्ट्र पाहुनी । मींहि वदलों अवद्य वाणी ।
श्रोतेही परिसा श्रवणीं । भावार्थ मनीं असुं द्या ॥ ४०-२६३."

( श्रे. च. जनार्दन ).

**सुदर्शन चरित्र** ( वीरदास )— आधार पाहूनच ग्रंथरचना झाली. हा आधार सकलकीर्तिकृत संस्कृत सुदर्शन चरित्राचाच असणार. ग्रंथकार स्पष्ट सांगतो,

" हे संस्कृताचि महाराष्ट्रवाणी । बहु न कळेची पैं विलनी ।
परि घेतिलें आधार पाहुनी । सज्जन जनि विश्वासु ॥ २५. ३७."

**आदिपुराण** ( महीचंद्र ) — ब्रह्म जिनदासाचा आदिनाथरास पाहूनच मराठीत हा ग्रंथ निर्माण केल्याचे कवी सांगतो.

" रास केली ब्रह्म जिनदासें । तो पाहून महिश्चंद्र उल्हासे ।
महाराष्ट्र केलें सायासें । श्रीगुरु प्रसादें ॥ १५.१४२ "

**जीवंधरपुराण** ( जिनसागर ) — ब्रह्म जिनदासाच्या जीवंधररासवर आणि गुणभद्रांच्या उत्तरपुराणातील जीवंधर कथेवर ही मराठी रचना उभी राहिली आहे. कवी म्हणतो —

" आतां नमूं तो ब्रह्म जिनदास । ज्यानें कथेचा केला प्रकाश ।
भाषा गुजराती सुरस । रचियेली सायास ज्यानें । १.७
तोचि घरोनीया अंशु । महाराष्ट्र भाषा अति उल्हासु ।
ज्या धर्मी आहे दयारसु । तोचि प्रकाशु परिसावा ॥ १.८
कथा ऐकावी जिवंधर स्वामीची । वाणी बोलली गुणभद्राची
जेथें चतुराइ सकल शास्त्राची । उत्तर पुराणीं कथिली ॥ १.९
कांही गुजराती रास । पाहून केलें कथेस ।
कांही उत्तर पुराणास । पाहोनी ग्रंथास रचिले ॥ १०-१९३. "

**सम्यक्त्वकौमुदी** ( दयासागर ) — मूळ कथा कठीण अशा संस्कृतात होती, ती मराठीत आणली. कवी सांगतो —

" कथा केली मंगरस नगरीं । तो आहे करनाटकाभीतरीं ।
कथा होती संस्कृत कठिण भारी । ही महाराष्ट्र केली अम्हि ॥ १८.१६९

**कर्माष्टमीकथा** ( अर्जुनसुत सोयरा ) — कन्नड भाषेतील ही अपूर्व कथा महाराष्ट्र भाषेत आली आहे :

" ऐसी कथा अपूर्व कानडे भासी । होती सुंदर करनाटक देसी
ते म्या सायासि मऱ्हाष्ट्र भासीं । लघु बुधि केली ॥ ११२ ॥

याचप्रमाणे कन्नड भाषेतील पुण्यास्रव कथाकोशावरून मराठीत पुण्यास्रव कथाकोश या ग्रंथाची निर्मिती केल्याचे जिनसेनाने सांगितले आहे ( ७९.९३ ). सकल-

कीर्तीचे जंबूस्वामी-चरित्र संस्कृतात होते. बालबोधार्थ मराठीत तो ग्रंथ आणल्याचे त्याने–जिनसेनाने सांगितले आहे ( १.२५ ).

बहुतेक ग्रंथांच्या अभ्यासावरून या निष्कर्षाला यावे लागते की कोणत्या ना कोणत्या तरी ग्रंथाचा आधार घेतल्याशिवाय जैन कवींनी मराठीत ग्रंथरचना केली नाही. स्वतंत्र बुद्धीने एखादी पौराणिक कथा घेऊन का होईना त्यावर खास मराठी बाण्याचे संस्कार आपल्या प्रतिमेच्या द्वारे करणे विशेषतः कोणालाच जमले नाही. मूळ कथा जशीच्या तशी मराठीत सांगायची यापलीकडे कवींचा हेतू असावा असे दिसत नाही. सांगत असताना ग्रंथकाराची काही विशिष्ट शैली असते, ती शैली झाकून राहात नाही. पण मूळ कथेच्या सांगाड्यात कोणत्याही प्रकारचा बदल मराठी ग्रंथकारांनी केला नाही. याला प्रमुख कारण दिसते ते असे की, जैन परंपरेप्रमाणे सर्वज्ञ भगवंताच्या कथनांतूनच या सर्व धार्मिक पौराणिक कथांची निर्मिती झाली आहे, असे मानले जाते. सर्वज्ञ भगवान अतीत-वर्तमान आणि अनागत कालांतील सर्व काही जाणत असल्याने त्यांनी जे सांगितले तेच संस्कृत अथवा प्राकृत वाङ्‍मयात आले आहे. परंपरेने त्याच कथा अथवा तेच ज्ञान मराठीत आल्याने कोणीही कवी प्रतिमा-सामर्थ्याने कथानकातील घटना व स्वभावदर्शन यांत बदल करण्यास धजलेले दिसत नाहीत. श्रेणिक ऊर्फ बिंबिसार हा महावीरांच्या समकालीन मगधचा राजा, पण त्याचेही चरित्र भगवान आदिनाथाने पूर्वीच सांगितले होते, तीच कथा मराठीत परंपरेने आली आहे असे म्हणण्यास कवी कमी करीत नाहीत.[२६] अशा परंपरित कथेत बदल करणे–मग तो बदल स्वाभाविक जरी असला तरी–कवींना पाप वाटत असे. एखादा कवी नवरसांच्या निर्मितीच्या धडपडीतून धैर्याने मुळात नसलेले प्रसंग वर्णितो; पण तत्काळ क्षमा मागून मोकळाही होतो. कवी जनार्दनाने श्रेणिकचरित्रात पतीच्या मृत्यूनंतर चेलनेने शोक केल्याचा प्रसंग वर्णिला आहे. पण त्यानंतरचे त्याचे उद्‌गार पाहण्यासारखे आहेत.[२७] एकंदरीत जे सांगितले गेले आहे तेच पुनः

---

२६. श्रे. च. ज. ४०–२६१ ते २६३

२७. येथे चेलनेचा गहिवर । याचा झाला की विस्तार ।
क्रोध न आणि अंतर । व्यर्थ वैखर चेतला ॥ ३८.१९७.
हा अन्याय करावा क्षमा । पहिल्या ग्रंथीं उपमा ।
कथिली नाहीं दुःख प्रेमा । ती म्या अधमान वर्णिली ॥ १९८
हा अपराध घाला पोटीं । पुढें कथेवरी द्यावी दृष्टि । १९९
म्हणाल प्रथम ग्रंथांतरीं । वर्णिली नाहीं दीक्षापरी ।
शोकहि न केला अंतरी । पुत्र परी न वर्णिली ॥ ३९.१४४
येथे कासिया विस्तार । ऐसें न वदावें श्रोते चतुर ।
नवरस कथेचा प्रकार । यास्तव चरित्रीं आणिला...३९.१४५ ( श्रे. च. ज. )

सांगावे ही प्राचीन मराठी जैन वाङ्मयाची वृत्ती दिसते. गुजराती कवी ब्रह्म जिनदास, संस्कृत कवी—सकलकीर्ती, गुणभद्र, सोमदेव, वादिराज यांच्या ग्रंथाधारे प्राचीन मराठीतील जैन काव्य व कथा-वाङ्मय उभे राहिले आहे. ही परंपरा संस्कृत, गुजराती व कन्नड या भाषांतून घेतलेली आहे. बहुतेक ग्रंथ आधारित आहेत. मराठीत नवीन काय येणार अगोदरच संस्कृतादि भाषांत सर्व येऊन गेले आहे ही कवींचीच समजूत असल्याने "हा तो संस्कृताचा इतिहासु" असे हरिवंशकार जिनदासाला म्हणावे लागले आहे.[२८] जीवंधर चरित्रासंबंधी "हा तो संस्कृताचा उलथा" असे जिनसागरालाही कबूल करावे लागले आहे.[२९]

धार्मिक कथानके, तत्त्वज्ञान व आचारधर्मविषयक साहित्य हे प्रामुख्याने परंपरेवर पूर्णपणे आधारित असून ते परजीवी आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही. पंडित मेघराज, गुणसागर, जनार्दन, जिनसागर, जिनदास, गुणकीर्ती, जिनसेन, महीचंद्र, वीरदास, दयासागर हे सर्व कवी प्रतिभावंत नव्हते असे म्हणण्याचे धाष्ट्य त्यांचे काव्य वाचल्यानंतर कोणालाही करता येणार नाही. पण त्यांची ती प्रतिभा केवळ वर्णनशैलीत आणि भाषेच्या विलासात पाहण्यास मिळते. मूळ कथानकातील घटना अथवा स्वभावचित्रे यांच्यावर आपल्या प्रतिभेचे स्वतंत्र संस्कार ते फारसे उमटवू शकले नाहीत. किंबहुना ते त्यांच्या परंपरेत बसणारे नव्हते. धार्मिक परंपरेने प्रतिभेला अशा रीतीने बंदिस्त करून टाकले होते.

पण हे कवी अभ्यस्त होते हे मात्र सहज मान्य होण्यासारखे आहे. मूळ ग्रंथांचा अभ्यास करून ते ग्रंथ मराठीत आणावयाचे असल्याने साहजिकच या मराठी कवींना अन्य भाषांतील ग्रंथांचे अध्ययन करावे लागले. गुजराती, संस्कृत, कन्नड अशा भाषांचा अभ्यास या कवींचा होता म्हणूनच कित्येकदा हे कवी अन्य भाषांतूनही ग्रंथरचना करताना आढळतात. जिनसागराने मराठी, हिंदी व संस्कृत अशा तीन भाषांत ग्रंथनिर्मिती[३०] केली. गंगादासानेही संस्कृत, मराठी व हिंदी या तीनही भाषांत रचना[३१] केल्या आहेत. मेघराजाने मराठी व गुजरातीत ग्रंथरचना[३२] केली. त्यामुळे त्या त्या भाषाचे संस्कारच नव्हेत तर त्यातील विचारप्रवाहही मराठीत आले असल्यास नवल नाही.

**विविध वाङ्मयीन प्रकार**—साहित्य अथवा वाङ्मय या दृष्टीने जेव्हा आपण प्राचीन मराठीतील जैन ग्रंथांकडे पाहू लागतो तेव्हा साहित्यिक मूल्यमापना-

---

२८. ह. पु. २.६६
२९. जीवंधर पुराण, ३.१०५.
३०. जिनसागराची समग्र कविता, VII
३१. भट्टारक संप्रदाय, पृ. ५७.
३२. जसोधररास, प्रस्तावना पृ. ११.

साठी वाङ्मयाच्या विविध शाखांत त्याचे वर्गीकरण करणे आणि त्या त्या शाखेतील वैशिष्ट्यपूर्ण कृतींचा–एक वाङ्मयीन प्रकार म्हणून अभ्यास करणे हे महत्त्वाचे काम ठरते. एखाद्या नवीन वाङ्मयीन प्रकाराची भर जैन साहित्यिकांनी मराठी वाङ्मयात टाकली असल्यास त्या प्रकाराची लक्षणे ठरवून मराठी साहित्यात त्याचे स्थानही निश्चित करावे लागेल. प्राचीन मराठीतील जैन वाङ्मयाचे वर्गीकरण करताना एक अडचण महत्त्वाची निर्माण होते ती ही की, त्या ग्रंथांचे 'नामकरण' अद्यापि नीट झालेले नाही. प्रत्येक ग्रंथाच्या अनेक हस्तलिखित प्रती मिळवून त्या त्या ग्रंथाचे निश्चित नामकरण केल्यानंतर वर्गीकरण करणे सुलभ जाईल.

प्रस्तुत अभ्यासात स्थूलमानाने तो तो ग्रंथ त्या त्या वाङ्मयप्रकारात का व कसा मोडतो याचा विचार करून जैन परंपरेत त्या त्या वाङ्मयीन प्रकारांची काही वैशिष्ट्यपूर्ण कल्पना सापडल्यास तिचा शोध घेणे एवढाच हेतू आहे.

पुराण, चरित्र, आख्यान, धर्मकथा, नागरकथा, कथासंग्रह, व्रतकथा, रास, कलाकाव्य, खंडकाव्य, स्तोत्र, आरती, पदे आणि लावणी असे लहानमोठे विविध वाङ्मयीन प्रकार प्राचीन मराठी जैन वाङ्मयात दिसून येतात.

**पुराण**—जैन साहित्याच्या परंपरेप्रमाणे 'दृष्टिवाद अंग' हा पुराणांच्या अभ्यासाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. या दृष्टिवाद अंगांतील जो प्रथमानुयोग नावाचा अधिकार आहे त्यात पुराणांचे वर्णन केलेले असते. प्रथमानुयोगातच पुराणांचा समावेश होतो असे आचार्य समंतभद्रांनी सांगितले आहे.[33] धवलासारख्या प्राचीन ग्रंथातही पुराणाची निश्चित व्याख्या दिली आहे.[34] जिनेंद्रानी बारा प्रकारच्या पुराणाचा मूळ उपदेश केला. या बारा पुराणांत 'जिनवंश' आणि 'रायवंश' वर्णिले जातात. धवला ग्रंथावरून तीर्थंकर, चक्रवर्ती, विद्याधर, नारायण-प्रतिनारायण, चारण-मुनी, प्रज्ञाश्रमण, कुरुवंश, हरिवंश, इक्ष्वाकुवंश, काश्यपवंश, वादिवंश आणि नाथवंश याप्रमाणे बारा वंशांचे वर्णन करणारी बारा प्रकारची पुराणे असतात असे दिसते.[35]

---

३३. प्रथमानुयोगमर्थाख्यानं चरितं पुराणमपि पुण्यं ।
बोधिसमाधि–निधानं बोधति बोधः समीचीनः ॥ २·२

—रत्नकरण्ड श्रावकाचार

३४. "जो पुण पढमाणिओ ओ सो चउवीस तित्थयर
बारहचक्कवट्टिणवबल णवणारायण णव पडिसत्तूणं पुराणं..."

(जयधवला १·१०३)

३५. बारसविहं पुराणं जगदिट्ठं जिणवरेहि सव्वेहिं ।
तं सव्वं वण्णेदि हु जिणवंसे रायवंसे य ॥ ७७ ॥
पढमो अरहंताणं विदियो पुण चक्कवट्टि वंसोदु ।
विज्जहराणं तदिओ चउत्थयो वासुदेवाणं ॥ ७८ ॥

यातही तीर्थंकरासंबंधीचे पुराण हेच मुख्य समजले पाहिजे. तीर्थंकर पुराणांचे शास्त्रोक्त स्वरूप साधारणतः पुढीलप्रमाणे असले पाहिजे. प्रथमतः तीर्थंकरांच्या पूर्वभवाचे वर्णन, नंतर त्यांचे देवलोकगमन, तेथून त्यांचा राजवराण्यात जन्म, जन्माभिषेक, राज्यप्राप्ती, प्रजापालन, प्रव्रज्याधारण, केवल-ज्ञानोत्पत्ती, तीर्थ-प्रवर्तन, संघ-संस्थापना, मोक्षप्राप्ती, शिष्यगणधर इत्यादिकांचे वर्णन असा हा वर्णनक्रम पुराणात असतो.[३६]

'वंशानुचरित' सांगणे हेही पुराणांचे महत्त्वाचे कार्य समजले जाते. सर्ग–प्रतिसर्गात्मक रचना हे पुराणाचे बाह्यांग आहे. पुराणात मन्वन्तरांचे वर्णनही येते. (विष्णु पुराण ३–६–२४). पुराणांमध्ये अनेक आख्याने आणि उपाख्याने असतात असेही दिसते. (विष्णुपुराण ३–६–१५). वैदिक परंपरेतील अठरा पुराणे आणि जैन परंपरेतील बारा प्रकारची पुराणे यांत मूळ विषयांत भिन्नता असली तरी सांगण्याच्या पद्धतीत काही भिन्नता नाही असे दिसते.

पुराण आणि महाकाव्यात विषय तोच असूनही शैलीत बदल होतो. म्हणूनच महाकाव्याचा प्रकार पुराणाहून वेगळा मानण्यात आला आहे.

पुराणांत ज्यांचा समावेश करता येईल असे प्राचीन मराठी जैन ग्रंथ गुणकीर्तिकृत पद्मपुराण, जिनदासकृत हरिवंशपुराण, महीचंद्रकृत आदिपुराण, देवेंद्रकीर्तिकृत कालिकापुराण हेच आहेत. विषय आणि विस्तार व पद्धती यांचा विचार केल्यास या ग्रंथांना पुराण म्हणणे योग्य होईल. पद्मपुराणात जैन रामायण असून हरिवंश पुराणात जैन महाभारत आहे. आदिपुराणात प्रथम तीर्थंकर ऋषभदेव यांचे पुराणपद्धतीने चरित्र वर्णन केले आहे. कालिकापुराणात सोमवंशाची उत्पत्ती आणि त्याचा झालेला विस्तार यासंबंधी माहिती आहे. या चारही ग्रंथात 'सर्ग' न म्हणता प्रकरणास 'अध्याय' म्हटले आहे आणि प्रारंभापासून अखेर-पर्यंत ओवी छंदाचाच उपयोग केला आहे.

राम हा जैन परंपरेप्रमाणे त्रेसष्ट शलाका पुरुषातील 'बलभद्र' आहे. विसावे तीर्थंकर मुनिसुव्रत यांच्या काळी तो झाला असे मानण्यात येते.

---

चारण वंसो तह पंचमो दु छट्ठोय पण्णसमणाणं ।
सत्तमओ कुरुवंसो अट्ठमओ तह य हरिवंसो ॥ ७९ ॥
णवमो य इक्खयाणं दसमो वि य कासियाण बोद्धव्वो ।
वाईणकार समो बारसमो णाहवंसो दु ॥ ८० ॥ (धवला),
प्रथमखंड, जीवस्थान पृ. ११२

३६. एत्थ णं अरहंताणं भगवंताणं, पुव्वभवा, देवलोग गमणाणि आउं चवणाणि जम्माणि अ अभिसेया, रायवर सिरीओ सीयाओ, पवज्जाओ, तवाय भत्ता केवलणा-णुप्पाया तित्थ पवत्ताणि अ, संघयणं, संठाणं, उच्चंतं आउवन्न विभागो सीसा गणहराय अज्जा आघविज्जंति । सम. सूत्र. १४७, नंदी सूत्र ५६.

हरिवंश पुराणात श्रीकृष्ण हीच प्रमुख व्यक्ती आहे; तरी परंतु २२ वे तीर्थंकर नेमिनाथ हे श्रीकृष्णाचे चुलत भाऊ होते असे जैन परंपरेत सांगितले आहे. श्रीकृष्ण त्रेसष्ट शलाका पुरुषांत ९ वे नारायण आहेत म्हणून त्याचेही स्थान श्रेष्ठ मानून पुराणात त्याचे चरित्र वर्णिले गेले आहे. आदिपुराणात आदितीर्थंकराचे महाबलांच्या वेळेपासून पूर्वभव, स्वर्गगमन, तेथून आयुष्य संपल्यावर मरू देवीच्या उदरी जन्म, राज्यश्री-लाभ व लोककल्याण, दीक्षा, केवलज्ञान-प्राप्ति, मोक्ष अशा क्रमाने चरित्र सांगितले आहे. कालिकापुराणात मात्र अगदी वैदिक पद्धतीने आदिशक्तीपासून सोमवंश कसा निर्माण झाला हे प्रथम सांगून नंतर १६ कुळांची उत्पत्ती, तगर चोगार, काथारादि जातींची उत्पत्ती विस्ताराने वर्णिली आहे. उपर्युक्त चारही पुराणकथा प्रचंड आहेत. पण या प्रचंड कथा मराठीत आणताना गुणकीर्ती हा कवी जितका यशस्वी झाला आहे तितका जिनदास झाला नाही. पद्मपुराणात पुराणकथनाला योग्य असे प्रतिभेचे सामर्थ्य गुणकीर्तीत दिसून येते. हरिवंशपुराणात जिनदासाने केवळ कथेची जंत्री दिली आहे. महीचंद्राचे आदि-पुराण मात्र एक कला-काव्य ठरले जाईल. अर्थात तो काळाचा प्रभाव म्हटला पाहिजे. एकनाथ मुक्तेश्वरानंतर तो कवी झाल्यामुळे त्याची पुराणकथा ही कलात्मक बनली आहे. कालिकापुराणात काव्य कमी असून कथेचा पसारा प्रदीर्घ आहे.

**चरित्र कथा**—पुराण, आख्यान व चरित्र हे एकमेकांपासून भिन्न असून पुराणांत त्रिषष्टि पुरुषाश्रित कथा असते तर चरित्रांत एक पुरुषाश्रयी कथा असते.[३७] आख्यानात मात्र फक्त एकच कथा असते. आचार्य समंतभद्राच्या काळापासून वाङ्मयाच्या या विविध शाखा मानण्यात आल्या होत्या असे दिसते. म्हणूनच त्यांनी प्रथमानुयोगात आख्यान, चरित्र व पुराणांचा समावेश केला आहे.

कित्येकदा चरित्रानाच 'पुराण' ही म्हटले आहे. त्याचाही विचार येथे करावयाचा आहे. संस्कृतमधील महाकाव्ये व विदग्ध काव्ये यांचा आदर्श समोर ठेवून जैन साहित्यातही संस्कृतात काही चरित्रे व पुराणे रचिली गेली होती. त्यांचाच आदर्शसमोर ठेवून मराठीतही चरित्राची निर्मिती करण्यात आली आहे.

मराठीतील अशी चरित्रे पुढीलप्रमाणे दिसतात: ब्रह्मगुणदासकृत श्रेणिक-चरित्र व जनार्दनकृत श्रेणिक-चरित्र, यशोधरचरित्रावरील मेघराज, गुणनंदी व नागोआया यांच्या रचना, सुदर्शनचरित्रावरील कामराज व बीरदासकृत रचना, जिनसेनकृत जंबूस्वामी-चरित्र. म्हणजे श्रेणिक, सुदर्शन, यशोधर व जंबूस्वामी हेच काय ते मराठीतील चरित्र कथांचे नायक आहेत. श्रेणिक राजा ही ऐतिहासिक व्यक्ती होती.

---

३७. एक पुरुषाश्रिता कथा चरितम् ।
विषष्टि शलाका पुरुषाश्रिता कथा पुराणम् ।।
प्रभाचंद्र टीका—रत्नकरण्ड श्रावकाचार.

महावीरांच्या समकालीं झाल्यामुळे व प्रत्यक्ष महावीरांशी नातलगत्वाचा संबंध आल्याने याचे महत्त्व विशेष आहे. प्रथम बौद्धमतानुयायी असणारा हा राजा नंतर जैन मतानुयायी कसा झाला हे चरित्रकारांनी दाखविले आहे.[३८] यशोधराचे पूर्वभव आणि त्याने शेवटी स्वीकारलेला अहिंसाधर्म हा भाग महत्त्वाचा आहे. सुदर्शन ब्रह्मचर्यानिमित्त प्रसिद्ध झालेला एक मुनी. अंतकृद्दशांगातील महावीरकालीन दहा नावांत त्यांचे नाव येते.[३९] जंबूस्वामी हे महावीरांच्या नंतरच्या परंपरेतील तिसरे आचार्य होते. ते इ. स. पूर्व पाचव्या शतकात होऊन गेले. त्यांची अद्भुतरम्य कथा जंबूस्वामी चरित्रात येते. दयासागरकृत भविष्यदत्ताचे चरित्रही याच प्रकारात येते.

या चरित्र-कथांत त्या त्या नायकाला महत्त्व देऊन ही चरित्रे लिहिली गेली आहेत. या चरित्रांची रचना वाङ्मयीन दृष्टीनेही कलात्मक करण्याचा प्रयत्न झालेला दिसतो. विशेषतः जिनसेनकृत जंबूस्वामी चरित्र हे एक उत्तम विदग्ध महाकाव्य म्हणता येईल, अशा योग्यतेचे आहे. बांधीव कथानक, प्रौढ व डौलदार भाषाशैली, अलंकारप्रचुर रचना यामुळे हे चरित्र इतर चरित्रांच्या मानाने उठावदार झाले आहे. धर्मकथनापेक्षा कथेकडे लक्ष देऊन अगदी सरळ सरळ पण मनोहारी शैलीत गुणदासाने श्रेणिक-चरित्र लिहिले आहे. जनार्दनाने श्रेणिक-चरित्रात जैन-धर्म-विषयक तत्त्वज्ञान व आचारधर्मांचे वर्णन जास्तीत जास्त आणण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे चरित्रातील कथेचा गोडवा कमी झाला आहे. पण जनार्दनाची भाषाशैली अलंकारप्रचुर असल्यामुळे व अर्थाभिव्यक्तीसाठी समर्थ असल्याने जणू काही त्यात मुक्तेश्वर व एकनाथ एकत्रित आलेले दिसतात. वीरदासकृत सुदर्शनचरित्र व कामराजकृत सुदर्शन चरित्रातही कथेपेक्षा धर्मकथनाने अधिक जागा व्यापली आहे. यशोधराचे चरित्र मेघराज, गुणनंदी आणि नागोआया या तीन कवींनी लिहिले आहे. नागोआयाने केवळ कथा सांगितली आहे. मेघराजाने ती धर्मकथा बनविली आहे. गुणनंदीने मात्र धर्मकथा करूनही हे चरित्र कलात्मक बनविले आहे. यासंबंधीचे अधिक विवेचन मी अन्यत्र केले आहे.[४०] जिनसागरकृत जीवंधर पुराणाचाही समावेश चरित्रकथेतच करावा लागेल. स्वतः कवी त्याला 'जिनकथा' म्हणतो. पण शैली व परंपरा पाहता चरित्रकथेत हा ग्रंथ येईल.

**धर्मकथा**—प्राचीन मराठीतील जैन साहित्यिकांनी आपल्या काही ग्रंथांना

---

३८. गुणदास मात्र आपल्या श्रेणिक चरित्राच्या शेवटी 'हे श्रेणिक रायाचें पुराण व परिसिजे पुराण विवेकें।" असे म्हणून चरित्र व पुराण या संज्ञेत काहीच फरक ठेवीत नाही. श्रे. च. गुन. ४. ७९३, ७९४

३९. धवला १. १, २.

४०. य. रा. प्रस्तावना पृ. १२

'धर्मकथा' ही संज्ञा वापरली आहे. विशेषतः चरित्रकथांना ही संज्ञा त्यांनी वापरल्याने त्यासंबंधी येथे थोडीशी चर्चा करावयाची आहे.

पंडित मेघराजाने आपल्या जसोधररास मध्ये चार वेळा 'धर्मकथा' या संज्ञेचा उपयोग केला आहे.[४१] म्हणजे तो या चरित्रकथेलाच धर्मकथा म्हणतो हे स्पष्ट आहे.

वीरदासानेही आपल्या सुदर्शनचरित्राला धर्मकथा असे म्हटले आहे.[४२] गुणनंदीने यशोधर चरित्रासही धर्मकथा म्हटले आहे.[४३] जिनसागर 'धर्मकथा' न म्हणता 'जिनकथा' असे म्हणतो.[४४] धर्मकथा किंवा जिनकथा यांचा उद्देश मुख्यतः चरित्राच्या आधारे धर्मकथन करणे हाच होता हे स्पष्ट आहे. धर्मकथेला जैन वाङ्मयात एक विशिष्ट परंपरा आहे. पण त्याची चर्चा मी अन्यत्र[४५] केली असल्याने येथे विस्तार करीत नाही. अशा कथांत धार्मिक दृष्टीला अधिक महत्त्व असल्याने कलात्मकता आपाततः कमी होते म्हणून या कथा 'धर्मकथा' ठरतात इतकेच.

**नागरकथा**—चरित्रकथेच्या प्रकारालाच सुदर्शन-चरित्रकार वीरदासाने 'नागरकथा' असे म्हटले आहे.[४६] चरित्रकथाना पुढे पुढे कलाकाव्याचे स्वरूप येऊ लागले आणि जवळ जवळ पंचवीस अधिकारापर्यन्त त्यांचा विस्तार वाढू लागला. जन्म, विवाह, मुनींचा उपदेश, वनविहार, पुत्रलाभ अशा प्रसंगाचे सविस्तर व कलात्मक वर्णन चरित्रकथेत येऊ लागल्याने या कथा नागरस्वरूपाच्या झाल्या असाव्यात. जे श्रेणिक चरित्र गुणदासाने चार अध्यायात संपविले आहे तेच श्रेणिक चरित्र जनार्दनाने चाळीस अध्यायाचे बनविले आहे. मेघराजाचे जसोधररास पाच अधिकाराचे तर गुणनंदीचे जसोधरपुराण आठ अध्यायाचे, कामराजाचे सुदर्शन चरित्र पंधरा अधिकाराचे तर वीरदासाचे पंचवीस अधिकाराचे. याचा अर्थ इतकाच आहे की पंधराव्या शतकात किंवा प्राचीन मराठी जैन वाङ्मयाच्या प्रारंभकाळी या कथा रंगवून सांगितल्या गेल्या नाहीत. परंतु उत्तरोत्तर या कथा विस्तृत होत गेल्या आहेत. कथेत रंगभरणी करण्यासाठी—कथा नागर करण्यासाठी हा प्रयत्न झाला आहे हे निश्चित होय. नागर याचा अर्थ सुसंस्कृत, चातुर्ययुक्त किंवा ललित असा होतो. शिष्ट

---

४१. ज. रा. ओवी २२, ३५, ३८ व ७१.

४२. हे धर्मकथा अतिसुरस । पूर्वी बोलिलें पुण्यपुरुष :
त्या अनुक्रमें हें महाराष्ट्र भाष । धर्मविशेष प्रबोधेण ॥ २५. ३५

४३. जसोधर पुराण. ८, २९

४४. जीवंधर पुराण. १, ३७, ३८

४५. ज. रा. प्रस्तावना. पृ. ६८, ६९

४६. इति श्री सुदरसेन कथासार । गुरू वंदिला धर्मचंद्र ।
बोधि बांधता विरसागर । कथा नागर परियावि ॥

लोकांसाठी जी कथा कलात्मक करून सांगितली ती नागरकथा असे म्हणावयास हरकत नाही. त्याच अर्थाने जीवदासाने सुदर्शन चरित्रासाठी 'नागरकथा' ही संज्ञा वापरली आहे. 'नागरीवोल[४७]' प्रमाणे 'नागरकथा' हा संज्ञाप्रयोग वैशिष्ट्यपूर्ण आहे यात शंका नाही.

**रास** —पंधराव्या शतकातील सुप्रसिद्ध गुजराथी जैन ग्रंथकार ब्रह्मजिनदास याचा प्रभाव प्रारंभीच्या मराठी जैन साहित्यावर फार मोठ्या प्रमाणात पडला. गुजरातीत हरिवंशरास, रामायणरास, जंबूस्वामी रास, जीवंधर रास, यशोधर रास, इत्यादी अनेक ग्रंथ त्यांनी लिहिले.[४८]

मराठी ग्रंथकार या ब्रह्म जिनदासाच्या ग्रंथांतील गुजराती भाषेला 'रास भाषा' म्हणूनही ओळखू लागले.[४९]

'रास' हा एक वाङ्मयप्रकारही आहे. वि. सं. १४१० ते वि. सं. १४८५या कालखंडातील काही गुजराती काव्यकृतींचा संग्रह 'गुर्जर रासावली' या ग्रंथात करण्यात आला असून त्यात 'रासु' किंवा 'रास' या काव्यप्रकाराची संक्षिप्त माहिती दिली आहे. रासु हा आख्यानकाव्याचा प्रकार असून श्रोत्यांसमोर त्याचे वाचन होई. रास–प्रकारात कथात्मक साहित्यच येते असे नाही. 'रेवंतिगिरि रासु' सारखे काव्य केवळ क्षेत्रवर्णनात्मकही आहे.[५०]

मराठीत 'रास' असे अभिधान ठेवून कोणतेच काव्य रचले गेले नाही हे खरे आहे. पण जे ग्रंथ मूळ गुजराती रासवरून मराठीत आणण्यात आले ते जरी मराठीच्या पद्धतीला अनुसरून चरित्र किंवा कथा म्हणून ओळखले जाऊ लागले तरी त्यांची रचना 'रास' स्वरूपाचीच झाली आहे.

याचे आदर्श उदाहरण म्हणजे दामा पंडिताचे साह रत्नाने सुधारून वाढविलेले जंबूस्वामी चरित्र होय. याचा परिचय मी 'सन्मति' मासिकात दिला होता. त्याचाच सारांश येथे देतो.[५१]—

मराठीत रास नावाचा एक वाङ्मयप्रकार मानावा लागेल अशी ही एक वैशिष्ट्यपूर्ण रचना आहे. भाषाच नव्हे तर मराठीला अपरिचित असे छंदही या ग्रंथात

---

४७. मराठीचे साहित्यशास्त्र–मा. गो. देशमुख, पृ. ६२.
४८. भट्टारक संप्रदाय, पृ. १५३.
४९. आदिपुराण गीर्वाणवाणी । बाळा गोपाळा न कळेल म्हणोनि ।
ब्रह्मजिनदास ठेवोनि । रासभाषा ॥ १'४ आ. पु.
भ्या देखिली रासभाषा । वोवी केली मन्हाट देश ।
देवेंद्रकीर्तिचा उपदेश । आला मज ॥ ७६२. धर्मपरीक्षा ( विशालकीर्ति ).
५०. व. रा. प्रस्तावना पृ. ८, ९
५१. सन्मति, जानेवारी १९६०.

वापरले गेले आहेत. ' दूहा, रासभासा, ओवीभासा, चौपईभासा व वस्तु अशा पाच छंदांत हे जंबूस्वामी चरित्र मराठीत आणले गेले आहे. प्रत्येक छंदाचे एकेक उदाहरण पाहिल्यास या मराठी रास काव्याच्या मापेची आणि रचनापद्धतीची कल्पना येईल:

दूहा–जंबूकुमार सुहावणा । राजसभा मझारी सार ।
आला कुवर हर्षवदन । जैसा नागकुमार ॥ ५.११७
श्रेणिक राजा उठोनिया । मान दिला बहुचंग
सींहासन दिल्ह बैसावया । आपुल्या मनी रंग ॥ ५.११८

रासभासा–सरोवर देखियला सार ।
निरमल जल कमले शोभितए ।
पंखी करित शब्दटंकार ।
मान सरोवर सरसे गुंजितए ॥ २.७८
स्वामी पाहा माहाराज ।
अंबवृक्ष विस्तारलाए ।
जैसा हा मंडपसार ।
मूळ धरी दिल्हाए ॥ २.७९

चौपाईभासा–

मामा म्हणे मास्या आईक विचार ।
एक कथा बहु माझी ज्निसवार ।
लोभी जीव नागदत्त बलिवंत ।
त्याणे आपुला कलु दिल्हा नाही अंत ॥ १३.३०

वस्तु–वस्तु हा छंद रासवाङ्मय प्रकारात नेहमीच वापरला जातो. हेमचंद्राने या छंदास 'रड्डा' असे नाव दिले आहे. 'वस्तु हे नावच असे दर्शविते की कथानकातील एखादा मुद्दा बाजूला काढून परिणामकारक करण्यासाठी गायचा असतो. त्याला स्वतंत्र ध्रुपद असून पदासारखी त्याची रचना असते. प्रथम चरण मुद्दाम द्विरुक्त केलेला असतो.

उदाहरण ( मराठीत )–

जंबूकुवर तव । जंबूकुवर तव । बोले सुमवाणी ।
हा संसार दुःखसागर । मामा आईक परमारथ मनोहर ।
धंदा करता जनम हारला । पूरव्या रासटे जीव ।
त्याकारणे खटपट परहरू । धरू संजम सीव ॥ १३.४०.

मराठीत रासकाव्यांची प्रतिकृती करण्याच्या प्रयत्नातून अशा प्रकारची कृती निर्माण झाली आहे. प्राचीन मराठी जैन वाङ्मयातील हे एक वैशिष्ट्यच मानावे लागेल.

**रूपक कथा**—रूपकांच्या आश्रयाने अमूर्त भावनेचे मूर्तीकरण करता येते. विशेषतः आध्यात्मिक बाबी या व्यावहारिक रूपकांच्या द्वारे अज्ञ लोकांना सुगम करून सांगता येतात. संस्कृतमध्ये जैन कवींनी अशी काही रूपककथा, नाटके लिहिली आहेत. नागदेवकृत 'मकरध्वज पराजय' वादिचंद्रकृत 'ज्ञानसूर्योदय' ही नाटके याच परंपरेतील आहेत. एकनाथांची भारुडे ही आध्यात्मिक रूपकेच आहेत. त्यांचे 'रुक्मिणी स्वयंवर' हे काव्यही जीव-शिव ऐक्याच्या मीलनाचे रूपक आहे असे म्हटले जाते. प्राचीन मराठीतील जैन कवींपैकी दोघांनी रूपककथा लिहिल्या आहेत. पंडित गुणिजनकृत 'परमहंसकथा' आणि दामापंडित कृत 'दानशीलतपभावना' ही दोन्ही रूपककाव्ये आहेत. विशेषतः परमहंसकथा हे एक आदर्श व उत्कृष्ट रूपक आहे. प्रारंभापासून अखेरपर्यंत हे आध्यात्मिक रूपक मनमोहक झाले आहे. काया नावाच्या नगरीत राज्य करणाऱ्या परमहंस राजाची ही कथा आहे. मायेच्या नादी लागून परमहंस बंदिवासात पडला. शेवटी मोहाशी विवेकाने घनघोर संग्राम केला आणि परमहंसास मुक्त केले. केवळ रूपकासाठी कथा, अशी कृत्रिमता या काव्यात दिसत नाही. खरोखरच कथा जिवंत वाटते आणि अमूर्त अशा गुणांची नावे धारण करून वावरणारी मोह, मदन, विवेक, चेतना, वसंतराव इत्यादी पात्रे मूर्तिमान झाली आहेत.

'दानशील तपभावना' यात मात्र कथा कमीच आहे. महावीरांच्या समोशरणामध्ये जाऊन दान, शील, तप व भावना हे चारही जण प्रत्येकाहून आपण कसे श्रेष्ठ आहोत हे पटवून देण्यासाठी युक्तिवाद करतात. एकंदरीत चार पात्रांचा हा संवाद झाला आहे. त्यांतून कथानिर्मिती झालेली नाही.

**व्रतकथा**—प्राचीन जैन वाङ्मयात श्रावक किंवा मुनी यांच्या अहिंसा, सत्य, अचौर्य, ब्रह्मचर्य व अपरिग्रह या अत्यंत महत्त्वाच्या नियमांना 'व्रत' ही संज्ञा लावण्यात येत असे. आणि त्या पाच व्रतांत प्रसिद्ध असलेल्या व्यक्तींच्या कथा प्रसिद्ध आहेत. अहिंसाव्रतात मातंग यमपाल, सत्यव्रतात धनदेव, अचौर्यव्रतात वारिषेण, ब्रह्मचर्यव्रतात नीलीकुमारी व अपरिग्रहव्रतात जयकुमार अशा या पाच व्यक्तींच्या[५२] कथांना व्रतकथा म्हटले तर त्यात काही वावगे होणार नाही.

परंतु मध्ययुगात 'व्रत' ही संज्ञाच अर्थाच्या अपेक्षेने किंचित बदलण्यात आली आहे असे दिसते. एखाद्या विशिष्ट दिवशी विशिष्ट देवतेचे पूजन करून उपवास करणे हा त्याचा मुख्य अर्थ झाला. त्यालाच धर्माचे महत्त्वपूर्ण स्वरूप मानण्यात येऊ लागले. साहजिकच अशा व्रताचे स्तोम अधिक माजले. व्रतांचा विधी सांगणे, त्या व्रताची कथा सांगणे आणि त्या व्रताचे फल सांगणे हेही त्या वाङ्मयाचे

---

५२. मातंगो धनदेवश्च वारिषेणस्ततः परः ।
नीलि जयश्च सम्प्राप्ताः पूजातिशयमुत्तमम् ॥ ६४ ॥ रत्नकरण्डश्रावकाचार

मोठे कार्य होऊन बसले. अपभ्रंश भाषेत, गुजराती राजभाषेत आणि कन्नडमध्येही अशा कथा बऱ्याच निर्माण झाल्या. अमरकीर्तिकृत पुरंदरविधानकथा, लक्ष्मणकृत चंदनषष्ठी-कथा, बालचंद्रकृत निर्दुःखसप्तमीकथा व विनय-चंद्रकृत निर्झर पंचमीकथा या अपभ्रंश भाषेतील बाराव्या तेराव्या शतकातील जैनव्रतकथा प्रसिद्ध आहेत.[५३]

प्राचीन मराठीतील जैन वाङ्मयातही अशा बऱ्याच व्रतकथा निर्माण झाल्या.

या व्रतकथांत व्रतउद्यापनाचा समारंभ व व्रतपालनाचे फळ इत्यादि भाग नीरस असतो. परंतु या व्रतांच्या कथा मात्र सरस आहेत. मराठीत पुढील व्रतकथा उपलब्ध आहेत: अभयकीर्तीकृत अनंतव्रतकथा, चिमनापंडितकृत अनंतव्रतकथा, ब्रह्मपुण्यसागरकृत रविवारव्रतकथा, विशालकीर्तिकृत रुक्मिणीव्रतकथा, पंत साबाजी-कृत सुगंधदशमीकथा, महीचंद्रकृत नंदीश्वरकथा, गरुडपंचमीकथा, लक्ष्मीचंद्रकृत मेघमाला व्रतकथा, जिनरात्रि व्रतकथा, यमासा अर्जुनसुतकृत रविवार व्रतकथा, अर्जुनसुत सोयराकृत कर्माष्टमीकथा, अनंतकीर्तिकृत दशलाक्षणिक व्रतकथा, जिनसागर कृत आदित्यकथा, अनंतव्रत कथा, निर्दोष सप्तमी कथा, पुष्पांजलिकथा, कलश दशमी-कथा व सुगंधदशमीकथा.

यात अनंतव्रतावर अभयकीर्ती, चिमनापंडित व जिनसागर या तिघांनी कथा लिहिली आहे. रविवार व्रतावर ब्रह्मपुण्यसागर, यमासा अर्जुनसुत व जिनसागर या तिघांच्या रचना आहेत.

यमासार्जुनकृत रविवारव्रतकथा ही व्रतकथा न राहता एक कलात्मक आख्यानकाव्य ठरेल अशी विविध वाङ्मयीन गुणांनी संपन्न आहे. जिनसागराची सुगंधदशमी कथा व निर्दोष सप्तमी कथा या सुद्धा कथा म्हणूनही सुरस व मनोहर आहेत. त्यांच्या कथा वाचून " जवळि जिनकथेचे मातुके गोड याहे। कवळ धरूनि संतीं एकदा अर्पिलें हे " [५४] हे त्याचे म्हणणे यथार्थ वाटते.

**संकीर्ण कथासंग्रह** — अनेक लोककथांना धार्मिक स्वरूप देऊन त्यांचाही संग्रह करण्याची प्राचीन काळापासून परंपरा जैन साहित्यांत आहे. हरिभद्रकृत समराइच्चकहा, सिद्धर्षी-कृत उपमितिभवप्रपंचकथा, हरिषेणकृत धर्मपरीक्षा, हरिभद्रकृत धूर्ताख्यान या ग्रंथात अशा अनेक लहानमोठ्या गंमतीदार कथा संग्रहित केल्या आहेत. मनावर नीतीचा परिणाम करण्याच्या अपेक्षेने या कथा उपयुक्त असतात. सुगमता हा त्यांचा मोठा गुण मानावा लागेल.

प्राचीन मराठीत जैन ग्रंथकारांनी अनुवाद करून अथवा आधार घेऊन संस्कृत प्राकृतातील काही कथासंग्रह मराठीत आणले आहेत. विशालकीर्तिकृत धर्म-परीक्षा,

---

५३. जिनसागर यांची समग्र कविता, प्रस्तावना पृ XII

५४. जिनसागर यांची समग्र कविता, पृ. २०

दयासागर कृत सम्यक्त्व-कौमुदी व धर्मामृतपुराण, महीचंद्रकृत सम्यक्त्वकौमुदी, जिनसेनकृत पुण्यास्रव-कथा-कोश हे कथासंग्रह प्रमुख आहेत.

धर्मपरीक्षा हा ग्रंथ जैनेतर धर्मांची परीक्षा करण्याच्या उद्देशाने निर्माण झाल्यामुळे परिहासकथांचे स्वरूप या ग्रंथाला आले आहे. सम्यक्त्व-कौमुदी हा तर सम्यक्त्व वाढविणाऱ्या कथांचा संग्रह आहे. या सर्वच कथा लोक-कथा–स्वरूपाच्या आहेत. पहिली कथा ही तेणाईरामकथेच्या स्वरूपाची आहे. एका कथेतून दुसरी कथा जन्म पावते. विशेषतः यमदंडाने राजाला सांगितलेल्या कथा रोचक आहेत. धर्मामृतपुराणात सम्यक्त्वाच्या आठ अंगांत प्रसिद्ध असणाऱ्यांच्या आठ कथा आल्या आहेत. पुण्यास्रवकथाकोषांत जशा पुराणकथा आहेत तशाच दैवत-कथाही आहेत. जैन परंपरेतील बऱ्याचशा कथांना आख्यानाचे स्वरूप देऊन त्यांचा हा संग्रह बनविला आहे. श्रेणिकचरित्रांत व जंबूस्वामी-चरित्रांतही कित्येक लोक कथा एकत्रित आणण्यात आल्या आहेत. एकाच मुलासाठी भांडणाऱ्या दोन भार्यांची कथा व एकाच स्त्रीसाठी भांडणाऱ्या दोन पुरुषांची कथा या शुद्ध लोक-कथाच आहेत. त्याचप्रमाणे मुनीकथा व तुकारीची कथा यांचेही स्वरूप लोककथेचेच आहे. श्रेणिकचरित्रातील जिनदत्त श्रेष्ठी व मुनी यांनी एकमेकाला सांगितलेल्या आठ कथा म्हणजे एक स्वतंत्र कथा–संग्रहच आहे. तसेच जंबूस्वामी चरित्रातील पद्मश्री, कनकश्री, विनयश्री व रूपश्री या चार स्त्रियांनी त्यांचे मन संसारात वळविण्यासाठी सांगितलेल्या चार कथा आणि जंबूकुमाराने उत्तरादाखल सांगितलेल्या चार कथा या लोककथा आहेत. हाती आलेला पुत्र मारून नवीन पुत्रोत्पत्ती करणारा धनदत्त, चुकून कैलासावर पडून मरण पावल्याने देव होणारा पण पुनः देवपद मिळावे म्हणून तेथे पडून जीव देणारा जीव, हाती आलेला हंडा 'पुढे पाहू' म्हणून बाजूस ठेवणारा शंखदरिद्री, लोभाने मरण पावलेला सर्प, समुद्रात मरण पावलेला मांसलोलुप कावळा, वृद्धपणी कर्दमात रुतून तहानेने मरणारा कामुक वानर, मधुबिंदूच्या लोभाने सर्पयुक्त विहिरीत झाडास लोंबकळणारा लोभी जंबुक यांच्या आठ कथा उत्कृष्ट आहेत. त्याचप्रमाणे जंबुकुमाराने मामाला व मामाने जंबुकुमाराला सांगितलेल्या चार चार कथाही संकीर्ण कथा संग्रहात शोभतील अशाच आहेत. अशा कथा काल्पनिक असल्या तरी धर्मतत्त्व मनावर बिंबविण्यासाठी त्यांचा उपयोग होतो. पंचतंत्र व हितोपदेशाच्या परंपरेत मोडतील अशा या कथा आहेत.

**भवांतर कथा**— जैन कथानकात पुनर्जन्म सिद्धान्ताला अतिशय महत्त्व दिले आहे. वसुदेवहिंडी, समराइच्चकहा किंवा कोणतेही पुराण अथवा चरित्र पाहिल्यास याची प्रतीती येते. पण केवळ ' भवांतर कथा ' मराठीत लिहिल्या आहेत हे विशेष होय. प्राचीन मराठी जैन साहित्यात मेघराजकृत पार्श्वनाथ भवांतर, गंगादास-विरचित पार्श्वनाथ भवांतर, चिमनापंडितकृत नेमिनाथ भवांतर आणि रत्नसेनकृत आदिनाथ भवांतर या चार रचना वैशिष्ट्यपूर्ण आहेत. पार्श्वनाथ, नेमिनाथ व

आदिनाथ तीर्थंकरांच्या पूर्वभवाच्या कथा या लहान लहान ग्रंथांतून सांगण्यात आल्या आहेत.

स्तोत्र— स्तोत्रवाङ्मय हा एक भारतीय वाङ्मयाचा बहुमोल भाग आहे. परमेश्वर अथवा आराध्य दैवत यांची स्तुती करणे हा स्तोत्राचा मुख्य विषय असतो. भक्तिभाव हा स्तोत्राचा मुख्य गाभा असावा लागतो. " जैन स्तोत्रवाङ्मयाचा प्राचीनतम भाग म्हणजे आचार्य कुंदकुंद व पूज्यपाद यांचे समजले जाणारे प्राकृत व संस्कृत भक्तिपाठ होत. 'दशभक्ति' जैन वाङ्मयात प्रसिद्ध आहेत. देव, गुरु व शास्त्र, दर्शनज्ञान व चारित्र आणि तीर्थक्षेत्रांची भक्ती हा जैन स्तोत्रवाङ्मयाचा पाया आहे. भक्तीतून स्तुती निर्माण होते. स्तुत्य विषयाचे विस्तृत वर्णन करणे आणि स्तवनाचे कारण व्यक्त करणे ही स्तोत्रवाङ्मयाची विशेषता. पण 'प्रता' प्रमाणेच स्तोत्राची ही कल्पनाही मागे पडली. स्वतःच्या परिश्रमाने स्तुत्य गुण मिळविणे हे वेगळे आणि आराधना करून देव प्रसन्न करून त्याच्याकडून वर मिळविणे वेगळे. पुढे पुढे वर व प्रसाद मिळविण्याची वृत्ती इतर धर्मांच्या प्रभावाने जैनधर्मीयांतही आली असावी. भक्तामर, कल्याणमंदिर, एकीभाव इत्यादी संस्कृत जैन स्तोत्रांत — वैष्णव, शैव भक्तिपर संप्रदायांना शोभून दिसणाऱ्या — तीन कल्पना-स्तुत्य देवतेची अलौकिकता, तिचे सर्वशक्तिमत्व आणि स्तवन करणाऱ्याची दीनता प्रामुख्याने दिसतात.[५५] "

मराठीत स्तोत्रवाङ्मय जैन कवींनी बऱ्यापैकी निर्माण केले आहे. संस्कृत स्तोत्रांचा अनुवाद जसा त्यांनी केला तशीच काही स्वतंत्र स्तोत्रेही रचिली. तीर्थंकराहून अन्य अशा पद्मावती – क्षेत्रपाल याचीही स्तोत्रे मराठीत झाली आहेत. महीचंद्रकृत शांतिनाथस्तोत्र अपवाद सोडल्यास बाकीची बहुतेक स्तोत्ररचना जिनसागराचीच आहे. भक्तामर स्तोत्र, आदिनाथ स्तोत्र, शांतिनाथ स्तोत्र, पार्श्वनाथ स्तोत्र, वीतराग स्तोत्र, पदमावती स्तोत्र, क्षेत्रपाल स्तोत्र अशी एकंदर सात स्तोत्रे जिनसागराची आहेत. महीचंद्रकृत शांतिनाथस्तोत्र छापे असले तरी त्यात भक्तीची तल्लीनता दिसून येते. जिनसागराची भाषा प्रौढ आहे. मानतुंगविरचित संस्कृत भक्तामर स्तोत्र ही रचना जैन वाङ्मयात फार लोकप्रिय आहे. ४८ कुलपाच्या आत त्यांना एका राजाने बंदिस्त केले होते. आणि या स्तोत्राच्या प्रभावाने त्यांनी ती कुलुपे तोडली. अशी एक कथा या स्तोत्राच्या पार्श्वभूमीत सांगितली जाते म्हणून अथवा त्यातील वाङ्मयीन गुणामुळेही ती रचना इतकी लोकप्रिय झाली असावी. जिनसागराने या स्तोत्राचा समश्लोकी अनुवाद केला आहे. ती रचना ५० श्लोकाची असून चांगली आहे. भक्तामर स्तोत्रात आदिनाथांची स्तुती आहे. मराठीत आदिनाथ, शांतिनाथ व पार्श्वनाथ हे स्तोत्रनायक दिसतात. पद्मावती स्तोत्रात स्वतःकडे अत्यंत लघुत्व घेऊन दीनपणाने याचना केली

---

५५. जिनसागर यांची समग्र कविता, प्रस्तावना पृ. XV

आहे.[५६] क्षेत्रपालस्तोत्रात भक्तिभाव कमी आहे, पण याचना अधिक दिसते. चिमना-पंडितकृत गोमटस्वामीस्तोत्र मात्र भावसंपन्न आहे.

## इतर काही प्रकार

बारमासी, फाग, गोळणीमाल, पाळणा, लावणी, भूपाळी, पदे, आरती, गीत, कैनो, बहुतरी, अभंग, विनती असे कितीतरी विविध पद्यवाङ्मयातील प्रकार जैन कवींनी हाताळले आहेत. गुजराथी व हिंदी वाङ्मयाच्या प्रभावाने प्राचीन मराठीत अल्पस्वल्प स्वरूपात का होईना हे कवी वरील प्रकार मराठीत आणू शकले. धर्मातील संबंधामुळे एका भाषेतील वाङ्मयप्रकार दुसऱ्या भाषेत कसे येऊ शकतात व साहित्यालाही त्यामुळे कधी कधी वैचित्र्यपूर्ण शोभा कशी प्राप्त होते याचे हे उदाहरण आहे. महानुभावांना अन्य प्रांतीय भाषेची परंपरा नव्हती. भागवत संप्रदायात तत्कालीन अन्य प्रांतीय भाषेतून काही विशिष्ट वाङ्मयप्रकार आणल्याचे दिसत नाही. पण जैन धर्मीयांत मात्र गुजरात व महाराष्ट्र यांतील भट्टारक पीठांच्या संबंधामुळे हे सहजासहजी होऊ शकले आहे. उपर्युक्त काही प्रकारांची ओळख येथे थोडक्यात करून देण्याचा प्रयत्न करीत आहे.

**बारमासी** – हा एक विरहगीताचा प्रकार आहे. हा प्रकार मुळात अपभ्रंशा-तला असावा. संस्कृतात हा प्रकार आढळत नाही. जैन कवींनी लोक-कथा व लोक-परंपरा यांचा आश्रय घेऊन आपल्या मताचा प्रसार केला. 'बारहमासी' हा एक लोकपरंपरेतून उचललेला वाङ्मयाचा प्रकार असण्याची शक्यता आहे.[५७] मराठीत ज्या 'विराण्या' आढळतात त्या आणि ही बारमासी यांचा प्रकार एकच आहे. पण विशिष्ट पद्धतीने प्रत्येक महिन्यातील परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर विरहाची व्याकुळता नायिकेने व्यक्त करणे ही बारमासीची विशेषता असते. हिंदीत 'बारहमासी' म्हणून तो प्रकार ओळखला जातो. बारहमासीच्या जैन परंपरेत बारा महिन्यांतील कोणत्याही एका महिन्यापासून या गीताचा आरंभ होतो. मराठीत दिनासाकृत 'बार-मासी' ही एकच या पद्धतीची रचना आहे. नेमिनाथांनी विवाहापूर्वीच राजुलचा त्याग केला. विवाहोत्तर जीवनाची मधुर नी धुंद स्वप्ने पाहणारी राजीमती शोकदग्ध झाली. तिच्या शोकाला जो शब्दाकार मिळाला तोच या बारमासीत पाहावयास मिळतो. वैशाखापासून तो चैत्रापर्यंत प्रत्येक महिन्यात राजीमतीची अवस्था कशी विरहव्याकुळ

---

५६. माझे बोल पवित्र कोमल तुझ्या थोर्नी न का शिवती ।
वाक्यें हे श्रवणात शोभति तई पाषाणही फूटती ।
माझा हा अपराध थोर दिसतो हे काय आश्चर्यता ।
टाकी कोर रुवेग हीच विनती घे तू मनी नचता ।—पद्मावती स्तोत्र १२.

५७ 'हिंदी अनुशीलन' अंक ४, संवत २०१० 'बारहमासीकी प्राचीन परंपरा'.

होते हे काव्यात सांगितले गेले आहे. ही रचना प्रसिद्ध झाली आहे.[५८] मराठी लावणीवाङ्मयातील काही काव्ये या परंपरेशी तंतोतंत जुळणारी आहेत. प्रियकराच्या जीवनाबद्दल काळजी वाटणे, स्वतः शोकव्याकूळ होऊन भोगोपभोगांचा त्याग करणे, इतरांचे सौख्य पाहून झुरणे हेच या विरहगीतांचे वैशिष्ट्य असते.[५९]

**'फाग':**—'फाग' हा गुजराती, राजस्थानी व हिंदी भाषेत पाहावयास मिळणारा प्रकार आहे. 'फाग' म्हणजे वसंतोत्सव. चैत्रमासांत खेळत, नाचत, रंग उडवीत, गात अनुभवायाचा हा वाङ्मयातला प्रकार आहे. त्यात अंतर्यमक असते. मात्रा १२ अधिक १२ असतात. मराठीत 'होळीगीते' आढळतात. पण 'फाग' या नावाचा उपयोग कोठेही केलेला दिसत नाही. मराठीत गुणकीर्तिकृत 'रामचंद्रफाग' व कामराजकृत 'चेतनफाग' ह्या दोन रचना दिसतात, त्यासुद्धा गुजराथी परंपरेतून मराठीत आल्या आहेत. पण जैन लेखकांनी व कवींनी 'फाग'चा उपयोग मात्र धार्मिक कारणासाठी केला आहे. पण त्याचबरोबर त्या काव्यातील मोकळेपणा व आनंद कायम ठेवला आहे.

**गौळणीमास**—हा सुद्धा गुजराती परंपरेतून गुणकीर्तीने मराठीत आणलेला प्रकार आहे. 'नेमिनाथ विवाह' गौळणीमासात त्याने सांगितला आहे. सामूहिक स्त्री-गीतांतलाच हाही एक प्रकार असावा.

**पाळणा**—रामनवमी अथवा कृष्णाष्टमीला त्या त्या परमपुरुषाचा जन्मदिवस असल्याने उत्सवात त्याचा पाळणा स्त्रिया म्हणत असतात. जैन परंपरेत तीर्थंकरांचा जन्मकल्याणिक उत्सव होतो. त्यावेळी पाळणा म्हटला जातो. विशेषतः 'जो जो' नेच या पाळण्याचा आरंभ झालेला असतो. पद्मावतीचाही पाळणा स्त्रियांत लोकप्रिय आहे. गुणकीर्तिकृत 'नेमिनाथपाळणा' हा प्राचीन मराठी साहित्यातील पहिला 'पाळणा' म्हणावा लागेल.

"जो जो सुरनर करतिल सेवा ।
आलि सांडुनि निद्रा करि नेमिदेवा ।"

हे या पाळण्याचे ध्रुपद आहे. गुणकीर्तीने रचलेला पाळणा अनेक दृष्टींनी महत्त्वाचा आहे. भाषेतील जुनेपणा येथे खास प्रत्ययास येतो. महीचंद्रकृत महावीर पाळणा, देवेंद्रकीर्तीच्या प्रियशिष्याने रचलेला पद्मावतीचा पाळणा अशा काही रचना या प्रकारात दिसून येतात. गंगादासकृत चक्रवर्तीचा पाळणाही उपलब्ध आहे. चिमनापंडितकृत 'नेमीश्वर पाळणा' ही पाहावयास मिळतो.

---

५८. सुषमा, एप्रिल मे १९६०.
५९. प्रभाकरकृत 'वैऱ्याचे दिवस लोटती' पाहा.
६०. गुर्जररासावली, Introduction, Page 12.

**लावणी–पोवाडा–कीर्तन**–लावणी हा शृंगारिक भावना व्यक्त करण्याचा प्रकार असताना महतीसागराने 'देवेंद्रकीर्तिलावणी'[६१] रचून त्याचा गुरुस्तुती करण्यासाठी उपयोग केलेला दिसतो. केवळ लावणीच्या पद्धतीने ही रचना म्हणावयाची म्हणूनच याला 'लावणी' असे कवी म्हणत असावा. गंगादासकृत 'पार्श्वनाथ भवांतर' 'डफगानाचि चालीमधी'[६२] गावयाचा आहे हे अनेक ह. प्रतींत स्पष्ट केले आहे. कवीनेही तसे म्हटले आहे. "जिनगुणाचे कीर्तन । भवातर केले डफगाणी* । कवित्व केले गंगादासाने । तुम्ही आयका चित्त देऊन ॥"
या कवीच्या सांगण्यावरून हा पोवाडा असावा असे वाटते. 'डफगाणे' म्हणजे पोवाडा अशी कल्पना असण्याची शक्यता आहे.

याच भवांतरकथेला कवी कीर्तनही म्हणतो.

"प्रमोद संवत्सर शुक्रवार त्रयोदस ।
'कीर्तन' पूर्ण जाले धर्मचंद्राचा आदेस ॥–
त्याह्यांचा पंडित मैति गंगादास
मंगलिक महोछवाकारण 'कीर्तनाचा प्रकास ॥" ६३.

या दोन 'कीर्तनां'चा उल्लेख हा विनाकारण नसून कीर्तनाप्रमाणे या कथेचा उपयोग झाला असल्याचा तो पुरावा आहे असे वाटते.

रत्नकृत 'सेटिमहात्म्य' हे काव्यही पोवाडा प्रकारातच येईल. चौकसहित ११ कडव्यांचा हा पोवाडा आहे.[६४] नागपूर येथील वर्धासा नावाच्या श्रीमंत गृहस्थाने मंदिरमहोत्सव करविला त्याप्रसंगी ही रचना झाली.

याच संदर्भात लक्ष्मीचंद्रकृत मेघमालाव्रतकथेचा उल्लेख करावासा वाटतो. मेघमालाव्रतकथासुद्धा सभेत वाचून दाखविल्याचा उल्लेख येतो.

"कडतासा रेवडिने आणिली ।
कडतासा कमलापुरेन प्रगट केली ।
गोविंदा कवड्याने गायिली ।
सभेमाजी[६५]

हा उल्लेख पाहता सभेत गाऊन दाखविणे हे येथे महत्त्वाचे मानावे लागेल. कीर्तन व पोवाडा या दोन्हींचा संगम अशा वेळी होत असल्यास नवल नाही.

---

६१. महतीकाव्यकुंज पृ. ९२.
६२. नागपुर हस्त. क्रमांक ५.
* पार्श्वनाथभवांतर ४७.
६३. पार्श्वनाथ भवातर ४६.
६४. युगवाणी, ऑगष्ट, १९५८.
६५. मेघमाला व्रतकथा ॥ ६९ ॥.

**भूपाळी** – भूपाळीला काही कवींनी ' प्रभाती ' असेही म्हटले आहे. प्रभातकाळी परमेश्वराचे नामस्मरण व गुणचिंतन घडावे हाच या भूपाळीचा प्रमुख हेतू असतो. जनार्दन श्रावककृत ' उठी उठी वा प्राणेश्वरा । जागृत होई वा लवकरा । ', दयाळकीर्तिशिष्य ' भूप ' याची ' प्रातःकाळी मजा वाचे हो, प्रातःकाळी मजा वाचे । चोवीस नाम जगता प्रभूचे, सार्थक होइल जन्माचे ' ॥ आणि कवींद्र सेवकाच्या ' भरत क्षेत्रात पवित्र भूमिका । तिचे नाव घोका प्रातःकाळी । ', ' ऊठ जीवा मना होय जागा तरी । पूर्व दिशेवरी सूर्य आला । ' या ' प्रभाती[६६] ' अतिशय मधुर आहेत. चिमना पंडितकृत ' उठि उठि बा प्रभात झाला । पंच परमेष्ठी स्मरण करा ' आणि ' मालगौड ' रागदारीतील " आदीश्वरा देवा दयाला, उठि वेगि म्हणे मरुदेवी बाला । प्रातःसमय झाला । दिनकर उगवला । जागे वहिला । मुखकमल प्रक्षाला ॥ " या भूपाळ्या रसभावपूर्ण आहेत. प्रातःकाळी तीर्थंकर नामाबरोबर तीर्थ-क्षेत्रांचेही स्मरण पवित्र मानले जात होते.

**पदे आणि गीते[६७]** – ब्रह्मगुणदास विरचित ' रामचंद्र हळदुली, कामराजकृत ' चैतन्यफाग ', पासकीर्ती – वीरदासकृत ' बहुतरी ', गुणदासकृत ' गान्हाणे ' व वीरदासकृत ' नेमिनाथ बन्हाड ' यांचे ' प्राचीन मराठी गीते ' या मथळ्याखाली डॉ. जोहरापूरकर[६८] यांनी संपादन केले आहे. यातील ' चैतन्यफागा 'चा विचार ' फाग ' प्रकारात केला आहे. ' रामचंद्र हळदुली ' हे रामविवाह प्रसंगाचे एक सुंदर स्त्रीगीत आहे. ' धवलगीत ' या प्रकारात याचा समावेश होईल. महदंबेचे ' धवळे ' व हे गीत यातील साम्य लक्षात घेण्याजोगे आहे. वराच्या अंगाला हळद लावून सुवासिनींनी गावयाचे हे गीत आहे. ' बहुतरी ' म्हणजे ' बहात्तरी ' असे असावे. हे गीत ७२ कडव्यांचे आहे. " बावन मातृकांच्या ( मुळाक्षरांच्या ) अनुरोधाने धर्मविचाराचा संग्रह करण्याची पद्धती गुजराती वाङ्मयात फार प्राचीन काळापासून रूढ आहे. ' बहुतरी ' ही अशी पहिली मराठी रचना असावी ! " असे या गीतासंबंधी डॉ. जोहरापूरकर यांनी म्हटले आहे. गुणदासकृत ' गान्हाणे ' हे एकनाथांच्या तसल्याच प्रकारच्या गीताशी साम्य दाखविते. परंतु परस्परांचा काहीही संबंध नाही हे विशेष होय. याशिवाय किती तरी पदे आणि गीते अद्यापि अप्रकाशित आहेत. गुणकीर्तींचे ' धंदागीत ', गुणदासकृत ' क्षमागीत ', व ' विंचू गीत ', मेघाकृत ' कृष्णगीत ', ' गुजरी मऱ्हाठी गीत ', ' गोमटस्वामी गीत ' यांचा त्यात प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. चिमना पंडिताने तर पदे आणि

---

६६. जिनेंद्रमंगल आराधना पृ. ४२ ते ४४.

६७. जैन कवि सोडून इतर कवींच्या गीतांचा संग्रह ' प्राचीन गीत भांडार ' या नावाने श्री. ना. ग. जोशी यांनी संपादिला आहे. मौज प्रकाशन ४१.

६८. सन्मति नोव्हें-डिसें. १९५९ व जून-जुलै १९६०.

गीते यांचीच रचना फार केली आहे. गोमटस्वामीगीत, पिंगा, फुगडी, चेंडूफळी, बालक छाटी, टिपरी, लाव्होटा, झंपा, गुरुगीत, नेमिनाथगीत, नेमिनाथमवांतरपद अशा कितीतरी विविध प्रकारच्या त्याच्या रचना पाहावयास मिळतात. याशिवाय रागदारीत गावयाची अनेक पदे त्यांनी रचिली आहेत. महीचंद्राचे नेमीश्वर गीत, रत्नाकृत शिवनेमी संवाद, कंसाचे पद, दिनाकृत ' चिंती रे चिंती माझ्या मना ', नेमाकृत अहिराणी गीत व नेमीश्वर गीत, आणि मानकीर्तीची काही पदे इत्यादी कितीतरी गीतांनी व पदांनी जैन साहित्याचे हे दालन समृद्ध आहे.

या रचना किरकोळ म्हणून त्यांच्याकडे दुर्लक्ष करता येणार नाही. प्राचीन काळची ही भावगीते आहेत. स्वतःचे कामक्रोधादी विकार आवरत नाहीत म्हणून ' गाऱ्हाणे ' गाणे, प्रभूचे गुणगान करणे, रूपकावून आध्यात्मिक विचार-भावना व्यक्त करणे, आत्मोद्धाराची अहर्निश तळमळ लागलेली असणे हीच या पदावून व गीतानून व्यक्त झालेली वैशिष्ट्ये आहेत. त्यातून त्या त्या गीतकारांनी स्वतःच्या भावभावनांना आकार तर दिलाच पण अनेक सामाजिक रीती-रूढी यांनाही शब्दांकित करून ठेवले आहे.

चिमनापंडिताने एकनाथाप्रमाणे तत्कालीन खेळांच्या प्रकारावून अध्यात्म सांगितले आहे. त्याने मालगौडा, कल्याणबिलावल, केदार, काफी, मल्हार, सक्लामरण या रागदारींचा उपयोग आपल्या पदासाठी व गीतासाठी केला आहे.

**विनती**—मराठीत हा वाङ्मयप्रकार नाही. पण हिंदीच्या संसर्गाने काही जैन कवींनी ' विनती ' रचल्या आहेत. चिमनाकृत ' मुनिसुव्रत विनती ' ही हिंदीत असली तरी ती मराठी कवीची आहे. रायाकृत ' जिनवर विनती ' मात्र खास मराठीत आहे. विनती म्हणजे ' विनंती ' विनयाने प्रभूजवळ आशीर्वाद मागणे हे विनतीत पाहण्यास मिळते.

**आरती***—मराठीत जैन आरत्या बऱ्याच आढळतात. तीर्थंकर, अरिहंत, सरस्वती, गुरू, पद्मावती इत्यादिकांच्या आरत्या पाहण्यात येतात. ' गेयता ' हा आरत्यांचा प्रमुख गुण असतो. वाद्यांच्या व टाळ्यांच्या तालात आरती रंगत असावी. जिनसागराच्या दशलक्षण धर्मावरील आरत्या अर्थाच्या दृष्टीनेही बऱ्या आहेत. बहुतेक आरत्यात शेवटी कवी ज्या गावातील जिनमंदिरातील मूळनायकाची आरती असेल त्याचा उल्लेख करतात. चालू संशोधनात माझ्या पाहण्यात पुढील आरत्या आल्या आहेत. चिमनापंडितकृत—आदिनाथ आरती, चंद्रनाथ आरती, पार्श्वकीर्तिकृत—पार्श्व-

*" आरती हा शब्द 'आर्तिक्य' म्हणजे मूर्तिपूजेतील एक उपचार या विधि किंवा ' आरात्रिका ' म्हणजे मूर्तीपुढे विशेषतः रात्री करावयाचे दीपदर्शन किंवा दीप ओवाळण्याची कृती या दोन्ही संस्कृत शब्दांपासून व्युत्पादिला जातो. " कुमुदिनी घारपुरे...म. सा. पत्रिका. वर्ष ३४ अंक १४०, १९६२.

नाथ आरती, रायाकृत–माणिकस्वामी आरती, नेमीश्वर आरती, शांतिनाथ आरती, महीचंद्रकृत–चूडामणि आरती, अरिहंताची आरती, रामकीर्तिकृत पद्मावती आरती, छत्रसेनकृत सरस्वती आरती, नंदीश्वर आरती, यमाशा अर्जुनसुतकृत गुरू आरती, रतनशाकृत सिद्धसेन आरती, जिनसागरकृत सात आरत्या[६९]–गंगादासकृत नेमिनाथ आरती, माणिकनंदीकृत अनंतनाथ आरती, चंद्रनाथ आरती, समवशरण आरती, भीमचंद्रकृत गुरूची आरती. याशिवाय ज्यांचा कर्ता मिळत नाही अशा कित्येक आरत्या आहेत.

**तीर्थवंदना**—हा मुद्दा धार्मिक वाङ्मयाचा प्रकारच मानला जातो. हिंदीत व गुजरातीत तीर्थवंदना आहेत. तीर्थक्षेत्रे ही पूज्य मानली जातात. त्यांनाही भक्तिभावाने वंदन करण्याची पद्धत जैन पूजापाठात आहे. ही तीर्थभक्ती म्हटली तरी योग्य होईल. मेघराजकृत गुजराती तीर्थवंदना उपलब्ध[७०] आहे. मराठीत चिमनापंडितकृत तीर्थवंदना चांगली आहे. तत्कालीन बऱ्याच प्रसिद्ध तीर्थक्षेत्रांचा उल्लेख त्याने केला आहे. जंबूस्वामी चरित्रातही (दामा-रत्नक) अकराव्या अधिकारात एक तीर्थवंदना[७१] आली आहे. पण ती स्वतंत्र रचना नाही. पण प्रकार तोच वाटतो. ऐतिहासिक दृष्ट्या हा वाङ्मयप्रकार मौलिक आहे.

**केको–कुतको–कोतको**–जुन्या वाङ्मयातील 'भारुड' या सदरात जमा होतील अशा या रचना आहेत. 'केको' जिनसागराची आहे. मानवजातीच्या भयानक भविष्याचे हे चित्र पद्मावतीने रेखाटले आहे. देव–देवी कोणाच्या तरी अंगात येऊन 'माकणुक' सांगतात त्याचप्रमाणे हुंबचवासी पद्मावती ही हे भविष्यकथन करीत आहे. या भविष्यात अद्‌भुताचा प्रकार जरी दिसत असला तरी त्यातही एक प्रकारचे कारुण्य दिसून येते. या रचनेस 'कयको' किंवा कैको म्हणण्याची कारणे मात्र समजली नाहीत. ज्याअर्थी पद्मावती स्वतःला 'ऐसी मी कयकाय'[७२] म्हणवून घेते. त्याअर्थी त्या शब्दाचा अर्थ कैकाडणी असावा. ती कैकाडणीच हे भविष्य लोकांना सांगत आहे. लोकवाङ्मयात ही रचना समाविष्ट होऊ शकेल. सोमवंशी ठकुर्जीकृत 'कोतको' नावाची एक रचना अशीच वैशिष्ट्यपूर्ण आहे. "सरी कोतको दंड जाईन । आहो जाईन गिरिनारी समान । पद्मावती अमाजीस पाहीन । आहो पाहीन काही फल मागेन ॥" असा या काव्याचा आरंभ आहे. हा काव्यप्रकार प्राचीन मराठीतील 'कोंवजी' या प्रकारासारखा वाटतो. त्यातही भविष्यकथन केलेले असते.[७३]

---

६९. जिनसागराची समग्र कविता.
७०. ज. रा. प्रस्तावना, पृ. १३.
७१. सन्मति, जानेवारी, १९६०.
७२. जिनसागर याची समग्र कविता, पृ. १२५
७३. महाराष्ट्र सारस्वत ( सं. डॉ. शं. गो. तुळपुळे ) पुरवणी पृ. १००६

अभंग—मराठी संतवाङ्मयात अभंगांचे स्थान अभंग आहे. विशेषतः तुकारामाच्या अभंगांनी ते स्थान कायम केले आहे. 'अभंग' हा मानला तर छंदाचा प्रकार आहे नाहीतर तो साहित्याचाच एक प्रकार होऊ शकेल अशी त्याची वैशिष्ट्ये आहेत. जैन वाङ्मयात अभंगनिर्मिती करणारे दोनच कवी दिसतात. तेही अठराव्या शतकानंतरचे आहेत. महतीसागर आणि कवींद्रसेवक या दोघांनीही भक्तिपूर्ण अभंगांची रचना केली असून अभंगांची परंपरा जैन साहित्यातही आणण्याचे काम उत्कृष्टपणे बजावले आहे. कवींद्र सेवकांच्या ५४५ अभंगांचे एक संपूर्ण हस्तलिखित[७४] मला उपलब्ध झाले आहे. 'अभंग चाल तुटक' व 'अभंग चाल यमक' असे दोन प्रकार त्यात दिसून येतात.

उदाहरणे—

अभंग चाल यमक –

देह मांसाचा पिंजरा । जीव पक्षी आत बरा ।। १ ।।
आयु कर्म्माण निर्मान । दोघे संयोजिले त्याने ।। २ ।।
खाया मिळता संतोष । तुट होता कासाविस ।। ३ ।।
वस्ती करी पुण्याधीन । सेखी पावे तो मरण ।। ४ ।।
देह धरी सोडी फार । जीवा न कळे हा पार ।। ५ ।।
मन पुसे जीवालागी । कारे जालासी कुसंगी ।। ६ ।।
जीव म्हणे रे प्रधाना । अंतरला तीर्थराना ।। ७ ।।
मन वदे रे फीरावे । हे तो तुझे तुला ठावे ।। ८ ।।
कवींद्र सेवका कोड । आले चित्ता अवघड ।। ९ ।।

अभंग चाल तुटक—

येका लोभासाठी । नाही ते करीति । ऐसा भगवंती कारे नाही ।। १ ।।
टंच वेळूवरी । कोल्हाटिण नाचे । मरणाच भय सोडी तेथे ।। २ ।।
कन्या पुत्र पोसी । वाहे तृणकाष्ठ । शरीराचे कष्ट सोपे मानी ।। ३ ।।
उपवासी बैसे । कुळाचिये द्वारी । व्रतासी न करी एक रोज ।। ४ ।।
येता दरिद्रासी । आन्हवानि चाले । आता वसइले घालि जोडा ।। ५ ।।
रानियाचे सभे लवावि मस्तक । न जोडी हास्तक साधुजणा ।। ६ ।।
दुर्वळाच्या करि फार चेष्टा मुखी । अरिहंत मुखी न घे कधी ।। ७ ।।
दीपायासी आशा । दाविताची राजा । शेळीयाचे पुजा उडी घाली ।। ८ ।।
ऐसी या लोभान । करिता तमाशा । क्षणात मोआला जासी वाया ।। ९ ।।

———

७४. हिंगोली हस्तलिखित, परिशिष्ट पाहा.

अकारणी कष्ट । का करी तु फुका । कविंद्र सेवका फीर माग ॥ १० ॥

या उदाहरणावरून या दोन प्रकारांची सहज कल्पना येते. तुकारामाने या जैन कवीवर किती मोठा परिणाम केला आहे हे दिसून येते. महतीसागरानेही आपल्या अभंगात विशेषतः भक्तिभाव व्यक्त केला आहे. चिमना पंडिताने २६४ अभंग केल्याचा उल्लेख मिळतो. ही जैन अभंगाची परंपरा मात्र केवळ वारकरी संप्रदायाच्या अनुकरणाने तयार झाली आहे.

**काही वैशिष्ट्यपूर्ण ग्रंथ** – आतापर्यंत वाङ्मयाच्या कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारात समाविष्ट होणाऱ्या ग्रंथांचा विचार केला पण काही ग्रंथ असे आहेत की त्यांचा समावेश निश्चितपणे कोणत्याच वाङ्मयप्रकारात करता येत नाही. गुणकीर्तीचे ' रुक्मिणीहरण ' मेघराजकृत ' रामायणीकथा ', जिनसागरकृत ' जिनकथा ' व ' लवअंकुशकथा ' या रचना काहीशा उल्लेखनीय आहेत. रुक्मिणीहरणावर गुजराती छायाच दिसून येते. पंधराव्या शतकातील ही रचना पुढील काळातील शाहिरी काव्याची आठवण करून देते. गेयता हेही एक वैशिष्ट्य तिच्यात दिसून येते. मध्येच ' चढावा ' चा भाग आहे. आणि तरीही कवि या रचनेस ' ओवी ' म्हणतो, ' रामायणी कथा ' हे चार गीतांचे मिळून झालेले एक स्वतंत्र काव्य आहे. शेवटी " मेघा माल्हणु, बोलिला । संत श्रद्धा परसादे । " असे कवी म्हणतो. यांतील ' माल्हणु ' हा एक काव्यप्रकार असावा असे वाटते. जिनसागरकृत 'जिनकथा' म्हणजे जिनसेनाच्या महापुराणाचा संक्षिप्त कथाभाग आहे. पद्यरचना म्हणूनच यास काव्य म्हणावे लागते. अन्यथा केवळ कंटाळवाणी अशी कथाजंत्रीच यात पाहावयास मिळते. ' लहुअंकुशकथे 'ला मात्र एक नमुनेदार व आदर्श खंडकाव्य म्हणता येईल. कथानिवेदन आणि काव्य यांचा उत्कृष्ट मिलाफ येथे झाला आहे.

आतापर्यंत पद्य वाङ्मयातील विविध प्रकारांचा विचार केला, त्यावरून प्राचीन पद्यरचनेतील बहुतेक काव्यप्रकार या कवींनी यशस्वी रीतीने हाताळले आहेत, असे दिसून येईल. गुजराती व हिंदी भाषांतील ग्रंथांचा परिणाम होऊन काही फारी नवीन प्रकार मराठीत जैन कवींनी आणले, ही मराठीला त्यांनी दिलेली देणगीच समजावी लागेल. रास, फाग, भवातरकथा हे प्रकार मराठीला तरी नवीन आहेत.

**गद्यवाङ्मय प्रकार** – प्राचीन काळी बहुतेक सर्व ग्रंथ पद्यातच लिहिले जात. विषय तत्त्वज्ञानाचा असो की कथेचा असो. ओवीसारख्या सर्वजनसुलभ छंदात ग्रंथकार आपला विषय मांडण्याचा प्रयत्न करीत. म्हणूनच गद्यवाङ्मय प्रकारांचा विकास जितका व्हावयास पाहिजे तितका झाला नाही.

गुणकीर्तिकृत धर्मामृततत्त्वसार, रत्नकरण्डश्रावकाचारावरील मराठी टीका, या दोन्ही रचना पंधराव्या शतकातील असल्याने त्यांचे महत्त्व विशेष आहे. रत्नकरण्डश्रावकाचार हा मूळ संस्कृत ग्रंथ असून त्यावरील ही मराठी टीका ' टीका ग्रंथ ' म्हणूनही विशेष महत्त्वाची मानावी लागेल. दिल्सुखविरचित स्वात्मविचारातील

प्रसंगोपात्त रसाविष्कार व उचित अलंकारांची पेरणी, रसाविष्कारासाठी नानाविध वर्णनांनी सजलेली पार्श्वभूमी आणि जीवनविषयक जागृत दृष्टिकोण अशा गुणांनीच कथावाङ्मय हे ' साहित्य ' या संज्ञेला योग्य बनते. ते साहित्य धार्मिकही असू शकते.

प्राचीन मराठीतील जैन कर्त्यांना आपण केवळ धर्मनिरूपण करणारे प्रवचनकार आहोत असे वाटत नव्हते असे दिसते. साहित्य निर्माण करण्यासाठी केवळ धर्मासंबंधी ज्ञान असून चालत नाही याची जाणीव त्यांना होती. धर्माच्या ज्ञानाबरोबर ' कवित्व ' अंगी असावे लागते आणि हे कवित्व जसे उपजत असते तसे अधिगमजही असते याची खात्री त्यांना असल्यामुळे त्या कलेचीही साधना त्यांनी केली होती असे त्यांच्याच निवेदनाने[७७] दिसून येण्यासारखे आहे.

पद, छंद, शब्द सूत्र, महाकाव्य, राग, तर्क, व्याकरण या सर्वांचा अभ्यास करून हे कवी ग्रंथ निर्माण करीत होते. म्हणूनच आत्मविश्वास हा अत्यंत महत्त्वाचा गुण कित्येक कवींत दिसून येतो. आपण साहित्य-निर्मिती करीत आहोत अशी जाणीव आणि त्यामागे आत्मविश्वास यामुळे या कर्त्यांच्या कवित्वाबद्दल संशय राहात नाही. यासाठी उदाहरणे अनेक मिळण्यासारखी आहेत. धर्मामृतकार गुणकीर्ती स्वतःला ' कविश्वरु ' म्हणवून घेतो. ( ध. प. १८९ ). त्याने पद्मपुराणात स्वतःला शारदेचा प्रसाद असल्याचे सांगितले आहे. ( प. पु. १७, ५३० ).

जसोधररासकार मेघराज टीकाकाराच्या हसण्याकडे लक्ष देत नाही. उलट यांच्या हसण्यामुळेच माझे कवित्वाचे बाधणे शुद्ध होईल असे सागून ' माझ्या माथ्यावर सरस्वती हात ठेवून धर्म कथा साग ' म्हणत असल्याचे तो अभिमानाने लिहितो. ( ज. रा. १. ३४, १.७१ ).

श्रेणिकचरित्रकर्ते ब्रह्मगुणदाससुद्धा सरस्वतीच्या प्रसादाने आनंदनिर्भर होऊनच कथा-प्रसंग बोलत आहेत. सरस्वतीने त्यांना ' अविरल वचन–शक्ती ' दिल्याचे ते सांगतात. ( श्रे. च. गुण. १.९, १.१२६ ).

जसोधर पुराणात गुणनंदी याच आत्मविश्वासाने ' भय सोडून कथा चालवीत आहेत. ' सरस्वतीने प्रस्ताव केल्याने त्यांचा पुण्योदय झाला आहे. ( जसोधरपुराण १.१० ). या सर्वांहून हरिवंश पुराणकर्ते जिनदास, व्युत्पत्ती व काव्य या दोन्ही बाबतीत अधिक आत्मविश्वास बाळगून काव्य करीत आहेत. ते म्हणतात ' या ग्रंथासाठी प्रत्यक्ष जिनवाणीच माझ्या हृदयस्थानी प्रगटली आहे. ती स्फूर्तिदेवता वाग-

---

७७. तेणें पद छंद महाकाव्य । शब्दसूत्र दावोनी स्वमेव ।
तर्कवृत्ति गद्यपद्य राग विक्र । केले आक्षर ज्ञान ।
प्रत्यक्ष वरदान मूर्ति सरस्वती । जियेते ब्रह्मादिक वंदिती।
ते जिनदास प्रसन्न कविचिचि । नामयासी ॥
हरिवंशपुराण, जिनदास, अध्याय २. ओव्या ५९, ६०

वादिनी, साहित्यातील रस जाणणारी स्वतःच या ग्रंथात पदश्लोकाची लावणी करीत आहे. ती पदहंसा साधकाररीतीने पदवाक्य मेळवीत आहे. ती जिनदासाला छप्पन्न भाषा दाखवीत आहे." "ती स्वतःच पदांश दाखवून ग्रंथ सिद्धीस नेत आहे. मी जे जे कथेत सांगतो आहे ते ते रसाळ निपजत आहे. तिच्या प्रसादाने माझ्या हृदयात कल्लोळ येत आहेत." (ह. पु. ४३. २, ३, ४ व ५३. ३, ४, ५)

जिनसागर आपल्या सुगंधदशमी कथेत, 'हे सरस्वती अशी काही रसाळ-वाणी श्रोत्यांना ऐकीव की ती ऐकून त्यांना साखरही गोड वाटणार नाही' अशी प्रार्थना सरस्वतीस करीत आहे. (सुगंधदशमी कथा २). जनार्दन, श्रेणिक-चरित्रात नवरस-कथेचे प्रकार आणल्याचे अभिमानाने सांगतो. (श्रे. च. ज. ३९. १४५). पुण्य-सागर देवाकडे 'कवित्व कळेची बुद्धि दे' म्हणून विनवणी करीत आहे। (ह. पु. ६७. १३८). दयासागर, "सम्यक्त्वकौमुदी कथा अमृत रसप्रमाण आहे, परंतु पारख्याच्या हाती दिल्याशिवाय ते रत्न मोलाला चढत नाही. हा ग्रंथही परीक्षेविना मोलाला चढणार नाही. या सम्यक्त्वकौमुदीत धर्म, अर्थ काम, मोक्ष, व्रत, चरित्र, क्रिया यांच्या उपदेशाच्या कथा नवरसात्मक आहेत. म्हणून आपण श्रवण करा." असे सांगत, टीकाकारांसमोर सम्यक्त्वकौमुदीत धीटपणे उभा राहात आहे. (सम्यक्त्व-कौमुदी, दयासागर, १८, १५१,१५२, १५४).

**काव्यगुणांचा परिचय**–साहित्याचे मूल्यमापन त्यातील काव्यगुणावरच अवलंबून ठेवले पाहिजे. विशेषतः कथा वाङ्मयाचे मूल्य काव्यगुणावरच निश्चित होत असते. रसाविष्कार, चित्तवेधक-सालंकारिक रचना, मनोविश्लेषणावर अधिष्ठित अशा परिणामकारी स्वभावरेखा, ग्रंथकर्त्यांचे आख्यानकौशल्य यावरच 'काव्य' अवलंबून असते. या दृष्टीने पाहिल्यास पद्मपुराण, हरिवंशपुराण, गुणदासकृत श्रेणिक चरित्र, जनार्दनकृत श्रेणिकचरित्र, गुणनंदीकृत जशोधरपुराण, गुणकीर्तिकृत रुक्मिणीहरण, नेमिनाथ-विवाह, जिनदीक्षा ही प्रकरणे, वीरदासकृत सुदर्शन चरित्र, मेघराजकृत जशोधर रास, अर्जुनसुतकृत रविवार कथा, जिनसेनकृत जंबूस्वामी चरित्र, जिनसागरकृत जीवंधर पुराण यांचा दर्जा बराच वरचा आहे असे म्हणता येईल. धर्मविवेचनापेक्षा कथा आल्हादकारी बनविण्याकडे वरील कवींचे लक्ष आहे.

**काही कल्पना व परंपरा**––पण येथे हे लक्षात घेतले पाहिजे की काव्या-संबंधी काही खास जैन कल्पना आहेत आणि परंपराही आहेत. त्या कल्पना–त्या परंपरा या कवींनी पाळल्या आहेत. म्हणून काही वेळा त्यांची कल्पना नसताना या काव्याचे रसग्रहण अवघड होऊन बसते. बहुतेक ग्रंथात प्रारंभी म. महावीरांच्या समवसरणांत–सभेत जाऊन श्रेणिक राजाने प्रश्न विचारणे आणि त्या प्रश्नाचे उत्तर म्हणून म. महावीराच्या दिव्य ध्वनीच्या आधारे गौतमगणधराने–कथा अथवा ग्रंथ सांगणे असा प्रस्ताव केलेला असतो. हरिवंश, पद्मपुराण, आदिपुराण, कालिका-पुराण यांचा प्रारंभ अशा थाटात झाला आहे.

'भूलोक भाषान्वय विचार' व एका अज्ञात टीकाकाराची 'आत्मख्याती' या दोन्ही गद्य रचना अठराव्या शतकातील आहेत. मराठी गद्याचा विकास पाहताना या ग्रंथातील ग्रांथिक मराठी गद्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही.

**चम्पूप्रकार** – गद्यपद्य अशी मिश्र रचना चम्पू काव्यात असते. मराठी जैन कवींनी हाही प्रकार मराठीत आणला आहे. पंडित सुरिजनकृत 'परमहंसकथा' हा लहानसा ग्रंथही या प्रकारात मौल्कि मानला जाईल. हा ग्रंथ प्रकाशित झाला असून त्याच्या विस्तृत प्रस्तावनेत या प्रकारासंबंधी संपूर्ण विवेचन मी केले आहे.[७५] महानुभाव वाङ्मयाशी तुलना करता जैन कवींनी गद्य विभागाकडे दुर्लक्ष केले आहे असे म्हणावे लागते. लोकजीवनाशी समरस झाल्याशिवाय गद्य वाङ्मयाचा विकास करता येणार नाही, याचा हा पुरावा आहे. इतिहास, चरित्रादि विषयांना गद्य-भाषाच मानवते पण याच भागाकडे प्राचीन मराठीचे दुर्लक्ष झाले आहे.

**उखाणे** – उखाणा म्हणजे एक ललितरम्य कोडेच. मराठीत कित्येक उखाणे असतील. त्यांचा संग्रह कोणी केल्याचे पाहण्यात नाही. नागपूरच्या[७६] एका हस्तलिखितात काही उखाणे संग्रहीत करण्यात आले आहेत. कर्ता कोण हे उखाण्याच्या बाबतीत विचारताच येत नाही. ते परंपरेनेच आलेले असतात. या उखाण्यांचा व जैन वाङ्मयाचा काही संबंध आहे असेही नाही. पण एका जैन हस्तलिखित संग्रहात ते सापडले आहेत. तत्कालीन म्हणजे दामा पंडित आणि मानकीर्तिकालीन हे उखाणे म्हणजे एक जुने धनच आहे. संख्येनेही ते थोडे आहेत. म्हणून ते येथे देत आहे.

१) काळक (?) वावारी घयाची मटकी उटाली ॥ कापुस ॥
२) येवडे हाये त्याची गांडी करी पुटपुट ॥ नळा ॥
३) नदीचे काठी माजली रोटी ते म्हने मी वाडाहोन मोटी ॥ धु ॥
४) झाडझोपाडं कुळ वाधेळ हींग बघाया पानं नाही ॥ चींचचा पाला ॥
५) काळा घोडा ताचा जीन येक उठो वो एक बैसवो ॥ रोटी ॥
६) ईलीसी मुली राजासव जेवी ॥ मासी ॥
७) एक वाटा उरटो टांग एक्या बैला सोळा सींगि ॥ राहाटा ॥
८) तळ्याच्या पाळी पांच केळी हालतं पण पडेना ॥ बोटं ॥
९) इलुसं दगालें झुडुपाआड लपाले ॥ वाग ॥
१०) लाकटाची मईस लोखंडाचा चारा । मईस न ये घरा दुद न दे दारा ।
॥ सींदीझाड ॥
११) घरात घरकुलं त्यांत पानकुलें ॥ दीवा ॥
१२) इलुसं पाकरू । त्याचे चकमक ॥ डोळा ॥

---

७५. जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, 'परमहंसकथा', १९६०.
७६. नागपूर क्र. ३. (अभ्यासाची साधने १ पाहा.)

१३ ) नगरात खेळं त्याचा भेद न कळं ॥ नाम ॥
१४ ) नाहाली धुली बायको भींतीसी उभी केली ॥ ताट ॥
१५ ) भींतीवरी होता ताटका तुझा काका मासेरिहाका ॥ वींचू ॥
१६ ) मासी तेच मासी दांतवासी ॥ आरसा ॥
तेच आरसा भांग सरसा ॥ फनी ॥
तेच फनी नागर येनी – ( ? ) असे आहेत हे उखाणे.

## सारांश

प्राचीन मराठी जैन कवींनी गद्यपद्य या दोन्ही प्रकारांत मिळून साधारणपणे पुराण, चरित्रकथा, धर्मकथा, नागरकथा रास, रूपककथा, व्रतकथा, संकीर्णकथासंग्रह, भवांतरकथा, स्तोत्र, बारमासी, फाग, गौळणीभास, पाळणा, लावणी, पोवाडा, कीर्तन, भूपाळी, पदे-गीत, विनती, आरती, तीर्थवंदना, कैको, अभंग, गद्यटीका, चम्पू, उखाणे असे विविध व मनोहर वाङ्मयप्रकार आपल्या मराठी सारस्वतात निर्माण केलेले दिसतात. विशेषतः पुराण व चरित्रांचे दालन मोठे व महत्त्वाचे आहे. अभ्यसनीय ग्रंथ त्याच दालनात आपणास मिळू शकतात. चरित्र कथा – नागरकथा–धर्मकथा हे शब्दप्रयोग जरी वेगवेगळे वाटत असले तरी वाङ्मयप्रकार म्हणून प्रत्येकाचे काही वैशिष्टय नाही. जैन कवींचा गुजराती व हिंदी वाङ्मयाशी धार्मिक संबंध असल्यामुळे त्या भाषेतील छोटेमोठे वाङ्मय-प्रकार मराठीत आणण्याचा मोह त्यांना झाला. विशेषतः रास, बारमासी, फाग, गौळणीभास, विनती हे प्रकार मराठीला तरी नवीन आहेत. आरती, पदे व गीते या किरकोळ रचना असल्या तरी भरपूर आहेत. समाजाच्या अभ्यासाच्या दृष्टीने तो भाग महत्त्वाचा आहे. भवान्तर कथा हाही प्रकार मराठीत नवाच म्हणावा लागेल. अभंग, पोवाडे, लावणी, कीर्तन हेही प्रकार येथे आहेत. पण विशेष संपन्न नाहीत. कैको, कुतको सारखे प्रकार लोकवाङ्मयाचा प्रकार दाखवितात. गद्यटीका ग्रंथ व चम्पू ग्रंथ फार नसले तरी महत्त्वाचे आहेत. उखाणे सुद्धा एकत्रित केले तर एक मनोहर वाङ्मय प्रकार तयार होतो. हे काही किरकोळ उदाहरणांवरुनही दिसून येते.

## साहित्य निर्मितीची जाणीव – आत्मविश्वास व व्युत्पत्ती

केवळ धार्मिक हेतूने निर्माण झालेले वाङ्मय कलेच्या दृष्टीने तितके श्रेष्ठ प्रतीचे असेलच असे म्हणता येणार नाही. परंतु तत्त्वज्ञान अथवा आचारधर्म प्रतिपादन करणाऱ्या ग्रंथात वाङ्मय कलेची अपेक्षाही विशेष केली जात नाही. विषयाचे शास्त्रशुद्ध निरूपण आणि त्यातील तार्किक संगती याच गुणांना अशा ग्रंथांत महत्त्व असते. पण पुराण, चरित्र, धर्मकथा, आख्यान अथवा भावकाव्य निर्माण करणाऱ्या कवींकडून, त्यांचे वाङ्मय जरी धार्मिक असले तरी रसिक श्रोत्यांच्या व वाचकांच्या काही अपेक्षा असतात. कथा निवेदनाची रसाळ शैली, कथेतील पात्रांची जिवंत निर्मिती,

प्रसंगोपात्त रसाविष्कार व उचित अलंकारांची पेरणी, रसाविष्काराशाठी नानाविध वर्णनांनी सजलेली पार्श्वभूमी आणि जीवनविषयक जागृत दृष्टिकोण अशा गुणांनीच कथावाङ्मय हे ' साहित्य ' या संज्ञेला योग्य बनते. ते साहित्य धार्मिकही असू शकते.

प्राचीन मराठीतील जैन कवींना आपण केवळ धर्मनिरूपण करणारे प्रवचनकार आहोत असे वाटत नव्हते असे दिसते. साहित्य निर्माण करण्यासाठी केवळ धर्मासंबंधी ज्ञान असून चालत नाही याची जाणीव त्यांना होती. धर्माच्या ज्ञानाबरोबर ' कवित्व ' अंगी असावे लागते आणि हे कवित्व जसे उपजत असते तसे अधिगमजही असते याची खात्री त्यांना असल्यामुळे या कलेचीही साधना त्यांनी केली होती असे त्यांच्याच निवेदनाने[७७] दिसून येण्यासारखे आहे.

पद, छंद, शब्द सूत्र, महाकाव्य, राग, तर्क, व्याकरण या सर्वांचा अभ्यास करून हे कवी ग्रंथ निर्माण करीत होते. म्हणूनच आत्मविश्वास हा अत्यंत महत्त्वाचा गुण कित्येक कवींत दिसून येतो. आपण साहित्य-निर्मिती करीत आहोत अशी जाणीव आणि त्यामागे आत्मविश्वास यामुळे या कवींच्या कवित्वाबद्दल संशय राहात नाही. यासाठी उदाहरणे अनेक मिळण्यासारखी आहेत. धर्मामृतकार गुणकीर्ती स्वतःला ' कविश्वरू ' म्हणवून घेतो. (ध. प. १८९ ). त्याने पद्मपुराणात स्वतःला शारदेचा प्रसाद असल्याचे सांगितले आहे. (प. पु. १७, ५३० ).

जसोधररासकार मेघराज टीकाकाराच्या हसण्याकडे लक्ष देत नाही. उलट यांच्या हसण्यामुळेच माझे कवित्वाचे बांधणे शुद्ध होईल असे सांगून ' माझ्या माथ्यावर सरस्वती हात ठेवून धर्म कथा सांग ' म्हणत असल्याचे तो अभिमानाने लिहितो. ( ज. रा. १. ३४, १.७१ ).

श्रेणिकचरित्रकर्ते ब्रह्मगुणदासमुद्धा सरस्वतीच्या प्रसादाने आनंदनिर्भर होऊनच कथा-प्रसंग बोलत आहेत. सरस्वतीने त्यांना ' अविरल वचन–शक्ती ' दिल्याचे ते सांगतात. ( श्रे. च. गुण. १.९, १.१२६ ).

जसोधर पुराणात गुणनंदी यांच आत्मविश्वासाने ' भय सोडून कथा चालवीत आहेत. ' सरस्वतीने प्रसाद केल्याने त्यांचा पुण्योदय झाला आहे. ( जसोधरपुराण १.१० ). या सर्वांहून हरिवंश पुराणकर्ते जिनदास, व्युत्पत्ती व काव्य या दोन्ही बाबतींत अधिक आत्मविश्वास बाळगून काव्य करीत आहेत. ते म्हणतात ' या ग्रंथासाठी प्रत्यक्ष जिनवाणीच माझ्या हृदयस्थानी प्रगटली आहे. ती स्फूर्तिदेवता वाग्-

---

७७. तेणें पद छंद महाकाव्य । शब्दसूत्र दावोनी स्वमेव ।
तर्कवृत्ति गद्यापद्य राग विक्र । केले आक्षर ज्ञान ।
प्रत्यक्ष वरदान मूर्ति सरस्वती । जियेते ब्रह्मादिक वंदिती ।
ते जिनदास प्रसन्न कविचित्ति । नामयासी ॥

हरिवंशपुराण, जिनदास, अध्याय २. ओव्या ५९, ६०

वादिनी, साहित्यातील रस जाणणारी स्वतःच या ग्रंथात पदश्लोकाची लावणी करीत आहे. ती पदहंसा सावकाशरीतीने पदवाक्य मेळवीत आहे. ती जिनदासाला छप्पन्न भाषा दाखवीत आहे." "ती स्वतःच पदांश दाखवून ग्रंथ सिद्धीस नेत आहे. मी जे जे कथेत सांगतो आहे ते ते रसाळ निपजत आहे. तिच्या प्रसादाने माझ्या हृदयात कल्लोळ येत आहेत." ( ह. पु. ४३. २, ३, ४ व ५३. ३, ४, ५ )

जिनसागर आपल्या सुगंधदशमी कथेत, 'हे सरस्वती अशी काही रसाळ-वाणी श्रोत्यांना ऐकीव की ती ऐकून त्यांना साखरही गोड वाटणार नाही' अशी प्रार्थना सरस्वतीस करीत आहे. ( सुगंधदशमी कथा २ ). जनार्दन, श्रेणिक-चरित्रात नवरस-कथेचे प्रकार आणल्याचे अभिमानाने सांगतो. ( श्रे. च. ज. ३९. १४५ ). पुण्य-सागर देवाकडे 'कवित्व कलेची बुद्धि दे' म्हणून विनवणी करीत आहे। ( ह. पु. ६७. १३८ ). दयासागर, "सम्यक्त्वकौमुदी कथा अमृत रसप्रमाण आहे, परंतु पारख्याच्या हाती दिल्याशिवाय ते रत्न मोलाला चढत नाही. हा ग्रंथही परीक्षेविना मोलाला चढणार नाही. या सम्यक्त्वकौमुदीत धर्म, अर्थ काम, मोक्ष, व्रत, चरित्र, क्रिया यांच्या उपदेशाच्या कथा नवरसात्मक आहेत. म्हणून आपण श्रवण करा." असे सांगत, टीकाकारांसमोर सम्यक्त्वकौमुदीत धीटपणे उभा राहात आहे. ( सम्यक्त्व-कौमुदी, दयासागर, १८, १५१,१५२, १५४ ).

**काव्यगुणांचा परिचय**—साहित्याचे मूल्यमापन त्यातील काव्यगुणावरच अवलंबून ठेवले पाहिजे. विशेषतः कथा वाङ्मयाचे मूल्य काव्यगुणावरच निश्चित होत असते. रसाविष्कार, चित्तवेधक-सालंकारिक रचना, मनोविश्लेषणावर अधिष्ठित अशा परिणामकारी स्वभावरेखा, ग्रंथकर्त्याचे आख्यानकौशल्य यावरच 'काव्य' अवलंबून असते. या दृष्टीने पाहिल्यास पद्मपुराण, हरिवंशपुराण, गुणदासकृत श्रेणिक चरित्र, जनार्दनकृत श्रेणिकचरित्र, गुणनंदीकृत जशोधरपुराण, गुणकीर्तिकृत रुक्मिणीहरण, नेमिनाथ-विवाह, जिनदीक्षा ही प्रकरणे, वीरदासकृत सुदर्शन चरित्र, मेघराजकृत जसोधर रास, अर्जुनसुतकृत रविवार कथा, जिनसेनकृत जंबूस्वामी चरित्र, जिनसागरकृत जीवंधर पुराण याचा दर्जा बराच वरचा आहे असे म्हणता येईल. धर्मविवेचनापेक्षा कथा आल्हादकारी बनविण्याकडे वरील कवींचे लक्ष आहे.

**काही कल्पना व परंपरा**——पण येथे हे लक्षात घेतले पाहिजे की काव्या-संबंधी काही खास जैन कल्पना आहेत आणि परंपराही आहेत. त्या कल्पना—त्या परंपरा या कवींनी पाळल्या आहेत. म्हणून काही वेळा त्याची कल्पना नसताना या काव्याचे रसग्रहण अवघड होऊन बसते. बहुतेक ग्रंथांत प्रारंभी म. महावीरांच्या समवसरणात—सभेत जाऊन श्रेणिक राजाने प्रश्न विचारणे आणि त्या प्रश्नाचे उत्तर म्हणून म. महावीरांच्या दिव्य ध्वनीच्या आधारे गौतमगणधराने—कथा अथवा ग्रंथ सांगणे असा प्रस्ताव केलेला असतो. हरिवंश, पद्मपुराण, आदिपुराण, कालिका-पुराण यांचा प्रारंभ अशा थाटात झाला आहे.

जैन ग्रंथांची दुसरी विशेषता ही की भवांतर-कथनाला त्या ग्रंथांत फार महत्त्व दिलेले दिसून येते. मागील एकाच जन्माचे नव्हे तर आठ-दहा जन्मांचे वृत्त कथा-नायक अथवा नायिकाला कथेतील केवलज्ञानी अथवा अवधिज्ञानी मुनी सांगतात. साध्या व्रतकथेतही हे भवांतराचे प्रकरण असतेच ( सुगंधदशमी–कथा जिनसागर. ). यशोधर, श्रेणिक, जीवंधर यांचीही पूर्वजन्मातील कथा त्या त्या ग्रंथांत सांगण्यात आली आहे. यशोधर रासचा ३ रा अधिकार आणि श्रेणिक चरित्राचा ( जनार्दन ) ३७ वा पूर्ण अध्याय पूर्वभव वर्णनासाठी खर्ची घातले आहेत.

तिसरी विशेषता ही की जैन धर्मातील तत्त्वज्ञान आणि आचारधर्म यांचे वर्णन कथेत कोठे ना कोठे तरी प्रसंग निर्माण करून ग्रंथकार विस्ताराने करतात. सप्त तत्त्व, षड्द्रव्य, बारा भावना, सोळा भावना, पाच व्रते, सप्त व्यसने, लोक–रचना हे विषय यात खास करून येतात. वीरदासाने सुदर्शन चरित्रात व जनार्दनाने श्रेणिक-चरित्रात फार मोठी जागा त्यासाठी घेतली आहे. कथानक बाजूला राहते आणि एखाद्या स्वतंत्र ग्रंथाप्रमाणे ही प्रकरणे मध्यंतरी येतात. पण ही जैन ग्रंथांची परंपरा आहे. ती मराठीतील ग्रंथकारांनीही सांभाळली आहे. काव्यावरही धर्माने अशा रीतीने प्रभाव पाडला आहे. यामुळे रसहानी होते, कथानकात सातत्य टिकत नाही. या गोष्टी जरी खऱ्या असल्या तरी वस्तुस्थिती ही अशी आहे. ती मुद्रा कित्येक वर्षे अखंडपणे जोपासिली गेली आहे आणि टिकविली गेली आहे.

**रससंबंधी जैन कल्पना**–रस-संबंधी जैन कल्पना काय आहे हे पाहून मराठीतील रसस्थळाचा आस्वाद घेतलेला बरा. अजितसेनाचार्यांनी 'अलंकार चिंतामणि' ग्रंथात रस आणि स्थायीभाव यांची जैन कल्पनेप्रमाणे मांडणी केली आहे. ते म्हणतात. " ज्ञानावरण व वीर्यांतराय या कर्मांचा क्षयोपशम झाला असता जीवाला इंद्रिये व मन यांच्या सहाय्याने इंद्रियज्ञानाची प्राप्ती होते. त्याच वेळी मोहनीय कर्मांच्या उदयामुळे रसाभिव्यंजक अशी स्थायीभावांची एक चित्तवृत्ती निर्माण होते. आणि ती जीवाला वरील इंद्रियज्ञानामुळे संवेद्यमान होते. रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा, विस्मय व शम हे नऊ स्थायीभाव आहेत.[७८] "

ही रसचर्चा जैन तत्त्वज्ञानातील ' कर्मा ' वर आधारलेली आहे. मोहनीयकर्म, ज्ञानावरणीय कर्म व अंतराय कर्म या तीन कर्मांचा संबंध रसाविष्कारात येतो. विशे-

---

७८. क्षयोपशमने ज्ञानावृतिवीर्यांतराययोः ।
इंद्रियानिन्द्रियैर्जीवेष्विद्रियज्ञानमुद्भवेत् ।
तेन संवेद्यमानो यो मोहनीय समुद्भवः ।
रसाभिव्यंजकस्थायिभावचिद्वृत्तिपर्ययः ॥
रतिहास शुचः क्रोधोत्साहौ भय जुगुप्सने ।
विस्मयः शमः इत्युक्ता स्थायिभावा नव क्रमात् ॥–अलंकारचिन्तामणिः

पतः नऊ नोकषाय-हास्य, रति, अरति, शोक, भय व जुगुप्सा हे मोहनीय कर्मांच्या उदयाने मनात निर्माण होतात. पण त्या संवेद्यमान होऊन आस्वाद मिळण्यासाठी जीवाला ज्ञानावरण कर्मांचा क्षयोपशम झाला पाहिजे व तो लाभ असल्याने वीर्यांतराय-कर्माचाही क्षयोपशम पाहिजे. पण आहे हा कर्मांचाच खेळ.

म्हणजे रसांचा आस्वाद घेणे हे सुद्धा कर्मबंधाचेच कारण ! म्हणून चित्त निर्विकार बनविणे हा संसारमुक्तीचा उपाय ठरला. साहित्यातील वेगवेगळ्या रसांचा आस्वाद घेताना विवेकी माणसाने संसाराचे स्वरूप समजून घेऊन त्यापासून दूर झाले पाहिजे. हे जैन साहित्याचे ध्येय आहे.

**काही रसोत्कट स्थळे**–मराठी जैन ग्रंथांतील रसाविष्काराच्या दृष्टीने काही स्थळे येथे निर्दिष्ट करतो. भक्तिरसाचा आविष्कार बहुधा कोठे जास्त आढळला नाही. शृंगाराकडे या कवींचे लक्ष कमीच. शृंगाराचे वर्णन आलेच तर लगेच वैराग्याचे प्रकरण त्यानंतर आल्याशिवाय राहात नाही. जसोधर-चरित्रात राणी अमृतमती आणि कुबडा माहूत यांच्या शृंगारचेष्टांचे वर्णन करून लगेच त्या हीन दर्जाच्या शृंगाराचा यशोधराच्या मनावर काय परिणाम होतो हे सांगण्यासाठी कवी आतुर झालेला आहे. ( ज. रा. २, २५३ ते २९१ ). जिनसागराने जीवंधर-पुराणात जीवंधर आणि सुरमंजरीच्या प्रेमाचे वर्णन रसाविष्काराच्या दृष्टीने उत्कृष्ट केले आहे. म्हाताऱ्याच्या वेशात आलेल्या जीवंधराला सुरमंजरीने शेवटी कसे वरले हे पाहण्यासारखे आहे. कामदेवाच्या देवळात कामदेवामागे लपून जीवंधर उभा आहे आणि सुरमंजरी म्हणते आहे की ' जीवंधर नवरा व्हावा । तरीच जीवा विश्रांति ॥ (९–८७ ) " यांत शृंगाराबरोबरच विनोदाचाही आविष्कार झाला आहे. गुणकीर्तिकृत 'नेमिनाथ-विवाह' प्रकरणात विप्रलंभ शृंगार आला असून अंजनापवनंजय वियोगात तो अधिक प्रमाणात दिसतो. दयासागरकृत हनुमानपुराणात आणि पद्मपुराणात अंजनेचे वियोगावस्थेतील व्याकुळ हृदय पाहावयास मिळते. ( प. पु. ७ १०० ). वीरदास-कृत सुदर्शन चरित्रात सुदर्शनाला कामोद्दीप्त करण्यासाठी राणी अभयमती, कपिला ब्राह्मणी व देवदत्ता वेश्या यांनी जे प्रयत्न केले त्यांचे वर्णन आले आहे. ते अश्लील शृंगारात जमा होईल; पण उद्देश मात्र शृंगाराविषयी विरक्ती निर्माण करण्याचा आहे. ( अधिकार ९, ११ व १९ ).

जंबूस्वामी चरित्रात पाचव्या व सहाव्या अध्यायात वीररसाचा उठाव जिनसेनाने चांगला केला आहे. जंबूस्वामी व रत्नचूल यांच्या युद्धाचे वर्णन त्या दृष्टीने वाचनीय आहे. ' न कळे निशा किंवा वासर । घडवून रणरस होती चूर । गज गजा अश्व अश्वावर पदातीवर पदाती ॥ ६. ४२. ॥ तीक्ष्ण खड्ग गदादंड । खेट करवाल तोमर प्रचंड । कदलीस्तंभवत् होती खंड । दिव्यांग महावीराचे ॥ ६. ४४. ॥ ' अशा पद्धतीचे हे वर्णन आहे. जनार्दनकृत श्रेणिकचरित्रात पहिल्याच अध्यायात उपश्रेणिक व

अळजापूरचा राजा सोम यांची लढाई वर्णिली आहे. " खड्ग वाजति खणखणा। बाण सुटती सनसना। जेवि विजा चमकती गगना। तेवि भास होतसे ॥ १. १०६। वीरासि वीर भिडे–एकमेकां देति रगडे। कित्येक भूमीवरी पडे। तळमळती तेथवा ॥ १. १०७ ॥" अशा बाह्य वर्णनांतूनच वीररसाचा उठाव होतो अशी समजूत बहुतेकांची आहे. पद्मपुराणांत ७ व्या अध्यायांत वरुण राजाशी रावणाच्या सैन्याचे युद्ध झाले. त्याचे वर्णन अशाच थाटाचे आहे. कारुण्याचा आविष्कार उपश्रेणिकाच्या मृत्यूनंतर त्याच्या राण्यांनी केलेल्या शोकप्रसंगांत जनार्दनाने श्रेणिकचरित्रात घडविला आहे. ( २. ७०, ९३ ). तसेच त्याच ग्रंथात श्रेणिकाच्या मृत्यूनतर चेलनेने केलेला विलापही करुणरसाने ओथंबलेला आहे. ( अध्याय ३८ पूर्ण ). स्वभाव व प्रसंग यातून विनोद निर्माण करून हास्यरस निर्माण केल्याची उदाहरणे दयासागर-कृत सम्यक्त्व–कौमुदीत चागली आहेत. स्त्रियांचा पुरुषांना होणारा त्रास व खादाडपणा यावरच हे हास्य उभे आहे.

एक म्हणे मजसी छळी। आणि शेजारणीसी करी कळी।
कोणी म्हणे रांड गेलीयावरी। खाली पोळी संतोषपणें। ९. ८१

हे उद्गार एका नवऱ्याचे आहेत. 'एक म्हणती सावकाश जेवावें। नसेल तें मागून घ्यावें। आरलें घोलर पोकळ करावें। लाजूं नये जेवना ॥ १३. १०८ ॥ पुरोहित म्हणे उपाध्यायासी। तुम्ही जेवावे सावकाशी। आळस न करावा घृताशी। ही संधी गेलीया न मिळे। तव शुद्ध आचमन करून। एक घावली तांब्या घेउन। तातडी धोत्रपात्र सांभाळून। चित्त दक्षणेपाशींच ॥ १३. ११५ ॥ हे वर्णन जसे यथातथ्य आहे तसें हास्यकारकही आहे यांत शंका नाही. बीभत्स वर्णन मनात जुगुप्सा निर्माण व्हावी या उद्देशाने करावयाचे असते. विशेषतः स्त्रियासंबंधी किळस निर्माण करण्याचा प्रयत्न जैन ग्रंथकारांचा बराच दिसतो. " मलमूत्र वाहे भगद्वारि। अशुद्ध वाहे त्या शरीरि। वोघल जाति पायावरि। दिन च्यारि जानिजे ॥" ( २०. ९ सुदर्शन चरित्र, वीरदास ). या एकाच उदाहरणावरून अशा वर्णनाचे स्वरूप लक्षात येऊ शकते. वात्सल्यभावाचे दर्शन जीवंधर–पुराणात जिनसागराने दोनदा चांगले घडविले आहे. जीवंधर मातृदर्शन ( ८. १४२–१५४ ) व जीवंधर बाळक्रीडा (४.५६–८८) ही प्रकरणे उत्कृष्ट आहेत. गुणकीर्तीने ' रुक्मिणीहरण ' काव्यात प्रद्युम्न–रुक्मिणी भेटीचे वर्णनही रसोत्कट केलें आहे ( ४७, ४८, ४९ ). रौद्र व भयानक वर्णन सुदर्शन चरित्रात सुदर्शनावर व्यंतरीने केलेल्या उपसर्गाचे वेळी चपखलेच नजरेस भरेल अशा पद्धतीने वीरदासाने केले आहे. ( सु. च. वी. २२. २ ते ४६ ). आतापर्यंत काही रसोत्कट स्थळांचा उल्लेख केला आहे. याचा विस्तार अधिक करणे योग्य होणार नाही. पण एवढे खरे की गुणकीर्तीचे पद्मपुराण, जनार्दनाचे श्रेणिकचरित्र व जिनसेनकृत जंबूस्वामीचरित्र हे ग्रंथ रसाच्या दृष्टीने श्रेष्ठ प्रतीचे आहेत.

अलंकारदर्शन :— मराठी ग्रंथांत आलेल्या काही निवडक अलंकारांचा उल्लेख फक्त येथे करणे शक्य आहे. श्लेषात्मक क्लिष्ट रचना कोणत्याच कवीने केलेली नाही. ही एक विशेषताच या ग्रंथकारांची मानावी लागेल. अलंकारासाठी अलंकार ही वृत्ती कोठेच पाहावयास मिळाली नाही. शब्दालंकारावर एक यमासाजुर्न-सुत कवी वगळला तर कोणीही जोर दिला नाही. यमाला मात्र रविवारव्रतकथेत अनुप्रास व यमक यासाठी काही प्रमाणात प्रयत्न करताना दिसतो. उदाहरणार्थ :—

रंगचंग मृदंग गर्जित भेरिभृंग सदाधरं ।
ज्ञान ध्यान पुराण निशिदिनि मग्न पूजन जिनवरं ॥ ३९ ॥
राजमंत्र चरित्र सुंदर चित्रप्रतिमा गणधरं ।
स्थीर धीर उदारधर्म परोपकार दयापरं ॥ ४० ॥
गुण वानिता नापुरे सीमा ।
काय देउ मी त्यासि उपमा ।
पुण्यशील तो अंतरिं क्षमा ।
आगमामधीं पूर्ण चंद्रमा ॥ ४१ ॥
धंधवामधें संच फारसा स्वामि मायचा चक्षु चारसा ।
सुज्जनामधें फारसा ठसा श्रीजनामधें वाणली दशा ।

वरील तीन्ही उदाहरणांत यमक आणि अनुप्रास हे दोन्ही अलंकार साधलेले आहेत.

रूपक व अलंकार जनार्दनाला एकनाथाप्रमाणे प्रिय आहे असे त्याचे श्रेणिक-चरित्र व नाथाचे रुक्मिणीस्वयंवर यांची तुलना केल्यास दिसून येते. युद्ध असो की भोजन असो, त्यावर प्रदीर्घ अशी रूपके जनार्दन योजितो. ( १.१४५ – १५१, ८. १०१ – १२४ ) ' ज्ञानमात ' व शांतिकडी ' अशी ही रूपके पाहिली म्हणजे त्याचा अतिरेक होत आहे असे वाटल्याशिवाय राहात नाही.

प्रौढ स्त्रियांचे शील म्हणजे ' पिकला आंबा ' आहे. झाडावरही ठेवता येत नाही आणि आढीतही ठेवता येत नाही. वडिल किंवा नवरा यापैकी कोणीच त्याचे संरक्षण करू शकत नाही. स्वतःचे रक्षण स्वतःच केले पाहिजे, ही कल्पना हृद्य नाही असे कोण म्हणेल ? ( शीलतरंगिनी पुराण १.१०९ ). रूपकालंकाराची पुढील रूपके मनोहर आहेत:

दुध व पाणी यांची मैत्री व त्यावरील रूपक (सुदर्शन च. वी. २. ४ – ९), विषयविषधरावरील रूपक (शीलतरंगिनी पुराण १.३६), मनुष्यजन्मद्रुमाचे रूपक ( पद्म पुराण १०.७८ ), वेश्या म्हणजे रजकशिला – उकिरड्यावरील खापरी ( श्रे.च. ज. २९.६३–६४ ) – बाह्य वैराग्य शस्त्र चमके । अंतर कच्चे लोह हीन फिके । तस्कर नायेपती खड्ग वाके ॥ १६.६ ( श्रे. च. ज. ) ही रूपके नवीन आहेत. दाही दिसांची पाखोडी । रितुरंग रंगली फुडी ॥ ( जसोधर रास. ९८३ ) हे रूपक हृद्य नाही काय ?

काही उपमा आणि उत्प्रेक्षाही रसिक-हृदयाला मोह घालतात. यशोधर-रास-मधील ( २३९, २६१, २८९, ३१७, ३१९ ) या ओव्यांतील उपमा बहारीच्या आहेत. पुण्य सोडून पाप कवटाळणाऱ्यांवर पुढील उत्प्रेक्षा जनार्दनाने केली आहे, *'कीं कल्पवृक्ष सांडोनी वेगा । धामळीच्या मशी शेंगा । कामधेनु सांडोनी डांगा । अजा वेगा पाळिला ॥ २५.२६ ॥'* सीतेच्या सौंदर्याचे वर्णन करताना पद्मपुराणकार पुढील उत्प्रेक्षा करतात. त्यातील सौंदर्य आगळेच आहे—

कीं ही महालक्ष्मी अवतरली । कीं रूपाची मर्यादा झाली ।
कीं ही रत्नाची ठेली ॥ १७.४५२
सौम्यकांतीची सतरावी कळा । कीं ही ब्रह्मतनुजा निर्मळा ।
कीं एकवटली गुणलुगला । गुणाची डाबली पैं ॥ १७.४५३ ॥

काही उपमांमध्ये खास जैन कल्पनापरंपरांचा उपयोग केला आहे.

जैसी जिनेश्वराची वाणी । तैसी वानरविद्या प्रमाणी ।
मिथ्यामताची असे कसनी । अरिकूळ ॥ ( प. पु. ९.४७).

यात जिनेश्वराची वाणी जशी सर्व परमतांचा पराभव करते तशा हनुमंताच्या विद्येमुळे शत्रूंचा पराभव झाला असे सुचविले आहे.

एकला आत्मा कर्मे वेढिला । तैसा लक्ष्मण म्लेंछे वेढिला । ( प. पु. १६.१३३ ). यातील आत्मा व कर्म यांच्या बंधाचा सिद्धांत फक्त जैन शास्त्र वाचणाऱ्यांच्याच लक्षात येऊ शकेल.

जैसा सुभोम चक्रवर्ती । आला परशुरामावरती ।
तैसा रावण आला निगुती । वरुणावरी ॥ ९.६॥ प. पु.

यात ज्या सुभौम चक्रवर्तीचा उल्लेख आहे तो जैन शास्त्राशिवाय अन्यत्र पाहण्यास मिळणार नाही.

काही दृष्टांत फारच मार्मिक आहेत.

गरज संपल्यानंतर त्या माणसांची किंमत संपते यासाठीच गुणदासाने एक दृष्टांत पुढीलप्रमाणे दिला आहे – समोर वाघ दिसला तेव्हा माणूस झाडाच्या फांदीवर चढून बसतो आणि वाघ निघून गेल्यानंतर खाली उतरून त्या फांदीकडे घराला आढे होईल म्हणून तोडून नेतो. ( श्रे. च. गुण. ४.४४४ ). तप करणारे ऋषी वनात जाऊनही बरोबर क्रिया पाळतात, हे कसे चुकीचे आहे हे पटविण्यासाठी पद्मपुराणकार दृष्टांत देतात—

" उदकांत न्हाला हस्ती । बाहीर निघाला मागुती ।
धूळ टाकी माथ्यावरती । पुन्हा तो ॥ ५.१६ ॥ "

भ्रांतिमान अलंकाराची पुढील दोन उदाहरणे जिनसेनकृत जंबूस्वामीचरित्रात आहेत. चंद्र व चंद्रप्रकाश यावर ती आधारित आहेत–

" शुद्ध भाव धर्नी गौरवर्ण । मारुती धीरासम चंद्रकिरण ।
धावत मार्जार दुग्ध म्हणुन । तदा पाहे निश्चित ॥ ७.४८ ।
पुष्पशय्येवरील मालिनी । होवोनी गाढ निद्रिस्त भामिनी ।
लज्जितपणें म्हणति तरणी । उरावला नेणों कदा ॥७.४९ ॥. "

**काही परिणामकारक स्वभावरेखा** – मराठीतील जैन वाङ्मयाचा अभ्यास करीत असता कित्येक परिणामकारक पात्रे भेटतात आणि आपल्या लक्षात राहतात. त्यांत पुरुष आहेत, स्त्रिया आहेत, प्रमुख पात्रे आहेत आणि गौण पात्रेही आहेत. पात्रांचे स्वभावचित्रण गुणदास आणि मेघराज उत्तम करतात.

श्रेणिकचरित्र आणि यशोधरचरित्र यांचा अभ्यास त्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. श्रेणिकचरित्रात श्रेणिक, अभयकुमार, चेलना, नंदा, कुणिक, तुकारी अशी कितीतरी पात्रे आपल्या नजरेसमोर येतात. मगध साम्राज्याचा एके काळचा सम्राट श्रेणिक हा या कथेचा नायक बाल्यपणीच आपत्तीतून वाट काढू लागतो. तीव्र बुद्धिमत्ता आणि पराक्रम यामुळे शेवटी तो सम्राट होतोच. त्यानंतर त्याच्या जीवनात चेलना प्रवेश करते. बौद्ध धर्म का प्रियतमा चेलना असा संघर्ष त्याच्या जीवनात सुरू होतो, आणि चेलना त्यात विजयी ठरते. सम्राट श्रेणिकाचा अखेर तर फारच शोकान्तपूर्ण होतो. प्रियतमा चेलनेचा मुलगा कुणिक हाच त्याचा वैरी बनतो. श्रेणिकाला वृद्धापकाळातील दिवस बंदिवासात काढावे लागतात. व्यक्तीच्या जीवनात नशिबाचे नाट्यमय स्थान पाहावयाचे असेल तर श्रेणिकाचा अंत पाहावा. चेलनेकडून परिस्थिती समजल्यावर पश्चात्ताप होऊन कुणिक पित्याला बंदिवासातून मुक्त करण्यासाठी त्याच्याकडे येत आहे; आणि " हा माझ्याकडे का येत आहे ? अजून काय विटंबना करण्याचा याचा विचार आहे ? " अशी शंका येऊन श्रेणिक लोखंडी पिंजऱ्यावर माथे आपटून जीव देतो. असे हे स्वभावदर्शन आहे. गुणदासाने अगदी साध्या व सहज शैलीत त्याचे स्वभावरेखाटन केले आहे. वडिलांसाठी त्यागच त्याग करणारा अभयकुमार जितका धार्मिक आहे, तितकाच मंत्री म्हणून चतुर आहे. प्रेम करण्यात चेलना जितकी दृढ आहे, तितकीच धार्मिक श्रद्धेच्या बाबतीत खंबीर आहे. उपकथानकात येऊनही लक्षात राहणारे पात्र म्हणजे तुकारी. आठ पुत्रानंतर नवसाने प्राप्त झालेली ही ब्राह्मणकन्या केवळ क्रोधाविष्ट स्वभावामुळे कशी दुर्दैवात ओढली जाते हे पाहण्यासारखे आहे.

जसोधर व अमृतमती यांच्या स्वभावरेखनाची चर्चा मीच जसोधररासच्या प्रस्तावनेत केली असल्यामुळे येथे द्विरुक्ती करीत नाही. वीरदासाने व कामराजाने सुदर्शनाचे स्वभावचित्र मात्र फारच ठिकळ बनविले आहे. कामुक स्त्रियांच्या विरुद्ध हा कामदेव झगडतो आहे. जिनसेनाने जंबूस्वामीचे चरित्रचित्रण करून त्याच्या जीवनातील पराक्रम आणि वैराग्य या दोन्ही पैलूंचे दिग्दर्शन केले आहे. जिनसागराने जीवंधराच्या जीवनातील अनेक चढउतार चांगले रंगविले आहेत. गुरूची आज्ञा पाळणारा, अनेक

स्त्रियांवर रसिकपणे प्रेम करणारा, युद्धात मूर्तिमंत पराक्रम गाजविणारा आणि शेवटी विरागी बनून मोक्ष मिळविणारा जीवंधर आदर्श पुरुष वाटतो. पद्म-पुराण आणि हरिवंश-पुराण हे तर अनेक स्त्री-पुरुषांचे समुद्र आहेत. पद्मपुराणात राम, लक्ष्मण, रावण, बिभीषण, हनुमान, अंजना, पवनंजय या व्यक्तिरेखा उठावदार झाल्या आहेत. रावणाचे व्यक्तिचित्रण पाहिले तर त्याच्याबद्दल आदर वाटू लागावा. त्याचा क्षत्रियोचित बाणा अखेरपर्यंत कायम आहे. दशरथाचा विश्वासघात केल्याबद्दल तो बिभीषणाची खरडपट्टी काढतो. (प. पु. १२. १६३–१६४). परांगना पकडून आणल्या व पर-धनास स्पर्श केला म्हणून कुंभकर्णास तो चोप लावतो. (प. पु. ९. ६९, ७०, ७३) अर्थात पद्म-पुराणातील रावण हा जिनधर्मभक्त आहे आणि सीता तर पाणी गाळून पिणारी, कार्तिक व अष्टान्हिक व्रत करणारी आहे. (प. पु. २४. १५, ३०–५). येथील नारद यज्ञवादाचे खंडन करतो. (प. पु. ४.१२७).

हरिवंश-पुराणात कृष्ण, बलभद्र, नेमिनाथ, राजीमती, रुक्मिणी, सत्यभामा हीन काय ती महत्त्वाची पात्रे. येथे पांडवांना फार महत्त्व नाही. दयाळू नेमिनाथ, विरहात व्याकुळ झालेली राजीमती यांच्या स्वभावरेखा सुरेख, सुस्पष्ट आहेत. बलभद्राचे बंधुप्रेम हरिवंश-पुराणात विशेष रीतीने प्रत्ययास येते. जरत्कुमाराच्या बाणाघाताने श्रीकृष्ण मृत्यू पावल्यानंतर बलिभद्राने केलेला शोक हृदयाला पाझर फोडणारा आहे. (अध्याय ६४, ६५). कर्तुमकर्तुम् शक्ती असणारा श्रीकृष्णही कर्मबंधाने नरकास जातो. आणि तेथून बलिभद्र त्याची सुटका करू पाहतो. त्यावेळी श्रीकृष्ण त्याला म्हणतो–"अरे कर्म भोगल्यावाचुनी । सुटका नोहे मजलागुनी । पूर्वं आयुष्य कर्म बांधुनी । गेले पाहिजे । ६७–४५ ॥"

जैन परंपरेप्रमाणे श्रीकृष्णाचे स्वभावरेखाटन असे करण्यात आले आहे.

**शब्दचित्रनिर्मिती**—प्रसंगाला उचित अशा वातावरणाची निर्मिती कवीश्वर आपल्या उत्कृष्ट वर्णन-शैलीने करीत असतात. प्रसंग शृंगाराचा असो, भोजनाचा असो, युद्धाचा असो, मृत्यूचा असो, जन्माचा असो, वियोगाचा असो, मीलनाचा असो अथवा निसर्गातील सूर्योदय, सूर्यास्त, चंद्रोदय, वनविहार असोत योग्य त्या शब्दांत त्या वातावरणाची निर्मिती करणे हे कवीच्या कौशल्यावर अवलंबून असते. उत्कृष्ट शब्दचित्रे त्यासाठी रेखाटावी लागतात. जैन ग्रंथांतील काही निवडक वर्णनाची फक्त पाच उदाहरणे येथे देतो.

जिनसागराने सुगंधदशमी कथेत सुगंधेचे शब्दचित्र–तिच्या लग्नाच्या वेळचे–किती उत्कृष्ट रेखाटले आहे, हे पाहण्यासारखे आहे. निसर्गातील सौंदर्यातील ही भाग्यलक्ष्मी त्याने साक्षात् उभी केली आहे.

"त्वरित मग सुगंधा आणिली पुष्पशाळी ।
मळवट पटरेखा रेखियेली कपाळीं ।

लखलखित कुंकाचें लाविले बोट दीसे ।
घवघवित विलासे काय लक्ष्मीच भासे ।। ( सुगंधदशमी कथा १११ )

जनार्दनाने श्रेणिकचरित्रात अळजपूरच्या राजाने उपश्रेणिकाय भेट पाठविलेल्या घोड्याचे वर्णन केले आहे, ते शब्दचित्र पाहण्यासारखे आहे. तो मीनकेतन घोडा आपल्या नजरेसमोर येतो--

मुखपट्टा तो मीनकेतन । माथा तुरा शोभे गहन ।
मुक्ताफळाचें लोंबती तोरण । नूर्व सजविला तुरंग तो ।। २.२६ ।।
पायीं घुंगरू रुणझुणति । थिरकत चाल विवेक नीति ।
श्यामकर्ण अनुपमस्थिति । तैसी मूर्ति दिसतसे ।। २७ ।।
दाळींब बीजापरी दंत । हाटक कांति शोभिवंत ।
शुभ्रवर्ण चामर झळकत । रत्नजडित त्यावरि ।। २८ ।।

पवनंजयाने अंजनेचा त्याग विनाकारण केला, तो युद्धावर गेला. वियोगाची बारा वर्षे लोटली, युद्ध संपले आणि एक दिवस पवनंजय शांतचित्ताने सरोवराकाठी बसून विचार करतो आहे. सूर्यास्ताची वेळ आहे, चक्रवाकी चक्रवाकासाठी आक्रोश करीत आहे. आणि पवनंजयाच्याही मनात विरहाचे वादळ माजले आहे. वातावरण व मन या दोघांचीही शब्दचित्रे पद्मपुराणात गुणकीर्तीने कशी रेखाटली आहेत ती पाहावी.

" सरोवर कांठी सुंदर । साता खणाचे मंदिर ।
तेथे बैसला कुमार । पवन राजा ।। ७.७२ ।।
दिन झाला अस्तमान । तमाशा पाही राजा पवन ।
चकोरपक्षी वियोगें म्हणून । कैसें कळकळती ।। ७३ ।।
चकोराचें चरित्र पाहून । पवना दया आली जाण ।
अंजना अपराधाविण । मी तजिली ।। ७४ ।।
हे अज्ञान पक्षी कुळ । यांची एवढी कळकळ ।
बारा वर्षांची तळमळ । अंजना साहे ।। ७५ ।। "

वर्षाकालात दुथडी भरून वाहणाऱ्या नद्यांचे वर्णन पद्मपुराणात गुणकीर्तीने फारच सुंदर केले आहे.

" वर्षाकाल आला कसा । सर्व सैन्यासी भूप जसा ।
लोटला जलप्रवाह तसा । भयानक पै ।।
झनत्कार करती विद्युन्माला । जैसी रसना हळहळा ।
गर्जना गाजे प्रबळा । गगन मंडळी पै ।।
गर्जना गजाच्या गजघंटा । अभ्रपटल रथदाटा ।
विद्या ल्हर्ना विकटा । तेथे पै ।।

जल कल्लोळ माला । महाजळें करोनि विशाळा ।
जसी तारुण्यपुरें बाळा । तसी सांभाळेंना ॥ २२३ ॥

(प. पु. १८. २१८ ते २२०).

मुक्तेश्वराच्या वर्णनशैलीची आठवण करून देणारा हा भाग मुक्तेश्वराच्या अगोदर निर्माण झाला आहे हे अभ्यासकांनी लक्षात घेतले म्हणजे मराठी वाङ्मयात ही मोलाची भर गुणकीर्तीने घातली आहे हे कबूल करावे लागते.

प्रभातसमयी तृणपात्यावर चमकणाऱ्या दंवबिंदूंची शोभा जनार्दनाने शब्दात कशी स्थिर करून ठेवली आहे हे पाहावयाचे असल्यास मुळातील त्याचाच भाग वाचावा लागेल.

" प्रातः समयींचा वेळ । तृण हिरवेगार केवळ ।
तथापि जलबिंदु पुष्कळ । चमकति मोति जैसे ॥
जेवि मुक्ताफळांचा भाव । योमी दिसें तेवि वैभव ।
पूर्व दिसेसीं दिनकरराव । होई संभव दोहोंचा ॥
सूर्यकिरण पडता वरी । तेज न समाये पृथ्वीवरी ॥
दृष्टि न ठरे तृणबिंदुवरी । जैसे तेजाळ दिसतसे ॥
सारोनि नीरारंभ मार्गे । चिद्रूप रूपमासे स्वांगे ।
कीं नाग महा स्फटिक रंगे । तेजे अभंग चमकती ॥
कीं उवडिल्या चिन्मयाब्धि । कोटी बिंब लोपती आधी ॥
ती अलक्ष्य स्वरूपाच संधीं । पावे बंधी तिमिर ॥

(श्रे. च. ज. ३. ६८–७२).

अशा सुंदर निसर्गशोभेत आध्यात्माचा आनंद मिळावा यांत नवल काय आहे.

गुणकीर्ती हा एक धर्माचार्य, पण रुक्मिणीहरणात त्याची रसिकता कशी प्रकट झाली आहे, हे पाहण्यासारखे आहे. पंधराव्या शतकातील त्याच्या भाषेचा थाट कसा डौलदार आहे आणि त्यात मृदुता व मस्ती हे दोन्ही गुण कसे दिसून येतात हे पुढील उदाहरणांवरून लक्षात येते :

" ते चोलिये मोतिये । कंकन ज्योतिये ।
मुद्रिके केतिये गे । सोभा दिसे ।
दशागुळे मिरवलिं । तारांगणे आली ।
नखें पे वोपलि गे । चंद्रकाति ।
तो उरावरि हारु । जोवनाचा भारु ।
सिखरेंसि मेरु गे । मिरवला ।
हे कनकाचें अंकुर । उगवले परिकर
अंगि कृशोदर । मुष्टि मातु समाये ॥

हे वर्णन रुक्मिणीचे आहे.

उदाहरणे देऊन विस्तार वाढविणे योग्य नाही. झाला हाही विस्तार थोडासा अधिकच म्हणावा लागेल, पण जैन काव्याचा अभ्यास अद्यापि विशेष झालेला नाही. वाचकांच्या हातीं ते ग्रंथही विनायास उपलब्ध नाहीत म्हणून मुळातील ही थोडीशी दीर्घ उदाहरणे येथे मी दिली आहेत.

**वृत्तवैचित्र्य** – काव्याचे बाह्य वाहन म्हणून वृत्त व छंद यांचे महत्त्व प्राचीन काव्यात तरी अधिक मानले जाई. ओवी, अभंग हे प्राचीन मराठीचे आवडते छंद. अभंगांचा उपयोग जैन कवींनी अगदी उत्तर काळी केला. कवींद्रसेवक आणि महतीदास यांनीच प्रामुख्याने अभंग छंदाचा उपयोग केला. कवी जिनसागर व अर्जुनसुत यांचा अपवाद वगळल्यास बहुतेकांनी आपली काव्ये ओवी छंदात केली आहेत. जिनसागरानेही जीवंधरपुराण ही मोठी रचना ओवीतच केली आहे. व्रत-कथांसाठी मात्र जिनसागराने संस्कृतमधील अक्षरगण वृत्तांचा आवडीने उपयोग केला आहे. भक्तामरस्तोत्राची रचना ही पूर्णपणे वसंततिलका वृत्तात आहे. जिनसागराने जरी संस्कृत वृत्तांचा आश्रय केला तरी तो त्यासाठी शब्दांची ओढाताणही कधीकधी करतो असे दिसते.

( उदा. सन्मूख, अनंतव्रतकथा, २४, महानग्र-महानगर-आदित्यव्रतकथा ५ ). यमासा अर्जुनसुताने रविवारकथेत अनेक वृत्तांचा उपयोग केला आहे. मराठीला पुढील छंदांचा उपयोग नवा होता. सवैया, तीन चरणी अभंग, चउपईभास, रासभासा, व दूहा याची उदाहरणे पुढे दिली आहेत.

**सवैया—**

शक श्रीनिक चक्र नरपति कनक नगरी पारना ।
असुनि नर धरि तृत नाही भूत तृष्णा त्या मना ॥
ऐसियापरि सकलदलबलि काल त्याहूनि देखिला ।
त्यापुढे या कोण केवा आमुचा तुम्हि लेखिला ॥ ११७ ॥
( रविवार व्रतकथा, यमासा )

**गायत्री छंद ( तीन चरणी ओवी )**

कोतवाल म्हणे रूसिराया । पंचभूति मिळुनि आलि काया ।
आम्हा सांगिजोय ॥ १८६ ॥
मुनिने आसिर्वादु दिधला । इतक्या अवसरीं जाला ।
प्रसंग सायु तीसरा ॥ १८३ ॥ ( यशोधर चरित्र । नागो आया ) ।

**भास चउपई—**

मामा म्हणे भास्या आईक विचार ।
एक कथा घदु माझी जिनसार ।

लोभी जीव नागदत्त बलिवंत।
त्याणें आपुला कलें दिल्हा नाही अंत।

(जंबूस्वामी चरित्र, रत्नक) १३. ३०

रासभासा —

सरोवर देखियत्र सार। निरमल जलकमले सोमितए।
पंखी करित शब्द टंकार। मान सरोवर सरसे गुंजतिए॥ २. ७८॥

(जंबूस्वामी चरित्र, रत्नक)

**मराठी भाषा स्वरूप** — प्राचीन मराठी जैन ग्रंथांतील मराठी भाषेच्या स्वरूपाचा विचार करण्याला चालू अवस्थेत तरी परिस्थिती अनुकूल नाही, त्याचे कारण म्हणजे शास्त्रीयदृष्ट्या त्या ग्रंथांचे संपादन अद्यापि फारसे झाले नाही. आतापर्यंत जसोधरराय, जिनसागर यांची समग्र कविता, धर्मामृत (गुणकीर्ती) व परमहंसकथा हेच काय ते ग्रंथ संपादित होऊ शकले आहेत. याशिवाय गुणकीर्तिकृत द्वादशानुपेक्षा व अभयकीर्तिविरचित अनंतव्रतकथा मासिकांत संपादित होऊन प्रसिद्ध झाल्या आहेत. याशिवाय अन्य ग्रंथ जोपर्यन्त शास्त्रशुद्ध रीतीने संपादित होत नाहीत तोपर्यंत भाषेचा अभ्यास समग्र स्वरूपात अशक्य आहे.

शिवाय १५ व्या शतकापासून तो १९ व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यन्त हे ग्रंथ निर्माण झाले आहेत. त्यांतील भाषेचे स्वरूप प्रदेश व कालमानाने बदलत गेले आहे. प्रत्येक कालातील ग्रंथांचा वेगवेगळा अभ्यास त्या दृष्टीने झाला पाहिजे. येथे मी फक्त मला आढळलेली काही भाषाविषयक वैशिष्ट्ये नमूद करीत आहे इतकेच.

जैन ग्रंथांत तत्त्वज्ञान व आचारधर्मविषयक पारिभाषिक शब्दांचा उपयोग फार मोठ्या प्रमाणात केलेला आहे. ते शब्द मराठी शब्दकोशात आज तरी आढळणे अशक्य आहे. स्याद्वाद, समोसरण, अर्जिका, अनुप्रेक्षा, सामायिक, संवर, आश्रव, निर्जरा या[७९] सारख्याशब्दांचा उपयोग मराठीतही जैन ग्रंथकार परंपरेने सीलेने करतात. पण आजच्या मराठी वाचकांना हे सर्व शब्द अपरिचित आहेत.

काही ग्रंथकार गुजराती ग्रंथ वाचून त्यावरून मराठीत ग्रंथ तयार करीत होते. त्यामुळे **गुजराती भाषेचे संस्कार** त्या भाषेवर होणे साहजिकच होते. गुणकीर्तींची भाषा या दृष्टीने पाहावी.

"शशिविनु रयेनि काइ किजे। सरोवरेविन कमलिनी। जी।
तरुविन जिम घेडि निरधरि। जिम प्रियेविन नारि संसारि। छी।

(नेमिनाथ विवाह).

---

७९. परमहंस कथा–प्रस्तावना पृ. ३५.

" चातकाच्या परी पिहु पिहु करी गे । जीवनेविंनु गीनु जैसा गे ।
चंदनु पोळते आंगी । सुइषम शशिकिरणे गे । उतावली पतीलागी ॥४१॥
( नेमिनाथ जिनदीक्षा ).

ही दोन्ही उदाहरणे पाहिली तर पंधराव्या शतकाच्या उत्तरार्धात मराठी भाषा जैन ग्रंथकार कशी गुजरानी संस्कारयुक्त वापरीत याची कल्पना येते. धर्मामृतातील गद्य वाक्यरचनेवरही गुजरातीचा परिणाम [८०] झाला आहे.

पंडित मेघराज लहकितु, कायर, डर, गवार, मैसा, मानोसिनी, पोतां, अरि अशा शब्दांचा उपयोग जसोधररासमध्ये [८१] सहजासहजी करतो. त्याचेच 'गुजरी मराठी गीत' या संदर्भात अभ्यसनीय आहे.

उदा. तप जप **पाखे फोकट** धर्म **कहता** न लाजो ।
दान देइ पुजा कीजे **हनाने काजो** ।
करताल उपवास । सिल नाही साहाजे ।
कसोटेने सोने उतरे काय बो कीजे ॥ ९ ॥

**अधोरेखित** शब्द स्पष्ट गुजराती आहेत.

जंबूस्वामी चरित्रातही ( दामा पंडित – रत्नसा ) गुजरातीचे मराठीकरण केलेले दिसून येते.

सुहावणा, राजसभामझारी ( ५.११७ ). चंग ( ५,११८ ), सोमित्ये, पंखी, गुंजतिए, ( २.७८ ), असे शब्द व क्रियापदांची रूपे दिसतात. क्रियापदांची ही एकारान्त रूपे महाराष्ट्री अपभ्रंश भाषेतून आली असली पाहिजेत. पद्मपुराणात गुणकीर्ती पाळणा शब्दाबद्दल 'झलना' शब्द वापरतो ( ८. ९ ). "रावणाचे करीन रोपन, पुजें पुजें करू रावणाचें", ( ७,१३०. १३१ ) "मग म्हणे देवा गौनमा। मभाची तकलीफ होते तुम्हा ।" त्याचे हे भाषाप्रयोग मराठी खास वाटत नाहीत.

जुन्या मराठीत काही कन्नड शब्दही आढळतात. बोने, मातु, गुढी, माडुस हे कन्नड[८२] शब्द मेघराजाने त्या काळी मराठीत प्रचलित असल्याने वापरले आहेत. 'कति' ( तलवार ) हा शब्द गुणनंदीने जसोधरपुराणात वापरला आहे तो कन्नड आहे. ( १. १२३ ).

" अहिराणी गीत " नावाची नींबाकृत एक रचना फक्त उपलब्ध झाली आहे. त्यात पुढील भाषाप्रयोग दिसतात.

तठे ( तेथे ), मननी आश, ( मनाची आशा ), मे देखा ( मी पाहिले ), मान्हा साहाकारी ( माझा साहाय्यकारी ), त्याने ( त्याला ) त्यान्हें ( त्यानें ),

८०. धर्मामृत, प्रस्तावना पृ. ३७
८१. जसोधररास, प्रस्तावना पृ. ७२.
८२ जसोधररास, प्रस्तावना पान ७२.

जिनसागर हा **विदर्भातील** कारंजाकडील १८ व्या शतकातला कवी. त्याची भाषा प्रौढ व संस्कृतनिष्ठ असली तरी त्याच्यावर **वऱ्हाडी बोलीची** छाया स्पष्ट आहे. 'स्त्रीलिंगी सर्वनामांची एकारांत रूपे हे या प्रकारचे मुख्य उदाहरण होय. ते गोष्टी, ते वननी इत्यादि. असा निष्कर्ष[८३] जिनसागर यांची समग्र कविता, या ग्रंथाच्या संपादकांनी काढलाच आहे.

म्हुनि (*अनंत व्रतकथा*), कामुनि – का म्हणून (*आदित्य व्रतकथा*), *दुकानूनी, बळाउनी, चुदा राहिला. (सुगंधदशमी कथा), त्यान्हे यान्हे, (अनंत-व्रतकथा)* ही वऱ्हाडी रूपे जिनसागराच्या कवितेत पाहावयास मिळतात. जिनसागराने मराठी व संस्कृत शब्दांची संधी घनवून काही मिश्ररूपे बनविली आहेत ते अनुक्रमे (अनंत व्रतकथा ६६), आलेऽमोघ्य (आदित्य व्रतकथा २४).

आदीश्वर भवांतरात छत्रसेनानें तिहाचे, तिहाले, नाचायले आनिली, (१-२, ३७) असे वऱ्हाडी भाषाप्रयोग केले आहेत.

संस्कृतप्रमाणेच प्राकृत व अपभ्रंश शब्दांचाही भरणा जैन ग्रंथात बराच आहे. *खुडिका, फासुक, रिद्धिनी, रयणी, विंझसिरी (विंध्यश्री), लहु, दुल्हम, साहमी (साधर्मी)* हे शब्द केवळ जसोधररासमधील[८४] आहेत. पधराव्या शतकातील अन्य मराठी जैन ग्रंथांचा अभ्यास या दृष्टीने बराच उपयुक्त होईल.

**भाषेतील वाक्प्रचार व म्हणी** म्हणजे भाषेचे खरे धन होय. मराठी जैन ग्रंथांतील काही वाक्प्रचार व म्हणी येथे एकत्रित देत आहे. त्यावरून त्या भाषेची समृद्धी कळून येईल. येथील माझा हा प्रयत्न फार अल्प आहे, पण अभ्यासकांना त्याचा उपयोग होईल. जसोधररास – व परमहंसकथा या ग्रंथातील वाक्प्रचार व म्हणी *त्यांच्या प्रस्तावनेत एकत्रित*[८५] *केल्या आहेत. त्यांची येथे पुनरुक्ती* करीत नाही.

'साडे पन्द्रह' हा शब्दप्रयोग ज्ञानेश्वरीत[८६] सुवर्ण, या अर्थी येतो गुणकीर्तीने साडे पन्नयाचे सुद्धाळ पाणी, असा प्रयोग नेमिनाथ पाळण्यात वापरल आहे. (१३).

मेणाचे दात, लोखंडाचे चणे, (७.३४) गजांची शोंबडी, मल्लांची कोल्हडी, (१४.११०). मक्षिका रडवीत बसणे (२०,४१७). मोडक्या काठीवर पाय देणे (दुःखी माणसाला दुःख देणे) ७. ९५. पद्मपुराण– (गुणकीर्ती).

---

८३. जिनसागर यांची समग्र कविता. प्रस्तावना पृ. XIX.

८४. ज. रा. प्रस्तावना पृ. ७२.

८५. ज. रा. प्रस्तावना पृ ७४, परमहंसकथा, प्रस्तावना पृ. ३५.

८६. ज्ञानेश्वरी १५.५२३

**श्रेणिकचरित्र ( गुणदास )** – रंगाला येणे ( राव रंगासि आला ) २. २८०. लयलीन होणे ( २.४३७ ), आरती येणें ( ४. २९ ). वलाय होणे ( पीडा जाणे ) – ११२, ठाव फेडणे ( ४. १३१ ). अंदण देणें ( ४.१८१ ) दारीं धूळ लाणें ( ४. २०४ ), बधाव देणें ( बातमी देणें ४. ४५३ ). नव जारो नव मर्तारो ( २. ४५२ ). काडी चोर तो पाडी चोर ( ४. ५४६ ). **सुदर्शन चरित्र ( वीरदास )** धाय मोकलणें ( १२. १७ ), वाऱ्याची मोट सुटणें – बांधणें ( २०.४४ ). **जशोधरपुराण – ( गुणनंदी )** साठी बुद्धी नाहटी ( २.९७ ). **जंबूस्वामी चरित्र** ( रत्नकप्रत. ) घरोवरी मातीच्या चुली ( १०. ८१ ), पळमाला नानें तीन ( १०.९३ ). **श्रेणिक चरित्र ( जनार्दन )** डोळ्यांत बाहुली उफराटी असणें ( ४. १२७ ).

**गद्यभाषाशैली** — मराठी गद्यशैलीचा विकास पाहताना आजवर महानुभावीय गद्य ग्रंथ व बखर--पत्रातील गद्याचाच विचार केला गेला आहे. गुणकीर्तीकृत, धर्मामृत, रत्नकरंडश्रावकाचारावरील मराठी टीका, परमहंसकथेतील गद्यविभाग आणि उत्तरकाली झालेल्या स्वात्मविचार व आत्मख्याती मराठी टीकेचाही या संदर्भात विचार झाला पाहिजे. धर्मामृत, रत्नकरंड टीका व परमहंस कथा ह्या रचना पंधराव्या शतकातील उत्तरकालांत झाल्या आहेत म्हणून त्यांचे महत्त्व विशेष आहे. गुणकीर्तीची गद्यशैली प्रौढ व अर्थवाही आहे. वाक्ये छोटी छोटी पण अर्थदृष्ट्या अत्यंत स्पष्ट व मार्मिक असे हे लिखाण आहे. अचौर्य अणुव्रताचे हे विश्लेषण त्या दृष्टीने पाहण्यासारखे आहे. " वाटे जाता कव्हनांचे करवाड, कणिस, ओंबि, चना, वालुक, वाव्होलि नेघावी । " ( परिच्छेद ७८ ) -- त्याचप्रमाणे— " लटिकाचि खडागोटा वाटे न टाकावा । वैला लामुफासु न करावा " ( प. ८३ ), " हिंसा स्थानकिं न वजावें कोणि कारकोन दरिबदार मारितां पाहों न वजावें, समर्थासि स्पर्धा न करावी " ( प. ७६ ). अशी ही शैली चटकदार व बोटी स्वरूपाची आहे.

परमहंसकथेतील गद्य बखर गद्याची आठवण करून देते. " दुताचें वृत्तांत सांगितले । मग तो दुताप्रति बोलला । आहो सुमैत्राद्ये कवन्या कारिया आले आहा । " ( पृ. ५१ ). " आज्ञासि तेन्हे मानभंगु केला । राया तुं आपुला परिवारु लेकरू घेऊनि पल्टी करावी । नाहीं तरीं विवेकु तुझ मारिल । " ( पृ. ५१ ). प्रश्न, आज्ञा, विनंती हे सर्व अर्थ अशल्या वाक्यातून प्रकट केले गेले आहेत. स्वात्मविचार व आत्मख्याति टीकेतील गद्य मात्र संस्कृत टीकेचे मराठीत केलेले रूपांतर वाटते. पण सैद्धांतिक गद्य म्हणून त्याचे महत्त्व मान्य करावे लागेल.

**इतर साहित्यिकांचा जैन ग्रंथकारावर झालेला परिणाम व देवाणघेवाण** – मराठी जैन साहित्यांत प्रत्यक्ष नाव घेऊन अन्यधर्मीय–नाथ, भागवत, महानुभाव ग्रंथकारांचा उल्लेख केलेला दिसत नाही. पण त्यांचे साहित्य जैन ग्रंथ-

कारांच्या वाचनांत येत नव्हते असे नाही. त्यामुळे त्याचा परिणाम ह्या काही प्रमाणात झालेला दिसतो. त्या दृष्टीने काही स्थळे महत्त्वाची वाटतात.

१ ) एकनाथांच्या रुक्मिणी–स्वयंवरांतील द्वारकेचे वर्णन आणि जिनसागरकृत जीवंधर पुराणांतील राजपूरनगर वर्णन यातील काही ओव्या जवळ जवळ समान आहेत.

प्रबोध पारवे घुमघुमिती । तेणें वागीश्वरा चमके चित्तीं ।
विस्मित जाइला बृहस्पती । आश्चर्य मानिती सुरवर ॥ ८ ॥
शुक शिकें अनुवादत । तेणें वेदांत दचकत ।
अति गुह्य ते गुह्यार्थ । पक्षी बोलत द्वारकेचे ॥ १३ ॥

— प्रसंग ३ रा.

या रुक्मिणीस्वयंवरातील ओव्यात जिनसागराने 'बृहस्पती'च्या ऐवजी 'सुरपती' व 'द्वारकेचे' ऐवजी 'नगरीचे' इतकाच बदल केला आहे. एकनाथांची लोकप्रियताच या अनुकरणाला कारणीभूत झाली आहे हे निश्चित होय. ( जीवंधर पुराण १.५३ व १.५८ ). रामदासाचीं 'मूर्ख लक्षणे' प्रसिद्ध आहेत. अगदी याच पद्धतीचीं मूर्खलक्षणे थोड्या फरकाने रत्नसाकृत 'जंबूस्वामी चरित्रा'च्या प्रतीत पाहावयास मिळतात. 'लोकसभेत आपल्या स्थानाचा विचार न करता बसणारा, आपली आपण प्रशंसा करणारा, सभेत विनोद करून स्वतःच हसणारा' अशी कितीतरी मूर्खलक्षणे जंबूस्वामी चरित्रात दिली आहेत. दासबोधातील लक्षणांशी ती जुळणारी आहेत. ( जंबूस्वामी चरित्र — रत्नसाप्रत १५२१ ते ३३ ओव्या. ) कालिकापुराणात मुक्तेश्वराच्या महाभारतातील काही ओव्या थोड्या फार फरकाने दिसतात. त्या दृष्टीने पुढील ओव्या पाहाव्यात.

ज्ञात पुरुषाचीं आगना । हेलोनी टाकी पतिवचना ।
पुत्र होउनि मेहुणा । चेष्टा करी विनोदें ॥
साधु बोधती सत्त्वगुणें । स्त्रिया तोषती रजोगुणें ।
शत्रु दंडावे तमोगुणें ॥ ( कालिकापुराण १४. १६१–१६२ )

मुक्तेश्वराच्या वनपर्वात धर्मराजाच्या शांतरणावर टीका करताना याच ओव्या दिसतात. ( वनपर्व ३. ४७–५३. कालिकापुराणकारानी सोळाव्या अध्यायात एकनाथांच्या त्रिविधवैराग्याचे वर्णन करणाऱ्या ओव्या जशाच्या तशा घेतल्या आहेत. त्यांतच एकनाथाचे 'चिरंजीवपद' हे प्रकरणही समाविष्ट करून घेतले आहे. 'गुरु अव्यंग मज लाहे' असे सांगणाऱ्या ओव्या एकनाथाच्याच आहेत. ( कालिका पुराण १६.४५ ते ७९ ओव्या व एकनाथाची गाथा पृ. ८७३ पाहा. ) जिनसागराने व कालिकापुराणकाराने पद्मावतीला बौद्ध तारा, शैव गौरी, वैदिक चंद्रा, जैन पद्मावती, वेदांनी गायत्री, व सांख्य आदिशक्ती म्हणतात असे म्हटले आहे. पण ही कल्पना मुळात मुक्तेश्वराची आहे. याचा उल्लेख मागे पाचव्या प्रकरणात आलाच आहे. रघुनाथ पंडिताच्या नलदमयंती स्वयंवराख्यानातील 'आर्षीन नैषधच्या

नवनीत गेला।' ही पंक्ती आणि जिनसागराची 'आधीच या जैन कथेसी गोडी' यातील साम्य सहजाउडहजी लक्षात येते. (सुगंधदशमीकथा श्लोक ३ व नलदमयंती स्व. आ. श्लोक १०४). चिमना पंडिताच्या ज्या लहान लहान रचना आहेत त्या एकनाथांच्या तशाच प्रकारच्या रचना ऐकून वा वाचून स्फुरल्या असणे शक्य आहे. 'चेंडूफळी', 'लाखोटा', 'झंपा', 'टिपरी' अशी ही प्रकरणे पाहिली तर दोन्ही कवींच्या धर्मश्रद्धेमुळे पडलेला फरक सोडला तर ती सारखीच आहेत. कवींद्रसेवकाच्या कित्येक अभंगावर तुकारामाच्या अभंगांची छाया आहे. जिनदासाच्या हरिवंशावर भागवताचा परिणाम झाला आहे. चेंडूफळीचा खेळ, त्यांतील पेंद्या याचाही उल्लेख हरिवंशात आला आहे. (ह. पु. ४१ - ७७) वैष्णवधर्मीय कृष्णभक्तीचा प्रभाव कित्येक जैन कवींच्या काव्यावर पडलेला दिसून येतो. जनार्दनाने अगदी वारकऱ्याप्रमाणे श्रीकृष्णाची स्तुती केली आहे. (श्रे. च. ज. ३१. १ - १६), रामचंद्राचीही भक्तियुक्त स्तुती सहसा जैन ग्रंथात आढळत नाही. 'रामनामा'चे महत्त्व त्यांनी मानलेले नाही, पण गुणकीर्तीने पद्मपुराणात 'रामनाम रमणिक जाणा। सुरेख वाटतसे रसना। थोर गोड या मना। अमृत जैसे॥ उपमा नाही रामनामा। ऐसे वाटतसे आत्मा। म्हणोनि सहस्रनामा। केले पैं॥ (प. पु. १४. ३,४). अशी रामनामाची महती गायिली आहे. राम व कृष्ण याना जैनांच्या 'त्रेसष्ठ शलाका पुरुषा'त स्थान असूनही ते त्यांचे भक्तिस्थान बनलेले दिसत नाहीत. पण मराठी जैन ग्रंथात मात्र त्यांची भक्ती दिसून येते. हे महाराष्ट्रातील वातावरणामुळे झाले असणे शक्य आहे.

उपर्युक्त चर्चेनंतर येथे देवाणघेवाण आहे म्हणण्यापेक्षा 'घेवाण'च जास्त आहे असे दिसून येईल. एकनाथ, मुक्तेश्वर, रघुनाथपंडित या कवींचा आणि भागवत रामायणादी ग्रंथांचा परिणाम मराठी जैन साहित्यावर झाला आहे. नामोल्लेख मात्र कोणी कोणाचा केला नाही.

**वाङ्मयीन परिशीलनातील काही निष्कर्ष**—मराठीत ग्रंथ निर्माण करण्याची प्रेरणा जरी धर्मप्रेमातून मिळाली असली तरी मराठी भाषेसंबंधी जैन ग्रंथकारांच्या मनात आत्मीयता होती. त्या भाषेसंबंधी त्यांना जिव्हाळा होता. बहुजनांची, सामान्य जनतेची ती भाषा आहे, त्यांना संस्कृत प्राकृत समजत नाही म्हणून मराठीत त्यांनी साहित्य निर्माण केले. प्राचीन मराठीतील जैन साहित्याचे प्रयोजन मुख्यतः जैनकथा, तत्त्वज्ञान व आचारधर्म लोकांना मराठीतून माहीत व्हावेत हेच आहे. त्यामुळेच मूळ परंपरेला बाध न येईल याची त्या ग्रंथकारांनी फार खबरदारी घेतली आहे. जे परंपरागत होते तेच त्यांनी पुनः सांगितले. तेसुद्धा संस्कृत, गुजराती, कन्नड या भाषांतील ग्रंथांच्या आधारे. म्हणूनच या वाङ्मयास 'परपराबद्ध' असे म्हटले पाहिजे. परंतु परजीवी आणि परंपराबद्ध असूनही जैन साहित्यात विविध काव्यप्रकार दिसून येतात. याचे कारण अन्य भारतीय भाषांतील त्या काव्याचा

असलेला घनिष्ट संबंध होय. मराठी जैन ग्रंथकार हे केवळ धर्माभ्यास करणारे संन्यासी होते असे नाही. साहित्यशास्त्राशी त्यांचा परिचय चांगला होता. रसिक आणि व्युत्पन्न असे ते शारदोपासक होते. म्हणूनच रसोत्कट, सालंकारिक व विविध वाङ्मयीन गुणांनी संपन्न असे श्रेष्ठ दर्जाचे साहित्य त्यांनी निर्माण केले. समकालीन व पूर्वकालीन अन्यधर्मीय मराठी ग्रंथांचाही अभ्यास त्यांनी केलेला होता.

० ० ०

प्रकरण ७ वे

# उपसंहार–मूल्यमापन

**सिंहावलोकन :**

इ. स. १४५० ते १८५० अशा जवळ जवळ चारशे वर्षांतील, जैन धर्मीयांनी–महाराष्ट्र शारदेच्या जैन उपासकांनी केलेल्या साहित्यसेवेचा हा एक संक्षिप्त परिचय आहे. किंबहुना हा एक अभ्यास आहे. अभ्यासाला अभ्यासकामुळे मर्यादा पडतात. स्वतःजवळची अभ्यासाची साधने, त्यासाठी बंधनभूत मानलेली एक विशिष्ट कालमर्यादा आणि अभ्यासकाची शक्ती यामुळे या सीमारेषा तयार होतात. मराठी जैन साहित्याची पार्श्वभूमी, त्या साहित्याचा कालानुक्रमे इतिहास पाहिल्यानंतर त्या साहित्यात आढळून येणाऱ्या जैनतत्वज्ञानाचा व आचारधर्माचा विचार केला आहे. पांचव्या प्रकरणात त्या साहित्यातील ऐतिहासिक, भौगोलिक व सामाजिक परिस्थितीचे जे प्रतिबिंब उमटले आहे त्याचा आढावा घेतला. सहाव्या प्रकरणात या साहित्याचे वाङ्मयीन परिशीलन करून माझ्या योजनेप्रमाणे मी हा अभ्यास संपविला आहे. आता एकच कार्य आणि तेही संक्षिप्तपणे करावयाचे आहे–ते म्हणजे या साहित्याचे जीवनदृष्टिविषयक मूल्यमापन.

**मूल्यमापन :**

प्राचीन मराठीतील संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुति[1] अथवा संतमंडळाचे ऐतिहासिक कार्य[2] यासंबंधी काही विचारवंतानी निर्भीड प्रतिपादन केले आहे. संत-साहित्याविषयी काहींनी गौरवाचे उद्‌गार काढलेले आहेत तर काहींनी तुच्छतेचे उद्‌गार काढले आहेत. ''आपत्तीच्या–'अस्मानी सुल्तानी' संकटाच्या काळात संतांनी आपला समाज हिंदुत्वात राखिला.'' असे काहींचे मत दिसते तर उलटपक्षी '' निराशा, दारिद्र्य, यामुळे ऐहिक संसाराचे वैय्यर्थ हे त्याच्या (बहुजनसमाजाच्या)

१. गं. बा. सरदार

२. बा. रं. सुंठणकर

मनात फार राहिलेले आहे. नव्या ज्ञानावर अजून त्याची मुळीच श्रद्धा बसलेली नाही. त्याच्या मनात धाडस, साहस, विजिगीषा, सृष्टीशी झुंज घेण्याइतकी कणखर वृत्ती, विषमतेविरुद्ध लढा करण्याची रग या वृत्तींची जोपासना करावयाची असेल तर त्या निवृत्तीच्या तत्त्वज्ञानाचा समूळ उच्छेद करणे अवश्य आहे. संसाराविषयी विरक्ती, पारलौकिक सुखाकडे ओढा, देव किंवा दैव यांच्यावर श्रद्धा या त्रिदोषांमुळे भारताचा देह अस्थिपंजर झाला व त्यामुळे इतर राष्ट्रांच्या चढाओढीत तो मागे पडला. या त्रिदोषनिर्मितीत प्राचीन काळी बौद्ध-जैनांनी भाग घेतला व मध्ययुगात टाळकुट्या संतांनी श्रम केले. त्यातला तुकाराम हा कळस होय." अशीही एक मतप्रणाली[3] दिसून येते. प्राचीन मराठीतील जैन साहित्याच्या जीवनदृष्टिकोणाच्या मूल्यमापनाच्या वेळीही असाच मतभेद होण्याची शक्यता आहे. कारण हेही साहित्य 'संत साहित्य'च आहे. संसाराविषयी विरक्ती, पारलौकिक सुखाकडे ओढा आणि देव किंवा दैव (कर्म) याच्यावर श्रद्धा या 'त्रिदोषा'पासून हे साहित्य अलिप्त नाही! उपर्युक्त 'त्रिदोष' हे खरोखरच दोष आहेत अथवा गुण आहेत हा वादग्रस्त प्रश्न आहे. विचारवंतांच्या व्यक्तिगत दृष्टिकोणातून हा वाद निर्माण होतो. गुरुदेव रा. द. रानडे आदि संतसाहित्याच्या अभ्यासकांनी आत्मा, परमात्मा, साक्षात्कार यांचा खरेपणा पारखून पाहिला आहे. अर्वाचीन काळी श्री अरविंदांनीही परमार्थाचे श्रेष्ठत्वच सिद्ध केले आहे. म्हणून निश्चितपणे असे म्हणावेसे वाटते की पारमार्थिक मूल्ये संतसाहित्यात आहेत हाच त्या साहित्याचा मोठेपणा आहे.

## जैन साहित्यिकांचा जीवनविषयक दृष्टिकोण—

प्राचीन मराठीत ज्यांना आता शारदोपासक म्हणून स्थान प्राप्त झाले आहे ते जैन साहित्यिक हे ज्या काळात निर्माण झाले त्या काळाचा त्यांच्यावर परिणाम झालेला असणारच. शिवाय ज्या एका प्राचीन धर्माचे ते वारसदार होते त्या धर्माचाही त्यांच्यावर परिणाम झाला आहे. ते साहित्यिक जसे मध्ययुगीन महाराष्ट्रीय होते तसेच जैनधर्मीयही होते. ते अध्यात्मवादी होते. संसार अस्थिर मानणारे होते. जड देहापासून आत्मा भिन्न करू इच्छिणारे होते. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य व अपरिग्रह यांना सर्वोच्च जीवनमूल्ये मानणारे होते. दया, क्षमा, शांती, संयम, त्याग इत्यादी गुणांची उपासना करणारे होते. त्यामुळेच मानवी जीवन मुक्त होणार अशी त्यांची दृढ श्रद्धा होती. जीवनासंबंधीचा त्यांचा तो निश्चित दृष्टिकोण होता. हा त्यांचा दृष्टिकोण म्हणजेच त्यांच्या साहित्याचे अंतर्मूल्य होय. ते स्तुती कशाची करतात आणि निंदा कशाची करतात, आदर्श कशाचा डागविरात व सन्मार्ग म्हणून हेटाळणी कशाची करतात हे त्यांचे साहित्य वाचून पाहिले की लक्षात येते. त्यावरून

३. मार्क्स चिंतन-पु. ग. सहस्रबुद्धे, पृ. ९३.

कोणती जीवनमूल्ये साहित्याच्या द्वारा त्यांना समाजात प्रसृत करावयाची होती याचे दर्शन घडते. जीवनात अहिंसेचे स्थान फार मोठे आहे हे त्यांना दिसले होते. त्यासाठी दयेची जोपासना झाली पाहिजे, धर्म हा दयापूर्वकच असला पाहिजे (धर्म म्हणीजे दयापूर्वकु ।–धर्मामृत) असे त्यांना वाटे. त्यागाचेही मूल्य त्यांना फार मोठे वाटले–(सुक्षेत्री धन वेचिजे । परोपकारि भजिजे । दयादान किजे । दिनदुखिया निरास वाउं नेदिजे ।–धर्मामृत) ही हृदयस्पर्शी वचने तळमळीशिवाय प्रकट झाली असतील असे वाटत नाही. परद्रव्य आणि परनारी यांचा त्याग हाच त्यांच्या दृष्टीने जीवनाचा मोठेपणा होता–(कल्हणाचे अधिक नेघावे । उने नेदावे । वाटे पडता नेघावे । कुडा लेख न करावा । कोन्हाची वस्तु विसरली न राखावी । अस्त्रिसी चोहटां गोष्टि न करावि । परस्त्रिसि हास्य रांडोलि न करावि । परस्त्रिचे सांगोपांग निरिख न करावे ।–धर्मामृत) हा केवळ पुस्तकी पांडित्यातून प्रकट झालेला परोपदेश नाही. मानवी जीवनाचे येथे नीट निरीक्षण आहे. पाणिपंथावर उभे राहून लडा मारणाऱ्यांना गुणकीर्तीने कसे हेरले आहे ते पाहावे. या अनुभवातून सत्य-अहिंसादी जीवनमूल्ये मराठी जैन साहित्यात सांगितली गेली आहेत. यशोधराची जीवनकथा अहिंसेचे माहात्म्य वर्णन करते तर त्याचीच कुलटा राणी अमृतमती आपणासमोर शीलभ्रष्ट स्त्रीचे हीन चारित्र्य जन्मजन्मांतरीच्या दुःखास कसे कारणीभूत होते याचे चित्र उभे करते. सुदर्शनाच्या जीवनातून परस्त्रीत्यागाचा पुरस्कार करण्यात आला आहे. जीवंधर, जंबुकुमार यांच्या चरित्रात भोग भोगूनही शेवटी विरक्तीच कशी श्रेष्ठ आहे हे दाखवून दिले आहे.

जैन साहित्यात वैराग्याचा पुरस्कार फार मोठ्या प्रमाणात करण्यात आला आहे. संसाराची असारता सर्वांनाच दिसते. पण ती दिसूनही सर्वजण शहाणे होत नाहीत. संत-साहित्यात त्याची जाणीव करून देण्यात येते. नामदेव तुकारामादिकांच्या साहित्यात तरी वैराग्याहून वेगळे काय दिसून येते ! जैन साहित्यात बहुतेक ग्रंथांत वैराग्यभावनेची आराधना असते. या विरक्तांच्या दृष्टीने धन हे अशाश्वत, शरीर आत्म्याहून वेगळे, स्त्री आणि बांधव परके, लक्ष्मी ही विनाशसहित आणि यौवन चंचल होय. "हे सरिर नव्हे आत्मयाचे । आत्मा स्वरूप नव्हे सरिराचे । येर कवण कवणाचे । संसारामाजीं ॥ जेथे नाही गावाचा आकारु । तेथे सिवेचा काइ विचारु । येणेप्रमाणे परिवारु । आपुला म्हणू नये ॥" असे अनुप्रेक्षाकार गुणकीर्ती म्हणतात तर "संसार हा चपळ सर्व अशाचि आहे । हा काळ सर्व जन भक्षिल कोण राहे ।" या शब्दांत जिनसागर सर्वभक्षी काळाचे वर्णन करतात.

व्यवहारातही सद्गुणाची स्तुती व दुर्गुणांची निंदा होतच असते. जैन साहित्यातही तोच दृष्टिकोण आहे. जिनसागराने आपल्या 'कयडो' नावाच्या रचनेत मानवी जीवनातील तामसी वृत्तीचे एक उत्कृष्ट चित्र रेखाटले आहे. अर्थात ते भविष्य-काळचे चित्र आहे असे तो म्हणतो. पण वर्तमानातच भविष्याची बीजे असतात. ते

चित्र असे आहे—

" अनखिन येक पुढ दादा नवल वर्तेल ।
बहिण मावंडासी दादा विवाह होईल ॥
पाचा वरखाची नार दादा भ्रतार मागल ।
साता वरसाची नार गरोदर होईल ॥
अनखिन येक येक माझी आयका नवलपरी ॥
भ्रतार सांडुनि नारी हिंडतिल घरोघरी ॥
गुरु चेला भांडण दादा पिया पुत्र वैरी ।
नाही दया नाही धर्म होईल देस्या परी ॥
गया टया करतिल लोक राहिल पुराण ।
धंदा मंदा गेला जन हिंडतिल रानोरान ॥ "

भविष्याचे हे चित्र आहे असे म्हणण्यापेक्षा जे होऊ नये असे वाटते त्याचे हे चित्र म्हणावे लागेल. मानवी जीवनाच्या भवितव्यासंबंधी कधी कधी विचारवंतांनाही निराश होऊन असे उद्गार काढावे लागतात. जीवन सुखी होण्यासाठी सद्गुणांची उपासना झाली पाहिजे. माणसांनी पापांना भ्याले पाहिजे.

" मातापित्यांना टाकून आवडत्या पत्नीबरोबर श्वसुरसदनात निवास करणारा, मंचकावर रोगग्रस्त पित्याला टाकून त्याच्या मरणाची वाट पाहाणारा, औषधाण्यासाठी वडिलांकरिता रुकाही न खर्चणारा पण तो मेल्यानंतर लौकिकासाठी रडणारा–असा हा पुत्र, पुत्र नव्हे जंतू होय ! " (श्रे च. व. ३४. ४४–४७) तसेच " हृदयात कठोर पण वरून काति मिरविणारा, मनात दया नसताना वरवरचे शब्दलालित्य दाखविणारा, हातात कडेकंकणे घालून सन्मार्गाने हात हालविणारा पण स्वप्नीही दान न करणारा–असा जो नर त्याला आग लावा. " (श्रे. च. व. ३६. १३९–१४६) हे श्रेणिक चरित्रकार जनार्दनाचे बोल त्यांची निराश अशी जीवनदृष्टी व्यक्त करतात. जैन साहित्यिकांची कर्मगतीवर पूर्ण श्रद्धा आहे.

" ललाटपट्टींचीं अक्षरें । तीं न टळतील हरिहरें ।
तेतीस कोटी सुरवरे– । कडूनि टळेंचि ना ॥ "

— प. पु. १२. १०९

हरिवंशपुराणात श्रीकृष्णाच्या तोंडी पुढील उद्गार आहेत.

" आरे कर्मभोगिल्यावाचुनि । सुटका नोहे मल्लापुनी ।
पूर्ण आयुष्य कर्मबांधुनी । गेले पाहिजे ॥

— ह. पु. ६७. ४५

सर्व प्रकारच्या मानवी प्रयत्नावरही प्रभुत्व गाजविणारी ही कर्मगती अथवा

दैवगती जैन साहित्याला पूर्णपणे मान्य आहे. थोडक्यात जीवन नश्वर आहे. दयाधर्मच सर्वश्रेष्ठ धर्म आहे. मोगाला त्यागानेच पूर्णत्व येते. मानवाने आपल्या कर्तृत्वाचा अहंकार करू नये हीच जीवनदृष्टी या साहित्याला व्यापून राहिली आहे. या ग्रंथकारांच्या दृष्टीने ही चिरंजीव जीवनमूल्ये आहेत. 'दोष' म्हणून त्यांची हेटाळणी करणारे खुशाल करोत! जीवनाला क्षुद्रतेऐवजी महत्ता आणि उदात्तता प्राप्त होते ती या जीवनमूल्यामुळेच.

## प्राचीन मराठी जैन साहित्याचे ऐतिहासिक कार्य –

या साहित्याने साधलेली कार्ये विविध स्वरूपाची आहेत, सामाजिक, धार्मिक व साहित्यिक असे त्या कार्याचे त्रिविध स्वरूप आहे. हे 'जैन साहित्य' आहे. जैन समाजाच्या तात्कालिक गरजा, प्रेरणा यांच्यातून त्या साहित्याची निर्मिती झाली. इ. स. च्या पंधराव्या शतकापासून अठराव्या शतकापर्यंत महाराष्ट्रीय समाजाचे जीवन किती अस्थिर होते याचा विचार केला म्हणजे या साहित्याचे कार्य लक्षात येते. महाराष्ट्रीय संतमंडळींनी जे कार्य साहित्याच्या द्वारा केले तेच कार्य जैन साहित्यिकांनी जैन समाजासाठी केले. समाजाचे स्थिरीकरण हेच ते कार्य होय. जुन्या काळात जी जीवनमूल्ये धर्माचार्यांनी एकदा प्रतिपादिली होती तीच शाश्वत जीवनमूल्ये अशी दृढ श्रद्धा असल्यामुळे, जनमनावर तीच मूल्ये बिंबवावीत हा या साहित्याचा उद्देश होता. अस्थिर राजकीय परिस्थिती आणि निरनिराळी भौतिक संकटे यांमुळे लोकांची धर्मावरची श्रद्धा उडत चालली होती. त्या श्रद्धेला सावरून धरण्याचा हा प्रयत्न होता. पण सावरण्याचा हा प्रयत्न फारच संकुचित मनोवृत्तीतून चालला होता हेही उघडपणे दिसून येते. प्राचीन आचार्यांच्या साहित्यात जी स्वयंभू व स्वतंत्र प्रेरणा होती ती आता नाहीशी झाली होती. आत्मशुद्धीपेक्षाही बाह्य आचाराचा प्रभाव समाजावर अधिक पडत चालला. प्राचीन मराठी साहित्यात हा बाह्य आचाराचा पगडा विशेष आहे. जैन समाज हा जैनाचारावर स्थिर राहावा ही कल्पना मुख्यतः असल्यामुळे असे झाले. रात्रिभोजनत्याग, पाणी गाळून पिणे, व्रत-वैकल्ये करणे, जिनमूर्तीचे रोज दर्शन घेणे हा खास आचारधर्म होता. पण त्यामुळेच जैन समाज वेगळा टिकून राहू शकला हेही खरे आहे. जैन समाजाचे पृथक् अस्तित्व टिकवून ठेवण्यात मराठी जैन साहित्याचे कार्य मोलाचे मानावे लागेल. हे कार्य जसे सामाजिक स्वरूपाचे होते तसेच धार्मिक स्वरूपाचेही होते. मुसलमानांकडूनही छळ आणि 'अवैदिक' म्हणून हिंदू समाजाकडूनही धार्मिक बाबतीत पाठिंबा नाही, अशी स्थिती जैनधर्मीयांची त्याकाळी झाली होती. अशा वेळी 'जैनधर्म' हा काही विशिष्ट प्रकारच्या आचारात बद्ध करून तो समाजाच्या गळी नित्य उतरवीत राहण्याचा प्रयत्न करण्याचीच जरूरी होती. मध्ययुगीन भट्टारकांच्या मठांनी तेच काम केले आणि त्यांच्याच परंपरेत निर्माण झालेल्या मराठी साहित्यानेही हेच काम केले.

'श्रमण साहित्या'ची परंपरा अखंडित ठेवणे हे या साहित्याचे दुसरे एक मोठे कार्य आहे. भारतीय साहित्यात जैनधर्मीय साहित्याचा समावेश श्रमणसाहित्यात करण्याची संशोधकांची परंपरा आहे. जैन धर्माच्या कार्यांचा जेव्हा विचार होतो तेव्हा साहित्यनिर्मिती हे एक जैनधर्मीयांचे महान् कार्य समजतात. प्राकृत, संस्कृत, अपभ्रंश आणि जुनी हिंदी, गुजराती व कन्नड-तामिळादी भाषांत जैन साहित्यभांडार फार मोठ्या प्रमाणात आहे. त्यात खंड असा कधी पडलेला नाही. ज्या वेळी जी लोकभाषा असेल तिचा उपयोग धर्मप्रसारासाठी करण्याची जैनाचार्यांची परंपरा होती. प्रसंग पडला तेव्हा मराठीचाही उपयोग प्रेमाने आणि जिद्दीने त्यांनी केला. परंतु मराठीत जे आले आहे ते परंपरेने आलेले 'धन' आहे. तत्वज्ञान, आचार-धर्म व कथा यांचा वारसा प्राचीन आहे. तो वारसा 'श्रमणसाहित्या'चा आहे. विंटरनित्सने त्या साहित्याची लक्षणेही निश्चित केली आहेत. वैदिक साहित्याहून या साहित्याची भिन्नता प्राचीन काळापासूनही स्पष्ट दिसून येते असे त्याचे मत आहे. "श्रमणसाहित्यात चातुर्वर्ण्य संस्थेला महत्त्व नाही. या साहित्यातील कथा-नायक देव किंवा ऋषी नसून राजे, व्यापारी अथवा शूद्रही असतात. काव्यासाठी सामान्य लोकांच्या परंपरेतील कथानकांचा उपयोग येथे करण्यात येतो. या साहित्यात संसारातील दुःखांचे कथन करून अहिंसादी गुणांचे महत्त्व वर्णन करण्यात येते. यज्ञयागाचे खंडन करण्यात येते." अशी ही श्रमणसाहित्याची विशिष्ट परंपरा आहे. प्राचीन मराठी साहित्याने आपल्या कुवतीनुसार मराठी भाषेतही या परंपरेची जोपासना केली हे मराठीलाही अभिमानास्पद आहे. पद्मपुराण, हरिवंशपुराण, यशोधरचरित्र, जीवंधरपुराण, श्रेणिकचरित्र, भविष्यदत्त बंधुदत्तपुराण, पुण्यास्त्रवपुराण, सम्यक्त्वकौमुदी, सुदर्शनचरित्र, धर्मामृत, परमहंसकथा इत्यादी साहित्याचा अभ्यास करताना हे ग्रंथ केवळ मराठीतच निर्माण झाले आहेत असे समजून चालता येत नाही. त्यातील प्रत्येक ग्रंथाला पूर्व इतिहास आहे, स्वतंत्र परंपरा आहे. त्यासाठी संस्कृतात, प्राकृतात, अपभ्रंशात, तामिळ भाषेत, कन्नड, गुजराती, हिंदी या सर्व भाषांतील साहित्याचा शोध घ्यावा लागतो. मराठी भाषेला ज्यांनी हा वारसा मिळवून दिला त्यांचे कार्य निश्चितपणे थोर आहे.

केवळ मराठी साहित्याच्या दृष्टीनेही प्राचीन मराठी जैन वाङ्मयाकडे जेव्हा आपण पाहतो तेव्हाही त्याचे महत्त्व नजरेस भरते. महाराष्ट्र सारस्वतात 'जैन साहित्य' या एकाच दृष्टिकोणातून त्याकडे न पाहता, मराठी भाषेच्या अभ्यासाच्या दृष्टीनेही

---

४. डॉ. ए. एन्. उपाध्ये यांनी 'बृहत्कथाकोश'च्या प्रस्तावनेत 'श्रमण साहित्या'चा विशेष विचार केला आहे.

५. Winternitz – Jainism in the History of Indian Literature, P. 8

त्याकडे पाहिले पाहिजे. जैन साहित्यिकांनी आपल्या साहित्यनिर्मितीने जैन समाजा-वर जसे उपकार केले आहेत, तसे मराठी भाषेवरही केले आहेत. मराठी भाषेची अभिवृद्धी त्यांनी निश्चितपणे केली आहे. निरनिराळे वाङ्मयप्रकार त्यांनी मराठीत आणले. शब्द, वाक्प्रचार व म्हणी यांत भर टाकली. साहित्याच्या दृष्टीनेही हे कार्य मोलाचे आहे. महाराष्ट्रीय समाजाला जे मराठीतून वाचावयास मिळत नव्हते ते या साहित्यिकांनी उपलब्ध करून दिले. याप्रमाणे मराठी साहित्य संपन्न करण्यात जैन साहित्याचा वाटा आहे.

## उपसंहार —

प्राचीन मराठीतील जैन साहित्याचे क्षेत्र संशोधनाच्या अपेक्षेने कितीतरी मोठे आहे. अजूनही कित्येक ग्रंथ उपलब्ध होतील. अनेकांच्या परिश्रमानेच हे संशोधन पूर्ण होत जाणार आहे. माझा हा प्रयत्न म्हणजे केवळ आरंभावस्था होय. जिन-सागराच्या एका श्लोकात या प्रबंधाची मी समाप्ती करीत आहे.

" जवळि जिनकथेचे भातुके गोड आहे ।
कवळ धरुनि संतीं येकदा अर्पिले हे ॥
सकळ मिळुनि आधीं स्वल्प चाखोनि पाहा ।
मन-वन वरि घ्या रे कांति येईल देहा । "

— निर्दोषसप्तमी कथा

● ○ ●

परिशिष्ट १

# अभ्यासाची साधने

**हस्तलिखित प्रतीसंबंधी माहिती** – प्राचीन मराठीतील जैन साहित्याचे संशोधन करण्याचे ठरविल्यानंतर माझ्यासमोर एक अडचण उभी राहिली, ती म्हणजे माझ्या हाती ते साहित्य कसे येणार ? कारण प्रकाशित ग्रंथ फारच कमी होते आणि जे होते ते सुद्धा अगदी भ्रष्ट स्वरूपात. प्रामाणिक अशा हस्तलिखित प्रतींवरून मुळांत काहीही बदल न करता छापलेले ग्रंथ नव्हते. अलिकडेच असा थोडासा प्रयत्न डॉ. विद्याधर जोहरापूरकर यांनी व मी केला आहे. पण संशोधनाला ही सामग्री पुरेशी नव्हती. ठिकठिकाणी जैन मराठी ग्रंथांची जी हस्तलिखिते असतील ती मिळविणे हाच त्यावरचा मार्ग होता. म्हणून जेथे हे ग्रंथ मिळतील असे वाटले, तेथील काही लोकांशी पत्रव्यवहार केला. आणि १९५८ च्या एप्रिल महिन्यात मराठवाडा व विदर्भ येथील काही गावांना प्रत्यक्ष जाऊन जवळ जवळ ४५ हस्तलिखिते मिळविली.

या संशोधनात जेथे जेथे त्या हस्तलिखिताचा संदर्भ देण्यात आला आहे तेथे तेथे तळटीपात त्यांचा उल्लेख केलाच आहे. पण त्या हस्तलिखित प्रतींची माहिती एकत्र देणे हे संशोधकांच्या व अभ्यासकांच्या दृष्टीने उपयुक्त होईल असे वाटले; म्हणून येथे त्या माहितीचे संकलन केले आहे.

एकाच गावच्या अनेक हस्तलिखित पोथ्या आहेत आणि एकाच पोथीत अनेक ग्रंथही आहेत. म्हणून येथे त्यांचे व्यवस्थित विवरण देऊन माझ्या अभ्यासाच्या सोई-साठी त्या त्या गावच्या प्रत्येक हस्तलिखित पोथीला क्रमांक दिला आहे. आवश्यक तेथे संदर्भात त्या गावाचे नाव देऊन त्या क्रमांकाचा उपयोग केला आहे. उदाहरणार्थ जिंतुर क्रमांक १.

येथे प्रामाणिकपणे हे नमूद केले पाहिजे की महाराष्ट्रात अजून कित्येक ठिकाणी अशा पोथ्या आहेत. पण मला जेवढ्या शक्य झाल्या तेवढ्या मिळविल्या आहेत. अजून हे क्षेत्र फार मोठे व व्यापक आहे.

(१) अंजनगांव सुर्जी (अमरावती) – जैनमंदिर,
श्री. मदनछंगाई यांच्याकडून

क्रमांक १ – जीर्ण पोथी, आकार ८" × ६",. पाने १९ ते १९५ शिल्लक आहेत. प्रारंभी अंबिकारास, होलिकारास या गुजराथी रचना आहेत. प्रतिलेखन–काल शके १५७७ असून कार्तिक महिन्यातील शु॥ ९ मीस रविवारी पाथरी गावात पार्श्वनाथ चैत्यालयात ही प्रत बनविण्यात आली आहे. शुभचंद्राने पुण्यमतीबाईच्या पठनार्थ ती तयार केली. या पोथीत पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) रुक्मिणीहरण ( गुणकीर्ती ) पान ८९ ते १०८. ( २ ) धर्मामृत : गुणकीर्ती : पान १०९ पासून पुढे.

क्रमांक २ : कर्माष्टमी कथा ( अर्जुनसुतसोयरा ) ७ पानांची स्वतंत्र प्रत. स्थळकाळादि काहीही दिले नाही. प्रतिकर्त्याचे नाव नाही.

क्रमांक ३ : जीवंधरपुराण ( जिनसागर ) स्वतंत्र प्रत. ही प्रति शके १८६१ मधील आहे. बाकीची माहिती दिलेली नाही.

( २ ) कारंजा ( अकोला ) : बलात्कार गण जैन मंदिर. श्री जयकुमार ज. मीसीकर याच्या मार्फत.

क्रमांक १ : सम्यक्त्व–कौमुदी ( महीचंद्र ) नंबर ७२६ ची प्रत. स्वतंत्र शास्त्राकार पाने, पृष्ठसंख्या ११५, आकार ९" × ५" शेवटी पुढील माहिती आहे. शके १७०४ शुभकृत नाम संवत्सरे आश्विन शुद्ध प्रतिपदा १ सोमवारी शिरड येथील शांतिनाथ चैत्यालयात धर्मचंद्र भट्टारकांचे शिष्य नेमसागर कर्नाटक यानी स्वहस्ते ही प्रत लिहिली आहे.

क्रमांक २ : –न. १०४५ ज्ञानोदय. ९ पृष्ठाची स्वतंत्र प्रत. आकार ९" × ५".

क्रमांक ३ : न. १०५४ स्वात्मविचार ( दिलसुख ) १३ पृष्ठांची स्वतंत्र प्रत आकार ११॥" × ५॥".

प्रतिलेखन काल संवत् १८९२. प्रतिकर्ता खेमा जिंतुरकर.

क्रमांक ४ : नं. १०६७ ची पोथी. यांत पुढील रचना आहेत.

( १ ) महावीर–पाळणा ( महीचंद्र ) पान १०९ वर. ( २ ) विंचूगीत ( गुणदास ). पान ११० वर. ( ३ ) धंदागीत ( गुणकीर्ती ) पान ११० वर.

( ३ ) चारठाणा ( परभणी ) : जैनमंदिर :

क्रमाक ( १ ) हस्तलिखित व्रतकथा संग्रह. आकार १०" × ६", १०४ पाने, त्यांत १४ व्रतकथा आहेत. पैकी ७ वी कथा ( चिमनापंडितकृत ) अनंतव्रत-कथा आहे. पृष्ठ ४७ पासून.

( ४ ) जिंतुर ( परभणी ) : मोतीलाल साधजी जिंतुरकर यांच्यामार्फत.

क्रमांक १ : ही एक जीर्ण पोथी आहे. पाने ६ ते २९१ शिल्लक आहेत. पोथीला नंबर नाही. आकार १०" × ६", ही संपूर्ण पोथी देऊळगांवनिवासी बघेरवाल ज्ञातीय साहुला वंशीय अर्जुनसाचा मुलगा रत्नसाह याने स्वयंपठनार्थ

लिहिली आहे. प्रतिलिपीचा काळ शके १६११ ते १६१५ पर्यंत आहे. या पोथीत पुढील मराठी ग्रंथ आहेत.

१. सुगंधदशमी कथा (पंत गावाजी) पाने १ ते १९. २. दानशील-तप-भावना (दामाजी पंडित) पाने २० ते ५०. (३) श्रेणिक चरित्र (ब्रह्मगुणदास) पाने ३ ते १३०. (पृष्ठक्रमांक पुनः १ पासून). (४) जंबुस्वामी-चरित्र (दामाजी पंडित) पाने १३१ ते २८६. (५) अष्टान्हिककथा (नंदीश्वर) (महीचंद्र) पान २९१ पासून. अपूर्ण.

क्रमांक २ : महावीर मंदिर पोथी क्र.६,३०० पानांची. पान २०० वर पोथीलेखकाने पोथीलेखनासंबंधी पुढील माहिती दिली आहे. " स्वस्तिश्री नृपशालीवान शके १७२४ दुंदुमि नाम संवत्सरे आषाढ मासे कृष्णपक्षे नवम्यां सुक्रवासरं शुकायां मानवत महाग्रामे श्री मल्लीनाथ चैत्यालय श्री मूलसंघे सरस्वति गछे बलात्कार गणे। श्री कुंदकुंदाचार्यान्वय भट्टारक श्री देवेंद्रकीर्ती देवानां तत्पटे धर्मचंद्र यतीश्वराणां। तत्पटे श्री देवेंद्रकीर्ति भट्टारक महामुनीश्वराणा। तस्य शिष्य ब्रह्मजिनसागरजी तस्य शिष्य सातापा। तस्य पुत्र पायाणा तस्य पुत्र काशिनाथ इंद्र। विजापूरकर हल्ली वस्ती मानवत ग्राममध्ये स्वहस्तेन ग्रंथ लिखितं। "

या पोथीत पुढील मराठी ग्रंथ आहेत. (१) गरुड-पंचमी-व्रतकथा (महीचंद्र) पान ७५ ते ८२. (२) जिनरात्रिव्रत-कथा (लक्ष्मीचंद्र) पान ८२ नंतर. (३) शील्यपताका (महाकीर्ति) पान २८५ नंतर.

क्रमांक ३ : आरतीसंग्रह–महावीर मंदिरांत हा वेगवेगळ्या आरत्यांचा एक हस्तलिखित संग्रह आहे. पोथी क्रमाक १२, आकार ७" × ४". या संग्रहात बऱ्याचशा मराठी आरत्या एकत्रित करण्यात आल्या आहेत. प्रारंभी इतर काही रचना आहेत. या संग्रहात पुढील आरत्या आहेत:

(१) गुरु–आरती (अर्जुनसुत). (२) समवसरण–आरती (तानू पंडित). (३) आदिनाथ–आरती (चिमना पंडित). (४) चूड–चिंतामणी आरती (महीचंद्र). (५) माणिकस्वामी – आरती (राया). (६) नेमिनाथ – आरती (गंगादास). (७) पार्श्वनाथ – आरती (रामचंद्र). (८) नेमीश्वर – आरती (जिनदास). (९) चंद्रनाथ – आरती (चिमना पंडित). (१०) नेमीश्वर – आरती (राया). (११) शीतलनाथ – आरती (?). (१२) सरस्वती – आरती (छत्रसेन). (१३) नंदीश्वर – आरती (,,). (१४). पंचमेरु – आरती (गुणसागर) (१५) पद्मावती – आरती (रामकीर्ती). (१६) चंद्रनाथ – आरती (माणिक नंदी). (१७) चंद्रनाथ – आरती (गुणसागर). (१८) अनंतनाथ – आरती (माणिकनंदी). (१९) समवसरण – आरती (माणिक नंदी).

क्रमांक ४ :– जिंतुरच्या पार्श्वनाथ (सेदवाल) मंदिरात ६" × ४" आकाराची ४ ते ५४ पानांची एक लहान गुटिका आहे. त्यात पुढील मराठी

रचना आहेत.

( १ ) आदीश्वर – भवांतर ( छत्रसेन ) पाने २८ ते ४३. ( २ ) बारमासी ( दिनाश ) पाने ४३ ते ४६. ( ३ ) तीर्थवंदना ( चिमना ) पान ४६ नंतर.

**क्रमांक ५ :–** जिंतुरच्या पार्श्वनाथ मंदिरात एक लहानशी जुनी वही आहे. तीत पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) पद्मावती – पाळणा ( देवेंद्रकीर्ति शिष्य ? ). ( २ ) पद्मावती – शृंगार ( चंद्रकीर्ति ). ( ३ ) पद्मावती – शृंगार ( ? ) ( ४ ) नेमिनाथ – भवांतर ( महीचंद्र ). ( ५ ) बारमासी ( दिनाश ).

**नागपूर :** नागपूर येथील सेनगण मंदिरातील बऱ्याचशा मराठी ग्रंथांच्या हस्तलिखित प्रतींचे संशोधन डॉ. वि. पा. जोहरापुरकर यांनी केले आहे. माझ्यासाठी ज्या प्रती मी त्यांच्याकडून मागवून घेतल्या त्यांचीच माहिती येथे देत आहे.

**क्रमांक : १** सेनगणमंदिर शास्त्र क्रमांक ७, शके १६११ मध्ये कारंजा येथे केलेली ब्रह्मगुणदासकृत श्रेणिक चरित्राची प्रत यात आहे.

**क्रमांक २ :** सेनगणमंदिर शास्त्र क्रमांक ११२, अष्टकर्म–प्रकृति ( यादवसुत ) ३९ पृष्ठे. बाकी काही माहिती दिलेली नाही.

**क्रमांक ३ :** जीर्णपोथी. ( डॉ. जोहरापूरकरांची ) प्रारंभी काही पूजा आहेत. चरित्रपूजेनंतर " इति चारित्रपूजा समाप्तं । श्रावणसुदि १० दशमीदिने लिखितं – अमरसागर – दामाजीपंडित पठनार्थं " असे म्हटले आहे. पं. दामाजीसाठी अमरसागर यांनी ही प्रत बनविली आहे. जंबुस्वामी चरित्रानंतर " सिउर सुमस्थाने आदिनाथ चैत्यालये अश्विनमासे पांचमी दिने आदित्य-वारे लिखितं अमरसागरे स्वहस्ते । " असा उल्लेख आहे. पण शक मात्र कोठेही नाही.

यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) जंबूस्वामी चरित्र ( दामापंडित ). ( २ ) दानशीलतप भावना ( दामापंडित ) ( ३ ) मराठी उखाणे ( ? ). ( ४ ) भानकीर्तिकृत काही मराठी पदे.

**क्रमांक ४ :** सेनगण मंदिर पोथी क्रमांक २३, नवीन क्रमांक ४, यात वीरदासकृत सुदर्शनचरित्र आहे. लेखनकाल दिला नाही.

**क्रमांक ५ :** सेनगणमंदिर ' उषा–अनिरुद्ध ' पोथी. यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) धर्मामृत ( गुणकीर्ती ) पान ४५. ( २ ) पद्मावती आरती ( रामकीर्ती ) पान ११७. ( ३ ) परमहंसकथा ( सुरिजन ) पान १७२. ( ४ ) पार्श्वनाथ भवांतर ( गंगादास ) पान १९४.

**क्रमांक ६ :** सेनगणमंदिर – नवकारमंत्र प्रकृति ( वीरदास ) ( डॉ. जोहरापुरकरांजवळ ).

**( ६ ) परभणी :–** दि. सेतवाल जैन मंदिरात दोन हस्तलिखिते मिळाली.

**क्रमांक १ :** कालिकापुराणाची ( देवेंद्रकीर्तिकृत ) प्रत – स्वतंत्र शास्त्राकार आकार. प्रत्येक अध्यायाला स्वतंत्र पृष्ठसंख्या दिलेली आहे. प्रतिकर्त्याने प्रतिकाल व स्थळ यासंबंधी माहिती दिलेली नाही. शेवटी त्याने " विघनाथ नन्होबा मलमकर सहितवाला ज्ञातीय वस्ती कबजे मुळाव याचे आहे. " असे म्हटले आहे.

**क्रमांक २ :** सम्यक्त्वकौमुदी – ( दयासागरकृत ) ची प्रत – ही प्रत अलीकडची आहे. स्वतंत्र शास्त्राकार पाने आहेत. प्रत्येक अध्यायाची पृष्ठसंख्या वेगवेगळी आहे. प्रतिकर्त्याने शेवटी पुढील माहिती दिली आहे. " दस्तुर बाबनाजी नारायेन सईतवाळ उबाळे राहणार कबजे डोनगांव तालुके मेहकर जिल्हा बुर्हाने, याचा ग्रंथ असे. चैत्रमास कृष्णपक्ष गुरुवार शके १८१७, तारीख २८ मार्च संवत १९५१. "

**( ७ ) बाहुबली ( कोल्हापूर ) क्रमांक १ :** बाहुबली येथील सरस्वती भुवनांत ह. शास्त्र नं. ६६ ची प्रत पुण्यास्त्रव कथाकोश. ( जिनसेनकृत ) शास्त्राकार पाने, प्रत्येक अध्यायाचे पृष्ठक्रमांक वेगळे आहेत. ही प्रत शके १७५१ मधील असून ' रावोबा हेंज्य ' यांनी गुरुवारी भरणी नक्षत्रावर पूर्ण केली आहे.

**( ८ ) वाढोणा (अकोला)** येथून प्रा. शांतिकुमार किल्लेदार, नागपूर यांनी दोन हस्तलिखित प्रती आणल्या होत्या. त्या मला पाहण्यास दिल्या.

**क्रमांक १ :** ही एक पोथी आहे. क्रमांक वगैरे नाही. या पोथीत प्रारंभी ब्रह्मगुणदासकृत श्रेणिकचरित्र असून नंतर ब्रह्मजिनदासकृत श्रेणिकरास आहे. पोथी-संबंधी शेवटी पुढील माहिती आहे. कारंजा येथील चंद्रनाथ चैत्यालयात ही पोथी लिहिण्यात आली आहे. शके १६१२ प्रमोदनाम सवत्सर चैत्र वद्य ७ बुधवारी शीतलसंघवींचा पुत्र तवना संघवी यांनी कर्मक्षयार्थ ही प्रत लिहविली.

**क्रमांक २ :** जीवंधर चरित्र सचित्र. याची प्रत प्रा. शांतिकुमार किल्लेदार यांच्याकडे आहे. प्रारंभी भ. ऋषभदेवाचे चित्र असून ज्या त्या प्रसंगावर आधारित जीवंधरविषयक चित्रे आहेत. जिनसागरकृत जीवंधर चरित्राची ही सचित्र प्रत चित्रकलेच्या अभ्यासकानाही उपयुक्त आहे.

**( ९ ) वासीम** — श्री लालचंद जोगी हराळकर वकील यांच्याकडून वासीम येथील जैन मंदिरातून प्राप्त हस्तलिखित प्रती.

**क्रमांक १ :** जीर्ण पोथी पाने ५० ते २३० शिल्लक. पोथी अति जीर्ण झाली असून कागदाचे तुकडे पडतात. पोथीलेखन शके १६४८ मधील आहे. पोथीत वादिराजकृत ' नेमीश्वर सवाया ' ही रचना आहे. त्यानंतर पुष्पिका आहे. ती पुढीलप्रमाणे—" इति श्री वादिराजकृत नेमीस्वर सवाया गीत समात ॥ श्री ॥ स्वस्ति श्री संवत १७८३ शालीवाहन शके १६४८ प्लवंग नाम संवछरे जेष्टमासे शुद्रपक्षे तिथी १ इदं पुस्तकं संपूर्ण ". पुनः एक पुष्पिका पान २०८ वर आहे. ती अशी—" हंस वच्छराज रास समातम् ॥ संवत १७८३ शालीवाहन शके

१६४९ वरषे प्लवंग नाम संवछरे आषाडमास शुदिपक्षे १६ भौमे धरणिधर क्षेत्रे इदं पुस्तकं आत्महितार्थं परोपकारार्थं रामासा देमासा तस सुत गंगाजी कल्याणसा माणिकसा पठनार्थ लिखितं ! हस्ताक्षर उधवजी उपासणी लिखितं । " यांतील धरणिधर क्षेत्र म्हणजे धरणगाव होय. कारण पोथीत पान ८२ वर " इति नलदमयंती चौपई " म्हणून " श्री धरणग्रामे संवत १७८३ शके १६४८ " असे म्हटले आहे.

या पोथीत पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) अहिरणी – अंतरीक्ष पार्श्वनाथ गीत ( नींबा ) पान ८५. ( २ ) नेमीश्वर मऱ्हाटी गीत ( नींबा ) पान ८६. ( ३ ) कृष्णगीत ( मेघा ) पाने ८७–९२. ( ४ ) रामचंद्र फाग भाषा गुजराती मिश्र, ( गुणकीर्ति ) पान ८३. ( ५ ) सीतादेवी गीत, भाषा गुजराती ( गुणकीर्ति ) पान १००. ( ६ ) गुजरीमऱ्हाटी गीत ( मेघा ) पान ८६. ( ७ ) क्षमा गीत ( गुणदास ) पान १०१. ( ८ ) गोळणीमास ( नेमीश्वर जिनदीक्षा ) ( गुणकीर्ति ) पाने १०१–१११.

याच पोथींत मेघराजकृत " छोतीमाव " ही गुजराती रचना आहे.

**क्रमांक २ :**– पोथी – १३६ पाने आहेत. पोथीत शेवटी पुढील पुष्पिका आहे. " शके १७०३ पलवनाम संवत्सारे श्रावण वद्य पंचमी बुधवार दिने ताम्रग्रामें सुमस्थाने श्री शातिनाथ चैत्यालय पुस्तक श्री, श्री, श्री पद्मकीर्ति स्वहस्तेन स्वयंपठनार्थं ॥ "

यांत पुढील दोन मराठी ग्रंथ आहेत. ( १ ) शीलपताका ( महाकीर्ति ) पाने १ ते ४३. ( २ ) जीवंधर पुराण ( जिनसागर ) पाने ४३ ते १३६.

**क्रमांक ३ :** कवींद्र सेवककृत ' सुमतिप्रकाश ' याची प्रत श्री जोगी वकिलांना हराळ येथे मिळाली. ग्रंथाकार स्वतंत्र पाने, ओव्या २३७२, प्रतिकाळ शके १८१५.

**क्रमांक ४ :** सेतवाळ जैन मंदिरातील एका हस्तलिखित पोथीत पान १८१ वर मेघाकृत कृष्णगीत ( कहानी गीत ) आहे.

**( १० ) शिरड शहापूर ( परभणी ) :** श्री. महाजन, सेक्रेटरी, मल्लिनाथ दिगंबर जैन मंदिर, शिरडशहापूर यांच्याकडून मिळालेल्या हस्तलिखित प्रती.

**क्रमांक १ :** ३"×४"आकाराची लहान गुटिका, पाने १५९. यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) नेमिश्वर–पाळणा ( चिमनापंडित ) पान ८९. ( २ ) नेमिश्वर–भवांतर ( चिमनापंडित ) १०३. ( ३ ) पद्मावती–आरती (?) पान १०७. ( ४ ) क्षेत्रपाल–आरती ( तानुपंडित ) पान १२०. ( ५ ) कौतको ( सोमवंशी तुकुजी ) पान १४१. ( ६ ) चिंती रे चिंती माझ्या मना ( पद ) ( दिनासा ) पान १४३. ( ७ ) राजमती–धावा–नेमिश्वर गीत ( महीचंद्र ) पान १४४. ( ८ ) गोम्मट स्वामी–आरती ( राया ) पान १४६. ( ९ ) क्षेत्रपाळ–आरती (राया) पान १४७. (१०) शातिनाथ–आरती ( राया ) पान १४९. ( ११ ) माणिकस्वामी–आरती ( राया )

पान १५०. ( १२ ) पार्श्वनाथ–आरती ( राया ) पान १५२. ( १३ ) शांतिनाथ–आरती ( राया ) पान १५३.

क्रमांक २ : जुनी वही, पाने ६ ते ७१ शिल्लक आहेत. प्रतीविषयी बाकी काही माहिती मिळू शकत नाही. यात प्रारंभी २१ पानांपर्यंत दशलाक्षणिक व्रतकथा ( अनंतकीर्ति ) आहे. बाकीच्या संस्कृत रचना आहेत.

क्रमांक ३ : बांधीव गुटका–काळा पुठ्ठा, आंतील पाने फार जीर्ण आहेत. पानेही मुडून मागे पुढे झाली आहेत. पोथीच्या शेवटी पुढील पुष्पिका आहे " सके १७५४ नंदन नाम संवछरे कार्तिकमासे वद्यपक्षे १३ रोज मंगळवार सायंकाळी संपूर्ण शीरड ग्रामे शुभस्थाने शांतिनाथ चैत्यालये. "

यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) आदिनाथ स्तोत्र ( जिनसागर ). ( २ ) नेमिनाथ भवांतर ( चिमनापंडित ) पान १७. ( ३ ) जिनवर विनती ( मल्लार्जापुत्र राव ) पान १९. ( ४ ) गोम्मट स्वामी स्तोत्र ( चिमनापंडित ) पान १४. ( ५ ) नेमिनाथ भवांतर ( महीचंद्र ) पान २१. ( ६ ) पार्श्वनाथ भवांतर ( मेघराज ) पान २६. ( ७ ) पार्श्वनाथ आरती ( तानूपंडित ) पान ५१. ( ८ ) बारमासी ( दिनासा ) पान ५४. भूपाळी ( चिमनापंडित ) पान ५७. ( १० ) भक्तामर स्तोत्र ( जिनसागर ).

क्रमांक ४ : लांबट आकाराची पोथी. १९९ पानांची, आकार १०" × ५" पहिली चार पाने नाहींत. पोथीत शेवटी पुढील पुष्पिका आहे. " इती श्रेणिक महाराज चरित्रं मन्हाष्ट्र भाषा संपूर्ण ॥ शके १६०६ रक्ताक्षनाम संवछरे श्रावणमासे कृष्णपक्षे तृतियदिने आदित्यवारे ग्रंथ लिखिते यथाप्रति हस्ताक्षर महानुभाव ॥ ".

या प्रतीत पुढील मराठी ग्रंथ आहेत.

( १ ) श्रेणिक चरित्र ( गुणदास ). ( २ ) रामायणी कहानी गीत ( मेघा ).

क्रमांक ५ : कालिकापुराणप्रत — कालिकापुराण ( देवेंद्रकीर्ति ). या ग्रंथाची ही बरीच जुनी हस्तलिखित प्रत आहे. प्रत मल्लीनाथ जैन मंदिराच्या मालकीची असून मोठी आहे. प्रत्येक अध्यायाचे पृष्ठ क्रमांक वेगळे आहेत. प्रतींत प्रती — काळ स्थळ, कर्ता यासंबंधी काहीही माहिती नाही.

क्रमांक ६ : संमेदशिखर महात्म्य ( चंद्रकीर्तिकृत ). स्वतंत्र पानाची प्रत. पाने ८. प्रतिलेखन काळ, स्थळ वगैरे माहिती दिली नाही.

( ११ ) सोलापूर–क्रमांक १ : श्रेणिकचरित्राची प्रत, ( ब्रह्मगुणदासकृत ) आदिनाथ दि. जैन मंदिर येथील ही प्रत अलिकडची आहे. विक्रमसंवत १९४४ मध्ये घेराळे या गावी नानचंद मियाचंद दयाहुंबड यांनी लिहिली आहे. सुटाकार पानांचा हा स्वतंत्र ग्रंथ आहे.

क्रमांक २ : हरिवंश पुराण – ( जिनदास ) ची प्रत दि. जैन गुरुकुल

येथील नेमचंद निहालचंद ग्रंथालय येथे मिळाली. प्रत्येक अध्यायाचे पृष्ठक्रमांक वेगवेगळे आहेत. ग्रंथाच्या शेवटी पुढील पुष्पिका आहे. " इदं ग्रंथं लखावितं दोसी पदमसी न्हालचंद सुत पदमसी भार्या गिताबाई पुत्र नानचंद परोपकारार्थे ॥ ज्ञानावरण कर्मक्षयार्थे संवत् १९४३ मार्गशीर्ष वद्य ३ भौम वाधरे । ज्ञानावरण कर्मक्षयार्थं । "

**क्रमांक ३ :** हरिवंशपुराणाची ( जिनदास ) प्रत आदिनाथ दि. जैनमंदिर येथील. प्रत्येक अध्यायाचे पृष्ठक्रमांक वेगवेगळे आहेत. प्रतिलिपिकाराने स्वतःचा व दात्याचा परिचय शेवटी स्वतंत्र ४५ ओव्या रचून दिला आहे. धाराशिव ( उस्मानाबाद ) येथे पर्णकुटीत वास्तव्य करुन दाजी संगवी यांनी ही प्रत तयार केली. प्रतिलिपीचा वगैरे खर्च सोलापूर येथील दशाहुंबड ज्ञातीय झुमाबाई यांचा मुलगा गौतमचंद यांनी केला. शके १७७० संवत १९०४ भृगुवार शुक्लपंचमीस.

**क्रमांक ४ :** बुबणे सेतवाळ जैनमंदिर येथील बाधीव गुटका. ९४ पानांची. क्रमांक नाही. प्रति – स्थळ, काळ काही माहिती दिलेली नाही. त्यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) पद्मावती आरती ( विशालकीर्ति ) पान १. ( २ ) क्षेत्रपाल आरती ( तानूपंडित ) पान ३. ( ३ ) पद्मावती पाळणा ( ! ) पान ३. ( ४ ) सिवानेमिसंवाद ( सटवा ) पान ७७. ( ५ ) पार्श्वनाथस्तोत्र ( जिनसागर ) पान ८०. ( ६ ) पद्मावती स्तोत्र ( जिनसागर ) पान ८२. ( ७ ) शांतिनाथ स्तोत्र ( जिनसागर ) पान ८६. ( ८ ) शातिनाथ स्तोत्र ( महीचंद्र ) पान ९२. ( ९ ) अरिहंत आरती ( महीचंद्र ) पान ९३. ( १० ) गुरूची आरती ( भीमचंद ) पान ९४.

**क्रमांक ५ :** आत्मख्याती टीका – पूर्ण ग्रंथ आकार १२" × ४". प्रत्येक अध्यायाची पाने स्वतंत्र ( प्रत माझ्याकडे आहे ).

१२ ) **हिंगोली ( परभणी ) :** श्री. जयकुमार दोडल वकील ॲडव्होकेट, हिंगोली यांच्याकडून हिंगोलीची हस्तलिखिते मिळू शकली.

**क्रमांक १ :** पार्श्वनाथ जैनमंदिर येथील शा. नं. ६४४ ची प्रत. पाने स्वतंत्र १३७. ग्रंथाकार ७" × ४" श्रेणिकचरित्र ( ब्रह्मगुणदास ) ची ही प्रत आहे. ग्रंथाच्या शेवटी पुढील पुष्पिका आहे. " शके १६९० मीति आश्विनमासे कृष्णपक्ष ७ सप्तम्यां श्री कार्यरंजकपुरे श्री चंद्रनाथ चैत्यालये लिखितं आबजी पुजारा तयो पुत्र रायाजि पूजारा हस्ताक्षर । "

**क्रमांक २ :** श्री गुलाबसा कुंडलसा धाकड यांची पोथी. पाने ६ ते ३७७. आकार १०" × ६". हस्ताक्षर देऊळगावच्या साह रत्नशाचे आहे. सर्व रचनांच्या खाली तसा त्याने उल्लेख केला आहे. शके १६१० मधील ही प्रत आहे. सुदर्शन चरित्राच्या अंती शके १६१० बरोबर ' महावीरानो वारो २४३० ' चा उल्लेख केला आहे. रत्नक म्हणजे रतनसा गहाणकरी बघेरवाळ असाही उल्लेख आहे. या

पोथींत पुढील मराठी ग्रंथ आहेत.

( १ ) सम्यक्त्वकौमुदी ( दयासागर ) पाने १ ते १४५. ( २ ) भविष्यदत्त – बंधुदत्त – पुराण ( दयासागर ) पाने १४६ ते २३०. ( ३ ) धर्मपरीक्षा ( विशालकीर्ति ) पाने २३१ ते २८०. ( ४ ) सुदर्शन चरित्र ( कामराज ) पान २८१ ते ३२८. ( ५ ) रविवारव्रतकथा ( पुण्यसागर ) पाने ३२९ ते ३४७. ( ६ ) पार्श्वनाथ भवांतर ( मेघराज ) पान ३४७ नंतर. ( ७ ) द्वादश अनुप्रेक्षा ( गुणकीर्ति ). ( ८ ) धर्मामृत ( फक्त ४ पाने ) ( गुणकीर्ति ).

**क्रमांक ३ :** ही पोथीसुद्धा श्री गुलाबसा कुंडलसा धाकड यांची आहे. पृष्ठ-संख्या १ ते १७७. पोथीच्या मुखपृष्ठावर " हे पुराण अर्जुनसुत येमासा तस्य पुत्र मानीकसा रवने इगोलीकर यांचे असे " असा मजकूर आहे. प्रतिलेखनाचा काल मात्र दिलेला नाही.

यांत दोन ग्रंथ मराठी आहेत.

( १ ) *सुदर्शन चरित्र ( वीरदास )* ( २ ) *रविवारव्रतकथा मोठी ( येमासा अर्जुनसुत )*

**क्रमांक ४ :** पार्श्वनाथ जैनमंदिरातील हस्त. शास्त्र क्रमांक ६५४/८६ बांधीव पोथी. प्रारंभी धनंजयकविकृत नाममाला आहे. अर्ध्या भागानंतर १ पासून पृष्ठक्रमांक टाकून १ ते २४ पृष्ठांत मराठी रत्नकरण्ड टीका ( गुणकीर्ति ? ) आहे. प्रतीच्या स्थलकालासंबंधी काहीही माहिती मिळत नाही.

**क्रमांक ५ :** सुगंधदशमीकथा ( पंत साबाजी कृत ). शास्त्राकार सुटीं २८ पाने आहेत. प्रतिकर्त्याने इतर कोणतीही माहिती दिलेली नाही. ही प्रत पार्श्वनाथ जैन मंदिराचीच आहे. नंबर मात्र नाहीं.

**क्रमांक ६ :** बांधीव गुटिका, पार्श्वनाथ जैनमंदिर शास्त्र क्रमांक ६५१/८९ प्रतीच्या शेवटी प्रतिकर्ता वीरदास यांनी एक संस्कृत श्लोक लिहिला आहे, तो असा –

" मानाख्य नगरे रम्ये । चंद्रप्रभ चैत्यालये ।
ब्रह्मश्री वीरदासेन । अनुप्रेक्षा लिखितं मया । "

कालाचा उल्लेख प्रतीत नाही. यात दोन मराठी रचना आहेत.

( १ ) द्वादश अनुप्रेक्षा ( गुणकीर्ति ). ( २ ) भक्तामर स्तोत्र ( जिनसागर )

**क्रमांक ७ :** रुक्मिणीव्रत–कथेची प्रत ( विशालकीर्ति )–पार्श्वनाथ जैन मंदिरातील. नंबर नाही. शास्त्राकार स्वतंत्र १४ पृष्ठे. प्रतीच्या शेवटी पुढील पुष्पिका आहे. " संवत १८३७ मीति माह वदि १२ बुधवासरे श्री दगमतग्रामे श्री आदिनाथ चैत्यालये लिखितं स्वामी अनतकीर्तिवाचनार्थं पंडित जिनचंद । शीरस्तु । कल्याणमस्तु ॥ "

**क्रमांक ८ :** बांधीव अभंगाची वही–पार्श्वनाथ जैनमंदिरांतील शास्त्र क्रमांक ६५६/९८ ; पृष्ठसंख्या १५०, प्रतीत पुढील पुष्पिकावाक्य आहे. " स्वस्तिश्री नृप

शालीवान शक १७३१ शुक्लनाम संवत्सरे अधिकमासे शुद्धपक्षे आष्टमि युक्तायां मंगलवार अत्र श्रीवसमत महाग्रामे पुभस्थाने श्री आदिनाथ चैत्यालये श्री मूलसंघे भारति गछे बलात्कार गणे श्री कुंदकुंदाचार्यान्वय श्री महीचंद्र भट्टारक तस्य पट्टे आचार्य चंद्रकीर्ति व अनंतकीर्ति तस्य शिष्य गुणसागरजिने पुस्तक लिहविले असे हस्ताक्षर बेंकाजी तस्य पुत्र महादजी झरकर सहितवाळ लेखनार्थ संपूर्ण -- "

यात पुढील मराठी रचना आहेत.

( १ ) तीर्थ वंदना ( चिमनापंडित कृत ) प्रारंभी. ( २ ) कवींद्रसेवकाचे अभंग ( पाने १ ते ७३ ). ( ३ ) तीर्थंकारांची भूपाळी ( कवि मेघ ) पान ७४. चक्रवर्तींचा पाळणा ( गंगादास ) पान ७५. ( ५ ) उनावळीचे अभंग ( चिमना-पंडित व कवींद्रसेवक कृत ) पाने ७७–१५०.

क्रमांक ९ : श्री. जयकुमार दोडल यांच्या स्वतःच्या घरांतील पदसंग्रह. फारच जीर्ण होऊन पृष्ठेही मागेपुढे झाली आहेत. यात किरकोळ रचना संग्रहित झाल्या आहेत, त्या पुढील आहेत :

( १ ) आदीश्वर भूपाळी ( चिमनापंडित ). ( २ ) मातेची सोळा स्वप्ने ( चिमनापंडित ). ( ३ ) गोमटस्वामी–गीत ( मेघा ). ( ४ ) कसणेर चिंतामणि– आरती ( चिमना ). ( ५ ) गुरुगीत ( चिमना ). ( ६ ) झंपा ( चिमना ). ( ७ ) टिपरी ( चिमना ). ( ८ ) लाखोटा चिमना. ( ९ ) बालक्रछाटि पद ( चिमना ). ( १० ) गोम्मट गीत ( चिमना ). ( ११ ) ज्ञानचंद्रफळी ( चिमना ). ( १२ ) चंद्रनाथ – आरती. ( चिमना पंडित ) ( १३ ) पुगडी ( चिमनापंडित ) ( १४ ) पिंगा ( चिमना पंडित ) ( १५ ) मुनिसुव्रत -- विनती ( हिंदी ) चिमनापंडित

क्रमांक १० : श्री. दोडल यांच्या संग्रहातील कामराजकृत सुदर्शन चरित्राची प्रत, आकार ९॥" × ५॥". पृष्ठसंख्या ६१. प्रतीची पुष्पिका पुढीलप्रमाणे आहे. " इति सुदर्शन चरित्र संपूर्ण समाप्त । श्रीरस्तु । शके १७०४ आश्विन वद्य ४ शनिवासरे सीरड महानगरे शातिनाथ चैत्यालये धर्मचंद्रशिष्य ब्रह्मनेमीसागरजीने कर्मक्षयार्थं । "

क्रमांक ११ : श्री. दोडल यांच्या संग्रहातील 'दानशीलतपभावना' ( दामापंडित ) ची प्रत आकार १०" × ५॥" पृष्ठसंख्या ४५, प्रतीविषयी माहिती पुष्पिकेत पुढीलप्रमाणे मिळते: " शके १६९६ अधिक वद्य ११ त्रिंतुर महानगरे महावीर चैत्यालये लिखीत ब्रह्मनेमिसागरे स्वहस्तेन । "

## सारांश

वर बारा गावांच्या ५० पोथ्यांचे विवरण दिले आहे. येथे मला त्या पोथ्यांतील ग्रंथांसंबंधी काही लिहावयाचे नाही. फक्त त्यांचे काही आढळलेले विशेष नमूद करावयाचे आहेत.

( १ ) बहुतेक पोथीकारांनी ज्या त्या ग्रंथाच्या अंती पुष्पिकावाक्य लिहून काळ, स्थळ यासंबंधी माहिती दिलेली आहे. त्यावरून घराचाही बोध होतो.

( २ ) ह्या पोथ्या गावांतील जिनमंदिरासारख्या पवित्र ठिकाणी बनविल्या जात असत. विशेषत: स्वतःच्या 'ज्ञानावरणकर्मक्षयार्थ' अथवा 'पठनार्थ' किंवा 'गुरूच्या पठनार्थ' ह्या प्रती बनवीत. उदा. (नागपूर क्रमांक १, अंजनगावसुर्जी क्रमांक १ ).

पोथीलेखन जेथे झाले आहे ती गावे पुढील आहेत: शिरडशहापूर, देऊळगाव, मानवत, कारंजा, सिऊर ( ? ), डोणगाव, घरणगाव, तांबगाव, वेराळे ( सोलापूर ), धाराशिव, वसमत, जिंतुर. प्रतीकर्त्यांनी त्या त्या ठिकाणच्या जैन मंदिरांचा उल्लेख केल्यामुळे थोडासा पूर्वइतिहासही कळतो. आज तेथे मंदिर आहे अथवा नाही याच्याही संशोधनास त्याचा उपयोग होतो.

( ४ ) प्रती लिपिकारात भिन्न भिन्न दर्जाचे लोक दिसतात. नेमसागर कर्नाटके, पंडित भीमचंद्र, रायाजी पूजारा हिंगोली क्रमांक ( १ ), अमरसागर नागपूर ( ३ ) कारंजा ( १ ) हिंगोली ( १० ). त्यागी, पंडित, पूजारी, उपासनी असे विविध लोक त्यात दिसतात.

( ५ ) काही प्रती लेखकाच्या समकालीन दिसतात. उदा. नागपूर ( ३ ). या प्रतीत अमरसागराने दामाजी पंडिताच्या पठनार्थ चारित्रपूजेची प्रत बनविली. पण त्याच अमरसागरने सिउर येथे दामाजींच्या जंबूस्वामीचरित्राची प्रत त्याच पोथीत बनविली आहे. म्हणजे ही प्रत दामाजींच्या काळीच बनविली गेली असा निष्कर्ष निघतो.

( ६ ) प्रतिकालासंबंधी संवत किंवा शके यांचा उपयोग केलेला आहे. अगदी अलीकडील प्रतीत तारीख व इंग्रजी महिन्याचाही उल्लेख आहे. उदा. परभणी क्रमांक २. महावीर संवत्‌चा मात्र उपयोग बहुधा कोठेही इतरत्र आढळत नाही. पण मराठी हस्तलिखित प्रतीत त्याचाही उपयोग साह रत्नकाने केला आहे. उदा० हिंगोली २.

या प्रतीत पान ३२९ वर सुदर्शनचरित्र संपल्यानंतर पुढील पुष्पिका वाक्य आहे.

" अथ श्री महावीर तीर्थंकरनो वारो ॥ २४३० सवत १७४५ शाके १६१० वर्षे श्रावण पद मासे कृष्ण पक्ष अष्टमी ८ तीथ बुद्धवासरे। संपूर्ण। श्री मूलसंघे सेनगणे पुष्कर गच्छाम्नाये भ. श्री जिनसेन श्रावक श्री अर्जुन रत्नकेन लिखितं। ज्ञाति बघेरवाळ गोति साहूला। ". या ठिकाणी रत्नकाने 'महावीरनो वारो' म्हणून २४३० दिला आहे. शके १६१० मध्ये महावीर संवत २४३० कसा हा प्रश्न पडतो. महावीर संवत्‌बद्दल जे वाद आहेत त्यात याही उल्लेखाचा काही उपयोग होण्याची शक्यता आहे.

(७) काही प्रतींत कन्नड रचनाही देवनागरी लिपीत आहेत. विशेषतः आरत्या व पदे या बाबतीत असे झाले आहे. उदा. हिंगोली क्रमांक ९ मध्ये पान १८ वर कानडी आरती म्हणून 'मंगलारति यानिति । जिनवरा पाडी । मंगलारति यानिति । पोंगल सगल वेडंगिन कुचगलु, बंगलु मिगळ सोबगिन वतियरु ॥ १ ॥' ही आदीश्वरांची ४ कडव्यांची आरती लिहिली आहे. झिंतुरच्याही आरती–संग्रहात काही कन्नड रचना आहेत. कित्येक गुजराती आणि हिंदी ग्रंथ मराठी हस्तलिखितात आढळतात. याचे एकच कारण की वाचकांना त्यातील कोणतीही भाषा वर्ज्य नव्हती.

(८) काही पोथ्या सचित्रही आहेत. उदा. बारठाणा (२).

(९) श्रेणिक चरित्र (ब्रह्मगुणदास), धर्मामृत (गुणकीर्ति), दानशील-तपभावना (दामा), पार्श्वनाथ भवांतर (मेघा), बारा अनुप्रेक्षा (गुणकीर्ति) या ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती अधिक आहेत. पद्मपुराण (गुणकीर्ति)' श्रेणिक चरित्र (जनार्दन) या ग्रंथांच्या हस्तलिखित प्रती शोध करूनही सापडल्या नाहीत.

(१०) मी पाहिलेल्या हस्तलिखित प्रतीत अंजनगाव सुर्जी येथील क्रमांक १ ही शके १५७७ ची प्रत ही त्यात जुनी (डॉ. जोहरापुरकरांनी धर्मामृत ग्रंथाच्या शके १५७१ मधील प्रतीचा परिचय त्यांनी संपादिलेल्या धर्मामृतात पान ७ वर दिला आहे.) मानावी लागेल. ही 'धर्मामृत' व 'रुक्मिणीहरण' या गुणकीर्तींच्या ग्रंथाची प्रत आहे.

## अभ्यासाची साधने :

### हस्तलिखित ग्रंथ

(हस्तलिखिताचा परिचय वर दिला आहे, येथे ग्रंथ ज्या गावच्या ज्या क्रमांकाच्या हस्तलिखितातून अभ्यासासाठी घेतला त्याचा निर्देश त्या त्या ग्रंथासमोर केला आहे.)

| ग्रंथ | कर्ता | गाव व हस्तलिखित | क्रमांक |
|---|---|---|---|
| अनंतनाथ – आरती | माणिकनंदी | झिंतुर | २ |
| अनंतव्रत कथा | चिमनापंडित | बारठाणा | १ |
| अभंग | धर्मचंद्रसेवक | हिंगोली | ८ |
| अरिहंत – आरती | महीचंद्र | सोलापूर | ४ |
| अष्टकर्म प्रकृति | यादवसुत | नागपूर | २ |
| अहिराणीगीत | नींबा | वासीम | १ |
| आदिनाथ – आरती | चिमनापंडित | झिंतुर | ३ |
| आदीश्वर भवांतर | छत्रसेन | झिंतुर | ४ |
| आत्मख्याती टीका | ? | सोलापूर | ५ |

| ग्रंथ | कर्ता | गाव व हस्तलिखित | क्रमांक |
|---|---|---|---|
| उखाणे | संकलन | नागपूर | ३ |
| कंसाचे पद | सटवा | डॉ. जोहरापूरकर संग्रह, नागपूर | — |
| कर्माष्टमीकथा | अर्जुनसुतसोयरा | अंजनगाव सुर्जी | २ |
| कालिकापुराण | देवेंद्रकीर्ती | शिरड | ५ |
| कोतकी | सोमवंशी ठकुजी | शिरड | १ |
| कृष्णगीत | मेघराज | वासीम | १ |
| गरुड पंचमी कथा | महीचंद्र | जिंतुर | २ |
| गुजरी मन्हारी गीत | मेघराज | वासीम | १ |
| गुरु – आरती | यमासा | जिंतुर | ३ |
| गुरु – आरती | भीमचंद | सोलापूर | ४ |
| गुरु – गीत | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| गोमटस्वामी आरती | राया | शिरड | १ |
| गोमटस्वामी गीत | मेघराज | हिंगोली | ९ |
| चंद्रनाथ आरती | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| चंद्रनाथ आरती | माणिकनंदी | जिंतुर | ३ |
| चक्रवर्तीचा पाळणा | गंगादास | हिंगोली | ८ |
| चिंतामणिपार्श्वनाथ आरती | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| चिंती रे चिंती माझ्या मना | दिनासा | शिरड | १ |
| चूडचिंतामणि आरती | महीचंद्र | जिंतुर | ३ |
| चेंडूफळी | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| जंबूस्वामी चरित्र | दामापंडित | नागपूर | ३ |
| जंबूस्वामी चरित्र | दामापंडित – रत्नसा | जिंतुर | १ |
| जयजय पारिस्वनाथा (पद) | मानकीर्ती | नागपूर | ३ |
| जिनरात्री व्रतकथा | लक्ष्मीचंद्र | जिंतुर | २ |
| जिनवर–विनती | राया | शिरड | ३ |
| झंपा | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| टिपरी | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| तनना तनना ( पद ) | मानकीर्ती | नागपूर | ३ |
| तीर्थंकरांची भूपाळी | बोन | हिंगोली | ८ |
| तीर्थवंदना | चिमनापंडित | जिंतुर | ४ |
| दशलाक्षणिक व्रतकथा | अनंतकीर्ती | शिरड | २ |
| दानशीलतपभावना | दामा पंडित | जिंतुर | १ |

| ग्रंथ | कर्ता | गाव व हस्तलिखित | क्रमांक |
|---|---|---|---|
| धंदागीत | गुणकीर्ती | कारंजा | ४ |
| धर्मपरीक्षा | विशालकीर्ती | हिंगोली | २ |
| नंदीश्वर आरती | छत्रसेन | जिंतुर | ३ |
| नंदीश्वरकथा ( अष्टान्हिक कथा ) | महीचंद्र | जितुर | १ |
| नवकार मंत्र प्रकृतिगीत | वीरदास | नागपूर | ६ |
| नेमिनाथ भवांतर | महीचंद्र | जितुर | ५ |
| नेमिनाथ भवांतरपद | चिमनापंडित | शिरड | ३ |
| नेमीश्वरगीत (राजमतीधावा) | महीचंद्र | शिरड | १ |
| नेमीश्वर पाळणा | चिमनापंडित | शिरड | ३ |
| नेमीश्वर मऱ्हाटी गीत | नीबा | वासीम | १ |
| पद्मावती आरती | रामकीर्ती | नागपूर | ५ |
| पद्मावती पाळणा | देवेंद्रकीर्तिशिष्य ( ? ) | जिंतुर | ५ |
| पद्मावती शृंगार | चंद्रकीर्ती | जितुर | ५ |
| पार्श्वनाथ आरती | तानू पंडित | शिरड | ३ |
| पार्श्वनाथ आरती | पद्मकीर्ती | सोलापूर | ४ |
| पार्श्वनाथ आरती | राया | शिरड | १ |
| पार्श्वनाथ भवांतर | गंगादास | नागपूर | ५ |
| पार्श्वनाथ भवांतर | मेघराज | शिरड | ३ |
| पिंगा | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| पुण्यास्रव पुराण | जिनसेन | बाहुबली | १ |
| पुगडी | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| बालक छाटी पद | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| भविष्यदत्त बंधुदत्तपुराण | दयासागर | हिंगोली | २ |
| भूपाळी | चिमनापंडित | शिरड | ३ |
| मानकीर्तिमुनि पूजिती भव्य प्राणी ( पद ) | मानकीर्ती | नागपूर | ३ |
| महावीर पाळणा | महीचंद्र | कारंजा | ४ |
| मातेची सोळा स्वप्ने | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| माणिकस्वामी आरती | राया | शिरड | १ |
| मेघमाला व्रतकथा | लक्ष्मीचंद्र | म. सा. पत्रिका. जा. फे. मार्च १९५६ ( परिचय ). | |
| म्हणे मानकीर्ति साधोनी लाहे | मानकीर्ती | नागपूर | ३ |

| ग्रंथ | कर्ता | गाव व हस्तलिखित | क्रमांक |
|---|---|---|---|
| रत्नकरण्ड श्रावकाचारटीका | गुणकीर्ती (?) | हिंगोली | ४ |
| रविवार कथा | पुण्यसागर | हिंगोली | २ |
| रविवार व्रतकथा (मोठी) | यमासा | हिंगोली | ३ |
| रामचंद्र फाग | गुणकीर्ती | वासीम | ८ |
| रामायणी कथा | मेघराज | शिरड | ४ |
| रुक्मिणी व्रत कथा | विशालकीर्ति | हिंगोली | ७ |
| रुक्मिणीहरण | गुणकीर्ति | अंजनगांवसुर्जी | ५ |
| लाखोटा | चिमनापंडित | हिंगोली | ९ |
| विंचू गीत | गुणदास | कारंजा | ४ |
| शांतिनाथ आरती १ | राया | शिरड | १ |
| शांतिनाथ आरती २ | राया | शिरड | १ |
| शांतिनाथ स्तोत्र | महीचंद्र | सोलापूर | ४ |
| शिवानेमि संवाद | हरवा | सोलापूर | ४ |
| संमेद शिखरमाहात्म्य | चंद्रकीर्ती | शिरड | ६ |
| समवशरण आरती | माणिकनंदी | जिंतुर | ३ |
| सम्यक्त्वकौमुदी | महीचद्र | कारंजा | १ |
| सरस्वती आरती | छत्रसेन | जिंतुर | ३ |
| स्वात्मविचार | दिलसुख | कारंजा | ३ |
| सिद्धसेन-गुरु-आरती | रतन | भट्टारक संप्रदायात उल्लेख | पान २३ |
| सिद्धसेनस्तुती | राघव | ,, | पान २५ |
| सुगंध-दशमी-व्रतकथा | पंत सावाजी | जिंतुर | १ |
| सुदर्शन चरित्र | कामराज | हिंगोली | २ |
| सुदर्शन चरित्र | वीरदास | नागपूर | ४ |
| सुमतिप्रकाश | कवींद्र सेवक | वासीम | ३ |
| श्रेणिक चरित्र | गुणदास | — | — |
| हरिवंश पुराण | जिनदास | सोलापूर | २ |
| क्षमा गीत | गुणदास | वासीम | १ |
| क्षेत्रपाल आरती | तानू पंडित | सोलापूर | ४ |
| क्षेत्रपाल आरती | राया | शिरड | १ |
| ज्ञानोदय | (?) | कारंजा | २ |

## अभ्यासाची साधने

### मुद्रित मराठी जैन ग्रंथांची यादी

( खालील मराठी जैन ग्रंथ अथवा रचना मुद्रित झाल्या आहेत. प्राचीन मराठी जैन साहित्याच्या अभ्यासाच्या साधनात त्यांचेही स्थान महत्त्वाचे असल्यामुळे त्यांची माहिती येथे संकलित केली आहे. ).

| ग्रंथ | ग्रंथकर्ता | प्रकाशक |
|---|---|---|
| अनंत–व्रतकथा | अभयकीर्ति | सन्मति, मे, १९५८. |
| आदिनाथ–पुराण | महीचंद्र | जि. ना. चवडे, वर्धा. |
| उपदेश रत्नमाला | जिनसेन | रा. र. चौगुले, गळतगे ( चिकोडी ) |
| उपदेश रत्नमाला | रत्नकीर्ति | परिचय म. शा. पत्रिका जा. फे. मार्च १९५६. |
| गान्हार्णे (गीत) | गुणदास | सन्मति, जुन-जुलै, १९६०. |
| चेतन–फाग | कामराज | सन्मति, नोव्हें.डिसें.१९५९. |
| जशोधर पुराण | गुणनंदी | शा. घ. आलासे, कुरुंदवाड. |
| जसोधर-रास | मेघराज | जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर. |
| जंबूस्वामी पुराण | जिनसेन | क. ने. उपाध्याय, नादणी, ( कोल्हापूर ). |
| जिनसागर यांची समग्र कविता | जिनसागर | जी. जैन ग्रंथमाला, सोलापूर. |
| त्रिकाळ तीर्थंकर पूजा | चिमनापंडित | जिनेंद्रमंगल आराधना, दोडल वकील, हिंगोली. |
| धर्मपरीक्षा | देवेंद्रकीर्ति | वर्धा. |
| धर्मामृत | गुणकीर्ति | जी. जैन ग्रंथमाला, सोलापूर. |
| धर्मामृत पुराण | दयासागर | जि. ना. चवडे, वर्धा. |
| नेमिनाथ जिनदीक्षा | गुणकीर्ती | धर्मामृत, परिशिष्ट ३ |
| नेमिनाथ पाळणा | गुणकीर्ती | धर्मामृत परिशिष्ट १. |
| नेमिनाथ वऱ्हाड | वीरदास | सन्मति, जून-जुलै, १९६०. |
| नेमिनाथ विवाह | गुणकीर्ती | धर्मामृत परिशिष्ट २. |
| पद्मपुराण | गुणकीर्ती | जयचंद्र श्रावणे, वर्धा. |
| पद्मपुराणातील अनुप्रेक्षा | गुणकीर्ती | सन्मती, आगस्ट-सप्टेंबर १९५९. |

| ग्रंथ | ग्रंथकर्ता | प्रकाशक |
|---|---|---|
| परमहंस कथा | पं. सूरिजन | जी. जैन ग्रंथमाला, सोलापूर. |
| पांडव पुराण | गिरिसुत (ठकाप्पा) | ? |
| बहुतरी | वीरदास | सन्मति – नोव्हेंबर, डिसेंबर १९५९. |
| बारमासी | दिनासा | सुषमा एप्रिल-मे, १९६०. |
| महती-काव्य-कुंज | महतीसागर | वी. को. गांधी, फलटण. |
| यशोधर चरित्र | नागो आया | यशोधररास, परिशिष्ट. |
| रामचंद्र हळदुली | गुणदास | सन्मति, नोव्हेंबर, डिसेंबर १९५९. |
| शीलतरंगिनी पुराण | महाकीर्ति | जयचंद्र श्रावणे, वर्धा. |
| श्रेणिकचरित्र | जनार्दन | जि. ना. चवडे, वर्धा. |
| सम्यक्त्व-कौमुदी | दयासागर | जि. ना. चवडे, वर्धा. |
| सेटी महात्म्य | रघू | सुगवाणी, ऑगस्ट, १९५८. |
| हनुमान पुराण | दयासागर | जयचंद्र श्रावणे, वर्धा. |

प्राचीन मराठीतील सुमारे १०० हस्तलिखित व ३० मुद्रित, व इतर लहानमोठ्या रचना यांच्या आधारे हा अभ्यास सादर केला असल्यामुळे त्यांना 'अभ्यासाची साधने' असे म्हटले आहे. त्या साधनांच्या संदर्भस्थळाचा परिचय येथे करून दिला आहे.



# मराठी जैन ग्रंथ सूची

* * *

# मराठी जैन ग्रंथकार सूची

* * *

## स्थल-सूची

* * *

# सामान्य सूची

* * *

# संकेतसूची

## मराठीतील जैन ग्रंथ.

आ. भ. – आदिनाथ भवांतर ( छत्रसेन ).
आदि. पु. – आदिपुराण ( महीचंद्र ).
कर्मा. क. – कर्माष्टमी कथा. ( अर्जुनसुतसोयरा ).
का. पु. – कालिकापुराण ( देवेंद्रकीर्ति ).
ज. रा. – जसोधर रास ( मेघराज ).
ध. प. – धर्मामृत – ( गुणकीर्ति ) परिच्छेद.
प – परिच्छेद.
प. क. – परमहंसकथा ( पं. गुरिजन ).
प. पु. – पद्मपुराण. – ( गुणकीर्ति ).
प. पु. अनुप्रेक्षा – ( पद्मपुराणातील अनुप्रेक्षा ).
श्रे. च. ज. – श्रेणिकचरित्र ( जनार्दन ).
श्रे. च. गुण. – श्रेणिकचरित्र ( गुणदास ).
स. शि. महात्म्य – संमेदशिखर महात्म्य ( चंद्रकीर्ति ).
सु. च. का. – सुदर्शनचरित्र ( कामराज ).
सु. च. वी. – सुदर्शनचरित्र ( वीरदास ).
ह. पु. – हरिवंशपुराण ( जिनदास ).
( संदर्भातील प्रथमांक अध्याय किंवा प्रकरणदर्शक असून नंतरचे अंक ओवी किंवा श्लोकदर्शक आहेत. )

## इतर ग्रंथ

भ. सं. – भट्टारक संप्रदाय.
दे. ना. – देशीनाममाला.

# संदर्भग्रंथसूची


अलंकारचिन्तामणिः – ' अजितसेनाचार्यकृत. प्रकाशक–सखाराम नेमचंद दोशी. सोलापूर. शकाब्दाः १८२९.

एकनाथांची गाथा – सं. आपटे व किंजवडेकर, चित्रशाळा प्रकाशन, पुणे.

गुर्जररासावली – ओरिएंटल इन्स्टिटयूट, बडोदा, १९५६.

गोम्मटसारजीवकांड – (नेमिचंद्राचार्य) परमश्रुत प्रभावक मंडल, बम्बई, १९१६.

जिनरत्नकोशः – प्रो. हरि दामोदर वेलणकर, भांडारकर ओरिएंटल रीसर्च इन्स्टिटयूट, पुणे, १९४४.

जसोधररास – (मेघराज) सं. सुभाषचंद्र अक्कोळे, जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर १९५९.

जिनसागर यांची समग्र कविता – सं. प्रा. विद्याधर जोहरापुरकर, जीवराज जैन ग्रंथमाला सोलापूर १९५९.

जिनेंद्रमंगल आराधना – सं. जयकुमार दोडल, हिंगोली (परभणी), १९५६.

जैन गुर्जर कविओ भाग ३ – खंड १ – सं. मोहनलाल दलीचद देसाई, श्वेतांबर जैन कॉन्फरन्स ऑफिस, मुंबई. १९४४.

जैन तत्त्वज्ञान (हिंदी) – ले. पंडित सुखलाल संघवी, जैन कल्चरल रीसर्च सोसायटी, बनारस हिंदु युनिव्हर्सिटी.

जैनदर्शन (हिंदी) – ले. महेन्द्रकुमार न्यायाचार्य, बनारस.

जैनशिलालेखसंग्रह भा. ३ – माणिकचंद दि. जैन ग्रंथमाला, मुंबई. १९५७.

जैन साहित्य और इतिहास (हिंदी) द्वितीयावृत्ती – पं. नाथूराम प्रेमी, संशोधित साहित्यमाला, ठाकुरद्वार, बंबई २ १९५६.

छंदोरचना – सं. डॉ. माधव त्र्यंबक पटवर्धन.

तत्त्वार्थसूत्र (उमास्वाति) – सं. कैलासचंद्र शास्त्री. भारतवर्षीय दि. जैन संघ, मथुरा, वीर. नि. संवत २४७७.

तिलोयपण्णत्ती भाग १ प्रथमावृत्ति – सं. डॉ. ए. एन्. उपाध्ये, डॉ. हिरालाल जैन. जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, १९४३.

द्रव्यसंग्रहः (नेमिचंद्र) – रायचंद जैन ग्रंथमाला, मुंबई.
दासबोध (समर्थ रामदास) – केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई.
धर्मामृत (गुणकीर्ती) – सं. प्रा. विद्याधर जोहरापुरकर, जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, १९६०.
नलदमयंती स्वयंवराख्यान (रघुनाथ पंडित) – सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर.
निर्ग्रंथ संप्रदाय (हिंदी) – पं. सुखलाल संघवी, जैन कल्चरल रीसर्च सोसायटी, बनारस हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस.
पाइअसद्दमहण्णव – सं. पं. हरगोविंददास.
परमहंसकथा (पं. सूरिजन) – सं. सुभाषचंद्र अक्कोळे, जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, १९६०.
पार्श्वनाथांचा चातुर्याम धर्म – धर्मानंद कोसंबी, धर्मानंद स्मारक ट्रस्ट मुंबई, १९४९.
पुरातन जैन वाक्यसूची – सं. जुगलकिशोर मुख्तार, वीरसेवामंदिर, सरसावा सहारनपुर, १९५०.
प्रवचनसार (कुंदकुंदाचार्य) – सं. डॉ. ए. एन उपाध्ये.
प्राचीन महाराष्ट्र भा. २ – श्री. व्यं. केतकर, व्हीनस प्रकाशन, पुणे.
बृहत्कथाकोशः (हरिषेणाचार्य) – सं. डॉ. ए. एन. उपाध्ये, सिंघी जैन ग्रंथमाला, भारतीय विद्याभवन, मुंबई,
भट्टारक संप्रदाय – सं. प्रा. विद्याधर जोहरापुरकर, जीवराज जैन ग्रंथमाला, सोलापूर, १९५८.
भारतीय संस्कृतिमें जैन धर्मका योगदान (हिंदी) – ले डॉ. हीरालाल जैन, मध्यप्रदेश शासन साहित्य परिषद, भोपाल १९६२.
मराठी भाषा उद्गम व विकास (आवृत्ती ३ री) – प्रा. कृ. पां कुलकर्णी, मॉडर्न बुकडेपो प्रकाशन, पुणे.
मराठीचे साहित्य शास्त्र – डॉ. मा. गो. देशमुख, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे.
महती काव्यकुंज – प्रकाशक–वीरचंद कोदरजी गांधी, फलटण, शके १८५७.
महतीसागराचे व कवींद्र सेवकाचे अभंग – प्रकाशक–हिराचंद नेमचंद दोशी, सोलापूर, १९२२.
महतीसागर चरित्र – अनतराज आवाजी बोपलकर, १९३७.
महाराष्ट्रीय ज्ञानकोश (भ) (श) – डॉ. श्री. व्यं. केतकर.

महाराष्ट्रजीवन परंपरा प्रगती आणि समस्या खंड १ – सं. गं. बा. सरदार, जोशी लोखंडे प्रकाशन, पुणे १९६०.
महाराष्ट्र सारस्वत – वि. ल. भावे, डॉ. शं. गो. तुळपुळे, – पुरवणी.
मऱ्हाटी संस्कृती – शं. बा. जोशी, आंतरभारतीय प्रकाशन, पुणे १९५२.
माझे चिंतन ( प्रथमावृत्ती ) – डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे.
रत्करण्ड श्रावकाचार ( समंतभद्र ) – बा. मु. पाटील, द. म. जैनसभा, सांगली.
रुक्मिणी स्वयंवर ( एकनाथ ) – केशव भिकाजी ढवळे प्रकाशन, मुंबई, शके १८७२.
वसुनंदी श्रावकाचार – भारतीय ज्ञानपीठ, (मूर्तिदेवी जैन ग्रंथमाला) बनारस.
वैदिक संस्कृतीचा विकास ( प्रथमावृत्ति ) – तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्राज्ञपाठशाळा, वाई.
षट्खण्डागम, खंड १ – सं. डॉ. हीरालाल जैन, सिताबराय लक्ष्मीचंद जैन साहित्योद्धारक फंड ( अमरावती ) १९३९.
सागारधर्मामृतम् – (पं. आशाधर) माणिकचंद दि. जैन ग्रंथमाला म. नं. २, मुंबई.
संत वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति – ले. गं. बा. सरदार.
हिंदी साहित्यका आदिकाल ( द्वितीय संस्करण ) – आचार्य हजारी प्रसाद द्विवेदी. बिहार राष्ट्रभाषा परिषद पटना.
ज्ञानेश्वरी – महाराष्ट्र राज्य शिक्षणखाते, १९६३

## इंग्रजी ग्रंथ.

Ancient India – By T. L. Shaha.
Bharatiya Vidya-bhavan's History of Indian People Vol. II.
Jain Community-A Social Survey – By Vilas Adinath Sangve, Popular Book Depot, Bombay 7.
Mysticism in Maharashatra – By R. D. Ranade.
Mysore and Coorg from Inscriptions – Rice B. L. London, 1921.

* The Jains in the History of Indian Literature – By Winternitz.

Studies in Jainism (Jacobi) – Edited by Jinvijaya Muni, Ahmadbad. 1916.

Yasastilaka & Indian Culture – By K. K. Handiqui, Jivraj, Jain Granthmala, Sholapur 1949.

*(प्रस्तुत संदर्भ डॉ.ए. एन. उपाध्ये यांच्या बृहत्कथाकोश या ग्रंथाच्या प्रस्तावनेतून घेतला आहे. ).

## मासिके.

अनेकान्त ( दिल्ली ) – वर्ष ८ किरण, १. वर्ष ११, किरण ९.

प्रतिष्ठान ( औरंगाबाद ) – मे,१९६०.

महाराष्ट्र साहित्यपत्रिका (पुणे) – जा. फे. मार्च १९५६. अंक १४०, वर्ष ३४ – १९६२.

सन्मति (बाहुबली–)कोल्हापूर. – नोव्हेंबर १९५३, डिसेंबर १९५८, ऑगस्ट १९५९, नोव्हें. डिसें. १९५९. जानेवारी १९६०, सप्टेंबर १९६३.

सुषमा ( नागपूर ) – एप्रिल, मे, १९६०.

युगवाणी ( नागपूर ) – ऑगस्ट १९५८.

विविधज्ञानविस्तार ( मुंबई )– मे, १९२४

हिंदी अनुशीलन – अंक ४, संवत २०१०.

* * *

## प्रबंधांत उपयोजिलेल्या कांही जैन पारिभाषिक शब्दांचे अर्थ

**अतिथिसंविभागव्रत**–त्यागी, संयमी अशा व्यक्तींची सेवा शुश्रूषा करणे. त्यांना भक्तीने दान देणे. **अधर्मद्रव्य** – जीव पुद्‌गला (जड) च्या स्थिर राहण्याला साहाय्य करणारे द्रव्य. (वाटसरूंना झाडाची सावली साहाय्य करते त्याप्रमाणे). **अधिगमज** – शास्त्राच्या अभ्यासाने निर्माण होणारे. **अनगारधर्म** – अगार म्हणजे घर. घराचा त्याग करणारे जे यति – मुनि त्यांचा धर्म. **अनर्थदंडव्रत** – निष्कारण अशा क्रियांचा त्याग करणे. **अनायतन** – अपूज्य ठिकाण. **अनुप्रेक्षा** – संसारापासून विरक्ति उत्पन्न होण्यासाठी वारंवार संसारस्वरूपाचे व आत्मतत्त्वाचे चिंतन करणे. **अनुयोग** – जैनागमाचे वर्णन करणारे निरनिराळे शास्त्राचे विभाग. उदाहरणार्थ कथा-पुराण वर्णन करणारी शास्त्रे प्रथमानुयोगात येतात. तर आचारविषयक ग्रंथांचा समावेश चरणानुयोगात होतो. **अणुव्रत** – हिंसा, असत्य, चोरी, कुशील व परिग्रह या पांच पापांचा स्थूलतः त्याग करणे. **अमूर्तिक** – स्पर्श, रस, गंध, वर्ण यांनी रहित. **अरिहंत**– आठ कर्मांपैकी चार घातियाकर्मांचा नाश करणारे व केवलज्ञानादि गुणयुक्त असे जीव. **अस्तिकाय ( पंच )** – बहुप्रदेशी. जीव, पुद्‌गल, धर्म–अधर्म आणि आकाश ही पांच द्रव्ये बहुप्रदेशी आहेत. म्हणून त्यांना पंचास्तिकाय म्हणतात. **आकिंचन्य** – अंतर्बाह्य परिग्रहांचा त्याग. **आस्रवतत्त्व** – कर्म परमाणूंचा जीवांत प्रवेश होणे. **उत्पाद** – नवीन पर्यायांची उत्पत्ती. सुवर्णाची अंगठी बनविणे म्हणजे नवीन पर्याय उत्पन्न होणे. **उपयोग** – जीवाचे ज्ञान–दर्शनरूप स्वभाव **कषाय**–जीवाच्या गुणाचा घात करणारे क्रोध, मान, माया व लोभ हे चार दोष. **कायोत्सर्ग तप**–उभे राहून खाली दोन्ही हात सोडून नासाग्र दृष्टि ठेवून तप करणे. **केवली**–ज्याला केवलज्ञान झाले आहे असा. संपूर्ण तत्त्वांना जाणणारे ज्ञान ते केवलज्ञान. **गुणव्रते**–अणुव्रतात गुणाची वृद्धी करणारी व्रते. **गुप्ति–तीन**–मन, वचन व काय यांच्या व्यापारांना रोखून आत्म्याचें संरक्षण करणें. **गणधर**–तीर्थंकरांच्या उपदेशाचा अर्थ लोकांना समजावून सांगणारे ज्ञानी मुनी. **चरणानुयोग** – ज्या ग्रंथात श्रावक-श्राविका, मुनि – आर्यिका यांच्या आचारांचे वर्णन असते असे ग्रंथ चरणानुयोगात येतात. **चारित्र** – पापास कारण असणाऱ्या हिंसा, असत्य, चोरी, कुशील व परिग्रह यांच्यापासून विरक्त होणे म्हणजेच चारित्र. **त्रेसष्ट शलाका पुरुष** – जैन

धर्मानुसार दुषमा-सुषमा या चवथ्या कालात भारतवर्षात मानवांमध्ये श्रेष्ठ व पृथ्वीतलावर विख्यात असे त्रेसष्ट महापुरुष होऊन गेले. २४ तीर्थंकर, १२ चक्रवर्ती, ९ बलभद्र (रामचंद्र), ९ नारायण, ९ प्रतिनारायण (जरासंध) असे ६३ शलाका पुरुष होत. **नामकर्म** – जीवाचे शरीर बनविणारा कर्म. **निर्जरातत्त्व** – कर्म परमाणू जीवाच्या प्रदेशातून बाहेर जाणे. **निदानबंध ध्यान** – पुढील जन्मात आपणास अमक्या अमक्या गोष्टींची प्राप्ती व्हावी असे ध्यान करणे. **नो – कषाय** – किंचित् कषाय-हास्य, रती, अरती, भय, जुगुप्सा, स्त्रीवेद, पुंवेद व नपुंसकवेद. **दिग्व्रत** – दिशा व विदिशांमध्ये जाण्यासंबंधी प्रमाण नियम करणे. **द्रव्य** – जे सद्रूप आहे ते द्रव्य होय. अथवा जे गुण व पर्याय यांनी युक्त असते ते. जीवादि सहा. **धर्मद्रव्य** – जीव व पुद्गलांच्या गतीला साहाय्य करणारे द्रव्य (माशोळ्यांच्या हालचालीस पाणी साहाय्यभूत होते तसे. **ध्रौव्य** – द्रव्याच्या एका पर्यायाचा नाश होऊन दुसऱ्या पर्यायाची उत्पत्ती होऊनही द्रव्यत्व कायमही राहणे. अंगठी मोडून नवीन अलंकार केल्यावरही सुवर्णत्व कायम आहे. **परमाणु** – पुद्गलाचा अविभाज्य अणू. **परिषहजय** – परिषह म्हणजे क्षुधादिक त्रास. त्यांना सहन करणें म्हणजे परिषहजय. **पुद्गल द्रव्य** – ज्यात स्पर्श, रस, गंध, वर्ण हे गुण आहेत ते. **प्रतिमा अकरा** – श्रावकांनी – गृहस्थांची एकेक पायरी वाढवीत मुनीअवस्थेकडे प्रगती करावयाची असते. या पायरीला प्रतिमा म्हणतात. त्या पायऱ्या अकरा आहेत. **प्रदेश** – अविभागी असा पुद्गल परमाणू आकाशाच्या जेवढ्या भागाला व्यापतो त्या आकाशाच्या भागास प्रदेश म्हणतात. **बंधतत्त्व** – कर्मपरमाणूंचा जीवाशी काही काळ संबंध राहणे. **भट्टारक** – शंकराचार्यांच्या मठाप्रमाणेच जैनाचार्यांचेही मठ होते. त्या मठाच्या अधिपतींना भट्टारक म्हणत असत. **भोगोपभोगसंख्याव्रत** – परिग्रहावरील आसक्ति कमी करावी म्हणून भोगोपभोगाच्या वस्तूंची ठराविक मर्यादा करणे. **महाव्रत** – हिंसा, असत्य, चोरी, कुशील व परिग्रह यांचा संपूर्णपणे त्याग करणे. **मूढता** – मूर्खपणा, हिंसक देवाची उपासना ही देवमूढता. हिंसक लोकाचार पाळणे ही लोकमूढता व ढोंगी– हिंसक गुरूंच्या नादी लागणे ही गुरु मूढता होय. **मूलगुण** – मद्य, मांस व मध या तीन मकारांचा व पंच उदुंबर फळांचा त्याग असे श्रावकाचे आठ मूलगुण आहेत. **मोक्षतत्त्व** – सर्व कर्म परमाणूंपासून जीवाची मुक्तता होणे. **रत्नत्रय** – सम्यग्दर्शन सम्यग्ज्ञान व सम्यग्चारित्र या तिघांना मिळून रत्नत्रय म्हणतात. **वर्गणा (कर्म)** – कर्मांच्या परमाणूंचे समूह. **विकलचारित्र** – गृहस्थी लोकांच्या चारित्राला विकल – एकदेश चारित्र म्हणतात. **वीर्यांतराय कर्म** – जीवाचा गुण अनंतशक्ती आहे. पण तो त्याचा गुण त्याला प्राप्त होऊ देण्यात अडथळा आणणारे कर्म. **वेदनीय कर्म** – जीवाला सुख किंवा दुःख देणारे कर्म. **वैयावृत्य (तप)** – गुरू आदिकांची सेवा करणे. **व्यय** – द्रव्याच्या पूर्व पर्यायांचा नाश. **शिक्षाव्रते** – ज्या व्रतामुळे मुनिव्रत पाळण्याचे शिक्षण मिळते ते शिक्षाव्रत होय.

**शुक्लध्यान** – आत्मस्वरूपात आत्मा विलीन झाल्यानंतर होणारे ध्यान. **शून्ये-सूना (पांच)** – कुटणे, दळणे, चूल पेटविणे, पाणी भरणे व झाडणे हीं पंचपातके गृहस्थाला करावीच लागतात. या क्रियांना पंचसूना म्हणतात. **श्रावक** – अहिंसादि अणुव्रते पाळणारा गृहस्थ. **श्रुतकेवली** – जैनधर्मातील द्वादशांगाचे संपूर्ण ज्ञाते असे मुनी. **सकलचारित्र** – सर्वसंगत्यागी मुनी लोकांच्या चारित्राला सकल-चारित्र अशी संज्ञा आहे. **सत्** – उत्पाद व्यय व ध्रौव्य स्वरूपाचे. **समवसरण–समोसरण** – तीर्थंकराची धर्मसभा. **समिति** – चालताना, बोलताना, आहार घेताना, वस्तू ठेवताना–उचलताना व मलमूत्र विसर्जन करताना जीवसंरक्षणाची काळजी घेणे. **सम्यक्चारित्र** – चारित्र शब्द पाहा. **सम्यग्दर्शन** – खऱ्या देव, गुरु, शास्त्रावर श्रद्धान करणे किंवा तत्त्वार्थ श्रद्धान. **सम्यग्ज्ञान** – न्यूनता, अधिकता, विपरीतता व संशय या चार दोषांनी रहित असे ज्ञान. **सम्यक्त्व** – जीवादि सप्त तत्त्वांवर दृढ श्रद्धा असणे. **सल्लेखना** – ज्याचा प्रतिकार अशक्य आहे अशा उपसर्ग, दुर्भिक्ष, म्हातारपण, रोग यांमध्ये धर्म समजून देहत्याग करणे. **सागारधर्म** – सागार म्हणजे श्रावक. घरात वास करणारा. त्याचा आचारधर्म. **सामायिक** – काही नियतकालापर्यन्त पांच पापांचा संपूर्णपणे त्याग करून साम्यावस्था धारण करणे. **सिद्ध** – आठही कर्मांचा नाश करून संसारमुक्त झालेला आत्मा. **संवर तत्त्व** – जीवाकडे येणाऱ्या कर्मपरमाणूंना संयमामुळे न येऊ देणे. **संघ-चतुर्विध** – जिनमार्गस्थ लोकसमूह, ऋषी, आर्यिका–त्यागी स्त्रिया, श्रावक व श्राविका या सर्वांस मिळून चतुर्विध संघ म्हणतात. **स्याद्वाद** – वस्तूच्या अनंतगुण स्वरूपाला मान्यता देऊन एकमेकास विरोध न येऊ देता प्रत्येक गुणाचे कथन करणे. **क्षयोपशम** – कर्मांचा क्षय व उपशम. कर्म काही काळ फळ न देता दबून राहणे अशी अवस्था.

— समाप्त —